

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई

# सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख

डॉ. वा. वि. मिराशी

मंगल कलश ( अमरावती स्तूप )



## डॉ. वा. वि. मिराशी

डॉ. मिराशी हे संस्कृत वाङ्मयाचे सहृदय समीक्षक आणि प्राचीन भारतीय इतिहासाचे प्रमाणभूत संशोधक म्हणून प्रसिद्ध आहेत.

त्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्याच्या देवगड तालुक्यातील कुवळे गावी १३ मार्च १८९३ रोजी झाला. शालेय व महाविद्यालयीन जीवनामध्ये अनेक शिष्यवृत्त्या व पारितोषिके मिळवून त्यांनी पुण्याच्या डेक्कन कॉलेजातून एम्.ए. परीक्षा प्रथम क्रमाने उत्तीर्ण केली. नंतर त्यांची नागपूरच्या मॉरिस कॉलेजात सन १९१९ मध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती झाली. ते १९४२ मध्ये मॉरिस कॉलेजचे आणि १९४७ मध्ये अमरावतीच्या विदर्भ महाविद्यालयाचे प्राचार्य होऊन १९५० मध्ये सेवानिवृत्त झाले. नंतर १९५७ ते १९६६ पर्यंत त्यांनी नागपूर विद्यापीठाच्या स्नातकोत्तर विभागाचे प्रमुख आणि प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती विभागाचे सन्मान्य प्राध्यापक म्हणून काम केले.

विद्वत्ता आणि संशोधन कार्य यांमुळे डॉ. मिराशींना अनेक सन्मान प्राप्त झाले. सन १९४१ मध्ये भारत सरकारने त्यांना 'महामहोपाध्याय' पदवीने विभूषित केले. सन १९५६ मध्ये मध्य प्रदेश साहित्य परिषदेने राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते त्यांना ताम्रपट व महावस्त्र देऊन त्यांचा सत्कार केला. सागर, मुंबई, नागपूर व संपूर्णानन्द (वाराणसी) विद्यापीठांनी अनुक्रमे सन १९५८, १९५९, १९६० व १९७८ मध्ये त्यांना डी.लिट्. ही सर्वोच्च पदवी देऊन विभूषित केले. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद, भारतीय इतिहास परिषद आणि भारतीय नाणक परिषद यांनी आपले अध्यक्षपद देऊन त्यांचा गौरव केला. विदर्भ संशोधन मंडळाच्या सन १९३४ मधील स्थापनेपासून ते त्याचे कार्याध्यक्ष आहेत. त्या मंडळाने त्यांना १९६५ मध्ये राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् यांच्या हस्ते गौरवग्रंथ अर्पण केला. डॉ. राधाकृष्णन् यांनी सन १९६७ मध्ये 'संस्कृत विद्येतील प्रावीण्य आणि शास्त्रनिष्ठा' यांचे प्रमाणपत्र देऊन त्यांना भूषविले. सन १९७३ मध्ये भारत शासनाने त्यांना आपल्या पुरातत्त्व विभागाचे सन्मान्य सल्लागार नेमले आणि सन १९७४ मध्ये भारतीय

(पुढील फ्लॅपवर चालू)

(मागील फ्लॅपवरून चालू)

साहित्य अकादमीने त्यांना आपले फेलो नेमून त्यांचा गौरव केला. भारतीय नाणक परिषद आणि भारतीय पुराभिलेख परिषद यांनीही त्यांचा तसाच सन्मान केला आहे. सन १९७५ मध्ये राष्ट्रपती फक्रुद्दीन अलीअहमद यांनी त्यांना 'पद्मभूषण' ही पदवी अर्पण केली. सन १९७८ मध्ये भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळाने आपल्या हीरक महोत्सवप्रसंगी त्यांना आपले सन्मान्य सभासद नेमून आपला त्यांच्याविषयी आदर व्यक्त केला.

डॉ. मिराशींनी आतापर्यंत ३२ संशोधनपर ग्रंथ इंग्रजी, मराठी, हिंदी आणि उडिया भाषांत प्रसिद्ध केले आहेत. त्यांपैकी तीन भारत शासनाच्या पुरातत्त्व विभागाने आणि दोन नागपूर विद्यापीठाने प्रकाशित केले आहेत.



महाराष्ट्राचा आद्य आणि वैभवशाली राजवंश सातवाहन आणि तत्कालीन महाराष्ट्र, गुजराथ, काठेवाड आणि माळवा या प्रदेशांवर काही काळ राज्य करणारे पश्चिमी क्षत्रप यांचे सर्व उपलब्ध कोरीव लेख देऊन त्यांच्या व इतर साधनांच्या आधारे त्यांचा सर्वांगीण इतिहास सांगणारा असा हा ग्रंथ आहे.

या ग्रंथाचे दोन मुख्य भाग आहेत. पहिल्या भागात पूर्वोक्त वंशांचा सविस्तर राजकीय इतिहास दिला आहे. त्या इतिहासातील अनेक प्रश्न—उदाहरणार्थ, सातवाहन राजवंशाचे मूलस्थान, त्याच्या उदयास्तांचे काल, त्याचे तत्कालीन इतर राजवंशांशी संबंध, क्षहरात क्षत्रपांच्या लेखांतील संवत् इत्यादी—अद्यापि अनिर्णीत आहेत. त्यांची सविस्तर चर्चा करून प्रस्तुत ग्रंथात ते निश्चितपणे सोडविले आहेत. काही समस्या अत्यंत वादग्रस्त असल्यामुळे त्यांचे विवेचन स्वतंत्र परिशिष्टांत केले आहे. याशिवाय या ग्रंथात तत्कालीन राज्यव्यवस्था, धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिती, संस्कृत व प्राकृत वाङ्मय, स्थापत्य, शिल्प व चित्रकला आणि नाणी यांचे सविस्तर वर्णन केले आहे. नंतरच्या एका प्रकरणात प्रस्तुत ग्रंथातील कोरीव लेखांच्या प्राकृत भाषेची चर्चा करून त्यांतील सर्व प्राकृत शब्दांचा कोश जोडला आहे. वाचकांस तत्कालीन लेखनपद्धती, स्थापत्य, शिल्प, चित्रकला व नाणी यांची कल्पना यावी म्हणून त्यांच्या अनेक पट्टिका घातल्या आहेत.

दुसऱ्या भागाचे दोन खंड आहेत. पहिल्या खंडात सातवाहनांचे ३७ आणि दुसऱ्यात पश्चिमी क्षत्रपांचे २५ लेख दिले आहेत. ते सर्व प्राकृत भाषेत असल्यामुळे प्रत्येक लेखाला त्याचा मराठी अनुवाद जोडला आहे. नंतरच्या परिशिष्टात मागाहून मिळालेले, सातवाहन काळावर प्रकाश टाकणारे किंवा वादग्रस्त झालेले असे काही लेख घेतले आहेत. हा ग्रंथ छापला जात असता मिळालेली नवीन माहिती शेवटी जोडली आहे.

महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात अत्यंत महत्त्व पावलेला, ज्याचा महाराष्ट्रीयांस रास्त अभिमान वाटावा असा, हा सातवाहन राजवंश होय. त्यांच्या कालाची शक्य ती सर्व उपलब्ध साधने मिळवून त्यांच्या दीर्घकालीन अभ्यासाने निर्माण झालेला प्रस्तुत ग्रंथ मराठीत तरी अपूर्व गणला जाईल यात संशय नाही.

# सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख

लेखक

डॉ. वा. वि. मिराशी



महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
मुंबई

जागतिक कीर्तीचे थोर संशोधक

**डॉ. भगवानलाल इंद्रजी**

यांच्या स्मृतीस

सादर समर्पण

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत, त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठीय स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे, हा मुख्य उद्देश लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने वाङ्मयनिर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा शब्दकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती - विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे, पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही. संशोधनाला परावलंबित्व राहते व विचाराला अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे तर, वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. पारतंत्र्याच्या काळात साम्राज्यशाही राज्यकर्त्यांनी विशिष्ट दृष्टीने केलेले भारताच्या व महाराष्ट्राच्या इतिहासाचे लेखन हे स्वातंत्र्योत्तर भारताच्या संदर्भात काहीसे चुकीचे व कालबाह्य ठरले आहे. गेल्या काही वर्षांत महाराष्ट्राच्या इतिहासावर प्रकाश टाकणारी संदर्भीभूत अशी अनेक साधने उजेडात आली आहेत. ही साधने लक्षात घेऊन व अद्ययावत साधनसामुग्रीचा उपयोग करून आधुनिक इतिहास-रचनेच्या तत्त्वांनुसार महाराष्ट्राचा प्रमाणभूत असा एक सलग राजकीय–सांस्कृतिक इतिहास मराठी भाषेत नव्याने संपादित/प्रकाशित करण्याची आवश्यकता महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर निर्माण झाली होती. मंडळाने यासाठी इतिहासावरील अनेक ग्रंथ प्रकाशित/संपादित/भाषांतरित करण्याची योजना हाती घेतली. या योजनेचाच भाग म्हणून, मंडळाने नव्याने हाती आलेल्या साधनांद्वारे महाराष्ट्रेतिहास नव्याने रचण्याची योजना आखली. या महाराष्ट्रेतिहास योजनेद्वारे प्राचीन कालखंड ते आधुनिक कालखंड अशा पाच खंडात या इतिहासाचे मंडळ संपादन/प्रकाशन करीत आहे. या प्रत्येक कालखंडाचा इतिहास सुमारे ५०० पानात समाविष्ट केला जाणार आहे. या योजने-व्यतिरिक्त मंडळातर्फे इतिहासावरील अनेक पुस्तके त्या त्या विषयातील तज्ज्ञांकडून संपादित/भाषांतरित करून प्रकाशित केली आहेत. नव्याने उपलब्ध झालेल्या साधनांवरून

तसेच शिलालेख, भित्तीपत्रके, कोरीव लेख, विविध दप्तरे याद्वारे मंडळाने "महाराष्ट्रातील दप्तरखाने", "रायगडची जीवनकथा", "मराठ्यांच्या इतिहासाची साधने", "पोर्तुगीज दप्तर खंड २ व ३", "असे होते मोगल", "नानासाहेब पेशवे आणि स्वातंत्र्ययुद्ध", "महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग", "मोगल दरबारची बातमीपत्रे" इत्यादी पुस्तके प्रकाशित केली असून "मराठाकालीन भित्तीचित्रे", "महाराष्ट्र व गोवे यांच्या इतिहासाशी संबंध असलेल्या शिलालेखांची व ताम्रपटांची वर्णनात्मक संदर्भ-सूची", "ऐतिहासिक पंचांग" इत्यादी अनेक मौलिक ग्रंथ प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. तसेच अनेक ग्रंथ मंडळाच्या अनुदानाने प्रकाशित केले आहेत.

४. महाराष्ट्राचा आद्य ऐतिहासिक राजवंश "सातवाहन" याचा पश्चिमेच्या क्षत्रपांशी संबंध होता. या संबंधाचे विशेष विश्लेषण करणारे प्रस्तुत पुस्तक हे संबंध दाखविणारी सर्व उपलब्ध साधने व त्या काळातील कोरीव लेख यांच्याद्वारे प्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ म. म. डॉ. वा. वि. मिराशी, नागपूर, यांनी स्वतंत्ररीत्या व परिश्रमपूर्वक लिहिले आहे. या पुस्तकाचे मुख्य दोन भाग असून पहिल्या भागात सातवाहन राजे व पश्चिमी क्षत्रप या दोन राजवंशांचा इतिहास सर्व उपलब्ध साधनांवरून डॉ. मिराशी यांनी एकत्रित केला आहे. दुसऱ्या भागात सातवाहनांचे ३७ कोरीव लेख, २५ क्षत्रप घराण्याचे लेख व परिशिष्टात ३ इतर संलग्न अधिपतींचे लेख अशा एकूण ६५ लेखांचा अंतर्भाव केला आहे. तसेच, प्रत्येक लेखासंबंधी प्रास्ताविक माहिती, विवेचन, वाचन व मराठीत अनुवाद दिलेले आहेत. इतिहासतज्ज्ञ तसेच सामान्य वाचक यांसही उद्‌बोधक वाटेल असे हे पुस्तक "सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख" या नावाने मंडळातर्फे प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी,<br>
अध्यक्ष,<br>
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

वाई :<br>
श्रावण २४, शके १९०१.<br>
दिनांक १५ ऑगस्ट १९७९.

# लेखकाचे हृद्गत

सातवाहन हा महाराष्ट्रातील आद्य ज्ञात राजवंश. त्याच्या काळी राज्यशासन, धर्म, साहित्य व कला यांत केलेल्या प्रगतीमुळे गौरवान्वित झालेला. पण मध्यकालीन अंधकारयुगात भारतीयांना त्याची पूर्णपणे विस्मृति झाली होती. काही पुराणांतील राजवंशावलीत शिशुक (सिमुक), सातकर्णि, गौतमीपुत्र, पुळुमावि, हाल, यज्ञश्री इत्यादि राजांची नावे व त्यांच्या कारकीर्दीची वर्षे दिली होती; पण त्यांना अंध्र म्हटल्यामुळे त्यांच्या मूल स्थानाविषयी गैरसमज पसरला होता. त्यांच्या कालाविषयी तर कोणासही काही कल्पना नव्हती. मग त्यांच्या कर्तृत्वाविषयी लोकांमध्ये पूर्णपणे अज्ञान असले तर नवल नाही. त्यांनी कोरलेली चैत्य व विहार लेणी महाराष्ट्रात नाशिक, कार्ले, कान्हेरी वगैरे ठिकाणी होती खरी, पण ती फार प्राचीन काळी पांडवांनी कोरली होती अशी चुकीची कल्पना पसरली होती. म्हणून नाशिकजवळच्या लेण्यांना 'पांडव लेणी' असे नाव पडले होते. लोकांनी त्यांतील बुद्ध मूर्तींना धर्म, भीम, अर्जुन अशी नावे दिली होती. त्या लेण्यांत लहान मोठे कोरीव लेख आहेत; पण त्यांची लिपी माहीत नसल्याने त्यांचा अर्थ कळत नव्हता आणि तो जाणून घेण्याचा कोणी प्रयत्नही केला नव्हता.

ही परिस्थिति भारतात इंग्रजांचा अंमल सुरू झाल्यावर पालटू लागली. त्यांना स्वभावतःच जिज्ञासा अधिक असल्यामुळे आणि ज्या प्रजेवर आपणांस राज्य करावयाचे आहे तिचा इतिहास आणि संस्कृति यांचे ज्ञान राज्यकारभाराच्या सोयीकरिता आवश्यक असल्यामुळे त्यांनी याबाबतीत लक्ष घालण्यास सुरवात केली. सन १७८४ मध्ये कलकत्त्यास वॉरन हेस्टिंग्जच्या अध्यक्षतेखाली बंगालच्या एशियाटिक सोसायटीची स्थापना झाली. नंतर चार वर्षांनी १७८८ मध्ये तिचे नियतकालिक 'एशियाटिक रीसर्चेस' याचा पहिला व्हॉल्यूम प्रसिद्ध झाला. या चळवळीचा प्रतिसाद महाराष्ट्रातही उमटू लागला. भारतीय इतिहास, वाङ्मय, संस्कृति, कला इत्यादिकांच्या अभ्यासाकरिता इंग्लंडातील रॉयल एशियाटिक सोसायटीची शाखा मुंबईस स्थापन होऊन तिच्या सभासदांनी केलेले संशोधन तिच्या जर्नलमध्ये प्रसिद्ध होऊ लागले, आणि पूर्वोक्त विषयांच्या अभ्यासास चालना मिळाली.

सातवाहनांच्या ज्या लेखांकडे प्रथम लक्ष वेधण्यात आले ते पुण्याच्या उत्तरेस ५६ मैलांवरील नाणेघाटातील लेख होत. सन १८३७ मध्ये साइक्सने जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ४, पृ. २८८ इ. वर त्यांविषयी माहिती प्रथम प्रसिद्ध केली. त्यानंतर पुढच्याच वर्षी, सन १८३८ मध्ये, जेम्स प्रिन्सेपने जुनागड येथील महाक्षत्रप रुद्रदामन् या पश्चिमी क्षत्रपाच्या लेखाकडे जर्नल ऑफ दि बेंगाल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ७, मध्ये त्याच्या प्रतिकृति छापून लक्ष आकृष्ट केले. मुंबई जवळच्या कान्हेरी येथील लेण्यांची माहिती डॉ. बर्ड याने सन १८३९ मध्ये एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगालच्या जर्नल १०, पृ. ९ इ. वर प्रथम प्रसिद्ध केली. त्याने त्या लेण्यांतील कोरीव लेखांची माहिती सन १८४७ च्या हिस्टॉरिकल रीसर्चेस मध्ये देऊन

त्यांकडे अभ्यासकांचे लक्ष वेधले. यानंतर स्टीव्हन्सन आणि ब्रेट, एड्वर्ड आणि आर्थर वेस्ट वगैरे साहेबांनी नाशिक, कार्ले, कान्हेरी इत्यादि पश्चिम महाराष्ट्राच्या लेण्यांतील लेखांच्या यथादृष्ट प्रती (eye-copies) रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नलमध्ये प्रकाशित केल्या ; पण त्या लेखांचे वाचन मात्र त्यांना करता आले नव्हते. पुढे रामकृष्णपंत भांडारकर, भगवानलाल इंद्रजी आणि ब्यूह्लर यांनी त्यांपैकी कांहीचे वाचन व अनुवाद देऊन चर्चा केली. नंतर सन १९०२ व १९०५ मध्ये फ्रेंच विद्वान् सेनार्ट याने नाशिक व कार्ले येथील लेण्यांतील सातवाहन व पश्चिमी क्षत्रप यांच्या लेखांचे छापांसह वाचन व अनुवाद एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ७ व ८ मध्ये देऊन विस्तृत चर्चा केली. पश्चिमी क्षत्रपांचे काही लेख गुजराथेत मिळाले आहेत. त्यांचेही वाचन व चर्चा कीलहॉर्न, बॅनर्जी, सुखटणकर वगैरे विद्वानांनी केली आहे.

सातवाहन व पश्चिमी क्षत्रप यांची नाणी किंवा नाण्यांचे संचय मधून मधून सापडतात. कोरीव लेखांप्रमाणे तीही प्राचीन भारतीय इतिहासाची अव्वल दर्ज्याची साधने होत. त्यांचाही अभ्यास भगवानलाल इंद्रजी, रॅप्सन, अळतेकर वगैरे विद्वानांनी केला आहे. त्यांचे लेख रॉयल एशियाटिक सोसायटीचे जर्नल, इंडियन अँटिक्वरी, न्यूमिस्मॅटिक सोसायटीचे जर्नल वगैरे संशोधन–कालिकांत प्रसिद्ध झाले आहेत.

कोरीव लेख व नाणी ही आपल्या देशाच्या प्राचीन इतिहासाच्या ज्ञानाची प्रमुख साधने होत. ती सापडतात तशी विद्वानांकडून अनेक नियतकालिकांत प्रकाशित केली जातात. या विखुरलेल्या साधनसंपत्तीचे एकत्रीकरण करून व तिचा चिकित्सक वृत्तीने अभ्यास करून सर्व उपलब्ध कोरीव लेख प्राचीन राजवंशांच्या नामानुसार एका ग्रंथमालेत प्रकाशित करावे अशी सूचना जेम्स प्रिन्सेप याने सन १८३७ मध्ये केली आणि त्या ग्रंथमालेला 'कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकॅरम्' (भारतीय – उत्कीर्ण – लेख – संग्रह) असे लॅटिन नावही त्याने सुचविले. त्यानंतरच्या गेल्या जवळजवळ दीडशे वर्षांत त्या ग्रंथमालेत फक्त सहा ग्रंथ आतापर्यंत प्रसिद्ध झाले आहेत. ते असे – ग्रंथ पहिला – अशोकाचे कोरीव लेख (प्रथमावृत्ति, सन १८७७, संपादक – जनरल अलेक्झांडर कनिंगह्याम्); (द्वितीयावृत्ति – सं. हुल्श, सन १९२४). ग्रंथ दुसरा – पहिला भाग – खरोष्ठी कोरीव लेख – सं. स्टेन कोनो (सन १९२९); दुसरा भाग – भारहुत येथील ब्राह्मी कोरीव लेख – सं. ल्यूडर्स, वाल्ड्श्मिट व मेहेंदळे (१९६३); तिसरा भाग – पूर्वकालीन गुप्त आणि त्यांचे उत्तराधिकारी यांचे कोरीव लेख – प्रथमावृत्ति – सं. फ्लीट (१८८८) ; द्वितीयावृत्ति – सं. दे. रा. भांडारकर, छाबडा आणि गै (मुद्रणावस्थेत); चौथा भाग – कलचुरि – चेदि संवताचे कोरीव लेख – सं. वा. वि. मिराशी (१९५५); पाचवा भाग – वाकाटकांचे कोरीव लेख – सं. वा. वि. मिराशी (१९६३); सहावा भाग – शिलाहारांचे कोरीव लेख – सं. वा. वि. मिराशी (१९७७).

शिलाहारांच्या कोरीव लेखांचे संपादन पूर्ण झाल्यावर मी महाराष्ट्राचा आद्य ज्ञात ऐतिहासिक राजवंश सातवाहन आणि त्याचे समकालीन पश्चिमी क्षत्रप यांच्या कोरीव लेखांचे व नाण्यांचे संपादन आणि त्यांच्या सर्वांगीण इतिहासाचे लेखन यांकडे वळलो. गेल्या सहा-सात वर्षातील माझा बराच वेळ या कार्यात गेला आहे.

या विषयात अद्यापि अनेक समस्या वादग्रस्त आहेत. अनेक विद्वानांनी त्यांवर भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत. सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास लिहिण्यापूर्वी त्या सोडविणे आवश्यक होते. म्हणून मी त्यांचा अभ्यास करून संशोधन — कालिकांत त्यांवर प्रथम लेख लिहिले आणि नंतर पूर्वोक्त वंशांचे लेख संपादण्यास व त्यांचा इतिहास लिहिण्यास आरंभ केला.

प्रस्तुत ग्रंथात सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचे सर्व उपलब्ध कोरीव लेख देऊन त्यांची चर्चा केली आहे. यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या कलचुरि, वाकाटक आणि शिलाहार वंशांच्या इतिहासविषयक मराठी ग्रंथांत, त्यांचे बहुतेक लेख संस्कृतात असल्यामुळे, त्यांचे मराठी भाषांतर देणे आवश्यक वाटले नव्हते. पण प्रस्तुत ग्रंथातील बहुतेक लेख प्राकृतात असल्यामुळे आणि विद्वानांनी कांही ठिकाणी भिन्न भिन्न अर्थ केल्यामुळे त्या सर्व लेखांचा मराठी अनुवाद येथे दिला आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागात सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा सविस्तर इतिहास सर्व उपलब्ध साधनांवरून दिला आहे. त्यात त्यांचा केवळ राजकीय इतिहासच आला नसून तत्कालीन राज्यशासन, धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिति, साहित्य, स्थापत्य, शिल्प आणि चित्रकला, या विषयांचे सविस्तर विवेचन केले आहे. काही वादग्रस्त प्रश्नांची विस्तृत चर्चा तद्विषयक प्रकरणांत करणे शक्य नसल्यामुळे ती त्या त्या भागांना जोडलेल्या परिशिष्टांत दिली आहे. नंतरचे प्रकरण नाण्यांविषयी आहे. सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांच्या, तसेच त्यांच्या मांडलिकांच्या, प्रत्येक प्रकारच्या नाण्यांचे वर्णन करणे व महत्त्व दर्शविणे शक्य नव्हते ; पण त्यांतील प्रमुख प्रकारांची माहिती त्यांच्या छायाचित्रांसह दिली आहे. शेवटचे प्रकरण कोरीव लेखांची भाषा हे असून त्याला प्राकृत भाषेचा कोश जोडला आहे. यांशिवाय सातवाहनकालीन कोरीव लेख, स्थापत्य, शिल्प व चित्रकला यांची कल्पना वाचकांस यावी म्हणून तद्विषयक अनेक पट्टिका जोडल्या आहेत. सारांश, प्रस्तुत ग्रंथावरून महाराष्ट्राच्या आद्य ऐतिहासिक कालाची यथार्थ कल्पना वाचकांस व्हावी याकरिता शक्य ते सर्व प्रयत्न केले आहेत.

प्रस्तुत ग्रंथ लिहिताना मला अनेकांच्या प्रकाशित ग्रंथांचा व लेखांचा उपयोग झाला आहे. त्यांचे ऋण सर्वत्र निर्देशपूर्वक मान्य केले आहे. विशेषतः यातील कोरीव लेखांचा अभ्यास करताना भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांच्या वाचनाचा व विवेचनाचा मला बराच उपयोग झाला आहे. तसाच ल्यूडर्सच्या ब्राह्मी लेखांच्या यादीतील संदर्भांचाही झाला आहे. नाण्यांचा अभ्यास करताना रॅप्सनचा तद्विषयक ग्रंथ आणि न्यूमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडियाचे जर्नल यांतील लेख यांचे बहुमोल साहाय्य झाले आहे. गुजराथेत अलीकडे सापडलेल्या कोरीव लेखांची माहिती डॉ. रसेश जमीनदार यांनी पुरविली आणि त्यांपैकी कांहींवरील आपल्या लेखांच्या सुटच्या प्रतीही पाठविल्या याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. मेवासा येथील भर्तृदामन्च्या काळच्या यष्टिलेखाचा उत्कृष्ट छाप डॉ. मार्गबंधू, सुपरिंटेंडिंग आर्किऑलॉजिस्ट, बडोदा, यांनी पुरविल्यामुळे मला त्या लेखाचे संपादन करता आले, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

## लेखकाचे हृद्गत

सन १९५० मध्ये अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयाच्या प्राचार्य पदावरून मी सेवानिवृत्त झालो. त्यावेळी माझे वय ५७ वर्षांचे होते. पुढे किती वर्षे आयुष्य लाभेल याची कल्पना नव्हती. त्यानंतर मी अनेक विषय अभ्यास व ग्रंथनिर्मिति यांकरिता घेतले. पण प्रत्येक वेळी ते कार्य आपल्या हातून तडीस जाईल काय याविषयी माझे मन साशंक असे. म्हणून मी त्या त्या विषयांचा अभ्यास व त्यांवरील ग्रंथनिर्मिति शक्य तो लौकर संपविण्याचा प्रयत्न करीत असे. एका सुभाषितात म्हटले आहे—

अजरामरवत्प्राज्ञो विद्यामर्थं च चिन्तयेत् ।
गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ।।

यात म्हटल्याप्रमाणे यमधर्माच्या हाती आपल्या आयुष्याची दोरी आहे याची सतत जाणीव ठेवून मी आपले ग्रंथलेखन गेली जवळ जवळ तीस वर्षे करीत आलो आहे. प्रस्तुत ग्रंथाचा विषय अभ्यासाकरिता घेतला तेव्हाही माझे शरीर रोगाने जर्जर होऊन बहुतेक सर्व इंद्रिये शिथिल झाली होती. तथापि, बुद्धि मात्र शाबूत होती. म्हणून हे दीर्घ परिश्रमाचे व बुद्धिमत्तेचे कार्य मी माझ्या ८७ व्या वर्षी पुरे करू शकलो, ही परमेश्वराची कृपा होय.

पुरातत्त्व खात्याच्या पूर्वोक्त उत्कीर्ण–लेख–संग्रहमालेत मी आतापर्यंत तीन ग्रंथ–कलचुरि–चेदि संवताचे लेख, वाकाटकांचे लेख आणि शिलाहारांचे लेख हे–इंग्रजीत प्रथम लिहून नंतर त्यांची मराठीत रूपान्तरे प्रकाशित केली होती. पण प्रस्तुत उत्कीर्णलेखसंग्रह मराठीत प्रथम प्रसिद्ध होत आहे, याचे कारण तो इंग्रजीत प्रकाशित करण्यास पुरेसे आयुर्मान मला लाभेल असे वाटत नाही. परमेश्वराची कृपा असल्यास तो पुढे इंग्रजीतही प्रकाशित होईल.

दोन वर्षांपूर्वी ह्या ग्रंथाचे लेखन जवळ जवळ पुरे होत आले असता मी प्रोस्टेट ग्रंथींच्या वृद्धीमुळे आजारी पडलो. त्या वेळी माझे वय ८५ वर्षांचे असल्यामुळे मी त्या ग्रंथींवरील शस्त्रक्रियेतून निभावेन काय याविषयी माझे मन साशंक होते. पण मुंबईचे विख्यात शल्यक्रियाविशारद डॉ. अजित फडके यांच्या कौशल्याने आणि परमेश्वराच्या कृपेने ती शस्त्रक्रिया यशस्वी झाली. म्हणून मी हा ग्रंथ पूर्ण करू शकलो. यामुळे माझे मन उभयतांबद्दल सदैव कृतज्ञ राहील.

प्राचीन भारतीय इतिहासाची अव्वल दर्ज्याची साधने–कोरीव लेख व नाणी ही–शोधून काढण्यात आणि त्यांचे विवेचन करण्यात पं. भगवानलाल इंद्रजी यांनी केलेले कार्य अत्यंत मोलाचे आहे. डॉ. ब्यूह्लर व प्रा. रॅप्सन यांसारख्या तज्ज्ञांनी त्याची मुक्तकंठाने स्तुति केली आहे. लायडन विद्यापीठाने त्यांना सन्मान्य डॉक्टरेट देऊन गौरविले होते. त्यांचे कांही सिद्धान्त व विवेचन ही नंतरच्या शोधांनी अग्राह्य ठरविली असली तरी त्यांनी केलेल्या कार्याचे महत्त्व कमी होत नाही. मीही प्रस्तुत ग्रंथात त्यांच्याशी काही बाबतीत सहमत होऊ शकलो नाही. पण ते आघाडीचे मार्गशोधक होते. म्हणून त्यांच्याविषयी मला वाटत असलेला परमादर हा ग्रंथ त्यांच्या स्मृतीस अर्पण करून मी व्यक्त करीत आहे.

या ग्रंथातील पट्टिका १, ३, ८ ते १८ व २७ या भारतीय पुरातत्त्व खात्याच्या संचालकांनी, व इतर काही कलकत्ता विद्यापीठाचा प्राचीन भारतीय इतिहासाचा विभाग, डेक्कन कॉलेज रीसर्च इन्स्टिटयूट वगैरेंच्या अध्यक्षांनी प्रसिद्ध करण्यास संमति दिल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. इतरही अनेक ग्रंथांतून मी कांही पट्टिका घेतल्या आहेत. त्यांच्याही प्रकाशकांचे हार्दिक आभार मानतो.

माझ्या इतर अनेक ग्रंथांप्रमाणे हाही ग्रंथ प्रकाशित करण्याची इच्छा विदर्भ संशोधन मंडळाने व्यक्त करून तदर्थ अनुदानाकरिता महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाकडे अर्जही केला होता; पण त्या मंडळाने स्वतःच तो प्रकाशित करण्याचे ठरविले, याबद्दल मी त्या मंडळाचे, आणि त्याचे अध्यक्ष तर्कतीर्थ पं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे हार्दिक आभार मानतो. या ग्रंथातील शुद्धलेखन मराठी महामंडळाच्या नियमांनुसार आहे. फक्त तत्सम शब्दांतील अंत्य ह्रस्व स्वर दीर्घ केले नाहीत.

प्रस्तुतसारखा ग्रंथ लिहिण्याकरिता संशोधनपर ग्रंथांनी व कालिकांनी सुसमृद्ध असे ग्रंथालय आवश्यक असते. तसे ग्रंथालय नागपुरात नाही ही माझी मोठीच अडचण होती. सन १९३५ मध्ये भारतीय–उत्कीर्ण–लेख–संग्रह मालेतील कलचुरि–चेदि संवताच्या लेखांचे संपादन करण्याचे काम स्वीकारल्यावर मला तशा सुसमृद्ध ग्रंथालयाची आवश्यकता तीव्रतेने भासू लागली. त्यानंतर नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागाचा दहा-बारा वर्षे प्रमुख असताना मी त्या विद्यापीठाचे ग्रंथसंग्रहालय संशोधनाकरिता समृद्ध करण्याचा प्रयत्न केला. पण पूर्वी प्रकाशित झालेले अनेक महत्त्वाचे साधनग्रंथ व कालिके आता अत्यंत दुर्मिळ झाली आहेत. तथापि, नागपुरात विद्यापीठाचे ग्रंथालय हेच त्यांतल्या त्यात समृद्ध आहे. त्याचा उपयोग करण्याची अनुज्ञा त्या विद्यापीठाच्या प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृति व पुरातत्त्व विभागाचे प्रमुख डॉ. अजयमित्र शास्त्री यांनी मला दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. महाराष्ट्र राज्य शासकीय मुद्रण व लेखनसामग्री विभागाचे संचालक श्री. स. आ. सप्रे यांनी या ग्रंथाच्या मुद्रणाविषयी विशेष आस्था दाखविली आणि विविध प्रकारे साहाय्य केले म्हणून त्यांचे, आणि नागपूर शासकीय मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. एल. जे. मेनेस व त्यांचे सहकारी यांनी तो शुद्ध व सुबक रीतीने छापून दिला याबद्दल त्यांचेही मनःपूर्वक आभार मानतो.

मकर संक्रान्ति,

दिनांक १४ जानेवारी १९७९. वा. वि. मिराशी

# अनुक्रमणिका

## भाग दुसरा

### सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचे कोरीव लेख

### खंड पहिला — सातवाहन राजवंशाचे लेख

## खंड दुसरा — पश्चिमी क्षत्रपांचे लेख

### (अ) क्षहरात क्षत्रपांचे लेख



### (आ) कार्दमक क्षत्रपांचे लेख

## खंड तिसरा — विदर्भातील क्षत्रप – लेख



## पट्टिकांची अनुक्रमणिका

# संदर्भ ग्रंथ आणि त्यांचे संक्षेप

## Works

1. Alberuni's India by Sachau.
2. Amrāvatī by N. S. Ramasvami.
3. Amrāvatī Sculptures in the Madras Government Museum by S. Sivaramamurti (*A. S. M. G. M.*)
4. Bhandarkar Commemoration Volume.
5. Bhāsa — A study by A. D. Pusalkar.
6. Bhilsā Topes by A. Cunningham.
7. Bhoja's Śṛiṅgāraprakāśa by V. Raghavan.
8. Bombay Gazetteer (old ed.) (*Bom. Gaz.*)
9. British Museum Catalogue of the Coins of the Andhra Dynasty, the Western Kshatrapas, the Traikūṭaka Dynasty, and the Bodhi Dynasty by E. J. Rapson [*B. M. C. (Andhras)*].
10. Budhasvāmin's Bṛihatkathāślokasaṅgraha by F. P. Matan.
11. Cambridge History of India, Vol. I (Ancient India) by E. Rapson (*C. H. I*—I).
12. Carmichael Lectures on Ancient Indian History by D. R. Bhandarkar (*Carm. Lec.*).
13. Cave Temples of India by Burgess and Fergusson (*C. T. I.*).
14. Chronology of Gujarat by M. R. Mujumdar.
15. Classical Accounts of India by R. C. Majumdar (*C. A. I.*).
16. Coins of India by C. J. Brown.
17. Dynasties of the Kali Age by Pargiter (*D. K. A.*).
18. D. R. Bhandarkar Volume (ed. by B. C. Law).
19. Early History of the Andhra Country by K. Gopalachari (*E. H. A. C.*).
20. Early History of the Deccan by R. G. Bhandarkar (*E. H. D.*), (*C. W. B.*).
21. Essay on Guṇāḍhya and the Bṛihatkathā by E. Lacote (Eng. Tr. pub. by the Mythic Society).
22. Excavations at Brahmapurī by Sankalia and Dikshit.
23. From History to Pre-history at Nevāsā by Sankalia.
24. Gazetteer of the Mahārāshtra State — History, Vol. I (Ancient History) (*M. S. G. H.*—I).
25. History and Culture of the Indian People (*H. C. I. P.*).
26. History of Dharmaśāstra by P. V. Kane (*H. D.*).
27. Historical Grammar of Inscriptional Prakrits by M. A. Mehendale.

28. History of Indian and Indonesian Art by Coomaraswamy (*Coomaraswamy*).
29. History of Indian Literature by M. Winternitz (Eng. Tr.).
30. History of Sanskrit Literature by S. K. De.
31. History of Sanskrit Literature by A. B. Keith.
32. History of Sanskrit Literature by A. A. Macdonell.
33. Inscriptions from the Cave-Temples of Western India by Burgess and Bhagvanlal Indraji (*I. C. T. W. I.*).
34. Das Indische Drama by Sten Konow.
35. Indian Art by V. S. Agrawal.
36. Introduction to Comparative Philology by P. D. Gune (second ed.).
37. List of Brāhmī Inscriptions by H. Lüders (*List*).
38. Literary and Historical Studies in Indology by V. V. Mirashi (*L. H. S. I.*).
39. On Yuan Chwang's Travels in India by Watters.
40. Pauni Excavations by S. B. Deo and J. P. Joshi.
41. Pavnār Excavations by S. B. Deo and M. K. Dhavalikar.
42. Political History of Ancient India by H. C. Raychaudhuri.
43. Rāghavan Felicitation Volume (*R. F. V.*).
44. Sanskrit Drama by A. B. Keith.
45. Select Inscriptions, Vol. I, by D. C. Sircar.
46. A Study in the History and Culture of the Andhras by K. Satyanarayana.
47. Studies in Indology, Vols. I—IV by V. V. Mirashi (*S. I.*).
48. Systems of Sanskrit Grammar by S. K. Belwalkar.
49. V. S. Apte Commemoration Volume (pub. by Deccan Education Society).
50. Two Thousand Years of Buddhism (ed. by P. V. Bapat).

## Periodicals

51. Andhra Epigraphical Series.
52. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute (*A. B. O. R. I.*).
53. Annual Report of the Archaeological Survey of India (*A. R. A. S. I.*).
54. Bulletin of the Deccan College Research Institute (*B. D. C. R. I.*).
55. Bulletin of the Prince of Wales Museum, Bombay.
56. Epigraphia Carnatica (*Ep. Carn.*).
57. Epigraphia Indica (*E. I.*).
58. Indian Antiquary (*I. A.*).
59. Indian Historical Quarterly (*I. H. Q.*).
60. Journal of Ancient Indian History (*J. A. I. H.*).

61. Journal Asiatique (*J. A.*).
62. Journal of the Asiatic Society of Bengal (*J. A. S. B.*).
63. Journal of the Bombay Branch of the Royal Asiatic Society (*J. B. B. R. A. S.*).
64. Journal of the Bihar and Orissa Research Society (*J. B. O. R. S.*).
65. Journal of the Numismatic Society of India (*J. N. S. I.*).
66. Journal of the Oriental Institute (*J. O. I.*).
67. Journal of the Royal Asiatic Society (*J. R. A. S.*).
68. Numismatic Chronicle (*Num. Chron.*).
69. Numismatic Supplement of the Journal of the Asiatic Society of Bengal (*Num. Suppl. J. A. S. B.*).
70. Sambodhi.
71. Viśveśarānanda Indological Journal (*V. I. J.*).
72. Zeitschrft der Deutschen Morganländischen Gesellschaft (*Z. D. M. G.*).

## Other Abbreviations

*A. P. E. S.*—Andhra Pradesh Epigraphical Series.
*A. S. I.*—Archaeological Survey of India.
*C. W. B.*—Collected Works of R. G. Bhandarkar.
*C. I. I.*—Corpus Inscriptionum Indicarum.
*G. O. S.*—Gaekwad's Oriental Series.
*M. A. S. I.*—Memoirs of the Archaeological Survey of India.
*S. B. E.*—Sacred Books of the East.

## संस्कृत, पालि, प्राकृत आणि मराठी ग्रंथ

७३. अंगुत्तरनिकाय (पालि टेक्स्ट सोसायटी).
७४. अजंठा (बाळासाहेब पंत प्रतिनिधिकृत).
७५. अवन्तिसुंदरीकथासार (दक्षिण भारती ग्रंथमाला).
७६. अष्टाध्यायी (पाणिनिकृत).
७७. आपस्तंबधर्मसूत्र (बाँबे संस्कृत सीरीज ) (आ. ध. सू.).
७८. आर्यासप्तशती (गोवर्धनकृत).
७९. उदयसुन्दरीकथा (सोड्ढलकृत).
८०. ऋग्वेद.
८१. कथासरित्सागर (सोमदेवकृत) (निर्णयसागर प्रेस).
८२. कातन्त्र-रूपमाला-व्याकरण (शर्ववर्मकृत) ( सं. जीवरामशास्त्री).
८३. कादम्बरी (बाणकृत).
८४. कामसूत्र (वात्स्यायनकृत) (हरिदास संस्कृत ग्रंथमाला).
८५. कालिदास (तृतीयावृत्ति) (वा. वि. मिराशीकृत).

८६. काव्यमीमांसा (राजशेखरकृत) (*G. O. S.*).
८७. काव्यादर्श (दण्डीकृत).
८८. कुवलयमाला (उद्द्योत्तनसूरिकृत) (सं. आ. ने. उपाध्ये).
८९. गाथासप्तशती (हालकृत) ( सं. स. आ. जोगळेकर).
९०. चतुर्भाणी (गुप्तकालीन शृंगारहाट) (सं. मोतीचंद्र).
९१. चारुदत्त (भासनाटकचक्र) (सं. सी. आर. देवधर).
९२. दशकुमारचरित (दण्डीकृत).
९३. दिव्यावदान (सं. प. ल. वैद्य).
९४. दूतवाक्य (भासकृत).
९५. नाटयशास्त्र (भासकृत) (*G. O. S.*).
९६. नेपाल – माहात्म्य (लाकोटच्या 'गुणाढ्य आणि बृहत्कथा' ग्रंथाचे परिशिष्ट).
९७. प्राकृत-व्याकरण (हेमचंद्रकृत) (सं. प. ल. वैद्य).
९८. प्राकृतप्रकाश (वररुचिकृत).
९९. महाभारत (भांडारकर इन्स्टिटयूटने प्रकाशित).
१००. मराठी भाषेचा उद्गम व विकास (कृ. पां. कुळकर्णीकृत).
१०१. मांडुक्यकारिका (गौडपादकृत).
१०२. मृच्छकटिक (शूद्रककृत) (सं. र. दा. करमरकर).
१०३. मेघदूत (कालिदासकृत) (सं. का. बा. पाठक).
१०४. रामचरित (अभिनन्दकृत).
१०५. रामायण (ओरिएंटल इन्स्टिटयूटने प्रकाशित).
१०६. वाकाटक नृपति आणि त्यांचा काल (वा. वि. मिराशीकृत).
१०७. वासवदत्ता (सुबन्धुकृत) (वाणी विलास प्रेस).
१०८. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख (वा. वि. मिराशीकृत).
१०९. संशोधन-मुक्तावलि (वा. वि. मिराशीकृत).
११०. सरस्वतीकण्ठाभरण (भोजकृत) (निर्णयसागर प्रेस).
१११. साहित्यदर्पण (विश्वनाथकृत) (निर्णयसागर प्रेस).
११२. सुत्तनिपात (पालि टेक्स्ट सोसायटी).
११३. हर्षचरित (बाणकृत).

## इतर संक्षेप

व्यू. = डॉ. व्यूह्लर. भ. = भगवानलाल इंद्रजी. इ. = इत्यादि.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| [२८] | टीप ३ | क्रमांक १३ | क्रमांक १९ |
| [६०] | १६ | आकारावन्ती | आकरावन्ती |
| [६६] | १० | भावांना | पुत्रांना |
| [७१] | १० | प्रस्तुत लेखाची | एका लेखाची |
| [८९] | १५ | अठसततमए | अठसतितमए |
| [१०७] | १८ | निश्चित् | निश्चित |
| [१३०] | १५ | किरात | किराता |
| [१३२] | टीप २ | समाचक्षति | समाचक्षीत |
| [१५९] | ६ | कुलवधु | कुलवधू |
| [१७३] | १४ | – रद्भुतार्थां | – रद्भुतार्थां |
| [१९०] | २४ | मत | हे मत |
| [१९२] | १४ | शुद्रकाच्या | शूद्रकाच्या |
| [२०१] | १९ | organisation | origination |
| [२३४] | २१ | माठरि – | माढरि – |
| [२३९] | २२ | उत्तर कारवार | उत्तर कन्नड |
| [२७०] | ७ | लयनस | लयनस्य |
| [२७०] | १० | लयनस | लयनस्य |
| ४ | १३ | रञो | रावो |
| ४ | २४ | ४१ | ४ |
| १० | १३ | [पथ] | [पठ] |
| १८ | २८ | राजा | राया |
| २५ | ११ | दिवसे २ | दिवसे १ |
| ४५ | टीप १, ओ. २ | शुश्रुषा | शुश्रूषा |
| ५१ | टीप १२, ओ. १ | परिसंथरण | पटिसंथरण |
| ५७ | ११-१२ | त्याच कालिकाच्या | मैसूरच्या आर्कि. स्टडीजच्या |
| ६७ | १६ | बोपकियतिसुजमान | बोपकियतिसुजमाने |
| ८३ | १४ | सातवहनिहारे | सातवाहनिहारे |
| ८८ | १४ | पृ. ३३९ | पृ. २३९ |
| ९४ | १४ | कुशणमूल | कुशणमूले |
| ९४ | तळटीप १० | सर्वं | सर्व |
| १०१ | १७ | कडुंबिनिय | कुडुंबिनिय |
| १४१ | १७ | खम्भो | खंभो |
| १६८ | १५ | १६५९ | १९५९ |

प्रकरण पहिले

# राजकीय इतिहास

## (अ) सातवाहन राजवंश

सातवाहन राजवंश हा महाराष्ट्राचा पहिला ज्ञात ऐतिहासिक राजवंश होय. त्याचा इतिहास अनेक दृष्टींनी वैशिष्टयपूर्ण आहे. सातवाहनांच्या पूर्वीचा महाराष्ट्राचा इतिहास आपणांस फारसा माहीत नाही. त्यापूर्वीच्या अशोकाच्या साम्राज्यात महाराष्ट्र सामील झाला होता खरा, पण त्या काळी तेथे रठिक, भोजक आणि पेतेनिक हे लहान-मोठे सरंजामदार सत्ताधारी होते, एवढीच माहिती अशोकाच्या लेखांवरून आपणांस मिळते. त्यांपैकी एकाही व्यक्तीचे नाव आपणांस माहीत होत नाही, मग त्यांच्या कारकीर्दीतील घटना कशा समजणार ? सातवाहनांच्या उदयापासून आपणांस महाराष्ट्राचा राजकीय इतिहासच नव्हे तर त्यांच्या राज्यातील राज्यशासन–पद्धति, धार्मिक व सामाजिक परिस्थिति, स्थापत्य, शिल्प व चित्रकला, साहित्यनिर्मिति इत्यादिकांविषयी थोडीबहुत माहिती मिळू लागते, यात त्या राजवंशाचे महत्त्व आहे.

हा राजवंश केवळ कालक्रमाने पहिला नाही तर कर्तृत्वानेही तो अग्रेसर आहे. त्याचे राज्य दक्षिण भारताच्या बहुतांश भागावर पसरले होते एवढेच नाही तर काही कालखंडांत मध्य भारताचाही कांही भाग त्याच्या अमलाखाली आला होता. या राजवंशाचे विस्तृत साम्राज्य साडेचार शतके कमीअधिक प्रमाणात टिकून राहिले, यातही त्याचे वैशिष्टय आहे. प्राचीन काळी सामान्यतः भारतीय राजवंश दोन अडीच शतकेच टिकत असत. साडेचारशे वर्षे अव्याहतपणे राज्य करीत असलेला भारतीय सम्राट्‌वंश दुसरा झाला नाही.

सातवाहनांनी विस्तृत प्रदेशावर दीर्घकाळ राज्य केले यातच त्यांची बहादुरी नाही. त्यांनी आपल्या काळात संस्कृत व प्राकृत वाङ्मय, स्थापत्य, शिल्प व चित्रकला यांत संस्मरणीय अशी प्रगति केली, व्यापार-उदीमांस उत्तेजन देऊन जनतेला समृद्धीचे व सौख्याचे जीवन प्राप्त करून दिले, परकीयांशी प्राणपणाने लढून आपले स्वातंत्र्य परत मिळविले आणि स्वदेशाला भाग्याचे दिवस पुनः दाखविले. या सर्व कारणांमुळे सातवाहन राजवंशाला महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात अनन्यसाधारण महत्त्व आहे.

पण या राजवंशाच्या इतिहासाची साधनें अत्यल्प आहेत. साधारणपणे राजवंश जितका प्राचीन तितकी त्याच्या इतिहासाची साधनें कमी, असा प्रकार भारतीय इतिहासात आढळतो. तेव्हा सातवाहन राजवंश दक्षिण भारतात सर्वांत प्राचीन असल्यामुळे त्याच्याविषयी माहिती देणारी साधनें अत्यल्प असली तर नवल नाही. तशात प्राचीन काळी भारतीयांनी इतिहास लिहून ठेवण्याची खबरदारी न घेतल्यामुळे तो अनेक साधनांवरून कणाकणानें ज़मवावा लागतो. पुराणांत सातवाहन काल – अखेरपर्यंत राजवंशावली दिल्या आहेत खऱ्या, परंतु गेल्या दीड हजार वर्षांत त्यांत अनेक पाठभेद घुसल्यामुळे त्यायोगें खऱ्या इतिहासाच्या ज्ञानाला साहाय्य होण्याऐवजी अडथळाच जास्त होतो. तथापि, गेली दीडशें वर्षे भारतीय व परदेशीय संशोधकांनी अविरत परिश्रमाने ऐतिहासिक साधनें जमवून व उपलब्ध साधनांचा चिकित्सक रीतीनें अभ्यास करून सातवाहन राजवंशाचा बराचसा इतिहास जमविला आहे. तो येथे द्यावयाचा आहे.

कोणत्याही राजवंशाच्या इतिहासाविषयी विचार करताना प्रथम प्रश्न उपस्थित होतो तो त्याच्या कालाचा. सातवाहनांच्या बाबतीत हा प्रश्न फार जटिल बनला आहे आणि त्याविषयी विविध मते प्रचलित झाली आहेत.

सातवाहनांच्या इतिहासाचे एक प्रमुख साधन पुराणांतील त्यांची वंशावळि होय. पण त्या राजवंशावळीविषयी पुराणांत तीव्र मतभेद आहेत. 'वायु', 'ब्रह्माण्ड', 'भागवत' आणि 'विष्णु' ही सर्व पुराणे अंध्र (म्हणजे सातवाहन) राजांची संख्या तीस देतात पण त्यांची नावे देताना १७, १८, १९, २२, २३, २४ किंवा २८ इतक्याच राजांचा उल्लेख करतात. याच्या उलट 'मत्स्य पुराण' ती संख्या एकोणीस अशी देते, पण वस्तुतः तीस राजांचा नामोल्लेख करते. सातवाहन राजवटीच्या एकूण वर्ष–संख्येविषयीही असाच मतभेद आहे. 'मत्स्य पुराणात' ती ४६० वर्षे, 'वायु पुराणा'त ४११ वर्षे आणि 'ब्रह्माण्ड', 'विष्णु' आणि 'भागवत' पुराणांत ४५६ वर्षे दिली आहे.[१] या सर्व पुराणांत राजांची वैयक्तिक कारकीर्दीची वर्षेही दिली आहेत ; पण त्यांतही मेळ नाही. सर्व राजांची सर्वांत जास्त उल्लेखिलेली वर्षे घेऊन बेरीज केल्यास ती ४४२½ वर्षे होते. तेव्हा पुराणांतील उल्लेखांवर विश्वास ठेवता येत नाही. तथापि एकंदरीने विचार करता सातवाहन राजांची एकूण संख्या तीस होती, आणि त्यांनी एकूण ४६० वर्षे राज्य केले असे मानावे असे पार्गिटरने म्हटले आहे[२] व ते अनेक संशोधकांनी मान्य केले आहे.

१ *D. K. A.*, p. 36. २ *Ibid.*, p. 36.

हे मत स्वीकारल्यास सातवाहनांचा उदय अशोकाच्या सुमारे ख्रिस्तपूर्व २३६ मधील निधनानंतर लौकरच म्हणजे ख्रि. पू. २३० च्या सुमारास झाला असावा असे म्हणता येईल. त्यांची एकूण वर्षसंख्या ४६० असल्यामुळे त्यांचा अस्त ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास झाला असावा. त्या काळी महाराष्ट्रात महाक्षत्रप ईश्वरदत्त, विदर्भात मुण्ड आणि अंध्रात इक्ष्वाकु राजांचा उदय झाला असल्यामुळे ही अस्तकालाची मर्यादा निश्चित आहे.

सातवाहनांच्या उदयकालाबद्दल मात्र एकवाक्यता नाही. डॉ. रा. गो. भांडारकर[१], डॉ. रायचौधरी[२], डॉ. दिनेशचंद्र सरकार[३] वगैरेंच्या मते सातवाहनांचा उदय ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या द्वितीय पादात झाला असावा. त्यांची प्रमाणे देऊन त्यांचे चिकित्सक परीक्षण करू.

**प्रमाण पहिले**—पुराणांत म्हटले आहे की अंध्रांचा (म्हणजे सातवाहनांचा) मूळ पुरुष सिमुक हा सुशर्मा नामक शेवटच्या काण्व राजाचा उच्छेद करून पृथ्वीचे राज्य संपादन करील.[४] काण्वांनी शुंगांनंतर ख्रि. पू. ७५ – ३० या कालात राज्य केले. तेव्हा सातवाहनांचा उदय ख्रि. पू. तिसऱ्या शतकाच्या अखेरीस झाला असणे शक्य नाही.

**परीक्षण**—सातवाहनांच्या मूळ पुरुषाने उत्तर भारतातील काण्वांच्या राज्यावर आक्रमण करून तेथे राज्य स्थापले याला प्रमाण नाही. शुंग नृपति अग्निमित्रापासून शुंगांची राजधानी पाटलिपुत्रात नसून विदिशेस होती. विदिशेवर सातवाहनांचे आक्रमण झाले असणे शक्य आहे. पण ते सातवाहनांच्या मूळ पुरुषाने केले नसून त्याच्या एखाद्या वंशजाने केले असावे. कोणताही वंशसंस्थापक राज्यस्थापनेनंतर लागलीच दूरच्या प्रदेशावर आक्रमण करण्याइतका प्रबळ होत नाही. तेव्हा काण्वांच्या राजधानीवर आक्रमण सिमुकाने केले नसून त्याच्या एखाद्या जवळच्या वंशजाने केले असावे. याला उपोद्बलक प्रमाण आहे. विदिशेजवळ सांची येथील स्तूपाच्या तोरणावर प्रथम सातकर्णीच्या मुकादमाचा लेख आहे[५] तो या आक्रमणानंतर त्या राजाच्या तेथील राजवटीत कोरला असावा. त्याच्या अक्षरवटिकेवरून तो लेख ख्रि. पू. दुसऱ्या शतकातील असावा

---

१ *E. H. D.*, p. 48.

२ *P. H. A. I.*, pp. 403 f.

३ *H. C. I. P.*, II, p. 195.

४ *D. K. A.*, p. 38.

५ *E. I.*, Vol. II, p. 88, क्र. २ पाहा.

हे ब्यूह्लरने दाखविले आहे.[१] याखेरीज ख्रिस्तपूर्व कालात सातवाहनांच्या उत्तर भारतावरील आक्रमणाचा दुसरा पुरावा नाही.[२] पुराणांनी या सातकर्णीचे कर्तृत्व सिमुकाला चिकटविले असावे.

**प्रमाण दुसरे**—पुराणांतील पंधरा-सोळा अंध्रांची (सातवाहनांची) नावे इतर कोणत्याही साधनांवरून ज्ञात होत नाहीत. तेव्हा ती एकतर बनावट असावी किंवा ती समकालीन तद्वंशीय मांडलिक राजांची असून सम्राटांच्या नामावलीत घुसडली गेली असावी. मत्स्य पुराणाच्या काही प्रतींत राजांची संख्या १९ दिलेली आहे. ती खरी दिसते. त्यांनी सुमारे तीनशे वर्षे राज्य केले असेल. सातवाहनांचा अस्त ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास झाला असल्यामुळे त्यापूर्वी ख्रि. पू. ७० च्या सुमारास त्यांचा उदय झाला असावा.

**परीक्षण**—सातवाहनांच्या वंशावळीतील काही नावांचे उल्लेख इतरत्र येत नाहीत हे खरे, पण त्यावरून ते राजे झालेच नव्हते हे म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ, क्र. ८ चा आपीलक राजा सुमारे ४० वर्षांपूर्वी सर्वस्वी अज्ञात होता. सन १९३७ मध्ये त्याचे एकच एक तांब्याचे नाणे मध्यप्रदेशाच्या छत्तीसगड विभागातील महानदीच्या काठी बालपुर येथे सापडले.[३] त्यावरून त्याचे पूर्वकालीन अस्तित्व सिद्ध झाले. हा राजा आरंभीच्या सातवाहनांपैकी आहे. त्यासारख्या इतरही सध्या अज्ञात असलेल्या आरंभीच्या राजांचे कोरीव लेख व नाणी पुढे मिळणार नाहीत कशावरून ?

**प्रमाण तिसरे**—आरंभीच्या सातकर्णि राजाच्या नाणेघाट येथील लेखाची अक्षरवटिका बेसनगर येथील हेलिओडोरसच्या स्तंभलेखाच्या[४] (ख्रि. पू. १०० या काळच्या) अक्षरवटिकेनंतरची आणि हाथीगुंफा येथील खारवेलाच्या लेखाच्या (ख्रि. पू. २५ च्या) पूर्वीची दिसते. तेव्हा हा सातकर्णि ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या मध्यात झाला नसून ख्रि. पू. पहिल्या शतकाच्या मध्यात झाला असला पाहिजे.

**परीक्षण**—अक्षरवटिकेचा पुरावा (अंतर फार नसेल तर) अविवाद्य असत नाही. त्यावर भिन्न भिन्न मते संभवतात. डॉ. ब्यूह्लरने

---

१ *E. I.*, Vol. II, p. 88.

२ सातकर्णीची काही नाणी मध्य भारतात सापडली आहेत. ती कदाचित् नंतरच्या सातकर्णीची असतील. ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकात गौतमीपुत्र सातकर्णीने मध्यभारतातील काही प्रदेश जिंकले होते, पण त्याचा येथे संबंध नाही.

३ *Num. Suppl.*, N., 94. *J. A. S. B.*, III (1937). पट्टिका २०, क्र. ३४.

४ *J. B. B. R. A. S.*, XXIII, p. 104.

म्हटले आहे की नाणेघाटातील लेखाची अक्षरवटिका अशोकानंतर फार काळ गेल्याचे दाखवीत नाही.[१] खारवेलाचा काळही ख्रि. पू. ५० इतका नंतरचा नाही, हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[२] शिवाय, ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे की मध्यभारत, कोकण व कलिंग यांसारख्या दूरदूरच्या प्रदेशांत अक्षरवटिकेचे परिवर्तन त्याच वेगाने झाले असणे शक्य नाही. तेव्हा या अक्षरवटिकेच्या पुराव्यात 'राम' नाही.

**प्रमाण चौथे**—नाशिक येथे सातवाहन राजा कृष्ण याच्या काळचा लेख ज्या लेण्यात आहे त्याजवळच एक चैत्य लेणे आहे. ते त्या काळीच खोदविले असावे. महाहकुसिरीची नात भटपालिका हिने ते लेणे कोरविले असा तेथील लेखात उल्लेख आहे.[३] सर जॉन मार्शल यांच्या मते या चैत्य लेण्याचा दरवाजा, बाजूच्या खांबावरील कमळ, पर्सिपोलिटन पद्धतीचे अर्धस्तंभ, द्वारपालाची विशिष्ट आकृति यांवरून हे लेणे सांची येथील तोरणांच्या काळचे (ख्रि. पू. ५० चे) दिसते.[४] ज्या हकुसिरीची नात भटपालिका हिने ते कोरविले तो नाणेघाटातील प्रतिमा-लेखावरून प्रथम सातकर्णीचा मुलगा दिसतो. तेव्हा तो सातकर्णि ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात झाला नसून ख्रि. पू. ५० च्या सुमारास झाला असावा.

**परीक्षण**—या प्रमाणाचे खंडन करताना डॉ. अ. स. अळतेकरांनी 'तो हकुसिरी सातकर्णीचा पुत्र असणे शक्य नाही, कारण राजन् हे उपपद त्याला लावले नाही' असे म्हटले आहे. पण आम्हांस ते खंडन पटत नाही. भटपालिकेच्या लेखाची अक्षरवटिका जुनी असून नाणेघाट लेखा-नंतर दोन तीन पिढ्यांची असावी असे सेनार्टने म्हटले आहे.[५] तेव्हा ही भटपालिका राजकुलाशी संबंधित दिसते. तिचा आजा हकुसिरी याला नाणेघाटातील प्रतिमालेखात 'कुमार' म्हटले आहे. तो वेदिश्रीनंतर गादीवर आला असावा. 'रञो सिरिसतस' असा लेख असलेली नाणी त्याची असावी. त्याचा राजकुलातील जन्म त्याच्या नावामागे 'महा' हे उपपद लावून सूचित केला आहे. तेव्हा हा भटपालिकेचा लेख सातवाहनांचा ख्रि. पू. ५० हा काळ समर्थित करीत नाही. नाशिकच्या चैत्य लेण्याचा दरवाजा, त्याच्या जवळचे स्तंभ व द्वारपाल हे ख्रि. पू. ५० या कालाचे निदर्शक आहेत खरे. पण त्याचे कारण हा दरवाज्याचा दर्शनी भाग

१ *A. S. W. I.*, V, p. 71.

२ सं. मु., सर ८, पृ. ११४ इ.; परिशिष्ट १ पाहा.

३ क्रमांक १०, ओ. १-२.

४ *C. H. I.*, I, p. 637. पट्टिका ८, आकृति १२ पाहा.

५ *E. I.*, VIII, pp. 91 f.

नंतर कोरला होता. हे त्या दरवाज्याच्या कमानीवर 'नासिककानं धंभिक-गामस दानं' असे प्राचीन ब्राह्मी लिपीत कोरले आहे[१] त्यावरून दिसते. भटपालिकेचा लेख लेण्याच्या आत दोन खांबांवर उभा कोरला आहे.

भटपालिकेने हे चैत्य लेणे कोरविले होते खरे, पण ते काही काळ अपूर्ण राहिले होते. नंतर नाशिक जिल्ह्यातील लोकांनी त्याचा दरवाजा वगैरे दर्शनी भाग कोरवून व धंभिक गाव देऊन ते पूर्ण केले व ही गोष्ट **त्या चैत्यलेण्याच्या दरवाज्याच्या कमानीवर कोरलेल्या लेखात** नोंदून ठेविली. हे नंतरचे कोरीव काम ख्रि. पू. ५० च्या सुमारास झाले असले तरी त्याचा संबंध सातवाहनांच्या उदयकालाशी येत नाही.

तेव्हा ३० सातवाहन राजांनी ४६० वर्षे राज्य केले हेच मत सयुक्तिक दिसते. या वंशाचा अस्त ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास झाला असल्याने त्याचा उदय ख्रिस्तपूर्व २३० च्या सुमारास झाला होता असे अनुमान करता येते.

ख्रिस्तपूर्व २३६ च्या सुमारास अशोकाचे निधन झाले. तेव्हा त्याच्या विशाल साम्राज्याचे तुकडे पडून लहान लहान राज्ये अस्तित्वात आली. अशोकानंतर पन्नास वर्षांच्या अवधीत मौर्य वंशाची सत्ता संपुष्टात येऊन शुंग सेनापति पुष्यमित्र याने गादी बळकावली. कलिंग देशात खारवेलाच्या पूर्वजांनी आपले स्वातंत्र्य उद्घोषित केले. महाराष्ट्रात राष्ट्रिक, भोजक, पेतेनिक इत्यादि सरंजामदार सत्ता गाजवीत होते. ते या काळात अगदीच स्वस्थ बसले नसावे. त्यांच्यापैकी सातवाहन नामक एका शूर पुरुषाने आपले स्वातंत्र्य उद्घोषित करून स्वतःच्या नावाने तांब्याची आणि शिशाची नाणी पाडली. ही नाणी औरंगाबाद,[२] हैदराबाद,[३] अकोला[४] वगैरे ठिकाणी जमिनीवर आणि नेवासे,[५] कोंडापूर[६] वगैरे ठिकाणी उत्खननात सापडली आहेत. त्यांच्या पुढील बाजूवर सोंड वर केलेला हत्ती असून सभोवती 'रञो सिरि–सादवाहनस' (हे नाणे राजा श्रीसातवाहनाचे) असा लेख आणि मागील बाजूवर आडवे-उभे ठेवलेल्या डंबेल्सचे बनलेले उज्जैनी चिन्ह आहे.

१ *C. T. I.*, pl. XXV. पट्टिका ८, आकृति १२ पाहा.

२ *B. D. C. R. I.*, VI, pp. 141 f.

३ *J. N. S. I.*, VII, pp. 1 f.; *S. I.* III, pp. 1 f.

४ *J. N. S. I.*, XXXVII, pp. 143 f.

५ *From Prehistory to History*, pp. 175 f.

६ *J. N. S. I.* XI, pp. 5 f. प्रकरण ८, 'नाणी' आणि पट्टिका २२, आकृति २८-३० पाहा.

हा राजा या वंशाचा मूळ पुरुष होय. जसे गुप्त नामक राजा-वरून त्याच्या वंशाला 'गुप्त' असे नाव पडले तसे या राजाच्या नावा-वरून त्याच्या कुलाला 'सातवाहनकुल' असे नाव पडले होते. त्याचा उल्लेख नाशिक येथील कृष्ण नृपतीच्या काळच्या अत्यंत प्राचीन लेखात[१] आढळतो.

कांही विद्वानांच्या मते ही नाणी या वंशकर्त्या राजाची नसून तन्नामधारी, नाणेघाटाच्या लेण्यातील एका प्रतिमा-लेखात निर्दिष्ट केलेल्या, नंतरच्या राजाची असावी. पण त्या मतात काही अर्थ नाही. कारण, हा दुसरा सातवाहन गादीवर आला होता याला प्रमाण नाही. नाणेघाटातील प्रतिमा-लेखात त्याचा 'कुमार सातवाहन' म्हणून निर्देश आहे. तो नागनिकेचा पुत्र असावा. पण त्यानंतर बराच कालावधि गेल्यावर कोरलेल्या वृद्ध नागनिकेच्या नाणेघाटातील लेखात तिच्या इतर पुत्रांप्रमाणे त्याचा उल्लेख नसल्यामुळे तो बहुधा तिच्या ह्यातीत निधन पावला असावा. दुसरा कोणी सातवाहन नामक राज्यकर्ता आपणांस माहीत नाही. तेव्हा ही नाणी त्या वंशाच्या मूळ पुरुषाचीच असली पाहिजेत.

या सातवाहनाच्या उदयाला तत्कालीन परिस्थितीही अनुकूल असावी. अशोकाने बौद्ध धर्म स्वीकारल्यावर स्वतःच्या मुदपाकखान्यातीलही प्राण्यांची हिंसा बंद केली हे त्याच्या प्रस्तरादेशावरून कळते.[२] तसेच त्याने आपल्या साम्राज्यात सर्वत्र हिंसा दण्डार्ह ठरविली. विदर्भाच्या चांदा जिल्ह्यात त्याच्या धर्ममहामात्राचा प्राकृत लेख सापडला आहे त्यात त्याने 'आमच्या प्रजाजनांपैकी जो कोणी प्राण्यांना पकडील किंवा त्यांची हत्या करील त्याला [दंड केला जाईल]' अशी आपल्या स्वामीची आज्ञा शिलाखंडावर कोरली होती.[३] प्राचीन काळी बहुसंख्य लोकांची श्रद्धा हिंसाप्रधान वैदिक यज्ञयागांवर असल्यामुळे ही अहिंसेची उद्घोषणा त्यांना जाचक वाटली असली तर नवल नाही. तेव्हा अशोकाच्या निधना-नंतर केंद्रीय सत्ता निर्बल झाल्यावर निरनिराळ्या प्रदेशांतील असंतुष्ट

---

१ क्रमांक १, ओ. २.

२ *S. I.*, I. (Second Ed.), pp. 1 f.

३ *Ibid*, I (Second Ed.), पृ. १२८ समोरील पट्टिकेतील एका ठिकाणच्या 'च' च्या आकृतीवरून हा लेख अशोकानंतर दीर्घकाळ गेल्यावर कोरला असावा असे कांहींनी प्रतिपादिले आहे. पण तसा 'च' नाणेघाटातील एका मूर्तिलेखातही (क्रमांक ५) येतो. पुढे कोरीव लेख, पृ. १६ पाहा. शिवाय त्यापूर्वीची म्हणून गणलेली 'च' ची आकृतीही देवटेक लेखात येते. म्हणून त्या आक्षेपात काही तथ्य नाही.

प्रजाजनांनी उठाव करून स्थानिक महत्त्वाकांक्षी पुढाऱ्यांस स्वतंत्र राज्य स्थापण्यास साहाय्य केले असावे. या संधीचा फायदा घेऊन राज्य स्थापणाऱ्यांनी पुढे लौकरच वैदिक यज्ञयाग केले, यावरून हेच सिद्ध होते. शुंगवंशसंस्थापक पुष्यमित्र याने स्वत: दोन अश्वमेध केले.[१] दक्षिणेत उदयास आलेल्या सातवाहनांच्या तिसऱ्या-चौथ्या पिढीतील सातकर्णीने तर केवळ दोन अश्वमेध व राजसूयच नव्हे तर आणखी पंधरा-वीस श्रौत याग केले आणि वैदिक धर्माला प्रतिष्ठा मिळवून दिली.[२] ही परिस्थिति ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या आरंभीची दिसते. तशी परिस्थिति ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होती असे दिसत नाही. म्हणून सातवाहनांचा उदय त्या काली झाला असणे संभवनीय नाही.

सातवाहनांचा पुढील इतिहास देण्यापूर्वी त्यांच्या मूल – स्थानाचा शोध केला पाहिजे. हा प्रश्न मोठा जटिल झाला आहे. पुराणांत यांना 'अंध्र' म्हटले असल्यामुळे आरंभीच्या भांडारकर,[३] ब्यूह्लर,[४] रॅपसन,[५] व्हिन्सेंट स्मिथ[६] वगैरे संशोधकांनी सातवाहन हे मूळचे अन्ध्र प्रदेशातील होत, असे प्रतिपादिले होते. ते मान्य केल्यास अंध्र प्रदेशातील आपल्या उदयानंतर एक-दोन पिढ्यांतच त्यांनी पश्चिमेचा विशाल प्रदेश आक्रमून कोकण प्रांतापर्यंत आपली सत्ता प्रस्थापित केली, असे मानावे लागेल ते नितान्त असंभवनीय दिसते. या वंशाचे अति प्राचीन लेख व नाणी अन्ध्र प्रदेशात मुळीच सापडली नाहीत. ती सर्व महाराष्ट्र व कोंकण या प्रदेशांतच सापडली आहेत. डॉ. रा. गो. भांडारकरांनी नाशिकच्या एका लेखात 'धनकटक' वाचून ते अंध्रातील धरणीकोट असावे असा तर्क केला होता आणि ती अंध्रांची राजधानी होती असे प्रतिपादिले होते.[७] तेथील खरा पाठ 'बेणाकट' असून तो भंडारा जिल्ह्यातील पौनीजवळच्या प्रदेशाचा निदर्शक आहे हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. व्हिन्सेंट स्मिथच्या मते अंध्र देशातील श्रीकाकुलम् ही अंध्रांची (सातवाहनांची) राजधानी असावी. पण त्याचा पुरावा म्हणून

---

१ *E. I.*, XX, pp. 57 f.

२ क्रमांक ३ पाहा.

३ *E. H. D.*, pp. 36 f.

४ *A. S. W. I.*, IV, p. 105 f.

५ *B. M. C.* (*Andhras*), p. xvi.

६ *Z. D. M. G.* (1902), p. 657.

७ *E. H. D.*, p. 46.

त्याने जो उतारा उद्धृत केला आहे तो ख्रिस्तोत्तर अकराव्या शतकाइतका नंतरचा आहे.[१] तेव्हा तो प्रमाण मानता येत नाही. अंध्रातील अमरावती येथील स्तूपाशी संबद्ध असे अनेक दानधर्माचे उल्लेख असलेले ख्रिस्तपूर्व पहिल्या-दुसऱ्या शतकांतील कोरीव लेख सापडले आहेत, पण त्यांत कोठेही तत्कालीन सातवाहन राजांचा उल्लेख नाही. याच्या उलट तेथे त्या कालात इतर राजांचे राज्य असल्याचे कोरीव लेखांवरून कळते. उदाहरणार्थ, अंध्रातील भट्टिप्रोलु येथे कुबीरक राजाचा कोरीव लेख[२] सापडला आहे. त्याच्या अक्षरवटिकेवरून तो राजा अशोकानंतर थोड्याच काळाने झाला असे दिसते. तो सातवाहनवंशी नव्हता. ख्रिस्तपूर्व १५० ते १३५ या काळात झालेल्या कलिंग नृपति खारवेलाने पिथुंद नगराचा विध्वंस करून त्रमिर (द्रविड) संघाचा मोड केल्याचे त्याच्या हाथीगुंफा लेखात सांगितले आहे.[३] त्या काळी त्या प्रदेशात सातवाहनांचा अंमल असता तर तो त्यांच्याशी झालेल्या झगड्याचा उल्लेख करता. पण तो तसे काही करत नाही. तेव्हा त्या काळी सातवाहन गोदावरी-कृष्णा दोआवात राज्य करीत नव्हते हे सुस्पष्ट आहे.

कांही वर्षांपूर्वी डॉ. वि. स. सुखटणकर यांनी बेल्लारी जिल्ह्यातील म्याकडोनी येथे सापडलेला सातवाहन नृपति पुळुमावि याचा शिलालेख प्रसिद्ध केला होता.[४] त्यात 'सातवाहनिहारा'चा (सातवाहन विभागाचा) उल्लेख त्यांना आढळला. त्यावरून त्यांनी अनुमान केले की तो प्रदेश सातवाहनांचे मूलस्थान असावा. पण ते अनुमान ग्राह्य वाटत नाही. कारण तेथे सातवाहनकालातील इतर काहीही अवशेष सापडले नाहीत. हा पुळुमावि सातवाहन वंशातील अखेरचा राजा दिसतो. त्याच्या काळी सातवाहनांची सत्ता त्या प्रदेशात पसरल्यावर त्याला इतर जवळच्या प्रदेशांहून निराळा दाखविण्याकरिता सातवाहनांचे नाव दिलेले दिसते. तसलेच 'साताहनिरट्ठ' असे दुसरे नाव नंतरच्या शिवस्कन्दवर्मन् या पल्लवनृपतीच्या हीरहडगल्ली ताम्रपटात आले आहे.[५] सातवाहनांचे आरंभीचे लेख किंवा नाणी या प्रदेशात सापडली नाहीत. तेव्हा बेल्लारी जिल्ह्याचा प्रदेश प्राचीन काळी सातवाहनांचे मूलस्थान होता ही सुखटणकरांची कल्पना मान्य करता येत नाही.

१ 'त्रिलिंगानुशासन' पाहा. हा ग्रंथ अकराव्या शतकातील आहे.
२ *E. I.*, II, pp. 323 f.
३ *E. I.*, XX, pp. 71 f.
४ *E. I.*, XIV, pp. 143 f. क्र. ३४.
५ *E. I.*, I, pp. 5 f.

अलीकडे गोपालाचारी यांनी एक नवीनच कल्पना काढून सातवाहनांचे अन्ध्रत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.[१] कांही पुराणांत अन्ध्रांच्या (सातवाहनांच्या) उदयासंबंधी पुढील श्लोक आढळतो[२] —

**शुङगानां चापि यच्छिष्टं**
**क्षपयित्वा बलं तदा ।**
**सिन्धुको ह्यन्ध्रजातीयः**
**प्राप्स्यतीमां वसुन्धराम् ।।**

यात सातवाहनांचा आद्य नृपति सिन्धुक (खरे नाव सिमुक) याला 'अन्ध्रजातीय' असे म्हटले आहे. त्यावरून गोपालाचारी यांनी असा तर्क केला आहे की सिमुक हा अन्ध्र देशातून आलेला, पूर्व कालातील मौर्य नृपतीचा प्रान्ताधिपति, असावा. ही कल्पना अशक्य नसली तरी तिला काडीचाही आधार नाही. शिवाय, तसे असते तर सिमुकाच्या वंशजांनी आपल्या लेखात कोठेतरी आपल्या अन्ध्रत्वाचा उल्लेख केला असता पण तसा उल्लेख त्यांच्या एकाही कोरीव लेखात आढळत नाही.

सातवाहनांच्या कोरीव लेखांपैकी शेकडा ७५ हून अधिक लेख पश्चिम महाराष्ट्रात आढळले आहेत. त्यांत त्यांच्या अगदी आरंभीच्या लेखांचा समावेश आहे. त्यांची आरंभीची नाणीही याच प्रदेशात मिळाली आहेत. त्यांच्याविषयी अति प्राचीन उल्लेखही त्यांचे हेच मूलस्थान दर्शवितात. उदाहरणार्थ, 'कलिंगाच्या (ओरिसाच्या) खारवेल राजाने आपल्या कारकीर्दीच्या दुसऱ्याच वर्षी सातकर्णि राजाला न जुमानता पश्चिमेकडे आपली चतुरंग सेना पाठविली. ती कन्हबेण्णा (सध्याची वैनगंगा) नदीपर्यंत आल्यावर असिकनगराचे (खानदेशच्या राजधानीचे) लोक भयभीत झाले' असे हाथीगुंफा लेखात म्हटले आहे.[३] हा सातकर्णि अंध्रात राज्य करीत असता तर खारवेलाने त्याच्या प्रदेशावर स्वारी करण्याकरिता आपली सेना पश्चिमेस न पाठविता दक्षिणेस पाठविली असती. वैनगंगेच्या तीरी त्यावेळी प्रथम सातकर्णि राज्य करीत होता हे त्याचे नाणे पौनी येथील उत्खननात सापडले आहे,[४] त्यावरून सिद्ध झाले आहे.

जैन वाङ्मयात सातवाहननृपति शक्तिकुमार याची राजधानी प्रतिष्ठान येथे होती असे म्हटले आहे.[५] ग्रीक प्रवासी टॉलेमी (ख्रिस्तोत्तर १४०)

---

१ *E. H. A. C.*, pp. 23 f.
२ *D. K. A.*, p. 38.
३ *E. I.* XX, pp. 74. f.
४ *J. N. S. I.*, XXXV, pp. 106 f.
५ मात्र हा उल्लेख निरपवाद नाही.

'पुळुमावि राजा प्रतिष्ठान नगरीत राज्य करतो' असे सांगतो.[१] या सर्व पुराव्यावरून महाराष्ट्र हेच सातवाहनांचे मूलस्थान होय याविषयी संशय राहत नाही.

तर मग असा प्रश्न उपस्थित होतो की या राजांना पुराणांत 'अन्ध्र' का म्हटले आहे? या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे आहे. पुराणांतील वंशावलि ख्रिस्तोत्तर ३२० च्या सुमारास रचलेल्या दिसतात. कारण त्यांत त्यानंतरच्या राजांचे उल्लेख नाहीत. सातवाहनांचा अस्त ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या द्वितीय पादात झाला हे मागे दाखविले आहे. त्या काळी सातवाहनांचे सत्ताकेंद्र अंध्रात होते. सातवाहनवंशावळीतील अखेरच्या राजांपैकी एक – विजय सातकर्णि – याचा अंध्रात नागार्जुनकोंड येथे शिलालेख सापडला आहे.[२] त्याने आपल्या नावे विजयपुरी (सध्याचे नागार्जुनकोंड) स्थापून तेथे आपली राजधानी केली होती असे दिसते.[३] त्याची नाणी विदर्भातही सापडली आहेत.[४] पण पश्चिम महाराष्ट्रात अद्यापि मिळाली नाहीत. पश्चिम महाराष्ट्र त्या काळी एका चुटुकुल सातकर्णीने व्यापला होता. तेव्हा यानंतर बनविलेल्या पुराणांतील वंशावळीत सातवाहनांना 'अन्ध्र' म्हटले असले तर आश्चर्य नाही. पुराणांखेरीज अन्य कोणत्याही इतिहाससाधनाचा पुरावा त्यांचे अन्ध्रदेशीयत्व दाखवीत नाही. याच्या उलट पुराणांतील तशा उल्लेखाचे संभवनीय कारण दाखविता येते. म्हणून हे **सातवाहन राजकुल मूळचे महाराष्ट्रातील याविषयी संशय राहू नये.**

सातवाहन राजाचे नाणे सापडून सातवाहन हे या वंशाच्या मूळ पुरुषाचे नाव होते हे सिद्ध होण्यापूर्वी या वंशाला 'सातवाहन' नाव का पडले याविषयी विद्वानांनी विविध तर्क केले होते. कोणी म्हणत की, त्या वंशातील राजांनी अनेकांना वाहने दिली (सात) होती म्हणून, तर दुसरे कोणी इतर राजांनी त्यांना मानचिन्ह रूपाने वाहने दिली होती म्हणून, त्यांना 'सातवाहन' हे नाव पडले. कांहींनी त्या वंशनामाचा 'सप्तवाहन' असा अर्थ करून सातवाहनांचे सूर्योपासकत्व प्रतिपादिले होते. पण त्यांच्या लेखांवरून ते समर्थित होत नाही.[५] 'कथासरित्सागरा'त तर अशी गोष्ट दिली आहे की 'सात' नावाचा एक यक्ष होता. तो आपणापासून झालेल्या एका ऋषिकन्येच्या मुलाला स्वतः सिंहाचे

---

१ *C. A. I.*, p. 376.

२ क्रमांक ३२.

३ पूर्वोक्त.

४ *J. N. S. I.* II, pp. 83 f.; पट्टिका २१, आकृति २२-२३ पाहा.

५ त्यांच्या लेखांच्या आरंभी सूर्याला नमन आढळत नाही. फक्त नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात अनेक देव व चंद्र यांबरोबर सूर्याला नमन आहे.

रूप घेऊन आणि त्याला पाठीवर वसवून नेत असे म्हणून त्या मुलाला हे नाव पडले.[१] या व यासारख्या 'सातवाहन' वंशनामाच्या इतर व्युत्पत्त्या केवळ काल्पनिक आहेत. त्यांना काडीचाही आधार नाही. अलीकडे सापडलेल्या नाण्यांवरून सातवाहन हे व्यक्तिनाम होते हे सिद्ध झाले आहे, मग त्याची व्युत्पत्ति कांही असो. ते पुढे त्याच्यापासून झालेल्या वंशाला मिळाले. त्याचे प्राकृत रूप 'सालाहण' असे आढळते.[२] त्याचे पुढे संस्कृतीकरण होऊन 'शालिवाहन' असे राजनाम वनले. ते आता प्रचलित आहे. शालिवाहनाने ख्रिस्तोत्तर ७८ या वर्षी एक संवत् सुरू केला, ही प्रचलित समजूत मात्र निर्मूल आहे हे पुढे दाखविले आहे.

सातवाहन राजे ब्राह्मणजातीय होते. पुळुमावीच्या नाशिक येथील लेखात त्याचा पिता गौतमीपुत्र सातकर्णि याचे वर्णन 'एकबम्हण' (अद्वितीय ब्राह्मण) आणि 'खतियदपमानदमन' (क्षत्रियांचा गर्व व अभिमान यांचे दमन करणारा) असे केले आहे.[३] पुढे ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकात मुंड नामक वेदवेत्त्या ब्राह्मणाच्या मुलाने केले त्याप्रमाणे या वंशाच्या मूळ पुरुषाने अशोकाच्या निधनाने देशात बंडाळी माजलेली पाहून शांतता प्रस्थापित करण्याकरिता स्रुवा टाकून तरवार घेतलेली दिसते. सातवाहन राजे स्वतः आर्यवंशी व ब्राह्मणजातीय असले तरी तत्कालीन परिस्थितीत त्यांचे विवाह नागकन्यांशी किंवा शक युवतींशी करण्यास प्रत्यवाय नव्हता. प्रथम सातकर्णीने नागनिका या नागकन्येशी विवाह केला होता. पुढे वासिष्ठीपुत्र सातकर्णीने शकवंशी महाक्षत्रप रुद्रदामन् याच्या कन्येला आपली पट्टराणी केली होती हे कोरीव लेखांवरून स्पष्ट दिसते.[४] त्या काळी हिंदु धर्म संकुचित वृत्तीचा नसल्याने असे शरीरसंबंध होऊन परकी आक्रमकांना हिंदु धर्मात प्रवेश मिळणे शक्य असे.

कित्येक सातवाहन राजांच्या नावांत त्यांच्या मातृगोत्राचा उल्लेख आहे. जसे 'गौतमीपुत्र सातकर्णि', 'वासिष्ठीपुत्र पुळुमावि' इत्यादि. त्यावरून कांही विद्वानांनी त्या काळी महाराष्ट्रात मातृसत्ताक कुटुंबपद्धति प्रचलित होती असे अनुमान केले आहे. इतर काहींना त्यात आतेबहीण व मामेवहीण यांच्याशी विवाहाची (cross-cousin marriage ची) पद्धत

---

१ कथासरितसागर, ६, ८७ इ.

२ पुढील गाथा पाहा—
सच्चं भण गोदावरि पुव्वसमुद्देण साहियासन्ती ।
सालाहणकुलसरिसं जइ ते कूले कुलं अत्थि ।। राजशेखरकृत प्रबन्धकोष.

३ क्रमांक १८, अनुक्रमे ओ. ७ व ५ पाहा.

४ क्रमांक २५.

दिसते. गोपालाचारी म्हणतात की ही मातृनामदर्शक नावे आरंभीच्या सातवाहनांत दिसत नाहीत. ती पुढे त्यांच्यांत रूढ झाली आणि त्यांचे शरीर-संबंध इक्ष्वाकु, आभीर वगैरे राजघराण्यांशी झाल्यावर त्यांच्यांत पसरली. ही सर्व अनुमाने चूक आहेत. मातेवरून मुलाचे नाव ठेवणे ही पद्धत भारतात फार प्राचीन काळापासून रूढ आहे. उदाहरणार्थ, वसुदेवपुत्र कृष्णाचा उल्लेख 'छांदोग्य उपनिषदा'त 'देवकीपुत्र' असा येतो, तो पाहा. ही मातृगोत्रदर्शक नावे केवळ राजघराण्यांतील व्यक्तींची असत असे नाही. कोरीव लेखांत अशी अनेक नावे सामान्य व्यक्तींचीही आढळतात आणि ते लेख दक्षिण भारतातल्या-प्रमाणे उत्तर भारततही सापडले आहेत. उदाहरणार्थ, सांची येथील मोगलीपुत व कोसिकीपुत,[१] पितळखोऱ्यातील वछीपुत[२] इत्यादि नावे पाहा. ही नावे उत्तरकालीन सातवाहनांतच प्रचलित होती, त्यांच्या प्राचीन पूर्वजांत रूढ नव्हती असेही म्हणता येणार नाही; कारण आपणांस पूर्वकालीन सातवाहनांचे फारच थोडे लेख उपलब्ध झाले आहेत.

सातवाहनांच्या इतिहासास आरंभ करण्यापूर्वी एक दोन गोष्टींचा खुलासा करणें आवश्यक आहे. पुराणांत सतरा ते तीस राजांची नावे दिली आहेत खरी. पण त्यांत एकवाक्यता नाही. शिवाय काहींच्या बाबतीत त्यांचा समकालीन कोरीव लेखांच्या प्रबळ पुराव्याशी विरोध येतो. उदाहरणार्थ, पुराणांत प्रथम सातकर्णीच्या नंतर पूर्णोत्संग आणि स्कन्धस्तम्भी अशी राजनामे आली आहेत,[३] पण नागनिकेच्या नाणेघाटातील लेखावरून[४] त्या सातकर्णीनंतर त्याचा पुत्र वेदिश्री राज्य करीत होता व त्या वेळी त्याचा धाकटा भाऊ शक्तिश्री हा बहुधा युवराज होता असे दिसते. पूर्णोत्संग व स्कन्धस्तम्भी यांचे उल्लेख कोठेच आढळत नाहीत. तसेच त्या वंशावळींत अन्ध्र (सातवाहन) राजांच्या कारकीर्दीची वर्षे दिली आहेत त्यांतही एकवाक्यता नाही. कांहींना समकालीन कोरीव लेखांचा विरोध आहे. उदाहरणार्थ, गौतमीपुत्र सातकर्णीने एकूण एकवीस वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात,[५] पण त्याचा नाशिकच्या लेण्यातील एक लेख त्याच्या कारकीर्दीच्या २४ व्या वर्षी खोदला होता.[६] तसेच 'गाथासप्तशती'कार हालाच्या कारकीर्दीला पुराणांत फक्त पाच वर्षे दिली आहेत. हालाची विविध प्रकारची ग्रंथरचना लक्षात घेता तेही असंभवनीय वाटते. कांहींच्या बाबतीत

१ *Bhisā Topes*, pp. 288, 289.

२ *I. C. T. W. I.*, p. 40.

३ *D. K. A.*, p. 38.

४ क्रमांक ३, ओ. १ व ४.

५ राजा श्रीगौतमीपुत्र एकविंशत्ततो नृपः। *D. K. A.*, p. 42.

६ क्रमांक १३, ओ. ७ पाहा.

तर संवत्सर संख्येचा निर्देशच नाही! याच्या उलट कौशिकीपुत्र सातकर्णि, कुंभ सातकर्णि, कर्ण सातकर्णि यांसारखी काही नावे नाण्यांवरून माहीत झाली आहेत,[१] पण ती पुराणांतील वंशावळीत आढळत नाहीत. तेव्हा सातवाहनाच्या इतिहासाचे पुराणांतील वंशावळि हे साधन किती लेचेपेचे आहे हे दिसून येईल. या वंशावळींचा पुरावा, अन्य उपोद्बलक पुरावा नसेल तर, सर्वथा विश्वसनीय मानता येत नाही.

पुराणांतील वंशावळीत शिशुक किंवा सिन्धुक याचा अन्ध्र (सातवाहन)–वंशसंस्थापक म्हणून निर्देश आहे. त्याचे खरे नाव सिमुक (श्रीमुख) होते. ते नाणेंघाटातील एका प्रतिमालेखात आले आहे.[२] त्या लेखात त्याचा निर्देश 'सिमुक सातवाहनो' असा आला आहे. त्याला कृष्ण नामक धाकटा भाऊ होता. तो त्याच्यानंतर गादीवर आला. त्याच्या काळच्या नाशिकच्या लेखात[३] 'सातवाहनकुले कन्हे राजिनि' (सातवाहन कुळातील कृष्ण राज्य करीत असता) असा निर्देश आला आहे. डॉ. अ. स. अळतेकर यांच्या मते हे दोन्ही भाऊ सातवाहनाचे पुत्र असावे,[४] पण तसे असते तर नाशिकच्या पूर्वोक्त लेखात 'सातवाहनपुते कन्हे राजिनि' असा शब्दप्रयोग आला असता. 'सिमुक सातवाहनो' या मूर्तिलेखातही 'सातवाहन कुळातील सिमुक' असाच अर्थ विवक्षित दिसतो. तेव्हा सिमुक व कृष्ण हे या सातवाहनाचे साक्षात् पुत्र नसून त्याचे वंशज होते हे स्पष्ट दिसते.

पुराणांत सिमुकाचे नाव आरंभी आले असले तरी तो या कुलाचा संस्थापक नव्हता. त्याच्या पूर्वी – एक दोन पिढ्यांमागे – सातवाहन नामक ब्राह्मणाने आपले स्वातंत्र्य उद्घोषित करून स्वतःच्या नावे तांब्याची व शिशाची नाणी पाडली होती. तो ख्रिस्तपूर्व २३० या वर्षी उदयास आला होता. त्याचे राज्य त्यावेळी लहानसेच असेल पण ते पुढे वृद्धिंगत झाल्यावर त्याचे वंशज आपण सातवाहन कुळातील आहो याचा अभिमान मानू लागले. 'ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीस अशी राजनामांकित नाणी प्रचारात नव्हती'[५] या आक्षेपात काही अर्थ नाही. पहिला सातकर्णि याच्या काळी चांदीची राजनामांकित नाणी प्रचलित होती यावर कोणाचा विश्वास बसला नसता. पण तो सातकर्णि व नागनिका यांचे चांदीचे जोड नाणें अलीकडे सापडले आहे.[६] तसा

१ *S. I.*, III, pp. 20 f.; pp. 43 f. प्रकरण ८, 'नाणी' पाहा.

२ क्रमांक ४ पाहा.

३ क्रमांक १, ओ. १.

४ *M. S. G.* (History), I, p. 77.

५ *Ibid.* p. 76.

६ पट्टिका २०, आकृति ३३ पाहा.

प्रकार सातवाहन राजाच्या नाण्यांच्या बाबतीत असणे असंभवनीय नाही. अन्य कोणी सातवाहन नामक नृपति कोठेही उल्लेखिला नाही.

सातवाहनानंतर एक दोन पिढ्यांनी पुराणांत उल्लेखिलेला आद्य नृपति सिमुक झाला असावा. त्याचा काळ ख्रिस्तपूर्व २०० असा अनुमानिता येतो. पुराणांत याच्यापासून वंशावळीला आरंभ करण्याचे कारण याने आपल्या राज्याचा बराच मोठा विस्तार करून त्याला प्रतिष्ठा मिळवून दिली होती, हे असावे. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात आरंभी याचे वर्णन आले होते, पण ते आता बरेचसे नष्ट झाले आहे. तथापि अवशिष्ट भागात नागनिका ही एका शूर, वीर व अजिक्य अशा दक्षिणापथपति राजाची वधू (स्नुषा) होती असे वर्णन आलेले दिसते[१] ते सिमुकाला अनुलक्षून असावे. त्यावरून त्याने दक्षिणापथावर (अखिल महाराष्ट्रावर) आपला अंमल बसविला होता असे अनुमानिता येते. या वंशातील तो पहिला बलाढ्य राजा असल्यामुळे त्याच्यापासून पुराणांतील वंशावळ सुरू झाली असल्यास नवल नाही.

या काळी सातवाहनांची राजधानी कोठे होती याचा उल्लेख कोठेही आढळत नाही. सातवाहनांचे सर्वांत प्राचीन लेख नाशिक व नाणेघाट येथे सापडले आहेत. त्यांवरून त्यांची राजधानी याच प्रदेशात असावी असे अनुमान करता येते. नाणेघाटाजवळ जुन्नर येथे सातवाहनांचा पाडाव करणाऱ्या नहपान क्षत्रपाची राजधानी होती असे मानण्यास थोडाबहुत पुरावा आहे.[२] तेव्हा तेथेच पूर्वी सातवाहनांची राजधानी असावी. पुढे त्यांचा पराभव करणाऱ्या नहपानानेही तेथूनच राज्य केले असे दिसते. म्हणून त्या काळी सातवाहनांना आपले मुख्य ठिकाण गोदातीरी प्रतिष्ठान (सध्याचे पैठण) येथे हलवावे लागले. पुळुमावीच्या काळी तेथे राजधानी होती हे टॉलेमीच्या तद्विषयक उल्लेखावरून स्पष्ट आहे.[३] पण तेथे सातवाहनांची राजधानी आरंभापासून असती तर नागनिकेचा विस्तृत लेख नाणेघाटात न कोरला जाता औरंगाबादजवळच्या एखाद्या लेण्यात दिसला असता.

सिमुकानंतर त्याचा भाऊ कृष्ण हा राजा झाला. त्याच्या काळचा लेख नाशिक येथील अत्यंत प्राचीन अशा लेण्यात कोरला आहे.[४] त्यात एका समण (श्रमण) नामक महामात्राने ते लेणें कोरल्याचा उल्लेख आहे.[५] अशोकाने

---

१ क्रमांक ३, ओ. २. भाग २, पृ. १०, टीप ४ पाहा.

२ तेथे बहुधा नहपानाची पूर्वी राजधानी असावी, कारण तेथील लेण्यात त्याच्या अमात्याचा लेख सापडला आहे.

३ *C. A. I.*, p. 376.     ४ क्रमांक १.

५ श्रमण हे 'बौद्ध भिक्षु' या अर्थी योजिले नसून ते व्यक्तिनाम होते. तसलेच 'तापस' हे व्यक्तिनाम क्रमांक ११ मध्ये आले आहे ते पाहा.

बौद्ध धर्माच्या प्रसारार्थ धर्ममहामात्र नेमले होते. ती पद्धत निदान कृष्णाच्या काळापर्यंत चालू होती असे दिसते. पुढील काळात हा अधिकारी दिसत नाही.[१] कृष्णाने अठरा वर्षे राज्य केले असे पुराणें सांगतात.

यानंतर गादीवर आलेला प्रथम सातकर्णि याचा तत्पूर्वीच्या कृष्णराजाशी कसा संबंध होता हे विवादास्पद झाले आहे. पुराणांच्या वंशावळीत त्याला 'कृष्णराजाचा पुत्र' म्हटले आहे.[२] पण तसे असते तर नाणेघाटात त्याची प्रतिमा अवश्य कोरली गेली असती. पण तेथे पुढील व्यक्तींच्याच प्रतिमा कोरल्या होत्या हे त्यांवरच्या कोरीव लेखांवरून कळते[३]– (१) राजा श्री सिमुक सातवाहन ; (२) देवी नागनिका आणि राजा श्री सातकर्णि ; (३) कुमार भाय[ल] ; (४) [नाम नष्ट ; बहुधा नागनिकेच्या नंतरच्या लेखात राजा म्हणून उल्लेखिलेला, पण प्रतिमा कोरल्या तेव्हा कुमार असलेला, वेदिश्री] ; (५) महारठि त्रनकयिर ; (६) कुमार हकुश्री ; (७) कुमार सातवाहन. या प्रतिमा–पंक्तीत कृष्णाचे नाव नाही. तो सातकर्णीचा पिता असता तर सिमुकाऐवजी त्याचेच नाव आरंभी आले असते. तेव्हा सातकर्णि हा त्याचा पुत्र नसून सिमुकाचा पुत्र असावा. सिमुकाच्या निधनकाळी सातकर्णि हा अल्पवयी असल्याने त्याचा चुलता कृष्ण यानें राज्यधुरा संभाळली असावी. कदाचित् चालुक्य मंगलेश आणि यादव महादेव यांच्याप्रमाणें त्याचे आपल्या पुतण्याशी कालान्तरानें वितुष्ट उत्पन्न झाल्यामुळे राज्यक्रान्ति होऊन सातकर्णि गादीवर आला असेल आणि म्हणून पुढे राजवंशी व तद्वंशसंबंधी व्यक्तींच्या प्रतिमा कोरताना त्याचे नाव गाळले असेल. कारण काही असो, त्याची प्रतिमा या प्रतिमावलीत नसल्याने सातकर्णि हा कृष्णाचा पुत्र होता हे पुराणांचे विधान चूक ठरत आहे.

या प्रतिमावलीनें पुष्कळ संशोधकांना बुचकळ्यात टाकले आहे. तीतील केंद्रिय व्यक्ति देवी नागनिका आणि राजा सातकर्णि याच होत. इतर व्यक्ति त्यांच्याशी संबद्ध आहेत. सिमुक हा सातकर्णीचा पिता होता. नागनिकेची प्रतिमा सातकर्णीच्या अगोदर कोरली असल्यामुळे ती सातकर्णीची राणी नसून माता असावी असे अनुमान डॉ. कटारे यांनी केले होते,[४] पण त्यात तथ्य नाही. नागनिकेच्या महत्त्वामुळे तिची प्रतिमा तिच्या पतीच्या पूर्वी कोरली होती. तिचे राजकुलातील महत्त्व आणि दरारा तिच्या नाणेघाटातील लेखावरून

---

१ यावरूनही हा लेख ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातील नसून अशोकानंतर लौकरच कोरण्यात आला असावा.

२ *D. K. A.*, p. 39.

३ क्रमांक ४–९ पाहा.

४ *I. H. Q.*, XXVII, p. 213.

स्पष्ट दिसतो.[१] आता तर सातकर्णि व नागनिका यांचे चांदीचे जोड नाणे सापडले आहे.[२] त्यावरून या बाबतीत संशयाला जागाच उरत नाही. त्या नाण्याच्या पुढील बाजूवर वरील भागी '[र]ञो सिरिसा[तकणिस]' आणि त्या खाली चौकोनात 'नागनिका' असे लेख आहेत. त्यांवरून नागनिका ही सातकर्णीची राणी होती यात मुळीच संदेह नाही.

नाणेघाटातील प्रतिमावलीत पुढे नागनिकेचे पुत्र भाय[ल] व बहुधा वेदिश्री यांच्या प्रतिमा कोरल्या होत्या असे दिसते. त्यांतील वेदिश्रीच्या प्रतिमेवरील भागाचा लेख आता नष्ट झाला आहे. नंतरचा महारठि त्रनकयिर हा नागनिकेचा पिता दिसतो. तिच्या लेखात त्याचे नाव नष्ट झाले असले तरी त्याचे वर्णन अवशिष्ट आहे. तो अंगियकुलवर्धन, सागरवलयांकित पृथिवी-वरील श्रेष्ठ वीर आणि महारठि होता. तो नागनिकेचा पिता असल्याने त्याला या प्रतिमावलीत स्थान मिळाले हे उघड आहे. शेवटच्या दोन प्रतिमा कुमार हकुश्री आणि कुमार सातवाहन यांच्या होत्या. हेही नागनिकेचेच पुत्र होते. त्यांपैकी पहिल्याचा निर्देश तिच्या नाणेघाटातील लेखात सतिसिरि (शक्तिश्री) असा आला आहे.[३]

या प्रतिमावलीत नागनिकेचे पुत्र एकत्र न येता दोन भागांत का विभागले आहेत, त्या सर्वांची नावे तिच्या लेखात न आढळता फक्त दोघांचा – वेदिश्री आणि शक्तिश्री यांचा –– निर्देश कसा येतो, यांचे कोडे संशोधकांना पडले आहे. पण ते सोडविणे कठीण नाही. या प्रतिमा सातकर्णीच्या कारकीर्दीत दोन भिन्न काळी कोरल्या होत्या, असे दिसते. पहिल्या सहा प्रतिमा – सिमुक, नागनिका, सातकर्णि, भायल, वेदिश्री आणि त्रनकयिर यांच्या – सातकर्णी-च्या कारकीर्दीच्या मध्यात कोरल्या असाव्या. पुढे काही काळाने नागनिकेला दोन पुत्र – हकुश्री आणि सातवाहन – झाले. त्यांच्या प्रतिमा कोरण्यात आल्या. नंतर बऱ्याच काळाने, वेदिश्री गादीवर आल्यावर काही वर्षांनी, नाग-निका अगदी वृद्ध झाली तेव्हा, तिचा नाणेघाटातील विस्तृत लेख कोरण्यात आला हे पुढे दाखविले आहे.[४] त्यावेळी तिच्या चार पुत्रांपैकी फक्त दोन – राज्यकर्ता वेदिश्री आणि त्याचा धाकटा भाऊ शक्तिश्री हे – जिवंत होते. त्यांची नावे तिच्या लेखात आली आहेत.

सातकर्णि हा मोठा बलाढ्य राजा होता. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात त्याचे वर्णन आले होते, पण ते बहुतेक सर्व आता नष्ट झाले आहे. फक्त

---

१ क्रमांक ३ पाहा. २ पट्टिका २०, आकृति ३३ पाहा.

३ कांही विद्वान शक्तिश्रीचे प्राकृत रूप हकुसिरी होणार नाही असा आक्षेप घेतात; पण हकु हे लाडके नाव असावे. हकु हे द्राविड भाषेतले रूप दिसते.

४ क्रमांक ३, ओ. ५ पाहा.

'महतो मह' एवढेच शब्द शिल्लक आहेत. त्यावरून तो तत्काळी अत्यंत श्रेष्ठ असा गणण्यात येत होता असे दिसते. त्याच्या कारकीर्दीतील काही ज्ञात घटनांवरूनही त्याचा प्रभाव अजमावता येतो.

सातकर्णीचा पिता सिमुक याने संपूर्ण महाराष्ट्र जिंकून 'दक्षिणापथपति' ही पदवी धारण केली होती. तेव्हा सातकर्णीने उत्तर भारतात आपल्या राज्याचा विस्तार करण्याचे ठरविले. त्या काळी उत्तरेत शुंगांचे बरेच मोठे साम्राज्य होते. पुष्यमित्रानंतर शुंगांची राजधानी पाटलिपुत्राहून हलवून मध्यभारतात विदिशा येथे नेण्यात आली होती. म्हणून तक्षशिलेचा तत्कालीन ग्रीक राजा अंतलिकित (अँटिअलकिडस) याने आपला वकील हेलिओदोर (हेलिओडोरस) याला पाटलिपुत्राला न पाठवता विदिशेस पाठविले होते, हे तेथील स्तंभलेखावरून माहीत झाले आहे.[१] सातकर्णीने विदिशेवर स्वारी करून तो प्रदेश काही काळ आपल्या ताब्यात ठेवला होता असे दिसते. या अवधीत त्याचा मुकादम वासिष्ठीपुत्र आनंद याने सांची येथील स्तूपाच्या तोरणावर आपला लेख कोरून ठेवला होता. त्यात तो स्वतःचा 'राजा श्रीसातकर्णीचा आवेशनिक' असा निर्देश करतो.[२] या स्वारीने शुंगांची सत्ता खिळखिळीत झाल्यामुळे पुढे काण्वांचा उदय होण्यास मदत झाली असावी. पुराणांत सिमुकाने काण्वांचे व अवशिष्ट राहिलेले शुंगांचे बल नष्ट करून आपले राज्य स्थापिले असे जे वर्णन आले आहे ते सातकर्णीच्या या स्वारीच्या स्मृतीमुळे लिहिले गेले असावे.

आपल्या कारकीर्दीत सातकर्णीला शत्रूने आपल्या राज्यावर केलेल्या आक्रमणाला तोंड द्यावे लागले होते. पूर्वेकडील कलिंग (ओरिसा) देशाचा राजा खारवेल याने गादीवर आल्यानंतर दुसऱ्याच वर्षी सातकर्णीला न जुमानता पश्चिमेकडे आपली चतुरंग सेना पाठविली. ती कण्हबेण्णा नदीपर्यंत पोचल्यावर तिच्या आक्रमणामुळे असिक (ऋषीक) देशाच्या राजधानीच्या लोकांच्या मनात धडकी भरली असे वर्णन खारवेलाच्या हाथीगुंफा लेखात आले आहे.[३] त्याचा अन्वयार्थ अद्यापि संशोधकांना नीट कळला नाही. काही विद्वान् ही कण्हबेण्णा कृष्णा नदी समजतात, आणि 'असिक – नगरा'च्या ऐवजी 'मुसिक – नगर' वाचून खारवेलाची सेना कृष्णा नदीला पोचल्यावर रायचूर जिल्ह्यातील मस्की येथील लोकांना भयग्रस्त करती झाली असे समजतात. पण हा अर्थ चूक आहे. कारण कलिंग देशाच्या सेनेला कृष्णा नदीला पोचण्याला पश्चिम दिशेला जावे लागले नसते. कृष्णा नदी कलिंगाच्या दक्षिणेस आहे

१ *J. B. B. R. A. S.*, XXIII, p. 104.
२ *The Monuments of Sāñchī*, p. 398. क्र. २ पाहा.
३ *E. I.* XX, pp. 71 f.

पश्चिमेस नाही. शिवाय, हाथीगुंफा लेखातील खरा पाठ 'असिकनगर' आहे, 'मुसिकनगर' नाही. असिक (ऋषीक) हे सध्याच्या खानदेशाचे प्राचीन नाव होते हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[१]

तेव्हा खारवेलाची सेना पश्चिम दिशेने आक्रमण करून कण्हबेण्णा (वैनगंगा) नदीपर्यंत आली होती यात संशय नाही. तो प्रदेश सातकर्णीच्या ताब्यात होता. वैनगंगा तीरावरील पौनी तत्कालीन विदर्भाची राजधानी होती. अलीकडे उत्खननात तेथे या सातकर्णीचे नाणे सापडले आहे.[२] त्यावरून या बावतीत संशयाला मुळीच जागा नाही.

खारवेलाच्या सेनेला वैनगंगातीरी पौनी येथे प्रबळ प्रतिकार झाला आणि त्यामुळे परत फिरावे लागले, असे दिसते. तिला विजय मिळाला असता तर खारवेलाने आपल्या लेखात त्याचा निश्चितच निर्देश केला असता. नंतर दोन वर्षांनी खारवेलाने पुन: सातकर्णीच्या राज्यावर स्वारी केली. पण या खेपेस सातकर्णीशी युद्धाचा प्रसंग टाळून त्याने त्याच्या रठिक आणि भोजक या मांडलिकांच्या प्रदेशांवर आक्रमण केले आणि त्यांपैकी कांहींना पकडून आपल्यापुढे नतमस्तक होण्यास भाग पाडले असे वर्णन हाथीगुंफा लेखात आले आहे.[३] या स्वाऱ्यांमुळे खारवेलाला फारसा फायदा झालेला दिसत नाही.

सातकर्णि जसा शूर तसा धार्मिक वृत्तीचा होता. त्याने अनेक श्रौत याग करून हजारो गाई, अनेक घोडे, हत्ती, वस्त्रे, कार्षापण नामक तत्कालीन नाणी आणि धान्याच्या राशि ब्राह्मणांना व यज्ञांच्या सेवकांना दान दिल्या. त्याची राणी नागनिका हिचा नाणेघाटातील लेख[४] आता अत्यंत खराब झाला आहे. तथापि अवशिष्ट भागात पुढील श्रौत यज्ञांचा निर्देश आहे – दोन अश्वमेध, राजसूय, अग्न्याधेय, अन्वारंभणीय, अंगारिक, भगलदशरात्र, गर्गत्रि-रात्र, गवामयन, अप्तोर्याम, अंगिरसामयन, शतातिरात्र, अंगिरसातिरात्र आणि छंदोपवमानत्रिरात्र. या यज्ञानुष्ठानात त्याला आपल्या धार्मिक वृत्तीच्या नागनिका राणीचे प्रोत्साहन व साहचर्य लाभले होते. ती स्वत: यज्ञदीक्षांदिकांत निष्णात होती आणि त्यांवर तिची नि:सीम श्रद्धा होती.

सातकर्णीने दोन अश्वमेध व राजसूय यज्ञ करून आपला दरारा भारतात सर्वत्र पसरविला होता. त्याचे उत्तर भारतातील राज्य फार काळ टिकले नसावे. तथापि त्या काळी त्याला शूर, वीर आणि धर्मनिष्ठ म्हणून मोठी कीर्ति प्राप्त

१ सं. मु., सर ८, पृ. ११९ इं.
२ *J. N. S. I.* XXXV, pp. 106 f.
३ *E. I.*, XX, pp. 71 f.
४ क्रमांक ३.

झाली असावी. त्याने अश्वमेध यागानंतर स्वतःच्या व आपली राणी नागनिका हिच्या नावे चांदीची नाणी पाडली होती. त्यांवर त्याच्या अश्वमेधाची सूचक अशी घोड्याची आकृति आहे. तसेच त्याने आपल्या नावाची अनेक प्रकारची पोटिन व शिशाची नाणी प्रसृत केली होती. त्यांपैकी काहींच्या पुढील बाजूवर हत्ती तर इतर काहींवर वृषभाची आकृति आहे. त्यांवरील लेख 'रञो सिरि-सातकणिस' (हे नाणे राजा श्रीसातकर्णीचे) असा आहे.[१]

सातवाहन राजाने या वंशाची स्थापना केली म्हणून त्याला 'सातवाहन-कुल' असे नाव पडले हे मागे दाखविले आहे. पण सातकर्णीनंतर ते कुलनाम मागे पडून 'सातकर्णि' हेच कुलनाम बनले. यापुढील या वंशाच्या राजांनी सातकर्णि हे कुलनाम घेऊन स्वतःचे वैयक्तिक नाव त्याला जोडण्याची प्रथा पाडली. म्हणून यापुढे कौशिकीपुत्र सातकर्णि, गौतमीपुत्र सातकर्णि, वासिष्ठीपुत्र सातकर्णि, स्कंद सातकर्णि, यज्ञ सातकर्णि, कुंभ सातकर्णि, विजय सातकर्णि इत्यादि नावे आढळतात. त्यांवरून यापुढे हे राजकुल सातकर्णि या नावाने ख्याति पावले असे दिसते. त्याचे पूर्वीचे 'सातवाहनकुल' हे नाव नंतर क्वचितच आढळते.[२]

सातकर्णीने केवळ दहा वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात. पण ते विश्वसनीय वाटत नाही. पंधरा-सोळा श्रौत याग – ज्यांमध्ये दोन अश्वमेध व एक राजसूय अंतर्भूत होते ते – दहा वर्षांत केले जाणें असंभवनीय आहे. इतर अनेक ठिकाणांतल्याप्रमाणे येथेही पुराणांचे विधान चुकीचे आहे.

सातकर्णीनंतर पूर्णोत्संग गादीवर आला आणि त्याने अठरा वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात. पण नागनिकेच्या नाणेघाटातील लेखावरून सातकर्णी-नंतर त्याचा व नागनिकेचा पुत्र वेदिश्री राज्य करू लागला असे दिसते. त्याच्या काळी नागनिकेचा नाणेघाटातील विस्तृत लेख कोरविला होता. त्यात प्राचीन कालनिदर्शक पद्धतीस अनुसरून आरंभी त्याच्या कारकीर्दीचे संवत्सर, ऋतु, पक्ष व दिवस यांचा उल्लेख आला असावा. पण तो भाग आता नष्ट झाला आहे तथापि, त्यात वेदिश्रीचे वर्णन 'तो राजा अनेक लोकोपयोगी (पूर्त) कामे करी, लोकांना आश्वासने देऊन त्यांची इच्छा पूर्ण करी आणि धनदान करून त्यांचे दारिद्रय दूर करी' असे आले आहे.

वेदिश्रीच्या कारकीर्दीत त्याची माता नागनिका अत्यंत वृद्ध झाली होती. तथापि, पतीच्या निधनानंतरही तिने आपले यज्ञानुष्ठान बंद केले नव्हते तिने स्वतः (सयं) अनेक यज्ञ पुरोहितांकडून करविले. त्यांचा निर्देश व त्य

१ *J. N. S. I.*, VIII, pp. 18 f. पट्टिका १९, आकृति ३१–३२.

२ क्रमांक ३४ मध्ये 'सातवाहनिहारा'चा उल्लेख आहे. बाणाने 'हर्षचरिता'च्या आठव्या उच्छ्वासात नागार्जुनाचा मित्र म्हणून सातवाहन नृपत्तीचा उल्लेख केला आहे.

प्रसंगी दिलेल्या गाई वगैरेंच्या दक्षिणांचा तपशील नाणेघाट लेखातील १७ ते २० या ओळीत आला होता. पण तो भाग आता बहुतेक नष्ट झाला आहे. तथापि, अवशिष्ट भागात पुढील यज्ञांचा निर्देश आहे – अंगिरसामयन, त्रयोदशरात्र, आणि दशरात्र.

'नाणेघाटातील लेख नागनिकेने कोरविला तेव्हा ती आपल्या वेदिश्री या अल्पवयी कुमाराच्या नावे राज्यकारभार करीत होती', असे मत ब्यूह्लर,[१] रॅप्सन[२] वगैरेंनी प्रतिपादिले होते. त्याला आधार 'नमो कुमारवरस वेदि-सिरिस रञो' हे नाणेघाटातील पहिल्या ओळीतील शब्द होत. पण हा अर्थ चुकीचा आहे. 'नमो कुमारवरस' याचा अर्थ 'कुमारश्रेष्ठ कार्त्तिकेयाला नमस्कार असो' असा आहे.[३] पुढे वेदिश्रीला 'राजा' म्हटले आहे. नंतर चौथ्या ओळीत त्याला 'देव' (राजा) असे उल्लेखिले आहे. तेव्हा तो त्या काली स्वतः राज्य करीत होता यात संशय नाही.

नागनिकेचा नाणेघाटातील लेख कोरला गेला तेव्हा ती अत्यंत वृद्ध झाली होती. तिच्या हयातीत तिचा वडील मुलगा भायल आणि धाकटा सात-वाहन हे अल्पवयी असताना निधन पावले होते. त्यामुळे आधीच अध्यात्मवृत्तीच्या तिच्या मनात संसाराविषयी अत्यंत विरक्ति उत्पन्न झाली होती. आता ती महिना-महिना उपवास करीत असे. ती गृहतापसी (संसारात असूनही तपस्विनी) झाली होती. ती अत्यंत संयत वृत्तीने राहत होती. यज्ञयाग आणि व्रते करण्यात तर ती अत्यंत निपुण होती. पतीच्या निधनानंतर त्याच्या विधवा स्त्रीने कसे वागावे हे मनूने खालील श्लोकात सांगितले आहे.[४]––

**आसीतामरणात्क्षान्ता नियता ब्रह्मचारिणी ।**
**यो धर्म एकपत्नीनां काङक्षन्ती तमनुत्तमम् ।।**

तदनुसार तिचे आचरण असे. नाणेघाटातील तिच्या वर्णनातील शब्दयोजना अगदी 'मनुस्मृती'तल्या प्रमाणे आहे. तेव्हा संन्यस्त वृत्तीने राहून सर्वकाळ यज्ञयाग, व्रते इत्यादि धार्मिक कृत्यांत घालविणारी ही नागनिका सातवाहनांच्या सारख्या विशाल साम्राज्याचा कारभार रीजंट (राजप्रतिनिधि) म्हणून चालवीत असेल हे सुतराम् असंभवनीय आहे.

प्रथम सातकर्णीनंतर त्याचा वडील मुलगा वेदिश्री गादीवर आला हे मागे सांगितले आहे. पण त्याचे नाव पुराणातील वंशावळीत येत नाही. त्याच्या

---

१ *A. S. W. I.*, V, p. 67.

२ *B. M. C.* (*Andhras*) Introd. xviii.

३ क्रमांक ३ चा अनुवाद पाहा. सक्तिगुंजी लेखातही 'कुमारवरदत्त' हे पद 'कार्त्तिकेय-दत्त' याच अर्थात योजिले आहे. *E. I.* XXVII, p. 48 f.

४ मनु. ५, श्लोक १५८.

ऐवजी पूर्णोत्संग असे नाव पुराणे देतात. डॉ. अळतेकरांनी पूर्णोत्संग हे वेदिश्रीचे विरुद असावे असें अनुमान केले आहे. पण त्याला आधार नाही.

वेदिश्री राज्य करीत होता तेव्हा त्याचा धाकटा भाऊ सतिसिरि (शक्तिश्री) हा बहुधा युवराज म्हणून राज्यकारभार पाहत असावा. या दोघांचीच नावे नागनिकेचे पुत्र म्हणून नाणेघाटातील लेखात आली आहेत. शक्तिश्रीचे दुसरे नाव हकुश्री असावे. त्याची प्रतिमा नाणेघाटात कोरली होती. तो वेदिश्रीनंतर गादीवर आला असावा. 'रञो सिरिसतस' लेख असलेली नाणी त्याची असावी. त्यांतील काही नर्मदेच्या उत्तरेस त्रिपुरी (जबलपूर जवळचे तेवर) येथे सापडली आहेत. नाशिक येथील क्र. १० च्या लेण्यातील लेखात ज्या महाहकुसिरीचा उल्लेख आहे तो हाच कुमार हकुसिरि असावा. त्याचे राजवंशीयत्व 'महा' या उपपदाने सूचित केलेले दिसते.

हा शक्तिश्री जैन ग्रंथांत उल्लेखिलेला शक्तिकुमार असावा. पण 'तो अत्यंत स्त्रीलंपट होता आणि त्यामुळे मारला गेला'[१] हे त्यातील वर्णन खरे वाटत नाही. या राजाची माळवा पद्धतीची नाणी सापडली आहेत. त्यांवर 'रञो सर–सतस' (रञो सिरि–सतिस) असा लेख आढळतो.[२] ही नाणी राजा सात (किंवा सातकर्णि) याची मानली जातात. पण ती राजा शक्तिश्रीची असणें जास्त संभवनीय आहे. कारण सातकर्णि याचे 'सात' असे संक्षिप्त रूप बनविण्याचे कारण नाही. शिवाय 'सा' यातील आकाराचे चिन्हही दिसत नाही. या नाण्यांची अक्षरवटिका अत्यंत प्राचीन पद्धतीची आहे.

कृष्ण राजाच्या काळी त्याच्या महामात्राने नाशिक येथे बौद्ध श्रमणांकरिता एक लेणे कोरविले होते. त्याच्या जवळच एक प्राचीन चैत्य लेणे खोदले आहे. ते महाहकुश्रीची नात व एका राजामात्याची कन्या भटपालिका हिने कोरविले होते. कांही विद्वानांच्या मते "हा हकुश्री नाणेघाटात ज्याची प्रतिमा कोरली आहे त्याहून भिन्न असावा. तसे नसते तर त्याला 'राजन्' हे उपपद लावले असते." पण हा तर्क बरोबर नाही. तो लेख सातवाहनांचा नाही. शिवाय इतरत्र जसे राजवंशीयत्व अरक (आर्यक) या उपपदानें दाखविले आहे, तसे ते येथे 'महा' या उपपदानें सूचित केले आहे.[३]

यानंतर द्वितीय सातकर्णीचे नाव पुराणांतील वंशावळीत येते. माळव्यात सापडलेली 'रञो सिरि सातकणिस' असा लेख असलेली नाणी याची असावी

---

१ *M. S. G., H.*, I, p. 82.

२ रॅप्सनने यांपैकी एका नाण्यावरील लेख 'रञो सिरि–सातस' असा वाचला आहे. *B. M. C.* (*Andhras*), pl. I, 2. पण त्यातील 'सातस' यांतील 'सा'चा 'आ'कार स्पष्ट नाही. तेथे 'सतस' असेच वाचले पाहिजे ते 'सतिस' चे द्योतक दिसते.

३ मागील पृ. [५] पाहा.

असा काही विद्वानांचा तर्क आहे.[१] इतर काहींच्या मते 'रञो सर – सतस' लेख असलेली नाणी याची असावी. या दोन्ही अनुमानांना काही आधार नाही. या द्वितीय सातकर्णीच्या कारकीर्दीविषयी आपणांस काहीच माहिती नाही. याच्या उलट प्रथम सातकर्णीने दोन अश्वमेध व एक राजसूय केले असल्यामुळे त्यानेच नर्मदेच्या उत्तरेस आपल्या राज्याचा विस्तार करून ही 'सातकर्णि' नावाची नाणी प्रसारित केली असावी, असे वाटते.

द्वितीय सातकर्णीनंतर त्याचा पुत्र लंबोदर गादीवर आला असे पुराणे सांगतात. हे नाव विलक्षण दिसते. तथापि याच्या काळी सातवाहन पूर्वेकडे हळू हळू सरकत असावे. कारण, याचा उत्तराधिकारी आपीलक याचे तांब्याचे नाणे छत्तीसगडाच्या बिलासपूर जिल्ह्यातील बालपूर येथे महानदीच्या काठी मिळाले होते.[२] त्याच्या फक्त पुढील बाजूवर आकृति व लेख आहेत, आणि मागील बाजू रिकामी आहे. पुढील बाजूवर खाली सोंड करून उजवीकडे चालणारा हत्ती व त्याच्या समोर अंकुश असून सभोवार 'रञो सिवसिरिसापीलकस' (हे नाणे शिवश्री आपीलकाचे) असा लेख आहे. 'शिवश्री' हे उपपद याच्याप्रमाणे पुढे अनेक सातवाहनांनी तसेच अन्यवंशी राजांनीही आपल्या नावामागे लावलेले दिसते. हे नाणे इतर सातवाहन नाण्यांहून भिन्न प्रकारचे आहे.

याच्या पुढील राजा मेघस्वाति याचे एक नाणे अन्ध्रात सापडले आहे. त्यावर त्याचे नाव 'घसद' (मेघसातकर्णि) असे आहे.[३] ते अपूर्ण असले तरी ते पाडणारा राजा दुसरा कोणी असण्याचा संभव नाही.

पुराणांतील वंशावळीत मेघस्वाति हा क्र. ९ चा राजा. त्यानंतर क्र. १७ च्या हालनृपतीपर्यंत सात राजांची फक्त नावेच आपणांस पुराणांतील वंशावळीवरून माहीत होतात. त्यांतील बहुतेकांच्या कारकीर्दीची वर्षेही अत्यल्प आहेत. याचे कारण काय ते निश्चितपणे सांगता येत नाही.

यानंतर क्र. १७ चा राजा हाल हा प्राकृत वाङ्मयात 'गाथासप्तशती'चा कर्ता म्हणून सुप्रसिद्ध आहे. पण त्याच्या चरित्राविषयी आपणांस काहीच माहिती नाही. सातवाहनांनी प्राकृत भाषेस मोठे उत्तेजन दिले होते.[४] आरंभीच्या

---

१ *J. N. S. I.*, IV, pp. 25-28; *M. S. G. H.* I, p. 84.

२ *J. R. A. S. B.*, III, N. 93 f. ३ *M. S. G. H.* I, p. 86.

४ 'कथासरित्सागरा'त (६, ११४-११५), एका सातवाहन राजाला त्याच्या राणीने जलक्रीडेत म्हटलेल्या 'मोदकैर्मा ताडय' या साध्या संस्कृत वाक्याचा अर्थ समजला नाही असे म्हटले आहे. राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त (पृ. ५०) कुन्तलदेशाच्या सातवाहन नामक राजाने आपल्या अन्तःपुरात प्राकृत भाषेचाच उपयोग केला पाहिजे असा नियम केला होता असे म्हटले आहे. भोजाच्या 'सरस्वतीकण्ठाभरणा'त (नि. सा. पृ. १२३) आढयराजाच्या (सातवाहनाच्या) राज्यात सर्व लोक प्राकृतभाषी होते असे सांगितले आहे.

सातकर्णि राजाने अनेक श्रौत याग करून ब्राह्मणांना उदार दाने दिली होती. पण त्याच्या राणीने आपल्या श्रौत यज्ञांचे वर्णन करताना संस्कृत भाषेचा उपयोग न करता प्राकृत भाषेचाच केला होता. सातवाहनांच्या काळी प्राकृत काव्याला मोठा बहर आला होता. राजापासून रंकापर्यंत ज्याला म्हणून थोडीही कवित्व-शक्ति होती त्याने प्राकृत गाथा रचण्यात भाग घेतला होता. अशा कोटचवधि गाथांमधून हालाने ७०० गाथा निवडून त्यांचा 'कोश' केला होता. त्याची प्रशंसा बाणानें मुक्तकंठानें केली आहे.[१] या कोशाच्या पुढे अनेक आवृत्त्या झाल्या. त्यांत पूर्वीच्या काही गाथा गाळून त्यांच्या जागी नंतरच्या कवींच्या गाथा घालण्यात आल्या. सुदैवानें अनेक गाथांच्या कर्त्यांचा नामोल्लेख या ग्रंथाच्या टीकाकारांनी केला असल्यामुळे या कोशाच्या आवृत्तींची थोडीबहुत कल्पना आपणांस येते. याचे विवरण अन्यत्र केले आहे.[२]

हालाच्या चरित्रातील एका घटनेंवर प्राकृतात 'लीलावई' (लीलावती) हे काव्य रचले आहे. हाल राजाचा सेनापति विजयनंद हा दिग्विजय करीत असता सिंहलद्वीपाच्या शीलमेघ राजाला एका गंधर्व पत्नीपासून झालेल्या लीलावती नामक राजकन्येविषयी वृत्तांत ऐकतो. नंतर राजधानीस आल्यावर तो हाल राजाला तिच्याविषयी माहिती देतो. तेव्हा हाल सप्तगोदावरीच्या भीमम् (सध्याचे द्राक्षाराम) या स्थळावर स्वारी करून राक्षसाला ठार करतो. पुढे लीलावतीशी विवाह लावून आणि तिच्या पित्याच्या नगरीला भेट देऊन तो प्रतिष्ठान राजधानीस परत येतो. हर्षाच्या 'रत्नावलि' नाटिकेप्रमाणें ही कथा अद्भुतरम्य आहे. पण तीत ऐतिहासिक सत्य मुळीच नाही.[३]

हाल राजानंतर मंटलक, पुरीन्द्रसेन व सुन्दर सातकर्णि यांची नावे पुराणांतील वंशावळीत येतात. पण त्यांच्याविषयीही आपणांस काहीच माहिती नाही. नंतरचा राजा चकोर याचाही उल्लेख इतरत्र आढळत नाही.[४] पण याची वधू (स्नुषा) गौतमी बलश्री हिच्या नाशिक येथील लेखातील वर्णनात त्याला राजर्षि म्हटले आहे. त्यावरून तो अत्यंत सच्छील आणि धार्मिक वृत्तीचा राजा असावा. पण याच्या कारकीर्दीला पुराणांनी फक्त सहा महिनेच दिले आहेत ! याच्या काली उत्तरेतील कुषाण राजांनी दक्षिण भारतावर आक्रमण करण्यास सुरुवात केली असावी.

---

१ हर्षचरिताचे प्रास्ताविक श्लोक पाहा.

२ याविषयी पुढे 'साहित्य प्रकरण' पाहा.

३ *M. S. G. H.* I, pp. 89 f.

४ *J. N. S. I.* XXI, pp. 18 f. मध्ये चकोर सातकर्णीचे म्हणून एक नाणे प्रसिद्ध झाले आहे, पण त्यावरील लेख स्पष्ट नाही. *J. N. S. I.*, XXII, p. 116.

सन ७८ मध्ये कनिष्काची राजवट सुरू झाली. त्याने लौकरच बहुतेक सर्व उत्तर भारत आक्रमून दक्षिणेकडे आपला मोर्चा वळवला. प्रथम त्यानें कच्छ जिंकून तेथे कार्दमक–वंशी चष्टन या आपल्या शक क्षत्रपाची (प्रांताधिपतीची) स्थापना केली. त्याचे आरंभीचे लेख शक वर्ष ६ व ११ (सन ८४ व ८९ चे) लेख कच्छ जिल्ह्यात दौलतपूर व अन्धौ येथे सापडले आहेत. त्याच्या अमलाखाली काठेवाडाचाही काही भाग असावा. पुढे कनिष्काने भूमक हा क्षहरात–वंशी दुसरा क्षत्रप नेमला. त्यानें गुजराथ, काठेवाडाचा काही भाग व माळवा यांवर आक्रमण करून ताबा मिळविला.[२] त्याची नाणी या प्रदेशात सापडली आहेत. त्यानें कोकण व महाराष्ट्र जिंकले होते काय हे माहीत नाही. पण त्याच्या नंतरच्या त्याच क्षहरात वंशातील नहपानाने तो प्रदेश जिंकून पुण्याच्या उत्तरेस सुमारे ५६ मैलांवर जुन्नर येथे आपली राजधानी केली होती[३] असे दिसते.

या काळात सातवाहनांना जुन्नर येथील आपली राजधानी मूलक देशातील प्रतिष्ठान येथे हलवावी लागली असे दिसते. उत्तर भारतातील अनूप प्रदेश, तसेच गुजराथ, काठेवाड व माळवा, दक्षिण भारतातील उत्तर महाराष्ट्र, कोकण व विदर्भ, आणि छत्तीसगड या विस्तृत प्रदेशावर कुषाणांचे साम्राज्य पसरलें होते. यांपैकी कच्छ-काठेवाडात क्षत्रप चष्टन व त्याचे वंशज यांचे शिला-लेख व नाणी सापडली आहेत. उत्तर महाराष्ट्र व कोंकण यांत नहपानाची नाणी मिळाली आहेत. इतर प्रदेशांचा उल्लेख त्याचा जावई ऋषभदत्त याच्या लेखांत येतो. पौनी येथे महाक्षत्रप कुमार रुपिअम्म याचा छायास्तम्भावरील लेख सापडला आहे. छत्तीसगडात कुषाण सम्राटांची अनेक नाणी मिळाली आहेत.

या काळी सातवाहनांना फार वाईट दिवस आले होते. तत्कालीन सात-वाहन नृपति कोण होता माहीत नाही. पुराणांत त्याचे नाव शिवस्वाति असे येते आणि त्याने अठ्ठावीस वर्षे राज्य केले असे समजते. गौतमी बलश्री ही याचीच राणी होय. ती आपणास महादेवी असे नाशिक लेण्यातील लेखात म्हणवते. त्यावरून तिच्या पतीनें महाराज पदवी धारण केली असावी. तिच्या पतीच्या अंमलाखाली दक्षिण महाराष्ट्र होता असे दिसते. तथापि एकंदरीने त्याची परिस्थिति फारशी चांगली नसावी.

---

१ अनुक्रमे क्र. ६३ व क्र. ४५ पाहा.

२ *B. M. C.* (*Andhras*), cvii.

३ कांहींच्या मते भडोच ही नहपानाची राजधानी असावी. पण तेथे त्याचा किंवा त्याच्या अधिकाऱ्यांचा लेख मिळाला नाही. याच्या उलट जुन्नरजवळच्या लेण्यात त्याचा अमात्याने कोरविलेला लेख सापडला आहे. क्रमांक ४४ पाहा.

त्याचा पुत्र गौतमीपुत्र सातकर्णि हा महाप्रतापी आणि कुशल सेनापति होता. आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या पंधरा-सोळा वर्षांत त्यानें आपले सामर्थ्य हळू हळू वाढवून परकी आक्रमकांच्या दास्यातून आपल्या मातृभूमीला मुक्त करण्याचा निश्चय केला. त्यानें प्रथम विदर्भावर स्वारी करून वेणातीरच्या पौनी (प्राचीन कुशावती) नगरीच्या क्षत्रपांचा उच्छेद केला. नंतर त्याने पश्चिमेकडे चाल करून नहपान क्षत्रपाच्या प्रदेशावर स्वारी केली. त्याची आणि नहपानाची घनघोर लढाई नाशिकजवळ गोवर्धनाच्या परिसरात झाली असे दिसते. तीत नहपानाचा पूर्ण पराभव होऊन तो पश्चिमेकडील सह्याद्रीच्या मावळात आश्रयार्थ पळून गेला. या विजयानंतर गौतमीपुत्राने लागलीच नाशिक येथील बौद्ध लेण्यांस भेट देऊन तेथील भिक्षुसंघास अजकालकिय नामक शेत दान दिले.[१] त्या प्रसंगी गोवर्धनातील अमात्य विष्णुपालित यास उद्देशून काढलेल्या आपल्या आज्ञेत गौतमीपुत्राने आपला निर्देश 'बेणाकटकस्वामी' असा केला आहे. त्याचे कारण असे दिसते की त्यापूर्वी नुकताच त्यानें बेणाकटक (वैनगंगेच्या तीरावरील प्रदेश) तेथील क्षत्रपाकडून जिंकून घेतला होता. नाशिकचे युद्ध गौतमीपुत्राच्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षी वर्षाऋतूच्या द्वितीय पक्षाच्या आरंभापूर्वी थोडे दिवस झाले होते. त्याच्या राज्यारंभाचे वर्ष निश्चितपणे माहीत नाही. पण नहपानाच्या कारकीर्दीतील शेवटचे वर्ष ४६ आहे. ते शक संवताचे असल्यामुळे[२] त्याचे समांतर ख्रिस्ती शकाचे वर्ष १२४-२५ येते. तेव्हा सन १२५ च्या सुमारास ही घटना घडली असावी.

नाशिक येथील विजयानंतर गौतमीपुत्राने नहपानाचा पाठलाग करून पश्चिमेच्या सह्याद्रि पर्वतात त्याचा समूळ उच्छेद केला असे दिसते. त्यानंतर त्यानें कार्ले येथील बौद्ध लेण्यांस भेट देऊन तेथील भिक्षुसंघास करजक ग्राम दान दिला.[३] त्याचा काळ राज्यसंवत्सर १८, वर्षापक्ष ४, दिवस १ असा कार्ले येथील लेखात दिला आहे. त्यावरून गौतमीपुत्राच्या या दोन युद्धात सुमारे पंधरा दिवस अंतर होते असे दिसते.

या युद्धात गौतमीपुत्राच्या शत्रुपक्षाची फार मोठी कत्तल झाली असावी. नाशिक येथील नंतरच्या एका लेखात गौतमीपुत्राचे वर्णन 'क्षहरात वंशाचा समूळ उच्छेद करणारा' असे आले आहे.[४] तथापि या कत्तलीतून मान नामक शक योद्धा निसटला आणि त्याने दक्षिणेत जाऊन कालान्तरानें आपले राज्य स्थापले हे पुढे दाखविले आहे.

---

१ क्रमांक ११ पाहा.

२ परिशिष्ट क्रमांक २ पाहा.

३ क्रमांक १२ पाहा.

४ क्रमांक १८, ओ. ६ पाहा.

नंतर गौतमीपुत्राने नहपानाची सर्व चांदीची नाणी परत मागवून त्यांवर आपल्या नावाचा शिक्का मारल्यावर ती प्रचारात आणू दिली. नाशिक जिल्ह्यातील जोगलतेंभी येथे सापडलेल्या नाणकसंचयात अशा प्रकारची १३२५० हून अधिक चांदीची नाणी होती.[१]

नहपानावरील संस्मरणीय विजयाने उत्साहित होऊन गौतमीपुत्राने आपल्या राज्याचा विस्तार करण्याचा निश्चय केला आणि केवळ दक्षिणेतीलच नव्हे तर उत्तर भारतातील अनेक देश एकामागून एक असे झंझावाती विजययात्रेत जिंकून घेतले. त्याच्या पुळुमावि नामक पुत्राच्या नाशिक येथील लेण्यातील एका लेखात[२] त्याच्या साम्राज्यातील पुढील देशांची यादी दिली आहे—उत्तरेतील सौराष्ट्र (काठेवाड), कुकुर (आग्नेय राजपुताना), आकरावन्ती (पूर्व व पश्चिम माळवा), आणि अनूप (महेश्वर नगरजवळचा प्रदेश). यांशिवाय दक्षिणेतील अपरान्त (उत्तर कोकण), ऋषीक (खानदेश), अश्मक (अहमदनगर जिल्हा), मूलक (पैठण जवळचा प्रदेश) आणि विदर्भ. त्याच्या राज्यात पुढील पर्वतांचा समावेश होता—विंध्य, ऋक्षवत् (सातपुडा), पारियात्र (अबू पर्वत), सह्याद्रि, कृष्णगिरि (मुंबईजवळील कान्हेरी), मंचगिरि, श्रीस्तन (श्रीशैल), मलय, महेंद्र (पूर्व घाट), सेटगिरि (श्वेतगिरि) (जुन्नर जवळचा प्रदेश) आणि चकोर. त्याच्या दिग्विजयात त्याचे घोडे तीन (पूर्व, पश्चिम आणि दक्षिण) समुद्रांचे पाणी प्याले होते असे म्हटले आहे ते त्याच्या दिग्विजयाला अनुलक्षून आहे. या वर्णनात थोडीबहुत अतिशयोक्ति असेल. पण निदान वर निर्दिष्ट केलेले देश त्याच्या साम्राज्यात अंतर्भूत होते यात संशय नाही.

गौतमीपुत्राने उत्तरेत स्वाऱ्या केल्या होत्या यात संशय नाही. कारण नाशिकच्या लेण्यातील आणखी एका त्याच्यासंबंधी योजिलेल्या विशेषणांत त्याने शक, यवन व पह्लव यांचा निःपात केल्याचा उल्लेख आहे. त्याची यवनांशी व पह्लवांशी चकमक नर्मदेच्या उत्तरेसच माळवा-काठेवाड-राजपुताना या प्रदेशात घडली असावी.

तेव्हा गौतमीपुत्राच्या राज्याचा विस्तार उत्तरेस काठेवाड, राजपुतान्याचा दक्षिण भाग, माळवा व त्यालगतचा प्रदेश येथपासून दक्षिणेस कृष्णानदीपर्यंत आणि पश्चिमेस अरबी समुद्रापासून तो पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत झाला होता. अंध्रात त्याची नाणी सापडली आहेत. कृष्णानदीच्या दक्षिणेचा कुंतल प्रदेश मात्र त्याच्या अमलाखाली नसावा. अलीकडे वाटेगाव (सांगली जिल्हा)

---

१ *J. B. B. R. A. S.*, XXII, pp. 223 f.

२ क्रमांक १८ पाहा.

येथे सापडलेल्या नाणक–संचयात[१] त्याचे पुत्र पुळुमावि व स्कंद सातकर्णि यांची नाणी आढळली आहेत, पण गौतमीपुत्राचे एकही नाणे त्यात नव्हते. यावरून हे अनुमान करता येते.

प्राचीन काळच्या राजांच्या कालाविषयी व त्यांच्या कारकीर्दीतील घटनांविषयीही आपणांस माहिती नसते. मग त्यांचे स्वरूप, स्वभाव, वर्तन यांविषयी आपले पूर्णपणे अज्ञान असते यात नवल नाही. पण सुदैवानें गौतमीपुत्र सातकर्णीविषयी आपणांस बरीच माहिती आहे, याचे कारण त्याची माता गौतमी बलश्री हिने खोदविलेल्या नाशिक येथील क्र. ३ च्या लेण्यात त्याच्याविषयी सविस्तर माहिती देणारा विस्तृत लेख कोरून ठेवला आहे हे होय.

ह्या गौतमी बलश्रीला (गौतमगोत्री श्रीबालेला) बौद्ध धर्माविषयी परमादर होता. गौतमीपुत्र सातकर्णीनें नहपानाचा नाशिकजवळ पराभव करून तेथील लेण्यांना भेट दिली तेव्हा तेथील भिक्षुसंघाला त्याने एक शेत दान दिले होते. तेव्हापासून गौतमी बलश्री हिने त्या भिक्षुसंघाला राजाश्रय चालू केला. नंतर सहा वर्षांनी जेव्हा गौतमीला समजले की आपल्या पुत्राने दिलेले शेत कसले जात नाही आणि ज्या गावात ते होते तो गाव उद्ध्वस्त झाला आहे तेव्हा तिने आपल्या पुत्राला–सातकर्णीला–सांगून पूर्वीच्या शेताच्या बदली दुसरे सरकारी शेत देण्याची आज्ञा काढविली.[२] गौतमीपुत्राच्या कारकीर्दीच्या २४ व्या वर्षी काढलेली ही आज्ञा त्याच्या व तिच्या नावानें काढली आहे. त्यावरून तिचा राज्यकारभारातील वचक प्रत्ययास येतो. तिच्या इच्छेनुसार क्र. ३ चे लेणें खोदविण्यात आले असल्यामुळे ते 'देवी–लेणे' या नावाने विख्यात झाले होते.[३] त्या लेण्याचे खोदकाम कित्येक वर्षे चालू होते. गौतमीपुत्रानंतर त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि गादीवर येऊन एकोणीस वर्षें झाली तेव्हाही या लेण्याचे काम चालूच होते. त्यावेळी लेण्याचा बहुतेक भाग खोदून झाला होता; पण त्याला शिल्पादिकांनी अलंकृत करण्याचे काम बाकी होते. त्याकरिता गौतमीने आपल्या नातवाला (पुळुमावीला) सांगून पिशाचीपद्रक हा गाव देवविला.[४] हे शिल्पकाम म्हणजे त्या लेण्याच्या दरवाजाच्या दोन्ही बाजूंच्या खांबावर कोरलेले शिल्पपट्ट असावे. त्यात सातकर्णीच्या पित्याच्या काळी

---

१ *J. N. S. I.*, XXXIV, pp. 205 f.

२ क्रमांक १३. या लेखावरून ती राज्यकारभारात भाग घेत असे कांही विद्वानांनी म्हटले आहे ते मात्र बरोबर नाही. धार्मिक बाबींशिवाय इतर प्रकरणांत ती भाग घेत असे याला पुरावा नाही.

३ क्रमांक १३, ओ. २ पाहा.

४ क्रमांक १८, ओ. ११.

शत्रूने सातवाहनांच्या राज्यश्रीचे हरण कसे केले, सातकर्णीने तिला कसे सोडवून आणले, त्याच्याबरोबर तिने काही काळ कसा आनंदात घालविला, पुढे पुळुमावीच्या कारकीर्दीत पुन: तिचे अपहरण करण्याचा कसा प्रयत्न झाला, पण पुळुमावीने तो कसा हाणून पाडला हे दाखविले आहे.[१]

या प्रसंगी – ते लेणें बहुतांशी पूर्ण झाले तेव्हा – गौतमीला आपल्या थोर पुत्राची दु:खद स्मृति होऊन तिने त्या ग्रामदानप्रसंगी कोरावयाच्या लेखात त्याचे स्वरूप, स्वभाव, शौर्य, राज्यविस्तार इत्यादिकांचे सविस्तर वर्णन करावयास लावून तो लेख त्या लेण्यात कोरविला.[२] म्हणून आज आपणांस प्राचीन महाराष्ट्राच्या या थोर पुत्राविषयी बहुमोल माहिती मिळत आहे.

गौतमीपुत्र शरीराने भव्य आणि वृत्तीने गंभीर होता. त्याचे मुखमंडल पूर्णिमेच्या चंद्राप्रमाणे सुंदर होते. त्याचे बाहु शेषाच्या शरीराप्रमाणे पुष्ट होते. त्याची चालण्याची ढब हत्तीप्रमाणे धीरगंभीर होती. तो जसा शूर तसा नीतिमानही होता. तो पौरजनांच्या सुखदु:खांत सहभागी होत असे आणि त्यांच्या आपत्तींत त्यांना साहाय्य करीत असे. तो योग्य असेच कर प्रजेवर लावत असे. पण तसाच त्याचा प्रजेमध्ये दराराही होता. तो कोणालाही जाति-विहित कर्मे टाकून वर्णसंकर करू देत नसे. तो स्वत: आपली स्वत:च्या जातीची कर्मे निष्ठेनें करी; म्हणून त्याला 'एक–ब्राह्मण' (अनुपम ब्राह्मण) म्हटले आहे. तो सज्जनांचा आश्रयदाता आणि आगमांचे निवासस्थान होता. त्याला हिंसेचा तिटकारा असे. शत्रूनें अपराध केला तरी तो त्याला क्षमा करी. त्यानें आपल्या सातवाहन कुलाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली होती. त्याचा युद्धात कधीही पराजय झाला नव्हता. त्याला आपल्या मातेविषयी नितान्त आदर वाटत असून तो तिच्या अर्ध्या वचनात होता. तो नेहमी तिच्या सेवेत व्यग्र असे. तिलाही आपल्या शूर, वीर, सच्छील आणि विनयसंपन्न अशा या पुत्राबद्दल यथार्थ अभिमान वाटत होता, तो तिने क्र. ३ च्या लेण्यात कोरविलेल्या लेखात व्यक्त झाला आहे.

गौतमीपुत्राने आपल्या कारकीर्दीच्या १८ व्या वर्षी नहपानावर विजय मिळविला होता. हे वर्ष इ. स. चे १२५ असावे हे मागे दाखविले आहे. यानंतर

---

१ परिशिष्ट ४ मधील 'नाशिक येथील देवीलेणे' हा लेख पाहा.

२ या वेळी गौतमी अत्यंत वृद्ध झाली होती. हा लेख तिचा नातू पुळुमावि याच्या राज्यकालाच्या १९ व्या वर्षी कोरविला होता. गौतमीला सातकर्णि हा पुत्र तिच्या सोळाव्या वर्षी झाला आणि त्याने आपल्या चौवीसाव्या वर्षी राज्यारोहण केले असे मानल्यास (त्याने निदान २४ वर्षे राज्य केले होते म्हणून) त्याच्या निधन–काळी तिचे वय १६+२४+२४=६४ वर्षे असावे. तेव्हा त्याचा पुत्र पुळुमावि याच्या राज्यकालाच्या १९ व्या वर्षी ती निदान (६४+१९=) ८३ वर्षांची वृद्धा असावी. गौतमीपुत्राने तिच्या नावे भिक्षु–संघाकरिता कोरविलेले लेणे पूर्ण झाल्यावर ते अर्पण करिताना तिच्या मनातील दु:खाचा कल्लोळ सहज अनुमानिता येईल.

त्यानें निदान सहा वर्षे राज्य केले असावे कारण २४ व्या वर्षीचा त्याचा लेख नाशिकच्या लेण्यात कोरला आहे. या अल्पावधीत त्याने सौराष्ट्र, राजपुतान्याचा काही भाग, मध्य भारत, उत्तर महाराष्ट्र, कोकण, अन्ध्र, इत्यादि प्रदेश बलाढ्य शत्रूकडून जिंकून घेतले होते. यात त्याचे शौर्याप्रमाणें रणकौशल्यही दिसून येते.

गौतमीपुत्र सातकर्णीनंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि सुमारे सन १३२ मध्ये गादीवर आला. हाही पित्याप्रमाणे शूर होता, पण याला नर्मदेच्या उत्तरेचा प्रदेश आणि उत्तर कोकण गमवावे लागले.[१] सन १४० च्या सुमारास होऊन गेलेल्या टॉलमीनें उज्जैनी येथे चष्टन आणि प्रतिष्ठान येथे पुळुमावि राज्य करतात असे लिहून ठेवले आहे.[२] त्यावरून चष्टन व त्याचा नातू प्रथम रुद्रदामन् यांनी गौतमीपुत्राच्या निधनानंतर लौकरच नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेश पुळुमावीकडून जिंकून घेतला होता असे दिसते. उत्तर कोकणात कान्हेरी येथे कार्दमक–वंशी महाक्षत्रप रुद्रदामन् याच्या कन्येच्या अमात्याचा लेख कोरला आहे. त्यात तिला वासिष्ठीपुत्र सातकर्णीची पट्टराणी असे म्हटले आहे. त्यावरून गौतमीपुत्राच्या निधनानंतर काही काळ काठेवाडातील हे क्षत्रप आणि महाराष्ट्राचे सातवाहन यांचे सख्य होऊन रुद्रदामन्ने आपली कन्या पुळुमावीचा धाकटा भाऊ वासिष्ठीपुत्र सातकर्णि याला दिली होती असे दिसते. पण पुढे त्यांच्यात वैमनस्य उत्पन्न झाले असावे. 'रुद्रदामन्नें सातकर्णीचा दोनदा पराजय केला, पण त्याच्याशी जवळचे नाते असल्यामुळे त्याचा समूळ उच्छेद मात्र केला नाही' असे सन १५० च्या जुनागड येथील रुद्रदामन्च्या लेखात म्हटले आहे.[३] हा सातकर्णि कोण याविषयी विद्वानांत दीर्घ काळ चर्चा चालू आहे. तो त्याचा जामात वासिष्ठीपुत्र सातकर्णि असणें शक्य दिसत नाही. कारण तो यावेळी गादीवर आला नव्हता. तो पुळुमावीच असावा. गौतमीपुत्राच्या निधनानंतर रुद्रदामन्ने उत्तरेचे प्रदेश जिंकून घेतले त्या युद्धा[illegible] अनुलक्षून जुनागड प्रस्तर लेखातील वरील विधान असावे. मागे दाखविल्याप्रमाणे प्रथम सातकर्णीनंतर सातवाहनकुलाला सातकर्णि हे नामाभिधान प्राप्त झाले होते. म्हणून पुळुमावीला गिरनार प्रस्तर लेखात 'सातकर्णि' म्हटले असले तर आश्चर्य नाही. शिवाय हा सातकर्णि 'दक्षिणापथपति' होता असे जुनागड लेखात म्हटले आहे. पुळुमावीची हीच पदवी त्याच्या क्र. १८ च्या नाशिक येथील लेखात उल्लेखिली आहे. त्यावरूनही याविषयी संशय राहू नये.

---

१ त्याचा समकालीन क्षत्रप चष्टन उज्जैनीस राज्य करीत होता त्यावरून हे स्पष्ट दिस[illegible]

२ *C. A. I.*, pp. 373 and 376.

३ क्रमांक ५१, ओ. १२.

गौतमीपुत्राची राणी वसिष्ठगोत्री असल्यामुळे त्याच्या पुळुमावि, स्कन्द आणि सातकर्णि या तीन्ही पुत्रांना 'वासिष्ठीपुत्र' हे उपपद त्यांच्या कोरीव लेखांत व नाण्यांवर लावलेले आढळते. पुळुमावीला उत्तर भारतातील प्रदेश गमवावे लागले खरे, पण त्याने आपली सत्ता दक्षिणेंत कुंतल देशावर पसरविली. त्याचा शिलालेख कर्नाटकातील वनवासी या सुप्रसिद्ध प्राचीन नगरातील मधुकेश्वर देवाच्या प्रांगणात अलीकडे सापडला आहे.[१] त्यात त्या शिलाखंडाला 'वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावीच्या महादेवीचा (पट्टराणीचा) छायाप्रस्तर' (स्मारकशिला) म्हटले आहे. त्यावरून पुळुमावीने कुन्तल प्रदेश जिंकल्यावर तेथील एका राजकन्येशी, बहुधा राजकीय हेतूनें, विवाह केला होता आणि काही कालानंतर ती वनवासी येथे निधन पावल्यामुळे तिची स्मारक–शिला तेथे बसविण्यात आली असे दिसते.

या लेखात पुळुमावीला 'शिवश्री' असे उपपद लावले आहे. त्यावरून तो प्रथम पुळुमावीहून भिन्न असून त्याचा उत्तराधिकारी असावा असे अनुमान काही विद्वानांनी केले आहे.[२] त्याच्या समर्थनार्थ ते पुराणांतील खालील श्लोक उद्धृत करतात :—[३]

**सप्तविंशः सुतस्तस्य पुलोमा वै भविष्यति।**
**शिवश्रीर्वै पुलोमा तु सप्तैव भविता नृपः॥**

या श्लोकात गौतमीपुत्र सातकर्णीनंतर त्याचा पुत्र पुलोमा (पुळुमावि) गादीवर आला. त्याने सत्तावीस वर्षे राज्य केले. त्यानंतर शिवश्री पुलोमा (पुळुमावि) याची सात वर्षांची कारकीर्द झाली असे म्हटले आहे, असे ते प्रतिपादितात. पण हा अर्थ चुकीचा आहे. प्राचीन काळी सातवाहन तसेच कदंब व पल्लव वंशांचे राजे 'शिवश्री' हे उपपद विकल्पानें आपल्या नावामागे लावीत असत. पुळुमावीची, तशीच शिवश्री पुळुमावीचीही, नाणी विदर्भात मिळाली आहेत.[४] नाशिक येथील लेण्यांतील लेखांत त्याचे वासिष्ठीपुत्र पुळुमावि असे नाव येते, तर वाटेगाव नाणकसंचयात ते वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावि[५] असे येते. हे दोन्ही राजे एकच होत यात संशय नाही. इतर अनेक राजांनी आपल्या नावामागे शिवश्री उपपद लावले होते. शिवश्री आपीलकाच्या नाण्याचा उल्लेख मागे आला आहे. वनवासी येथील लेखात शिवस्कन्दनागश्रीचा

---

१ संशोधन मुक्तावलि : सर ८, पृ. १३५ इ. क्र. २२ पाहा.

२ सं. मु., सर ८, पृ. १२९ इ.

३ *D. K. A.*, p. 42.

४ *J. N. S. I.* II, pp. 39 and 40. पट्टिका २१, क्र. ८–१४ पाहा.

५ *Ibid.*, XXXIV, p. 207.

उल्लेख सुप्रसिद्ध आहे.[१] सातवाहनानंतर उदयास आलेल्या पल्लव नृपति शिवस्कन्दवर्म्याचे नाव त्याच्या मयिदवोलू[२] आणि हीरहडगल्ली[३] ताम्रपटांवरून माहीत झाले आहे. शिवश्री पुळुमावि हा पुळुमावीहून भिन्न असून त्याचा उत्तराधिकारी व पुत्र होता असे मानल्यास त्या दोघांना वासिष्ठीपुत्र म्हटले असल्यामुळे त्या दोघांच्याही माता वसिष्ठगोत्री होत्या असे मानावे लागेल. ते नितान्त असंभवनीय आहे. तेव्हा हे दोघे एकच होत यात संशय नाही.

पुळुमावीचे राज्यारंभापासूनचे अनेक लेख नाशिक व कार्ले या ठिकाणी सापडले आहेत. त्याच्या काळचा एक लेख पूर्व दिशेच्या अमरावती येथील स्तूपाच्या कठड्यावर मिळाला आहे.[४] कर्नाटकातील वनवासी येथील त्याच्या लेखाचा उल्लेख मागे आला आहे. त्याची नाणी सांगली जिल्हा, विदर्भ, पूर्वीच्या हैदराबाद संस्थानातील कोंडापूर, अन्ध्र प्रदेश इत्यादि ठिकाणी सापडली आहेत. त्यांवरून असे दिसते की जरी त्याला नर्मदेच्या उत्तरेचा प्रदेश आणि उत्तर कोकण हे पश्चिमेच्या क्षत्रपांना द्यावे लागले तरी दक्षिण भारताचा बराच मोठा भाग त्याच्या अमलाखाली होता. पश्चिम महाराष्ट्र, अश्मक, मूलक, दक्षिण कोसल, अंध्र, कर्नाटक इत्यादि प्रांत त्याच्या राज्यात समाविष्ट होते. तेव्हा आपला पिता गौतमीपुत्र सातकर्णि याच्यामागे आपल्या कुलाची प्रतिष्ठा त्याने सांभाळली होती यात संशय नाही. त्याच्या चांदीच्या नाण्यांवर त्याचा मुखवटा उमटविला आहे. त्यात त्याचे गरुडाच्या चोचीसारखे नाक आणि करारी मुद्रा ही स्पष्ट दिसतात.[५]

सन १३२ च्या सुमारास पुळुमावि गादीवर आला असावा. त्याने अठ्ठावीस वर्षे राज्य केले असे पुराणें सांगतात ते संभवनीय आहे; कारण त्याचा शेवटचा ज्ञात लेख २४ व्या वर्षाचा आहे. तेव्हा त्याची कारकीर्द सुमारे १६० मध्ये संपली असावी.

पुळुमावीनंतरच्या राजांविषयी पुराणांत खालील श्लोक आला आहे –[६]

> **[ एकोनविंशतिं भाव्यः सातकर्णिस्ततो नृपः । ]**
> **शिवश्रीर्वै पुलोमा तु सप्तैव भविता नृपः ।**
> **शिवस्कन्धः सातकर्णिर्भवितास्यात्मजः समाः ।।**

---

१ क्रमांक ३७ पाहा.
२ *E. I.*, VI, pp. 86 f.
३ *Ibid.*, I, pp. 5 f.
४ क्रमांक २१.
५ *J. N. S. I.*, XV, pp. 1-3.
६ *D. K. A.*, p. 42.

या श्लोकांनी अनेकांना बुचकळ्यात टाकले आहे. यांपैकी आरंभीचा श्लोकार्ध फक्त वायुपुराणाच्या 'इ'–हस्तलिखितात आढळतो, पण त्या हस्तलिखितातील पाठ बरेच विश्वसनीय ठरले आहेत. तेव्हा हा सातकर्णि कान्हेरी येथील लेखात कार्दमकवंशी महाक्षत्रप रुद्रदामन्‌चा जामात वासिष्ठी-पुत्र सातकर्णि असावा. त्याच्या मातृगोत्रनिदर्शक बिरुदावरून तो पुळुमावीचा सख्खा भाऊ दिसतो. इतर अनेक पुराणांतील पूर्वोक्त श्लोकार्धात जो शिवश्री म्हणून उल्लेखिला आहे तो हाच वासिष्ठीपुत्र शिवश्री सातकर्णि असावा. पुराणांनी त्याचे नाव न देता त्याचे शिवश्री हे वैकल्पिक उपपद उल्लेखिले आहे. त्या श्लोकाचा खरा पाठ 'शिवश्रीर्वै पुलोमात्तु सप्तैव भविता नृपः।' असा असावा: 'पुलोमात्' म्हणजे 'पुळुमावीनंतर'. यापुढील राजा 'शिवस्कन्ध' असा दिला आहे. त्याचे शुद्ध नाव शिवस्कन्द असले पाहिजे. त्याला पूर्वोक्त शिवश्री सातकर्णीचा पुत्र म्हटले आहे. ते चूक आहे. वाटेगाव नाणकसंचयात त्याची अनेक नाणी वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या नाण्यांबरोबर सापडली आहेत.[१] त्यांवरील लेख 'वासिठिपुतस सिरिखदसातकणिस' (हे नाणें वासिष्ठीपुत्र श्रीस्कंद सातकर्णीचे) असा आहे. तेव्हा पुळुमावि, सातकर्णि आणि स्कन्द हे तिघेही वासिष्ठीपुत्र होते, अर्थात् सख्खे भाऊ होते यात संशय नाही. पार्गिटरने संशोधित म्हणून दिलेल्या पूर्वोक्त श्लोकार्धात शिवस्कन्दाच्या कारकीर्दीच्या वर्षांचा मुळी उल्लेखच नाही! पार्गिटरलाही याची जाणीव होती. म्हणून त्याने एका टीपेत 'भवितास्यात्मजः समाः।' च्या ऐवजी 'इ'–वायुपुराण या हस्तलिखितातील 'भविष्यति समास्त्रयः।' असा पाठ दिला आहे[२] तो पूर्वोक्त दोन दोषांपासून मुक्त आहे. पण तो खरा मानल्यास स्कन्द सातकर्णीने फक्त तीन वर्षे राज्य केले असे समजावे लागते. ते असंभवनीय वाटते. कारण वाटेगाव येथील एका नाणक–संचयातच त्याच्या नावाची १०१ नाणी होती, व ती भिन्न भिन्न काळी पाडली होती असे दिसत होते. त्याची अनेक नाणी विदर्भाच्या तऱ्हाळा संचयातही होती. तेव्हा त्यानें केवळ तीन वर्षे राज्य केले असणे असंभवनीय आहे.

पुळुमावि, स्कन्द सातकर्णि आणि वासिष्ठीपुत्र सातकर्णि या सख्ख्या भावांनी कोठे राज्य केले हे पुराणें सांगत नाहीत. ते त्यांच्या नाण्यांच्या प्राप्ति-स्थानांवरून ठरविले पाहिजे. या बाबतीत उपलब्ध पुरावा पुढे दिला आहे.

पुळुमावि दक्षिण भारताच्या विशाल प्रदेशावर राज्य करीत होता हे मागे दाखविले आहे. वाटेगाव संचयात फक्त त्याची व स्कंद सातकर्णीची शिशाची

१ *J. N. S. I.* XXXIV, pp. 205 f.
२ *D. K. A.*, p. 42, n. 7.

नाणी सापडली आहेत. तेव्हा पुळुमावीनंतर स्कन्द सातकर्णीचे या प्रदेशावर स्वामित्व होते असे दिसते. अलीकडे त्याचे चांदीचे नाणे नाशिक येथे सापडले आहे. त्याची पोटीन धातूची नाणी विदर्भातही सापडली आहेत. पण अंध्रात मात्र मिळाली नाहीत. तेव्हा पुळुमावीच्या निधनानंतर त्याच्या साम्राज्याची विभागणी झाली असावी. पश्चिमेचा महाराष्ट्र, कर्नाटक, विदर्भ इत्यादि प्रदेश स्कंद सातकर्णीला मिळाले असे दिसते. वासिष्ठीपुत्र सातकर्णीला अंध्र प्रदेश मिळालेला दिसतो. तेथे त्याची अनेक नाणी सापडली आहेत. त्यांवर त्याचे वासिष्ठीपुत्र बिरुद नाही खरे, पण ती नाणी बहुधा गौतमीपुत्र सातकर्णीची नसून वासिष्ठीपुत्र सातकर्णीचीच असावी.

वासिष्ठीपुत्र सातकर्णीची चांदीची नाणी अंध्रात तशीच पश्चिम महाराष्ट्रातही सापडली आहेत. त्यांवरून असे दिसते की स्कन्द सातकर्णीनंतर वासिष्ठीपुत्र सातकर्णीच्या अमलाखाली हे दोन्ही प्रदेश पुन: एकत्र आले होते. कोकणात कान्हेरी येथे त्याच्या राणीच्या अमात्याचा लेख सापडला आहे.[१] पण तो कदाचित् आरंभीच्या कालातील असेल किंवा वासिष्ठीपुत्र सातकर्णीने स्कन्द सातकर्णीनंतर कोकणात आपली सत्ता प्रस्थापित केली त्या काळचा असेल. त्या लेखात काळाचा उल्लेख नसल्यामुळे या बाबतीत निश्चित विधान करणे शक्य नाही.

पुळुमावीप्रमाणे वासिष्ठीपुत्र सातकर्णीचीही चांदीची, राजाचा मुखवटा असलेली, नाणी अंध्रप्रदेशात सापडली आहेत. पुळुमावीचे तसेच वासिष्ठीपुत्र सातकर्णीचेही राज्य अंध्र प्रदेशात असल्यामुळे आणि त्या प्रदेशाकरिता ती पाडली असल्यामुळे त्यांवरील लेख तेलगू भाषेतही दिला आहे.[२] स्कन्द सातकर्णीच्या चांदीच्या नाण्यांच्या दोन्ही बाजूंवर तो प्राकृत भाषेतच आहे, तेलगू भाषेत नाही ; कारण त्याचे राज्य अंध्रावर पसरले नव्हते.

नाणेघाट येथील एका कोरीव लेखात वासिष्ठीपुत्र चतरपण सातकर्णीचा उल्लेख आहे. चतरपण हे नाव विलक्षण दिसते ते पुराणांतील वंशावळीत किंवा इतरत्रही आढळत नाही. त्या नावाची नाणीही मिळाली नाहीत. तेव्हा भगवानलाल इंद्रजींनी वाचलेल्या या नावात काही चूक असावी असे मानले जाते. चतरपणाऐवजी 'खद' (स्कन्द) नाव असावे. स्कन्द सातकर्णीची नाणी वाटेगाव नाणक–संचयात, तसेच तऱ्हाळा येथील संचयातही सापडली आहेत. त्याचे चांदीचे नाणे नाशिक येथे मिळाले आहे. नाणेघाटातील लेखात संवत्सर १३, हेमंत पक्ष ५, दिवस १० असा काळाचा उल्लेख आहे. पुराणांत स्कंदाने तीन वर्षेच

---

१ क्रमांक २५ पाहा.

२ *J. N. S. I.*, XXXVIII., pp. 12 f.

राज्य केले असे म्हटले आहे, पण पुराणांतील वर्ष–संख्या पुष्कळदा चूक असलेली आढळते.

वासिष्ठीपुत्र सातकर्णीनंतर यज्ञ सातकर्णि राज्य करू लागला असे दिसते. त्याचे गौतमीपुत्र असे बिरुद होते. त्याचे कोरीव लेख अंध्राच्या कृष्णा जिल्ह्यात, तसेच पश्चिमेस नाशिक व कान्हेरी येथे सापडले आहेत.[१] त्याची पोटीनची नाणी विदर्भाच्या तऱ्हाळा गावी सापडली होती. अंध्रात त्याची दोन शिडांच्या जहाजाची नाणी प्रचारात होती.[२] त्यांवरून त्याचा अंमल पूर्वेच्या समुद्रकाठच्या कॉरोमांडेल किनाऱ्यावर होता हे उघड आहे.

यज्ञश्रीनें स्वतःच्या मुखवटयाची चांदीची नाणीही पाडली होती. त्यांपैकी एक काठेवाडात व दुसरे मध्य भारतात बेसनगर (विदिशा) येथे मिळाले होते. पण एक दोन नाण्यांच्या प्राप्तीवरून ते प्रदेश त्याच्या राज्यात समाविष्ट होते असे अनुमान काढणे धाडसाचे होईल. तथापि त्याने अपरान्त (उत्तर कोंकण) मात्र रुद्रदामन्‌च्या वंशजांकडून जिंकून घेतला होता यात संशय नाही. कारण त्या प्रदेशातील कान्हेरी येथे त्याचा लेख आढळला आहे.[३]

यज्ञश्रीनें पश्चिम सागरापासून पूर्वसागरापर्यंतच्या दक्षिण भारताच्या विशाल प्रदेशावर आपले स्वामित्व प्रस्थापित केले होते. त्याने एकोणीस वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात. त्याची राजवट यापेक्षाही जास्त काळ चालली होती. कारण त्याचा अंध्रातील चिन (कृष्णा जिल्हा) येथील लेख त्याच्या कारकीर्दीच्या २७ व्या वर्षाचा आहे.[४]

यज्ञश्रीनंतर सातवाहन साम्राज्य एक पिढी टिकले असे दिसते. त्याच्यानंतर माढरीपुत्र शकसेन गादीवर आला. त्याचे यज्ञश्रीशी कसे नाते होते ते समजत नाही. तो बहुधा त्याचा पुत्र असावा. त्याचे नाव पुराणांतील वंशावळीत येत नाही. पण त्याचे दोन लेख कान्हेरीच्या लेण्यांत आढळले आहेत.[५] त्यांपैकी एकात त्याच्या कारकीर्दीच्या ८ व्या संवत्सराचा उल्लेख आहे. दुसऱ्यातील कालोल्लेख खंडित झाला आहे.

या शकसेनाचे राज्य विदर्भ व अन्ध्र या प्रदेशांवर पसरले होते असे दिसते. विदर्भातील तऱ्हाळे संचयात सापडलेली शक सातकर्णीची नाणी त्याचीच असावी.[६] त्यांवरील लेखात त्या संचयातील इतर नाण्यांवरील लेखांतल्या-

---

१ क्रमांक २६–२९ पाहा.

२ *S. I.*, III, pp. 17 f.

३ क्रमांक २७.

४ क्रमांक २९.

५ क्रमांक ३० व ३१.

६ 'सातवाहन व क्षत्रप यांची नाणी' हे प्रकरण ८ पाहा.

प्रमाणें त्याच्या मातृनामाचा उल्लेख नाही. अन्ध्रात त्याचे लेख सापडले नाहीत, पण त्याची काही तांब्याची नाणी सापडली आहेत.[१] त्यांवरील खंडित लेखांत त्याचे मातृनामनिदर्शक बिरुद 'माढरी–' किंवा फक्त 'म' वाचता येते. त्याचे वैयतिक नाव शक किंवा शक सातकर्णि आढळत नाही. तथापि, ती नाणी त्याचीच असावी.

या शक सातकर्णीनंतर कोकण व पश्चिम महाराष्ट्र या प्रदेशात सातवाहनांचे कोरीव लेख किंवा नाणी सापडली नाहीत. कोकणात वनवासी येथील हारितीपुत्र विष्णुकड चुटुकुलानंद सातकर्णीचा अंमल प्रस्थापित झाला असे दिसते.[२] पश्चिम महाराष्ट्रात महाक्षत्रप ईश्वरदत्त यानें सातवाहनांची सत्ता उखडून आपला अंमल सन २३० च्या सुमारास बसविला. या दोन राज्यक्रांतीविषयी माहिती पुढे येईल.

माढरीपुत्र शकसेनानंतर विजय सातकर्णि अंध्रात राज्य करू लागला. पुराणांत त्याचे नाव यज्ञश्रीनंतर येते आणि त्याने फक्त सहा वर्षे राज्य केले असे त्यांत म्हटले आहे. अलीकडे नागार्जुनकोंड येथे सापडलेल्या लेखात[३] त्याच्या 'गौतमीपुत्र' बिरुदाचा उल्लेख आहे. तो लेख त्याच्या कारकीर्दीच्या सहाव्या वर्षाचाच आहे. यज्ञश्रीही 'गौतमीपुत्र' होता. तेव्हा विजय त्याचा धाकटा भाऊ दिसतो. शकसेन यज्ञश्रीचा पुत्र असल्यास विजय सातकर्णीनें आपल्या पुतण्यानंतर अन्ध्र प्रदेश बळकावला असावा. म्हणून त्याची कारकीर्द अल्पकाळ टिकली असल्यास नवल नाही.

विजय सातकर्णीची नाणी विदर्भात व अंध्रात सापडली आहेत. पण पश्चिम महाराष्ट्रात ती मुळीच मिळाली नाहीत.

विजय सातकर्णीनें अंध्रात 'विजयपुरी' नामक नगरी बसविली असावी. त्या नगरीचे ते नाव नागार्जुनकोंड येथील नंतरच्या इक्ष्वाकुवंशीयांच्या लेखांत राजधानी म्हणून येते. त्यावरून विजय सातकर्णीने ते नगर आपल्या नावे वसवून त्याला आपली राजधानी केली असे दिसते.

विजय सातकर्णीनंतर त्याचा पुत्र चंडश्री हा गादीवर आला आणि त्याने दहा वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात. हाही अंध्रातच राज्य करीत होता असे दिसते; कारण पीठापुरम् जवळच्या कोडवलि येथे वासिष्ठीपुत्र चंडस्वातीचा संवत्सर २ चा लेख सापडला आहे,[४] तो याचाच असावा.

---

१ *Sātavāhana Coins in the Andhra Pradesh Govt. Museum*, Nos. 309-312.

२ क्रमांक ३६ पाहा.

३ क्रमांक ३२ पाहा.

४ क्रमांक ३३ पाहा.

याची नाणी गोदावरी व कृष्णा जिल्ह्यांत मिळाली आहेत. रॅप्सनने त्यांवरील नाव चंद्रस्वाति असे वाचले आहे. पण त्याच्या कोडवलि शिलालेखावरून ते 'चंडस्वाति' असे दिसते.

याशिवाय रुद्र सातकर्णीची नाणी अंध्रात सापडली आहेत. त्याचे नाव पुराणांत येत नाही. यानंतर पुराणांच्या वंशावळीतील शेवटचा राजा पुळुमावि याने सात वर्षे राज्य केल्याचे पुराणें सांगतात. पण त्याचा चंडश्री (किंवा रुद्रश्री) याच्याशी कसा संबंध होता हे ती सांगत नाहीत.

पुळुमावीचा शिलालेख बेल्लारी जिल्ह्यातील अडोणी गावाजवळ सापडला आहे.[१] त्यात त्या प्रदेशाला 'सातवाहनिहार' असे म्हटले आहे. त्यावरून वि. स. सुखटणकर यांनी सातवाहन मूळचे त्या प्रदेशातील होते असा तर्क केला होता, पण पुढे त्यांनी तो सोडून देऊन सातवाहन राजे पश्चिम महाराष्ट्रातील होत हे मत मोठ्या हिरीरीने प्रतिपादिले. आता सहसा कोणी सातवाहन हे मूळचे अंध्रातले किंवा कर्नाटकातले असे म्हणत नाहीत.

हा पुळुमावि गौतमीपुत्राचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि असावा असे सुखटणकरांनी अनुमान केले होते[२] आणि त्याचा पुरावा म्हणून असे म्हटले होते की तो शेवटचा पुळुमावि असणे शक्य नाही. कारण त्याचा हा बेल्लारी जिल्ह्यातील लेख आठव्या वर्षीचा आहे ; पण पुराणांत शेवटच्या पुळुमावीची कारकीर्द सात वर्षांची होती असे म्हटले आहे. हे कारण प्रत्ययोत्पादक नाही. कारण, पुराणांतील राज्यकालाची म्हणून सांगितलेली वर्षे विश्वसनीय नाहीत हे मागे अनेकवार दाखवून दिले आहे.

बेल्लारी जिल्ह्यातील पूर्वोक्त लेखाची अक्षरवटिका नंतरची दिसते. म्हणून हा पुळुमावि सातवाहन वंशातील शेवटचा राजा असावा. त्याची पोटिन धातूची नाणी तऱ्हाळा नाणक–संचयात होती. पण त्यांवर त्याचे नाव 'पुळुहामवि' असे दिसते.[३]

शक सातकर्णीनंतरचे विजय, चंड, रुद्र आणि पुळुमावि यांचे राज्य अंध्र प्रदेशातच सीमित होते असे दिसते. कदाचित् विदर्भापर्यंत त्यांची सत्ता पसरली असेल. त्यांची राजधानी विजयपुरी (सध्याचे अंध्रातील नागार्जुनकोंड) ही असावी. ते नगर विजय सातकर्णि यानें आपल्या नावे वसवून त्याला आपली राजधानी केले होते असे दिसते. तेव्हा सातवाहन कालाच्या अखेरीस त्या राजांच्या सत्तेचे केंद्र अंध्र प्रदेशात होते यात संशय नाही. म्हणूनच, जरी सातवाहन वंशी राजे मूळचे महाराष्ट्रातील होते, तरी त्यांना पुराणांत 'अंध्र' म्हटले आहे.

---

१ क्रमांक ३४. २ *E. I.*, XIV, pp. 153 f.

३ *J. N. S. I.*, II, pp. 53 f. पट्टीका २१, आकृति २१–२२.

त्या नामाभिधानाने विद्वानांना दीर्घ काळ चकविले होते. आता ते विधान चुकीचे ठरले आहे.

यज्ञश्रीच्या विजय, चंड, रुद्र आणि पुळुमावि या उत्तराधिकाऱ्यांचे लेख व नाणी पश्चिम महाराष्ट्रात व कोकणात सापडली नाहीत. कोकणात सातवाहन कालाच्या अखेरीस, दुसऱ्याच एका राजवंशाचे स्वामित्व प्रस्थापित झाले होते, असे दिसते. हा वंश सातवाहनांशी संबंधित दिसतो. त्याच्या सत्तेचे केंद्र कर्नाटकाच्या उत्तर कानडा जिल्ह्यातील पुरातन नगर वनवासी येथे होते. तेथे हारितीपुत्र विष्णुकड चुटुकुलानंद सातकर्णीचा स्तंभलेख सापडला आहे.[१] त्या राजाचा उल्लेख कान्हेरीच्या लेण्यातील एका लेखातही आला आहे. त्याच्या नागमुलनिका नामक कन्येने ते लेणें खोदविले होते.[२] तिचा उल्लेख पूर्वोक्त वनवासी येथील लेखातही आला आहे.

यानंतर लौकरच कर्नाटकात राज्यक्रान्ति होऊन कदंबांची सत्ता प्रस्थापित झाली. मैसूरच्या शिमोगा जिल्ह्यातील मळवळ्ळी येथे ज्या स्तंभावर पूर्वोक्त हारितीपुत्र विष्णुकड चुटुकुलानंद सातकर्णीच्या राज्यकाळातील प्रथम वर्षाचा लेख आहे त्यावरच नंतरच्या एका कदंबवंशी राजाचाही लेख कोरला आहे. त्यावरून ही राज्यक्रान्ति सुस्पष्ट आहे.

पुराणांतील सातवाहनांच्या नावांखेरीज इतर अनेक राजांची नावे मुख्यतः नाण्यांवरून ज्ञात झाली आहेत. पूर्वीच्या हैदराबाद संस्थानात कौशिकीपुत्र सातकर्णीची नाणी सापडली आहेत.[३] ती विदर्भात सापडलेल्या नाण्यां-सारखीच आहेत. त्यांच्या पुढील बाजूवर सोंड वर केलेला हत्ती असून मागील बाजूवर उज्जैनी चिन्ह असते. या तऱ्हेची काही इतर–पुराणांत न उल्लेखिलेल्या सातवाहन राजांची––कुंभ व कर्ण सातकर्णि यांची––नाणी तऱ्हाळा येथील संचयात होती.[४] त्याशिवाय राजा सेबक आणि त्याचा वंशज प्रकाशशिव सेबक यांची नाणी हैदराबाद प्रदेशात सापडली आहेत[५] त्यांपैकी पूर्वोक्ताची नाणी बरीच प्राचीन, आणि उत्तरोक्ताची नंतरची दिसतात. या राजांचा सातवाहनांशी कसा संबंध होता हे माहीत नाही.

सातवाहन काळी अनेक सामन्त घराणी भिन्न भिन्न प्रदेशांत राज्य करीत होती. ती बरीच प्रबळ असल्याने स्वतःच्या नावे नाणी पाडण्याचा हक्क बजावीत असत असे दिसते. त्यांच्या नाण्यांवरून आपणांस त्यांची माहिती झाली आहे.

१ *E. C.*, VII, pp. 251 f. क्र. ३५ पाहा.

२ *A. S. W. I.* V, 86 f. क्र. ३६ पाहा.

३ *S. I.* III, p. 20 pf.

४ *Ibid.*, II, pp 83 f.

५ *Ibid.* VIII, 107 f. याच्या वंशाचा मूळ उत्पादक सेबक याचीही नाणी पूर्वेच्या हैदराबाद संस्थानात सापडली आहेत. *Ibid.* VII, pp. 94 f.

मैसूरच्या चितलदुर्ग जिल्ह्यात सदकण कळलाय महारठीची शिशाची नाणी सापडली आहेत.[१] 'त्याचे नाव नागनिकेच्या नाणेघाटात आले होते, पण ते आता खंडित होऊन शेवटली '—लाय' एवढीच अक्षरे आता अवशिष्ट आहेत' असे रॅप्सन्‌नें प्रतिपादिले होते.[२] पण ते संभवनीय नाही. त्याच्या नावातील पहिला शब्द 'सदकण' हा सातकर्णीचे प्राकृत रूप कदाचित् असेल. पण ते बिरुद कळलाय महारठीनें का धारण केले असावे हे सांगता येत नाही.

उत्तर कानडा प्रांतात चुटुकुलानंद आणि मुडानंद यांची मोठी शिशाची नाणी सापडली आहेत.[३] पण त्यांचा सातवाहनांशी संबंध आलेला दिसत नाही. सातवाहन कालाच्या अखेरीस या प्रदेशातील चुटुकुलातील राजांनी उत्तरेस कोकणातील कान्हेरीपर्यंत आपली सत्ता पसरविली होती हे मागे दाखविले आहे.

कोल्हापूरच्या पंचगंगा नदीच्या काठच्या ब्रह्मपुरी या उपनगरात पूर्वी केलेल्या उत्खननात शिशाची किंवा पोटीन धातूची नाणी सापडली होती. त्यांच्या पुढील बाजूवर पर्वत आणि त्याच्या जवळ वृक्ष आणि मागील बाजूवर मौर्वी खाली केलेले धनुष्य आणि त्यावर लावलेला उभा बाण अश्या आकृति असतात. त्यांवरील लेख खालील प्रमाणे आहेत[४]—

१ रञो वासिठिपुतस विळिवायकुरस.
२ रञो माढरिपुतस शिवळकुरस.
३ रञो गोतमिपुतस विळिवायकुरस.

या राजांचा कालक्रम वरील प्रमाणें होता हे क्र. २ च्या राजाने क्र. १ च्या राजाची नाणी पुनः आहत केली होती, आणि क्र. ३ च्या राजाने क्र. २ च्या नाण्यांच्या बाबतीत तेच केले होते, यावरून स्पष्ट दिसते.

रॅप्सनने या नाण्यांचा संबंध सातवाहनांशी जोडला आहे.[५] क्र. ३ चा राजा गौतमीपुत्र विळिवायकुर हा सुविख्यात सम्राट् गौतमीपुत्र सातकर्णि होय असे त्याचे मत होते. पण ते आता कोणी मानीत नाही. या राजांनी सामान्यतः आपल्या नाण्यांवर 'राजन्' ही पदवी घातली असली तरी कोल्हापूरच्या संग्रहालयातील निदान क्र. २ च्या एका नाण्यावर 'रञो' अशी पदवी नसून 'महारठिस' अशी आहे. तेव्हा हे तिघेही वस्तुतः महारठी असून क्वचित् 'राजन्' पदवी असलेली नाणीही प्रसारित करीत असत असे दिसते. नहपानही स्वतः

---

१ *B. M. C. (Andhras)*, Intro. p. xxxiii.

२ *Ibid.* Introd. p. xlvi.

३ *Ibid.* pp. 59, 60.

४ *Ibid.* pp. 5 f. पट्टिका २४ आकृति ४४, ४५.

५ *B. M. C. (Andhras)*, Introd., p. xl.

केवळ 'क्षत्रप' (प्रांताधिपति) असताही आपल्या नाण्यांवर 'राजन्' पदवी घालीत असे, त्यासारखा हा प्रकार आहे. तेव्हा हे कोल्हापूरचे राजे सातवाहनांहून भिन्न होते. त्यांच्या नावांवरून ते 'कुर' वंशी होते असे मानले जाते. सन १४० च्या सुमारास होऊन गेलेल्या टॉलेमीने हिप्पोकूरच्या बॅलिओकुरसचा उल्लेख केला आहे[१] तो शेवटच्या विळिवायकुराचा दिसतो. त्यानंतर वासिष्ठीपुत्र पुळुमावीने कुन्तल देश जिंकला तेव्हा त्याचे राज्य खालसा केले असावे.

पुळुमावीच्या नाशिक लेण्यातील लेखात त्याचा पिता गौतमीपुत्र सातकर्णि याचे वर्णन 'क्षहरात वंशाचा निःशेष उच्छेद करणारा' म्हणून केले आहे. त्याने युद्धात नहपानाचा व त्याच्या बहुतेक नातलगांचा निःपात केला असावा. पण त्या वंशातील एक वीर पुरुष या कत्तलीतून निसटलेला दिसतो. त्याने दक्षिणच्या माहिषक प्रदेशात आपली सत्ता प्रस्थापित करून आपल्या नावाची नाणी पाडली होती. त्याच्या पोटिन नाण्यांच्या पुढील बाजूवर मध्ये मोठ्या आकाराचे स्वस्तिक असून सभोवार 'महासेनापतिस भरदजपुतस सगमान-चुटुकुलस' (हे नाणें महासेनापति भरद्वाजपुत्र शक मान चुटुकुल याचे) असा लेख आहे.[२] मागील बाजूवर वज्र आणि खाली टोक केलेला बाण आहे. हीच चिन्हे नहपान क्षत्रप ज्या क्षहरात वंशाचा होता त्याचीही होती. ती प्राचीन काळच्या इतर कोणत्याही वंशाच्या नाण्यांवर आढळली नाहीत. तेव्हा भरद्वाज-पुत्र मान नहपानाचा वंशज होता यात संशय नाही. नहपानाच्या उच्छेदानंतर तो महाराष्ट्रातून निसटला आणि दक्षिणेत (पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाच्या दक्षिण भागात) त्याने प्रथम आपले छोटेसे राज्य स्थापले असे दिसते. त्याने आपल्या काही नाण्यांवर आपली 'महासेनापति' पदवी उल्लेखिली आहे. कालान्तराने प्रबळ झाल्यावर त्याने 'राजन्' पदवी धारण केली आणि सात-वाहनांच्या सारखी हस्तिचिन्हांकित स्वतःची नाणी पाडली.[३] त्यांच्या पुढील बाजूवर सोंड वर करून उजवीकडे चालणारा हत्ती आणि सभोवार 'रञो सिरि-सग-मान-महसस' (हे नाणे राजा श्री शक मान महिषाचे) असा लेख आणि मागील बाजूवर उज्जैनी चिन्ह असते.

या नाण्यांवरील लेखात मान या शक नृपतीने आपणांस 'महिष' असे म्हटले आहे. तसाच त्याचा उल्लेख पुराणांतील एका पंक्तीत आला आहे.[४]

---

१ *C. A. I.*, pp. 37 f.

२ *J. N. S. I.* XI, pp. 1 f. पट्टिका २५, आकृति ४६.

३ *I. H. Q.* XXII, pp. 34 f. पट्टिका २५, आकृति ४७, ४८.

४ पुराणातील ही पंक्ति पुढीलप्रमाणे अत्यंत सदोष आहे—
शक्यमानोभवद्राजा महिषीणां महीपतिः । *D. K. A.* p. 51.

सुमारे ख्रिस्तोत्तर दुसऱ्या-तिसऱ्या शतकांत झालेल्या राजांचे वर्णन करताना पुराणे म्हणतात—

शकमानोभवद्राजा महिषाणां महीपतिः। [शकवंशी राजा मान हा महिषांचा नृपति झाला.] पुराणांत प्राचीन काळच्या अत्यंत विख्यात अशा राजांचाच उल्लेख येतो. तेव्हा हा शकवंशी मान राजा कालान्तराने वराच प्रबळ झाला असावा. त्याला वरील पंक्तीत 'महिषांचा राजा' म्हटले आहे. त्याचा अर्थ तो माहिषक देशावर राज्य करीत होता असा आहे.

आता हा माहिषक देश कोठे होता याचा विचार करू. 'वायुपुराणा'त त्याचा निर्देश महाराष्ट्र आणि कलिंग यांच्या सह 'दक्षिणापथवासी' म्हणून केला आहे. रामायणात सुग्रीवाने सीतेच्या शोधाकरिता वानरांना विदर्भ, ऋषीक आणि माहिषक या देशांत जाण्यास सांगितले होते असे म्हटले आहे. महाभारतात तर माहिषकाचा उल्लेख अनेक पर्वांत येतो. भीष्मपर्वात त्याची गणना द्रविड व केरल या देशांसह दक्षिण जनपदांत केली आहे. कर्णपर्वात द्रविड आणि कलिंग देशांतल्याप्रमाणें माहिषकातील लोक अधार्मिक आहेत असे म्हटले आहे. अनुशासनपर्वात सांगितले आहे की माहिषक हे पूर्वी क्षत्रिय होते, पण ब्राह्मणांच्या संसर्गाभावी द्रविड आणि कलिंग देशांतल्याप्रमाणे ते वृषल झाले. तेव्हा माहिषक हा विदर्भ, ऋषीक आणि कलिंग यांना लागून असणारा दक्षिणेतील देश – बहुधा पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाचा दक्षिण प्रदेश – असावा.[१] सुमारे तीस वर्षांपूर्वी आम्ही केलेले हे अनुमान अलीकडे अंध्र प्रदेशाच्या पश्चिम गोदावरी जिल्ह्यातील गुंटुपल्ली येथील महामेघवाहन (श्रीसद) याच्या स्तंभलेखांवरून[२] समर्थित झाले आहे. त्यात त्या राजाला 'महाराज–कलिंगाधिपति' आणि 'माहिषकाधिपति' म्हटले आहे. हा माहिषक पश्चिम गोदावरी जिल्ह्याला पश्चिमेकडे लागून असलेला प्रदेश असावा. तो आम्ही पूर्वी अनुमानिल्याप्रमाणे पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाचा दक्षिण भागच दिसतो.

मान महिष याने चुटुकुल किंवा चुटुक असे वंशनाम घेतलेले दिसते. त्याच्या यश आणि शिवल या वंशजांचीही नाणी पूर्वीच्या हैदराबाद संस्थानात मिळाली आहेत.[३] पण त्यांचे कोरीव लेख – शिलालेख व ताम्रपट – अद्यापि मिळाले नाहीत. ते मिळतील तेव्हा त्यांत काल-निर्देशार्थ शक संवताचा उपयोग केलेला आढळेल असे आमचे अनुमान आहे.[४]

---

१ *I. H. Q.*, XXII. pp. 34 f. अशोकाच्या कारकीर्दीत महादेव श्रमणाचार्याला बौद्ध धर्माच्या प्रसाराकरिता ज्या महिषमंडळात पाठविले होते तो देश माहिषकच असावा.

२ *Oriental Journal*, XIX, pp. 59 f.

३ *J. N. S. I.* XI, pp. 2 f.; XV, p. 120. ४ *S. I.*, II, pp. 99 f.

या मानवंशीयांचे राज्य दक्षिणच्या बऱ्याच विस्तृत प्रदेशावर पसरले असावे. त्यांच्याशी संबंध आल्यामुळे वनवासीच्या सातकर्णीनी 'चुटुकुलानंद' हे विरुद्ध धारण केले असे दिसते.

मागे दाखविले आहे की सातवाहन काळाच्या अखेरीस उत्तर कानडा प्रदेशातील वनवासीच्या विण्हुकड चुटुकुलानन्द सातकर्णीचे राज्य उत्तर कोकणापर्यंत पसरले होते. त्या राजाचे लेख किंवा नाणी पश्चिम महाराष्ट्रात सापडली नाहीत. पण या कालातील चष्टनवंशी पश्चिमेच्या क्षत्रपांच्या नाण्यांचे संचय कऱ्हाड,[१] व रांजणगाव[२] येथे सापडले आहेत. तथापि, त्यांवरून त्या क्षत्रपांचे राज्य पश्चिम महाराष्ट्रावर पसरले होते असे अनुमान करता येणार नाही. विदर्भातही क्षत्रपांच्या नाण्यांचे असेच संचय, तसेच त्यांची किरकोळ नाणीही अनेक ठिकाणी सापडली आहेत.[३] ही नाणी वाकाटक कालातील आहेत. दक्षिणेतील आभीर व वाकाटक राजांनी स्वतःची नाणी पाडली नसल्यामुळे त्यांनी व्यवहाराच्या सोईकरिता क्षत्रपांची नाणी आपल्या प्रदेशांत चालू दिली असावी. तथापि अलीकडे डॉ. शोभना गोखले यांनी इंदूर येथे सापडलेले महाक्षत्रप ईश्वरदत्ताचे एक नाणे प्रसिद्ध केले आहे.[४] त्यावरून या काळच्या महाराष्ट्रातील राजकीय परिस्थितीवर महत्त्वाचा प्रकाश पडला आहे तो दाखवितो.

यापूर्वी ईश्वरदत्ताची नाणी अनेक ठिकाणी सापडली होती. पूर्वीच्या बांसवाडा संस्थानातील सर्वाणिया,[५] जुनागड संस्थानातील वासोज[६] आणि पुणें जिल्ह्यातील रांजणगांव[७] इत्यादि ठिकाणी सापडलेल्या क्षत्रपांच्या नाणकसंचयांत ईश्वरदत्ताची नाणी आढळली होती. पण त्यांवर क्षत्रपांच्या नाण्यांवर दिसते तसे शक संवताचे वर्ष उमटविलेले दिसले नव्हते. त्यांच्या पुढील बाजूवर मुखवटयाच्या मागे आडव्या एक किंवा दोन लहान रेषांनी आणि मागील बाजूवरील लेखात 'वर्षे प्रथमे' किंवा 'वर्षे द्वितीये' या शब्दांनी त्याच्या राज्यकालाचे अनुक्रमे पहिले किंवा दुसरे वर्ष दाखविले होते,[८] तेव्हा या ईश्वरदत्ताने फक्त दोन वर्षे राज्य केले असे मानले जात असे.

---

१ *Bom. Gaz.*, I, pp. 48, 49.
२ *J. N. S. I.* XXXVIII, pp. 27 f.
३ *S. I.* III, p. 215 f.
४ मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक १९५६, पृ. ९४ – ९७. पट्टिका २६, आकृति ५१.
५ *A. R. A. S. I.* for 1913-14, p. 229.
६ *J. R. A. S. B.*, III, Num. Suppl. XLVII, p. N. 39.
७ *J. N. S. I.*, XXXVIII, pp. 27 f.
८ *B. M. C.* (*Andhras*), pp. 124-125.

माळवा व काठेवाड प्रदेशांत पश्चिमेच्या क्षत्रपांची अनेक कालोल्लिखित नाणी सापडली आहेत. त्यांवरून ज्ञात झालेल्या कालखंडात जेथे निदान दोन वर्षांचे खिंडार दिसत असेल त्या काळी हा ईश्वरदत्त होऊन गेला असावा[१] असा तर्क केला जात होता.

या तर्कपद्धतीस अनुसरून पं. भगवानलाल इंद्रजी यांनी 'ईश्वरदत्त शक संवत् १७१ ते १७६ या काळात होऊन गेला आणि तो ख्रिस्तोत्तर २५० मध्ये सुरू होणाऱ्या कालचुरि – चेदि संवताचा संस्थापक असावा ' असे अनुमान केले होते; कारण त्या काळची क्षत्रप नाणी सापडली नव्हती. पण नंतर क्षत्रप विजयसेनाची तशी नाणी आढळली. म्हणून तो तर्क अग्राह्य ठरला. रॅप्सनच्या मते ईश्वरदत्त शक संवत् १५८ ते १६० या कालखंडात होऊन गेला असावा; [२] कारण, या काळची क्षत्रपनाणी तेव्हा मिळाली नव्हती. पण नंतर डॉ. देवदत्त भांडारकरांना शक संवत् १६० चे यशोदामन्‌चे नाणें सर्वाणिया येथील नाणकसंचयात दिसले. म्हणून रॅप्सनचा तर्क चुकीचा ठरला. स्वत: डॉ. देवदत्त भांडारकरांनी शक संवत् ११० ते ११३ हा काळ ईश्वरदत्ताकरिता सुचविला,[३] पण प्रा. रॅप्सन व डॉ. शोभना गोखले यांनी शक संवत् ११०, ११२ व ११३ ची क्षत्रप नाणी प्रसिद्ध केली आहेत. तेव्हा भांडारकरांचेही मत स्वीकारता येत नाही.

डॉ. गोखले यांनी इंदूर येथे सापडलेले ईश्वरदत्ताचे नाणें मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक, १९७६, पृ. ९४ ते ९७ वर फोटोसह प्रकाशित केले आहे. त्यावरून या प्रश्नावर महत्त्वाचा प्रकाश पडला आहे.[४]

या नाण्याच्या मागील बाजूवर ईश्वरदत्ताच्या इतर नाण्यांवर आढळते तसे त्याच्या कारकीर्दीचे वर्ष शब्दांनी निर्दिष्ट केले होते; पण ते शब्द खंडित झाले आहेत. डॉ. गोखले ते 'वर्षे द्' असे वाचतात आणि 'वर्षे द्वितीये' असे घेतात, पण हे वाचन नि:संदिग्ध नाही. आतापर्यंत ईश्वरदत्ताच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर मुखवटयाच्या मागे शकसंवताचे वर्ष आढळले नव्हते. ते या नाण्यावर दिसत आहे. ते (१००,५० व ४ या) संख्यावाचक चिन्हांनी १५४ असे स्पष्टपणें निर्दिष्ट केले आहे. हे वर्ष क्षत्रपांच्या नाण्यांवरील वर्षांप्रमाणें शकसंवताचे आहे यात संशय नाही. त्याचे ख्रिस्ती शकाचे वर्ष २३२-३३ असे येते. ईश्वर-दत्ताच्या इतर नाण्यांवरही असाच शकसंवताच्या वर्षाचा उल्लेख असावा, पण तो आतापर्यंत वाचला गेला नव्हता. रॅप्सनच्या कॅटलॉगमधील क्र. ४७२

१ *J. R. A. S.* 1890, p. 657.

२ *B. M. C.* (*Andhras*), pp. 135 f.; Introd. p. cxxxv f.

३ *A. R. A. S. I.* for 1913-14, pp. 227 f.

४ पट्टिका २६, आकृति ५१ पाहा.

या नाण्याच्या पुढील वाजूच्या फोटोचे सूक्ष्मपणें निरीक्षण केल्यास इंदूरच्या पूर्वोक्त नाण्याप्रमाणे त्यावरील एक चिन्ह ५० ही संख्या दर्शविते हे आढळेल. त्यानंतरचे चिन्ह १ या संख्येचे द्योतक आहे हे रॅप्सनने सांगितले आहे. तेव्हा त्या नाण्यावरील शकसंवताचे वर्ष १५१ होते असे दिसते. तेच त्या नाण्याच्या मागील बाजूवर 'वर्षे प्रथमे' असे उल्लेखिले आहे. त्यावरून ईश्वरदत्ताची कारकीर्द शक संवत् १५१ (ई. स. २२९) मध्ये सुरू झाली असे दिसते. अर्थात् इंदूरच्या नाण्यावरील १५४ हे वर्ष त्याच्या कारकीर्दीचे चौथे वर्ष होय. तेच त्या नाण्याच्या मागील बाजूवर 'वर्षे चतुर्थे' असे उल्लेखिले असावे. 'वर्षे द्वितीये' असणे शक्य नाही. या नाण्याचा दुसरा स्पष्ट फोटो पाहिल्यावर आम्हांस मागील वाजूवरील लेखात 'चतुर्थे' पदातील 'च' स्पष्ट दिसला.

ईश्वरदत्त कोठे राज्य करीत होता हे आतापर्यंत निश्चित झाले नाही. त्याची नाणी सामान्यतः गुजराथ, काठेवाड आणि पश्चिम महाराष्ट्र या प्रदेशांत सापडलेल्या क्षत्रपांच्या नाणक–संचयांत आढळली आहेत. त्यांवर त्याची 'महाक्षत्रप' ही पदवी उल्लेखिली आहे. या नाण्यांवरून पश्चिमेच्या क्षत्रपांप्रमाणे ईश्वरदत्त स्वकालीन कुषाण सम्राटाचे स्वामित्व मान्य करीत होता असे दिसते. तथापि तो त्यांच्याप्रमाणें शकवंशी होता असे दिसत नाही. तत्कालीन शक क्षत्रपांची नावे सामान्यतः 'दाम', 'सिंह', किंवा 'सेन' पदान्त असत. उदाहरणार्थ, रुद्रदामन्, रुद्रसिंह आणि विजयसेन ही नावे पाहा. ईश्वरदत्त हे नाव तसे नाही. ते भारतीय दिसते. डॉ. गोखले यांनी ईश्वरदत्त हा आभीरवंश – संस्थापक ईश्वरसेन होय असे मानले आहे. पण त्याला आधार नाही. नाशिकच्या लेण्यातील लेखात[१] त्या आभीर राजाचे वर्णन माढरीपुत्र शिवदत्ताचा पुत्र 'राजन्' ईश्वरसेन असे आले आहे. त्याला 'महाक्षत्रप' म्हटले नाही. तेव्हा महाक्षत्रप ईश्वरदत्त हा राजा ईश्वरसेनाहून भिन्न होता यात संशय नाही. त्याचे राज्य मात्र ईश्वरसेनाच्या प्रमाणें महाराष्ट्रावर असणे संभवनीय आहे. त्याच्या नाण्यांच्या प्राप्तिस्थानांवरून त्यानें क्षत्रपांच्या माळवा – काठेवाड प्रदेशावर स्वारी करून तेथे आपली सत्ता गाजविली होती असे दिसते. रॅप्सनने आपल्या कॅटलॉगमध्ये महाक्षत्रप दामसेनाची शक संवत् १५१ ते १५८ या वर्षांची नाणी उल्लेखिली आहेत.[२]

---

१ *C. I. I.* IV, p. 3.

२ *B. M. C.* (*Andhras*), pp. 108 f.
शक संवत् १५१ ते १५४ या वर्षांची नाणी महाक्षत्रप दामसेन आणि महाक्षत्रप ईश्वरदत्त या दोघांची सापडतात यावरून ते दोघे एकाच प्रदेशावर राज्य करीत नव्हते असे दिसते. दामसेन माळवा-काठेवाड प्रदेशात तर ईश्वरदत्त महाराष्ट्रात राज्य करीत असावा. ईश्वरदत्ताने दामसेनाच्या राज्यावर स्वारी केल्यामुळे त्याची नाणी तेथे सापडली असावी.

ईश्वरदत्ताची स्वारी त्याच्या काळी झाली असावी. पण त्याची नाणी बहुधा पहिल्या व दुसऱ्या वर्षांचीच नर्मदेच्या उत्तरेस सापडली असल्याने त्याला लौकरच परत फिरावे लागले असे दिसते.

महाक्षत्रप ईश्वरदत्तानें शक संवत् १५१ (सन २२९) मध्ये पश्चिम महाराष्ट्रात सातवाहनांचा पाडाव करून सत्ता बळकावली असावी. पुराणांतील निर्देशावरून सातवाहनांचा अस्त याच काळात झाला हे मागे दाखविले आहे. ईश्वरदत्तानें किती वर्षे राज्य केले, त्याचे उत्तराधिकारी कोण होते आणि त्यांनी किती काळ सत्ता उपभोगिली हे निश्चितपणें सांगता येत नाही पण सन २५० च्या सुमारास महाराष्ट्रात पुन: राज्य–क्रान्ति होऊन आभीरवंशी शिवदत्ताचा पुत्र ईश्वरसेन याने या क्षत्रपांचा पराजय करून आपले राज्य पश्चिम महाराष्ट्रात स्थापले असे दिसते. त्याच्या काळचा लेख नाशिकच्या लेण्यात सापडला आहे.[1] पुढे ईश्वरसेनाने किंवा त्याच्या वंशजांनी कोंकण, खानदेशासह पश्चिम महाराष्ट्र, दक्षिण गुजराथ आणि मध्यप्रदेशातील अनूप जिल्हा या प्रदेशांवर आपले राज्य पसरविले असे दिसते. या सर्व प्रदेशांत ईश्वरसेनाने प्रचलित केलेला आभीर संवत् दीर्घ काळ चालू होता असे तेथे सापडलेल्या लेखांवरून कळते.[2]

पश्चिम महाराष्ट्रातल्याप्रमाणें विदर्भातही सन २३० च्या सुमारास सातवाहन राजवटीचा अस्त होऊन एक नवे घराणें सत्तेवर आले असे अलीकडे अमरावती जिल्ह्यातील अचलपूरजवळच्या मल्हारा गावी सापडलेल्या, पेटिकाशीर्षक लिपीत आणि संस्कृत भाषेत लिहिलेल्या, ताम्रपटावरून सिद्ध झाले आहे.[3]

या ताम्रपटावरून असे कळते की परमभागवत (भगवान् विष्णूचा निष्ठावान् उपासक) असलेल्या आणि अश्वमेध याग करणाऱ्या मुंड वंशामध्ये चारी वेदांच्या अध्ययनात आनंद मानणारा सोम नामक ब्राह्मण होऊन गेला. त्यानंतर त्याचा पुत्र वर्धन आणि नातू मुण्ड हे त्याच्या सारखेच विद्वान्, परम धार्मिक आणि सच्छील असे ब्राह्मण होते.

त्यांतील मुण्ड ब्राह्मणाच्या नावे हा वंश प्रसिद्ध झाला. या तीन ब्राह्मणांनी कधीही राजपदाचा उपभोग घेतल्याचा त्या ताम्रपटात उल्लेख नाही. पण त्यानंतरच्या मुण्डपुत्र राष्ट्रमहाराजानें आपल्या गुणांनी राजपद मिळविले असे म्हटले आहे, पण ते कोणत्या परिस्थितीत हे सांगितले नाही. त्याचा पुत्र राजकुल महाराज याने आपल्या शत्रूवर संस्मरणीय विजय मिळविल्याचे

१ *C. I. I.*, IV, pp. 1 f. २ *Ibid.* IV, pp. 5 f.

३ क्रमांक ६४.

वर्णन आहे. त्यानेच बहुधा या कुलाचा आरंभी उल्लेखिलेला अश्वमेध यज्ञ केला असावा. शेवटचा राजा आदित्यराज याने आपल्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी या ताम्रपटानें काही गाव ब्राह्मणांना दान दिले होते. शेवटी ताम्रपटाची मिति सव्व २, गिम्ह प २, दिव १५ (संवत्सर २, ग्रीष्मपक्ष २, दिवस १५) अशी प्राकृतात दिली आहे.

या ताम्रपटात उल्लेखिलेली गावे विदर्भाच्या अकोला आणि अमरावती जिल्ह्यांत सापडतात. त्यावरून हा ताम्रपट त्या प्रदेशातील होय, याविषयी संशय नाही. त्यात एखाद्या संवताचा निर्देश करून कालाचा उल्लेख केला नाही. तथापि तो वंश वाकाटकपूर्व कालातील असावा हे सहज दाखविता येते. हा अश्वमेध–याजी राजवंश वाकाटक काळातील असणें शक्य नाही ; कारण त्या काळी वाकाटकांची सत्ता विदर्भात उत्तरेत नर्मदेपासून दक्षिणेंत गोदावरीपर्यंत अनिर्बन्ध होती. वाकाटकोत्तर काळातही हा वंश विदर्भात झाला असणें संभवनीय नाही. वाकाटकानंतर विष्णुकुंडी प्रथम माधववर्म्याचा अंमल विदर्भात काही काळ चालला होता.[१] त्याचे निधन सन ५२८ मध्ये झाले हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[२] त्यानंतर माहिष्मतीच्या कटच्चुरि (कलचुरि) कृष्ण राजाची सत्ता सन ५४० च्या सुमारास विदर्भात प्रस्थापित झाली.[३] त्याने विदर्भ आपला मांडलिक स्वामिराज याच्या स्वाधीन केला.[४] त्याने आपल्या स्वामीप्रमाणे आपल्या राज्यात आभीर संवत् चालू केला. त्याचा आभीर संवत् ३२२ (सन ५७३) चा नगरधन ताम्रपट आम्ही संपादिला आहे.[५] तेव्हा विष्णुकुंडी प्रथम माधववर्म्याच्या सन ५२८ मधील निधनापासून सन ५४० मधील कलचुरि कृष्णराजाच्या विदर्भातील सत्ता–स्थापनेंपर्यंतच्या सुमारे बारा वर्षांच्या अल्पावधीत हे तीन पिढ्यांचे मुंड राजघराणें विदर्भात राज्य करीत असेल हे अत्यंत असंभवनीय आहे. स्वामिराजाच्या सन ५७३ च्या नगरधन ताम्रपटानंतरचा विदर्भाचा इतिहास काही काळ अज्ञात आहे. कलचुरींच्या सन ६२० मधील पराभवानंतर[६] बादामीच्या चालुक्यांच्या

---

१ विष्णुकुंडींची विपुल नाणी पवनार येथील उत्खननात व विदर्भात इतरत्र जमिनीवरही सापडली आहेत.
*Pavnar Excavations*, p. 13; *J. N. S. I.*, XXVIII, pp. 164 f.

२ सं. मु., सर ८, पृ. १७५.

३ त्याने पश्चिम महाराष्ट्र त्रैकूटकांकडून सन ५३३ मध्ये जिंकून घेतला होता. सं. मु., सर ७, पृ. ७७. त्यानंतर त्याने विदर्भावर आक्रमण केले असावे. म्हणून त्याचा काळ सन ५४० असा अनुमानाने धरला आहे.

४ त्याचा नगरधन ताम्रपट आभीर संवताच्या ३२२ (सन ५७३) या वर्षाचा आहे.

५ *C. I. I.*, IV, pp. 611 f.

६ *Ibid.* IV, Introd. p. l.

साम्राज्यात विदर्भाचा अन्तर्भाव झाला असावा. सन ६३४ च्या ऐहोळे येथील शिलालेखात[१] द्वितीय पुलकेशी तीन महाराष्ट्रांचा स्वामी झाल्याचे वर्णन आहे. त्यावरून हे स्पष्ट आहे. पण सन ५७३ ते ६२० या काळातही हे मुंडवंशी राजे झाले असणे शक्य नाही. कारण मल्हारा ताम्रपटाची मिति राज्यकालाच्या वर्षांत (regnal years मध्ये) दिली आहे. **ती पद्धत त्या काळात महाराष्ट्रात कोठेही प्रचलित नव्हती.** सर्वत्र काल–निर्देश एखाद्या संवताच्या वर्षाचा उल्लेख करूनच होत असे. म्हणून हा मुंडराजवंश वाकाटकोत्तर काळातही होऊन गेला असणे सुतराम् असंभवनीय आहे.

तेव्हा हे मुंडवंशी राजे वाकाटकपूर्व काळातच विदर्भात राज्य करीत असले पाहिजेत. पूर्वोक्त तीन राजांच्या राजवटीस सुमारे ४० वर्षांचा काळ लागला असावा. तो सन २३० ते २७० असा अनुमानानें ठरविता येतो.

सन २३० मध्ये सातवाहनांचा अस्त झाला हे आपण मागे पाहिले आहे. त्यानंतर दक्षिणेंत अराजक माजून सर्वत्र अंदाधुंदीची परिस्थिति उत्पन्न झाली आणि धार्मिक जीवन अशक्य झाले. तेव्हा धर्मशास्त्राच्या आदेशानुसार मुंड-पुत्रानें पुढे होऊन यज्ञीय स्रुवेच्या ऐवजी तरवार हाती घेतली आणि देशात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित केली.[२] नंतर त्याने 'राष्ट्रमहाराज' असे सार्थ नाव धारण केले. त्याचा पुत्र राजकुलमहाराज यानें अश्वमेध यज्ञ करून सर्वत्र आपला दरारा बसविला. त्याचा पुत्र आदित्यराज याने फार अल्पकाळ राज्य केले असावे. कारण त्याच्या राज्यकालाच्या दुसऱ्या वर्षी दिलेला हा मल्हारा ताम्रपट या राजवंशाचा एकच एक आतापर्यंत उपलब्ध झाला आहे. सन २७० च्या सुमारास दक्षिणेतील वल्लूरच्या वाकाटक वंशातील प्रथम विन्ध्यशक्तीचा पुत्र प्रथम प्रवरसेन याने विदर्भावर स्वारी करून या मुंडवंशाचा पराजय केला आणि आपले राज्य विदर्भात स्थापिले.[३]

अंध्रात विजयपुरीच्या (सध्याच्या नागार्जुनकोंडच्या) इक्ष्वाकुवंशी शान्तमूलाने सातवाहनांच्या नंतर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्यानेही, मुंड व वाकाटकवंशी राजांप्रमाणें अश्वमेध, वाजपेय आणि इतर श्रौत यज्ञ करून आपली वैदिक धर्मावरील निष्ठा व्यक्त केली.[४] नर्मदेच्या उत्तरेस

---

१ *E. I.* VI, pp. 1 f.

२ शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यत्ते। मनु. ८, श्लो. ३४८.

३ आतापर्यंत प्रथम विंध्यशक्ति याला वाकाटक राज्याचा संस्थापक मानले जात असे, पण मल्हारा ताम्रपटावरून असे दिसते की प्रथम प्रवरसेन हा त्या वंशाचा पहिला राजा होय. वाकाटकांच्या सर्व दानपत्रांत त्या घराण्याची वंशावळ या प्रवरसेनापासून सुरू होते. पुराणांतही त्यालाच राज्य–संस्थापक म्हटले आहे. *D. K. A.*, p. 50.

४ *E. I.* XX, pp. 1 f.

गुजराथ, काठेवाड व माळवा या प्रदेशांत पश्चिमेच्या क्षत्रपांचा अंमल गुप्तांच्या उदयापर्यंत चालू राहिला. याप्रमाणे सातवाहनांची साम्राज्यसत्ता सन २३० च्या सुमारास संपुष्टात आल्यावर दक्षिणेत लहान लहान प्रांतीय राज्ये अस्तित्वात येऊन दक्षिण भारताचा चेहरामोहरा वदलला.

## सातवाहनांची वंशावळ*




* कोरीव लेख व नाणीं यांवरून माहीत झालेल्या राजांची नावें कंसविरहित आणि केवळ पुराणांवरून ज्ञात झालेल्या राजांची नावे काटकोनाकृति कंसांत दिली आहेत. त्यांच्याविषयी निश्चिती नाही. याशिवाय पुढील राजांची नावे नाण्यांवरून माहीत झाली आहेत, पण वंशावलीतील त्यांचा क्रम समजत नाही:—(१) कुंभ सातकर्णि. (२) कर्ण सातकर्णि. (३) कौशिकीपुत्र सातकर्णि.


[स्कन्दस्वाति]
[मृगेन्द्र]
[कुन्तल]
[स्वातिवर्ण]
[प्रथम पुलोमावि]
[अरिष्टकर्ण]
हाल
[मण्टलक]
[पुरीन्द्रसेन]
[सुन्दर सातकर्णि]
[चकोर]
[शिवस्वाति]
गौतमीपुत्र सातकर्णि
वासिष्ठीपुत्र द्वितीय पुळुमावि
वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णि
वासिष्ठीपुत्र सातकर्णि
गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि
माठरीपुत्र शकसेन
गौतमीपुत्र विजय सातकर्णि
वासिष्ठीपुत्र चंडस्वाति
तृतीय पुळुमावि

# राजकीय इतिहास

## (आ) पश्चिमी क्षत्रप

### (१) क्षहरात क्षत्रप

सातवाहनांना आपल्या दीर्घकालीन राजवटीत अनेकदा पश्चिमी क्षत्रपांशी युद्धे करावी लागली. त्यांचे उल्लेख मागील पृष्ठांत मधून मधून आले आहेत. त्यांच्याविषयी संगतवार माहिती देणे सातवाहनांच्या इतिहासाच्या दृष्टीनें आवश्यक आहे.

'क्षत्रप' म्हणजे 'प्रांताधिपति'. हा शब्द मूळचा संस्कृत भाषेतील नाही आणि तो प्राचीन संस्कृत वाङमयात कोठेही आढळत नाही. तो इराणी भाषेतील 'क्षत्रपावन्' या शब्दापासून बनविलेला आहे. इराणी भाषेत 'क्षत्र' म्हणजे राष्ट्र. आखिमीनियन् लेखांमध्ये क्षत्रपावन् याचा अर्थ 'प्रांताधिपति' असा आहे. भारतावर आक्रमण करणाऱ्या शक व कुषाण राज्यकर्त्यांचा इराण-मधील पह्लवांशी संबंध आला असल्यामुळे त्यांनी ती पदवी भारतातील आपल्या प्रांताधिपतींकरिता योजिली होती. भारतीय प्रांताधिपतींचे दोन मुख्य वर्ग होते. कांहींचा अंमल पंजाब व लगतच्या मथुरा वगैरे प्रदेशांवर होता. त्यांना भारतीय इतिहासात 'उत्तरेचे क्षत्रप' असे म्हणतात. त्याशिवाय तसेच प्रांताधिपति महाराष्ट्र, कोंकण, गुजराथ, सौराष्ट्र व माळवा येथे सत्ता गाजवीत होते त्यांना 'पश्चिमी क्षत्रप' असे म्हणतात. हे क्षत्रप सन १२० च्या सुमारास स्वतंत्र झाले तरी त्यांनी आपली पूर्वीची 'प्रांताधिपति' या अर्थाची 'क्षत्रप' ही पदवी टाकली नाही. एखाद्या गौण पदवीचाही काही काळ वापरून सराव झाला म्हणजे ती टाकावीशी वाटत नाही. शुंगराज्यसंस्थापक पुष्यमित्र हा मूळचा मौर्य राजाचा सेनापति होता. पुढे स्वतंत्र होऊन त्याने दोन अश्वमेध केल्यावरही आपली सेनापति पदवी चालू ठेवली हे त्याचा वंशज धनदेव याच्या अयोध्या येथील शिलालेखावरून स्पष्ट दिसते.[१] हैदराबादच्या नबाबांनीही तोच मार्ग अवलंबिला होता. तेव्हा पश्चिमेच्या शक प्रांताधिपतींनी स्वतंत्र झाल्यावरही अखेरपर्यंत आपली क्षत्रप पदवी चालू ठेवली असली तर त्यात आश्चर्य नाही. तोच मार्ग विदर्भाच्या अधिपतीनेही अवलंबिला होता.

प्राचीन काळी ग्रीक (यवन), शक आणि पह्लव यांनी वायव्येकडून उत्तर भारतावर स्वाऱ्या केल्या, पण त्यांपैकी क्वचितच कोणी सौराष्ट्र, गुजरात व माळवा येथपर्यंत आपला अंमल बसविला होता. पण जैन परंपरेनुसार

---

१ *E. I.* XX, pp. 57 f.

ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात शकांची (सिथियनांची) माळव्यावर स्वारी झाली होती. त्या वेळी गर्दभिल्ल राजा उज्जैनीत राज्य करीत होता. त्याने जैन मुनि कालकाचार्य याच्या संन्यासिनी भगिनीला बलात्कारानें आपल्या अंत:पुरात घातले. तेव्हा कालकाचार्य सिंध प्रांतातील शकांकडे गेला आणि त्यांच्या साहाय्यानें त्याने गर्दभिल्लाला ठार केले. नंतर शकांचा उज्जैनी येथे अंमल फक्त चार वर्षे टिकला. पुढे गर्दभिल्लाच्या विक्रमादित्य नामक पुत्राने त्यांना पिटाळून लावून ख्रिस्तपूर्व ५७ मध्ये आपला विक्रमसंवत् सुरू केला. नंतर शकांनी ख्रिस्तोत्तर ७८ या वर्षी पुन: माळवा जिंकून आपला शक संवत् चालू केला असे 'कालकाचार्य – कथानका'त म्हटले आहे.

डॉ. अ. स. अळतेकरांना ही परंपरागत कथा संभवनीय वाटत होती.[१] कारण ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात सिंधमध्ये शक राजा मौएस याचे राज्य होते असे दिसते. शकांचे राज्य माळव्यात तीन-चार वर्षेच टिकल्यामुळे त्यांची नाणी तेथे मिळाली नसावी असे ते म्हणत. पण ही परंपरागत कथा विश्वसनीय वाटत नाही. कालकाचार्याविषयी अनेक आख्यायिका जैन ग्रंथांत आढळतात. तो सुवर्णभूमीला (सुमात्राला) गेला असे कांही टीकादिकांत म्हटले आहे, पण त्याचा अविवाद्य पुरावा अद्यापि मिळाला नाही. जास्तीत जास्त इतके म्हणता येईल की तो वराहमिहिरापूर्वी (ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकापूर्वी) होऊन गेला असावा. गर्दभिल्ल वंशाचा उल्लेख पुराणांत सातवाहनकालानंतर उदयास आलेल्या राजवंशांच्या यादीत आढळतो. त्यापूर्वी त्यांचा उल्लेख येत नाही. तो वंश अस्तापूर्वी कोठे राज्य करीत होता हे माहीत नाही. पुराणांत विक्रमादित्याचे नाव येत नाही. आणि विक्रमादित्याने ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात माळव्यात आपला संवत् सुरू केला या कल्पनेला काडीचाही आधार नाही. त्याचे आरंभीचे लेख माळव्याच्या उत्तरेस शेकडों मैलांवर बर्नाळा येथे (पूर्वीच्या जयपूर संस्थानात) सापडले आहेत.[२]

मथुरा येथे शक क्षत्रपांचा अंमल ख्रिस्तपूर्व ५० पासून ख्रिस्तोत्तर ५० पर्यंत होता असे कोरीव लेखांवरून दिसते. तेथे शक क्षत्रप कुसूलक आणि त्याचा पुत्र पतिक यांचे लेख सापडले आहेत.[३] पतिकाच्या तक्षशिला ताम्रपटात त्याचा पिता कुसूलक यास छहरात आणि चुक्ष यांचा क्षत्रप असे वर्णन केले आहे.[४] चुक्ष हे तक्षशिलेच्या वायव्येस असलेले सध्याचे चच हे गाव दिसते. छहरात (क्षहरात) हेही तसेच तक्षशिलेजवळचे दुसरे ठिकाण असावे. त्या गावापासून या शक क्षत्रपांना क्षहरात (प्राकृत खखरात) हे वंशनाम पडले असावे. या

१ *M. S. G. H.*, I, p. 144.
२ *E. I.* XXVI, pp. 118 f.
३ *C. I. I.* II, i, pp. 48 f.
४ *Ibid.* II, i, pp. 28 f.

वंशाचे क्षत्रप पुढे महाराष्ट्रात राज्य करू लागले हे पुढे दाखविले आहे.

या क्षहरात वंशाचे क्षत्रप मथुरेत येऊन तेथे त्यांनी आपली सत्ता स्थापिली. कांही दक्षिणेस गुजराथ–महाराष्ट्रात गेलेले दिसतात. त्यांतील भूमक हा पहिला क्षहरातवंशी क्षत्रप दिसतो. डॉ. अळतेकरांनी मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियममध्ये एक तांब्याचे नाणे पाहिले होते. त्यावरील नाव अस्पष्ट होते, पण त्यावरील धर्मचक्र व सिंह यांच्या चिन्हांवरून ते नाणे पाडणाऱ्या क्षत्रपाचा मथुरेचा कुसूलक आणि गुजराथेतील भूमक यांच्याशी संबंध आला असावा असा तर्क त्यांनी केला होता.[१]

क्षहरातवंशी भूमक व नहपान यांच्या नाण्यांवर वज्र आणि अनुक्रमे वर किंवा खाली टोक केलेला बाण ही चिन्हे आढळतात. शक राजे स्पॅलिरींसेस आणि दुसरा आझेस यांच्या नाण्यांवर चक्र, धनुष्य व बाण ही चिन्हे दिसत असल्यामुळे[२] त्या नाण्यांचा संबंध भूमक व नहपान यांच्या नाण्याशी लावता येतो. तेव्हा हे उत्तरोक्त क्षत्रप उत्तर भारतातून दक्षिणेत आले असावे असे अनुमान करता येते. तेच त्यांच्या नाण्यांवरील ग्रीक व खरोष्ठी लिपींतील लेखांनी समर्थित होते.

सन ७८ मध्ये कनिष्क राज्य करू लागला. लौकरच त्याने उत्तर भारताचा बहुतेक भाग जिंकून घेतला असे दिसते. त्याची राजधानी वायव्य प्रांतात पुरुषपुर (सध्याचे पेशावर) येथे होती. तेथून दूरच्या प्रांतांवर सत्ता चालविणे कठीण होते. म्हणून त्याने आपले क्षत्रप (प्रांताधिपति) नेमले असावे. भूमक हा त्याचा क्षत्रप होता. त्याची नाणी गुजराथ, सौराष्ट्राचा काही भाग आणि माळवा येथे सापडली आहेत. त्याचे कोरीव लेख मात्र अद्यापि मिळाले नाहीत. त्याची राजधानी कोठे होती हेही माहीत नाही. त्याच्यानंतर नहपान या प्रदेशांवर राज्य करीत होता. त्याच्या कोरीव लेखांतील वर्षे ४१ ते ४६ पर्यंतची आहेत. ही वर्षे त्याच्या स्वतःच्या राज्यकालाची, विक्रम संवताची किंवा शक संवताची, याविषयी विद्वानांत तीव्र मतभेद आहेत. या प्रश्नाचा विचार पुढे एका परिशिष्टात केला आहे.[३] याविषयी संभवनीय मत हे दिसते की ती वर्षे कनिष्काने सुरू केलेल्या शक संवताची असावी. कनिष्काने २२–२३ वर्षे राज्य केले असे तत्कालीन कोरीव लेखांवरून दिसते. त्यानेच बहुधा भूमकाला आपला क्षत्रप म्हणून गुजराथ, काठेवाड व माळवा या प्रदेशांवर नेमले असावे.

भूमकाच्या नाण्यांवरील लेख, तो उत्तरेतून आल्यामुळे, पुढील बाजूवर खरोष्ठी लिपीत आणि मागील बाजूवर ब्राह्मी लिपीत आहे. खरोष्ठी लिपीत

---

१ *M. S. G. H.* I, p. 145. २ *Ibid.* I, p.146.

३ परिशिष्ट २ पाहा.

तो ' छहरदस छत्रपस भुमकस ' आणि ब्राह्मी लिपीत ' क्षहरातस क्षत्रपस भूमकस ' असा आहे.[१] त्याच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर प्रथम वर टोक केलेला बाण, मध्ये लहान वर्तुळ व नंतर वज्र यांच्या आकृत्या असून मागील बाजूवर स्तंभशीर्ष, सिंह आणि धर्मचक्र ही आढळतात. यांतील काही चिन्हे मथुरेच्या क्षत्रपांच्या नाण्यांवरही दिसतात, म्हणून भूमक त्यांच्या वंशातील असावा असे अनुमान करता येते.

भूमकानंतर नहपानाला तत्कालीन कुषाण सम्राटाने गुजराथ, काठेवाड, मध्यभारत, उत्तर महाराष्ट्र व कोंकण या प्रदेशांवर क्षत्रप म्हणून नेमलेले दिसते. त्याच्या लेखांतील वर्षे शक संवताची आहेत हे पुढे दाखविले आहे.[२] त्यातील शेवटचे वर्ष ४६ आहे. तेव्हा भूमक आणि नहपान यांनी मिळून शक संवत् ४६ पर्यंत राज्य केलेले दिसते. त्यांतील पहिली कांही वर्षे सुमारे शक संवत् २० पर्यंत भूमकाच्या कारकीर्दीची आणि नंतरची सव्वीस वर्षे नहपानाच्या कारकीर्दीची असावी. कनिष्काचा या दक्षिण भागांतील प्रदेशांवरचा अंमल त्याच्या राज्यारंभानंतर लौकरच प्रस्थापित झाला असावा. कारण पुढे दाखविल्या-प्रमाणे त्याने कच्छ येथील आपला क्षत्रप चष्टन यांस शक संवत् ६ (सन ८४) पूर्वी नेमले होते.

कुषाणांची सत्ता दक्षिणापथाच्या अनेक देशांवर पसरली होती हे सिद्ध करणारा पुरावा आता उपलब्ध झाला आहे. भूमक आणि नहपान यांच्या अमलाखालील गुजराथ, कोंकण, मध्यभारत व उत्तर महाराष्ट्र यांचा उल्लेख मागे आला आहे. विदर्भात वैनगंगेच्या तीरी महाक्षत्रप कुमार रुपिअम्म याचा छायास्तंभावरील लेख सापडला आहे.[३] हा महाक्षत्रप कुषाणांनीच नेमला असावा. विदर्भाच्या पूर्वेस मेकल (अमरकंटक जवळचा प्रदेश) व दक्षिण कोसल (छत्तीसगड) येथे कुषाणांची मुबलक नाणी मिळाली आहेत. सन १९६४ मध्ये मध्यप्रदेशाच्या शहडोल जिल्ह्याच्या बेवहारी तहसिलीत तांब्याच्या ७५७ नाण्यांचा मोठा संचय सापडला होता.[४] त्यात पुढील कुषाण राजांची नाणी होती :—

| | |
|---|---|
| वीम कडफीसस .. .. .. | ४४ |
| कनिष्क .. .. .. | ३२४ |
| हुविष्क .. .. .. | ३६२ |
| इतर अस्पष्ट क्षत्रप नामांची .. | २७ |
| | ७५७ |

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 63 f.  २ परिशिष्ट क्र. २ पाहा.

३ स. मु., सर ६, पृ. १०० इ. क्र. ६२.  ४ *J. N. S. I.*, XXVIII, p. 1 f.

यावरून कनिष्काच्या कारकीर्दीत हा सत्ताप्रसार प्रथम झाला होता असे दिसते. वीम कडफीसची नाणी त्याच्या नाण्यांबरोबर तेथे प्रचारात आली असावी. हुविष्कानंतरच्या वासुदेव या कुषाण राजाचे मात्र एकही नाणे या संचयात आढळले नाही. तेव्हा त्याच्या काळी कुषाणांचे या भागातून उच्चाटण झाले असावे. वासुदेवाचा काळ सुमारे सन १४५–१७६ हा आहे.

नहपानाचे स्वतःचे कोरीव लेख मिळाले नाहीत. पण त्याच्या अमात्याचा लेख जुन्नरजवळील नाणेघाटाच्या लेण्यात मिळाला आहे. कदाचित् जुन्नर हीच नहपानाची राजधानी असेल. त्याच्या पूर्वी ती सातवाहनांची राजधानी असावी हे मागे दाखविले आहे. नहपानाचा जावई उषवदात (ऋषभदत्त) याचे अनेक लेख नाशिक व कार्ले येथे[१] आणि त्याची कन्या दक्षमित्रा हिचे लेख नाशिक येथे[२] आढळले आहेत. उषवदाताने आपल्या लेखांत आपल्या काही विजयांचा व आपण अनेक ठिकाणी केलेल्या धर्मदायांचा उल्लेख केला आहे. त्यावरून नहपानाच्या अमलाखालील प्रदेशांची कल्पना करता येते.

भूमकाकडून नहपानाला अजमेर जवळचा प्रदेश, काठेवाडाचा काही भाग आणि उत्तर गुजराथ हे प्रांत मिळाले असावे. त्याने बहुधा सातवाहनांकडून कोंकण आणि उत्तर महाराष्ट्र हे प्रदेश जिंकून घेतले असावे. त्याच्या कारकीर्दीत त्याचा अंमल या सर्व प्रदेशांवर होता हे त्याचा जावई ऋषभदत्त याच्या लेखांवरून[३] व त्याच्या स्वतःच्या नाणकसंचयांच्या प्राप्तिस्थानांवरून[४] कळते.

नहपान हे नाव पह्लवी दिसते, पण त्याचा जावई दीनीकाचा पुत्र, ऋषभदत्त स्वतःस शक म्हणवितो. त्या काळी पह्लव व शक जमातींचे मिश्रण झाल्यामुळे अशी नावांत सरमिसळ झाली असल्यास आश्चर्य नाही.

ऋषभदत्ताने आपल्या नाशिकच्या लेखांत आपल्या अनेक धर्मकृत्यांचा व दानांचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्याचा स्वामी व सासरा नहपान याच्या राज्यविस्ताराची कल्पना करता येते.

ऋषभदत्ताने नानंगोल आणि चिखलपद्र या उत्तर कोकणातील गावांत कित्येक हजार नारळांची झाडे दान दिली होती. तसेच त्याने कोकणातील अनेक नद्यांवर त्या पार करण्याकरिता धर्मार्थ तरींची व्यवस्था केली होती व त्यांच्या दोन्ही तीरांवर पाणपोई घातल्या होत्या. त्या नद्या अश्या—इबा (गुजराथेतील बलसाडजवळची नदी), पारदा (दमणच्या उत्तरेस वाहणारी पार), दमण (सध्याची दमणगंगा), करबेणा (अंबिका नदीला मिळणारी

१ क्र. ३८—४०, ४३.

२ क्र. ४१ व ४२.

३ क्र. ३८ पाहा.

४ *B. M. C.* (*Andhras*), pp. cviii f.

कावेरी), दाहानुका (दाहानुजवळची खाडी), तापी (सुरत जिल्ह्यातील) आणि बार्णासा (अहमदाबाद जिल्ह्यातील बानास). त्याने भरूकच्छ (भडोच), दशपुर (मंदसोर), गोवर्धन (नाशिकजवळचे), आणि शोर्पारग (ठाणे जिल्ह्यातील सोपारा) येथे धर्मदाय म्हणून घरे, वागा व तलाव निर्माण केले होते. त्याने काठेवाडातील प्रभास या पुण्यक्षेत्री आठ ब्राह्मणांची लग्ने लावून दिली होती.[१]

ऋषभदत्ताने उत्तमभद्रांना सोडविण्याकरिता मालयांवर (मालव गणाच्या लोकांवर) चाल केली, पण त्याच्या स्वारीचा निर्घोष ऐकताच त्यांनी पळ काढला. मग त्याने अजमेरजवळच्या पुष्कर या पुण्यक्षेत्री जाऊन स्नान केले आणि ब्राह्मणांना गोसहस्रदान हे महादान दिले. या वर्णनावरून त्याचे प्रतिस्पर्धी मालय हे त्या काळी अजमेर–जयपुर या भागातील मालवगणाचे लोक होत यात संशय नाही.

ऋषभदत्ताने ज्या ठिकाणी ही धर्मकृत्ये केली ती केवळ पुण्यक्षेत्रे होती, तेथे तो दानादिकांकरिता गेला होता, ती नहपानाच्या राज्यात नव्हती, असे म्हणता येणार नाही. केवळ पुण्यक्षेत्री दानधर्म करण्याचा त्याचा उद्देश असता तर तो यांपेक्षाही सुप्रसिद्ध अशा काशी, प्रयाग व गया या पुण्यक्षेत्री गेला असता. तेव्हा ही स्थले त्याच्या सासऱ्याच्या – नहपानाच्या – राज्यात सामील होती यात संशय नाही. या उल्लेखांवरून नहपानाचे राज्य उत्तरेस अजमेर पासून दक्षिणेस नाशिक – पुणें जिल्ह्यांपर्यंत आणि पश्चिमेस काठेवाड, गुजराथ, उत्तर कोकणापासून पूर्वेस माळव्यापर्यंत पसरले होते यात संशय नाही. अशा बलाढ्य राजाचे स्वतःचे कोरीव लेख सापडू नयेत ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

नहपानाविषयी कांही आख्यायिका जैन ग्रंथांत आल्या आहेत. पण त्यांत किती तथ्य आहे ते सांगता येत नाही. एका आख्यायिकेत[२] म्हटले आहे की नरवाहनाची (म्हणजे बहुधा नहपानाची) राजधानी भडोच, हिला सातवाहन राजाने अनेकदा वेढा घातला. पण प्रत्येक वेळी तो अयशस्वी झाला. तेव्हा

---

१ क्र. ४३, ओ. १.

२ *J. B. O. R. S.* XVI, p. 290 f. ; *M. S. G. H.*, I., p. 152. 'पेरिप्लस' मध्ये अरिआके (उत्तर कोंकण) च्या नंबानुस विषयी एक आख्यायिका दिली आहे. नंबानुस म्हणजे नहपान असे समजून डॉ. अळतेकरांनी ती विश्वसनीय मानली आहे. तीत भडोच ही नंबानुसची राजधानी होती असे म्हटले आहे. 'पेरिप्लस' ग्रंथ ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या उत्तरार्धात लिहिला गेला असे मानण्यात येते. नहपान ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या प्रथमार्धात (सु. १०० ते १२४) राज्य करीत होता हे त्याच्या काळच्या लेखांवरून दिसते. म्हणून या आख्यायिकेत काही तथ्य नाही. वास्तविक पेरिप्लस मधील नाव 'नंबानुस' नसून 'मोंबारुस' आहे. *The Classical Accounts of India*, p. 301.

त्याच्या एका मंत्र्यानें युक्तीनें नरवाहनाचा पाडाव करण्याचे योजिले. त्याने नरवाहनाचा सेवक बनून त्याची मर्जी संपादन केली. नंतर तो नरवाहनाला दानधर्मात उत्तरोत्तर जास्त धन खर्चण्यास प्रवृत्त करू लागला. त्यामुळे नरवाहनाचा कोश रिकामा होऊन त्याचे सैन्यबळ खच्ची झाले. ते पाहून सातवाहन राजाने त्याच्यावर पुन: स्वारी केली आणि त्याचा पराभव केला.

या कथेतील नरवाहन ह्यास नहपान समजून काही विद्वानांनी गौतमीपुत्राच्या त्याच्यावरील विजयाची उपपत्ति लावली आहे. पण या आख्यायिकेत काही तथ्य दिसत नाही. कारण नाशिक व कार्ले येथील लेण्यांतील लेखांवरून गौतमीपुत्र सातकर्णि आणि नहपान यांची निर्णायक लढाई नाशिक-कार्ले या भागात झालेली दिसते, भडोच येथे नव्हे.

पूर्वोक्त आख्यायिकेत वर्णिल्याप्रमाणे नहपान इतका उदार होता काय हे माहीत नाही, पण त्याचा जावई ऋषभदत्त मात्र दानशूर होता यात संशय नाही. यात लक्षणीय गोष्ट ही की नाशिकच्या पूर्वोक्त लेखातील आरंभीच्या त्याच्या देणग्या हिंदूधर्मीयांना दिल्या होत्या. त्याचा हिंदूधर्माविषयी विशेष आदर दिसतो. त्या देणग्यांचा बौद्ध धर्माशी संबंध नसताही बहुधा त्याच्या आग्रहामुळे त्या नाशिकच्या बौद्ध विहारांत कोरून ठेवल्या होत्या. तसेच त्याचे संस्कृत भाषेवरील प्रेमही त्या लेखावरून व्यक्त होते. सातवाहन स्वत: वैदिकधर्मी होते. त्यांनी अनेक श्रौत याग केले होते. पण त्यांचे सर्व कोरीव लेख प्राकृतात आहेत. या उलट या शक जामाताचा हा व इतर लेख बऱ्याच शुद्ध अशा संस्कृत भाषेत लिहिले आहेत. नंतरचा शक क्षत्रप रुद्रदामन् याचा गिरनार लेख तर सुंदर संस्कृत भाषेत लिहिला असून त्यात त्याची संस्कृत गद्य व पद्य काव्यांचा कर्ता म्हणून प्रशंसा केली आहे. एकाच कालातील भारतीय हिंदू व परकी शक राजांची ही प्रवृत्ति खचितच लक्षणीय आहे.

ऋषभदत्ताचा व त्याच्या दक्षमित्रा पत्नीचा बौद्ध धर्मालाही उदार आश्रय होता. त्यांनी बौद्ध भिक्षूंकरिता नाशिक येथे लेणी कोरवून, त्यांना ग्रामदानें देऊन व अक्षयनीवीकरिता रकमा गुंतवून त्यांच्या जीविकेची, चीवरांची व औषधांची सोय केली होती.[१]

नहपानाने आपल्या नावाची चांदीची नाणी पाडली होती. त्याने भूमकाच्या नाण्यांच्या पुढील बाजूवरची वज्र, वर्तुळ व बाण ही क्षहरात वंशाची विशिष्ट चिन्हे, त्यांत किंचित् फरक करून, आपल्या नाण्यांच्या मागील बाजूकरिता स्वीकारली, पण त्यांच्या पुढील बाजूवर मध्यभागी स्वत:चा मुखवटा घालून सभोवार ग्रीक लिपीत आपले नाव व पदवी निर्दिष्ट केली. मागील बाजूवर

---

१ क्र. ३८ ओ. ३-४, यातील कुशणमूल हे वस्तुत: 'कुशलमूल' आहे. परिशिष्ट ६ पाहा.

पूर्वोक्त चिन्हांसभोवार 'राज्ञो क्षहरातस नहपानस' असा लेख ब्राह्मी लिपीत आणि 'रञो छहरतस नहपनस' असा खरोष्ठी लिपीत घातला.[१] अशी तीन लिप्यांत व भाषांत नाव व पदवी असलेली नाणी फक्त त्यानेच पाडलेली माहीत आहेत.

जोगलतेंभी (नाशिक जिल्हा) येथे नहपानांच्या १३२५० नाण्यांचा संचय सापडला होता. त्यांवरील राजाची आकृति भिन्न भिन्न प्रकारची आढळली. त्यावरून काही विद्वानांनी असे अनुमान केले आहे की नहपानानंतरच्या अनेक क्षत्रपांनी ती नाणी पाडली असावी.[२] त्यांच्यापैकी शेवटच्या क्षत्रपाचा उच्छेद गौतमीपुत्र सातकर्णीने केला असावा. पण या अनुमानात तथ्य नाही. नहपानाच्या नंतरच्या क्षत्रपांनी नहपानाचीच नाणी (आपले नाव न घालता) पाडणे चालू ठेवले हे संभवनीय वाटत नाही. तत्कालीन दुसऱ्या–कार्दमक–क्षत्रप घराण्यातील राज्यकर्त्यांनी असे केल्याचे दिसत नाही. त्यांपैकी प्रत्येकाने आपली स्वत:ची आकृति व लेख तसेच शक संवताचे वर्ष आपल्या नाण्यांवर घातले आहे. नहपानाच्या नाण्यांवरील त्याच्या विविध आकृतींचे कारण नाणी पाडणाऱ्यांची अकुशलता हे होय. ग्रीक नाणी पाडणारे उत्तरेतील कलाकार यथातथ्य आकृति काढण्यात वाकबगार होते. महाराष्ट्रात तसे कलाकार नहपानाला मिळाले नसावे. दुसरे प्रमाण हे की या नहपानाच्या तथाकथित उत्तराधिकाऱ्यांपैकी कोणाचाही नामोल्लेख तत्कालीन कोरीव लेखांत येत नाही. याच्या उलट गौतमीपुत्र सातकर्णि आपल्या नाशिकच्या लेखात सांगतो की पूर्वी ऋषभदत्ताने उपभोगिलेले शेत आपण तेथील भिक्षुसंघाला देत आहो. तेव्हा ऋषभदत्त आणि त्याचा सासरा नहपान हे त्याच्या नजीकच्या पूर्व काळात होऊन गेले असावे, असे अनुमान करता येते.

## (२) कार्दमक क्षत्रप

याच कालात क्षत्रपांचे दुसरे एक घराणे काठेवाड-माळव्यात राज्य करीत होते. त्याच्या इतिहासाकडे आता वळू.

या घराण्याला कार्दमक असे नाव होते. ते रुद्रदामन्च्या कन्येच्या अमात्यानें कान्हेरी येथे कोरविलेल्या लेखात आले आहे.[३]

या घराण्यातील सर्व क्षत्रपांनी आपल्या कोरीव लेखांत व नाण्यांवर शक संवताचा उपयोग केला आहे. त्यावरून डुब्रूइल याने असा तर्क केला होता

---

१ *B. M. C.* (*Andhras*), pp. 65-67.

२ *M. S. G. H.* I, pp. 163 f.

३ क्रमांक २५.

की तो संवत् या वंशाचा मूळ पुरुष चष्टन याने सुरू केला होता,[१] पण ते अनुमान बरोबर नाही. नहपानासारखा चष्टनही एक क्षत्रप किंवा प्रांताधिपति होता. तो संवत्संस्थापक असणे शक्य नाही. नहपान व चष्टन यांनी व यांच्या वंशजांनी आपल्या सम्राटाच्या संवताचा उपयोग आपल्या लेखांत केला असला पाहिजे. तो सम्राट कुषाणवंशी असला पाहिजे. तेव्हा तो संवत् कनिष्काने सुरू केला असावा, हे मत आता बहुधा सर्वमान्य झाले आहे. इतर अनेक संवतांप्रमाणे त्याला आरंभी विशिष्ट नाव नव्हते. माळवा-काठेवाड येथील शकवंशी क्षत्रपांनी त्याचा आपल्या लेखांत उपयोग केल्यामुळे त्याला 'शक संवत्' असे पुढे नाव मिळाले खरें, पण तो मूळचा कुषाण सम्राट कनिष्काने चालू केला होता यात संशय नाही.

अगदी अलीकडे कच्छमध्ये अन्धौ येथे चष्टनाच्या काळचे वर्ष ६ व ११ यांचे यष्टिलेख सापडले आहेत.[२] त्यामुळे या वंशाच्या आरंभकालावर महत्त्वाचा प्रकाश पडला आहे. त्यापूर्वी असे मानले जात होते की गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानाचा उच्छेद केल्यावर तत्कालीन कुषाण सम्राटाने – बहुधा हुविष्काने – सातवाहनांच्या वर्धिष्णु सत्तेला पायबंद घालण्याकरिता चष्टनाला दक्षिणेत पाठविले असावे. मथुरेजवळच्या माट गावातील राजवंशाच्या देवकुलात (प्रतिमागृहात) वीम कडफीसस्, कनिष्क व हुविष्क यांच्या पुतळ्यांबरोबर सापडलेला एक पुतळा चष्टनाचा मानण्यात येतो. त्यावरील नाव अस्पष्ट आहे. कोणी ते 'मष्टन' तर कोणी 'षस्तन' असे वाचले होते, पण ते 'चष्टन' असणे अधिक संभवनीय आहे. तथापि चष्टन शक संवत् ४७ (सन १२५) इतक्या नंतरच्या काली दक्षिणेत आला नव्हता हे आता सिद्ध झाले आहे.

अन्धौ येथील लेखांत य्सामोतिकाचा पुत्र म्हणून चष्टनाचा निर्देश असून त्यांत त्याच्या राज्यकालाच्या ११ व्या वर्षी एक यष्टि (स्मारकशिला) उभारल्याची नोंद आहे. हे वर्ष शक संवताचेच मानले पाहिजे. कच्छमधील दौलतपूर येथील यष्टिलेखात तर चष्टनाच्या राज्यकालाच्या सहाव्या वर्षाचा उल्लेख आहे. तेव्हा कुषाण सम्राट् कनिष्काने आपल्या कारकीर्दीच्या आरंभी कच्छमधील प्रदेश जिंकून चष्टनाला क्षत्रप म्हणून दक्षिणेतील कच्छ प्रदेशावर राज्य करण्यास पाठविले होते, असे दिसते. त्याच्या य्सामोतिक या पित्याला कोणतीही पदवी कोणत्याही लेखात लावली नाही. तेव्हा तो एक सामान्य दर्जाचा पुरुष होता आणि त्याच्या चष्टन या पुत्राने स्वतःच्या कर्तबगारीने व शौर्याने क्षत्रपपद प्राप्त करून घेतले होते असे दिसते. तो बहुधा कनिष्काचा

---

१ परिशिष्ट क्र. ३.

२ अनुक्रमे क्र. ६३ व क्र. ४५.

नातलग असावा. म्हणून मथुरेजवळच्या माट येथील देवकुलात वीम कडफीसस, कनिष्क व हुविष्क यांच्या प्रतिमांप्रमाणे त्याचीही प्रतिमा उभारली होती.

चष्टन व रुद्रदामन् यांचे आरंभीचे लेख कच्छ द्वीपामध्येच सापडले आहेत.[१] त्यांवरून आरंभी त्यांच्या अंमलाखालील प्रदेश अगदी मर्यादित होता असे दिसते. कच्छशिवाय काठेवाडाचाही काही भाग त्यांच्या सत्तेखाली असावा. पण काठेवाडातच प्रभास येथे ऋषभदत्ताने आपली धर्मकृत्ये केली होती हे मागे दाखविले आहे. त्यावरून निदान त्याजवळचा काठेवाडातील प्रदेश नहपानाच्या अमलाखाली होता असे वाटते. त्याने तो प्रदेश चष्टनाकडून जिंकून घेतला असेल हे संभवनीय वाटत नाही.

चष्टनाची चांदीची नाणी सापडली आहेत. ती त्याने क्षत्रप व महाक्षत्रप असताना पाडली होती.[२] त्यांच्या पुढील बाजूवर त्याचा मुखवटा व सभोवती ग्रीक लिपीतील लेख आणि मागील बाजूवर पर्वत, वर चंद्र आणि खाली नदी अश्या आकृत्या असून सभोवती ‘राज्ञ क्षत्रपस य्सामोतिकपुत्रस चष्टनस’ असा ब्राह्मी आणि खरोष्ठी लिपीतील लेख दिसतो. त्याचे एक तांब्याचे नाणेही सापडले आहे.

चष्टनाचा पुत्र जयदामन् आपल्या पित्याच्या कारकीर्दीत क्षत्रप म्हणून राज्यकारभारात मदत करीत होता. अशा क्षत्रपांनाही स्वतःच्या नावे नाणी पाडता येत असत. जयदामन्‌ची तांब्याची नाणी सापडली आहेत. त्यांच्या पुढील बाजूवर वशिंड असलेला बैल आणि त्रिशूल व परशु यांची जोड आकृती, आणि मागील बाजूवर पर्वत, चंद्र व तारा ही असतात.[३]

जयदामन् चष्टनाच्या कारकीर्दीत कालवश झाला असावा. त्याला कोणत्याही लेखात ‘महाक्षत्रप’ ही पदवी लावलेली आढळत नाही. त्याच्यानंतर त्याचा पुत्र चष्टनाचा नातू–प्रथम रुद्रदामन् हा आपल्या आजास राज्यकारभारात मदत करू लागला असे दिसते. चष्टन व रुद्रदामन् यांच्या जोड नावांचे लेख अन्धौ येथे सापडले आहेत. त्यांवरून त्यांची जोड कारकीर्द होती हे कळते. या लेखांचा काळ वर्ष ५२ (सन १३०-१३१) हा आहे. म्हणजे तो नहपानाच्या उच्छेदानंतर सहा वर्षांनी कोरलेला आहे. या अवधीत गौतमीपुत्र सातकर्णीने पूर्वी नहपानाच्या अमलाखाली असलेले सुराष्ट्र (काठेवाड), कुकुर (राजपुतान्याचा नैऋत्येचा प्रदेश), अनूप (नेमाड जिल्हा) आणि आकरावन्ती (पूर्व व पश्चिम माळवा) हे प्रदेश जिंकून घेतले होते.[४] चष्टन व रुद्रदामन् त्याला काहीही प्रतिकार करू शकले नव्हते असे दिसते. कदाचित्

१ क्र. ४५–५० व ५२–५४ पाहा. २ *B. M. C.* (*Andhras*), pp. 72—75.

३ *B. M. C.* (*Andhras*), pp. 76 f. ४ क्र. १८.

त्यांनी नम्रतेचे धोरण स्वीकारले असेल. या काळात रुद्रदामन्च्या कन्येचा विवाह गौतमीपुत्राच्या वासिष्ठीपुत्र सातकर्णि या धाकटया मुलाशी झाला असावा.[१]

सन १३२ च्या सुमारास झालेल्या गौतमीपुत्राच्या निधनानंतर ही परिस्थिति पालटली. त्याचा ज्येष्ठपुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि त्याच्या इतका शूर व रणकुशल नव्हता. या गोष्टीचा फायदा घेऊन चष्टन व रुद्रदामन् यांनी उत्तर कोंकण आणि नर्मदेच्या उत्तरेचे आनर्त (उत्तर गुजराथ), सौराष्ट्र, मारवाड, सिन्धु–सौवीर, अनूप (नेमाड जिल्हा), पूर्व आणि पश्चिम माळवा हे प्रदेश एकामागून एक जिंकून घेतले. त्यांना पुळुमावीने प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा रुद्रदामन्ने दोनदा पराभव केला. तथापि त्याचा पिता गौतमीपुत्र याने नहपानाचा समूळ उच्छेद केला तसे न करिता तो आपल्या जावयाचा वडील भाऊ आहे हे जवळचे नाते ध्यानात घेऊन, रुद्रदामन्ने त्याला सोडून दिले. रुद्रदामन्चे हे सर्व विजय सन् १४० पूर्वी प्राप्त झाले असावे. कारण टॉलेमीच्या सन १४० च्या सुमारास लिहिलेल्या प्रवासवृत्तात चष्टनाचा उल्लेख उज्जैनीचा राजा म्हणून केला आहे.[२] रुद्रदामन्ने सन् १५० या वर्षी कोरलेल्या जुनागड येथील लेखातही त्याच्या आकारावन्ती (माळवा) प्रदेशावरील स्वामित्वाचा निर्देश आहे.[३] पूर्वोक्त प्रदेश चष्टन व रुद्रदामन् यांनी आपल्या शौर्याने व रणकुशलतेने मिळविले होते. म्हणून तत्कालीन कुषाण सम्राटाने (बहुधा हुविष्काने) त्या दोघांनाही 'महाक्षत्रप' ही पदवी बहाल केली. चष्टनाच्या नाण्यांवर आणि रुद्रदामन्च्या जुनागड लेखांत तिचा उल्लेख आहे. जुनागड लेखात तर रुद्रदामन्ने ती पदवी स्वतः मिळविली होती असे स्पष्ट म्हटले आहे.

आपल्या राज्याचा असा विस्तार केल्यावर चष्टनाने आकरावन्तीतील उज्जैनी येथे आपली राजधानी नेली. ग्रीक ग्रंथकार टॉलेमी (सु. सन १४०) याने चष्टन हा उज्जैनीस आणि पुळुमावि हा प्रतिष्ठान (पैठण) येथे राज्य करतो असे म्हटले आहे. तो चष्टनाचा उल्लेख उज्जैनीचा राज्यकर्ता म्हणून करतो, पण रुद्रदामन्चा तसा उल्लेख करीत नाही. गिरनार लेखावरून रुद्रदामन् सन १५० मध्ये महाक्षत्रप म्हणून स्वतःच्या नावाने राज्य करीत होता असे दिसते. तेव्हा चष्टन – रुद्रदामन् यांचे पूर्वोक्त बहुतेक विजय निदान सन १४० पूर्वी प्राप्त झाले असावे आणि त्यांनी आपली राजधानी उज्जैनी येथे हलविली असावी.

---

१ क्र. २५. वासिष्ठीपुत्र सातकर्णींची पत्नी, रुद्रदामन्ची कन्या, हिच्या अमात्याचा हा लेख कान्हेरी येथे सापडला आहे.

२ *B. M. C. (Andhras)*, p. xxxix. ३ क्रमांक ५१.

रुद्रदामन्च्या काळी उत्तरेतील कुषाण सम्राटांची सत्ता निर्बळ होऊ लागली होती. त्यांच्या स्वत:च्या अमलाखालील प्रदेशाजवळील यौधेयांसारख्या गणांच्या टोळ्या सभोवरच्या राज्यांच्या अधिपतींचा पराजय करून आपले वर्चस्व वाढवीत होत्या. म्हणून तत्कालीन कुषाण सम्राटाला त्यांना काबूत ठेवण्याकरिता रुद्रदामन्ला विनंती करणे भाग पडले असावे. रुद्रदामन्ने आग्नेय पंजाबातील या गर्विष्ठ यौधेयांचा (आणि बहुधा त्यांसारख्या आर्जुनायन, मालव वगैरे अन्य स्वातंत्र्यप्रेमी गणांचाही) पराभव करून त्यांना शरण येणे भाग पाडले. या युद्धात त्याला काही मुलुखही मिळाला असावा. गिरनार लेखात त्याच्या राज्यातील प्रदेशांमध्ये सिन्धु–सौवीराचा उल्लेख आहे. याने सामान्यत: सिन्धचा दक्षिण भाग दाखविला जातो असे पूर्वी मानले जात होते. परंतु 'महाभारता'तील अनेक उल्लेखांवरून आता असे सिद्ध झाले आहे की त्याने पंजाबचा दक्षिण भाग (मुलतानजवळचा प्रदेश) विवक्षित असे.

रुद्रदामन्चे राज्य उत्तरेतील पंजाबापासून दक्षिणेतील नर्मदा नदीपर्यंत पसरले होते. त्यात सिंधु–सौवीर, मरु (मारवाड), आनर्त (उत्तर गुजराथ), सुराष्ट्र (काठेवाड), कुकुर (सिंध), कच्छ, पूर्व व पश्चिम आकरावन्ती (माळवा) आणि अपरान्त (उत्तर कोंकण) या देशांचा अंतर्भाव होता.[1]

जुनागड लेखात रुद्रदामन्च्या व्यक्तित्वाचे तसेच कर्तृत्वाचेही बरेच सविस्तर वर्णन आले आहे. तो स्वत: शस्त्रास्त्रनिपुण, शूर वीर आणि रणधुरंधर होता. तथापि, शत्रु शरण आल्यावर तो त्याचा नि:पात करीत नसे. अनेक राज्यभ्रष्ट अधिपतींना त्याने त्यांचे प्रदेश मिळवून दिले होते. त्याने सातकर्णि (पुळुमावि) याचा दोनदा पराजय करून त्याला सोडून दिले होते याचा उल्लेख मागे आला आहे.[2] त्याने आपल्या राज्यात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित केली होती. तो योग्य असेच कर प्रजेवर बसवीत असे. प्रजेच्या कल्याणाकरिता आवश्यक अशा तलावादिकांच्या निर्मितीकरिता व दुरुस्तीकरिताही प्रजेवर कर न लादता तो शासकीय खर्चाने ती लोकोपयोगी कृत्ये करवून घेत असे. त्याला हिंदु धर्माविषयी विशेष निष्ठा होती. त्यामुळे तो गाई व ब्राह्मण यांना पूज्य मानीत असे[3]. क्षहरातवंशी क्षत्रपांनी बौद्ध धर्माला लेणी खोदवून आणि ग्रामदाने करून उदार आश्रय दिला होता, तसा प्रकार या कार्दमकवंशी क्षत्रपांनी केलेला फारसा आढळत नाही. रुद्रदामन् दानशूर तसाच विद्याव्यासंगी आणि

---

१ क्र. ५१, ओ. ११.

२ क्र. ५१ मध्ये त्याला सातकर्णि म्हटले असले तरी तो रुद्रदाम्याचा जावई नव्हे. सातकर्णि हे तेथे वंशनाम म्हणून योजिले आहे. तेथे विवक्षित राजा पुळुमाविच होय.

३ क्र. ५१, ओ. १५ मधील 'गोब्राह्मणां'चा उल्लेख पाहा.

कलाभिज्ञ होता. त्याने स्वतः गुण व अलंकार यांनी नटलेली अशी गद्य पद्य काव्ये रचली होती. ती अर्थातच संस्कृत भाषेत असावी. त्याचा गिरनार लेख हा प्राचीन काळचा पहिला विस्तृत व शुद्ध संस्कृत मध्ये लिहिलेला लेख आहे. त्याचा प्राकृत भाषेत एकही लेख उपलब्ध नाही. त्याला संगीताची आवड होती. त्याच्या काली संस्कृत विद्येला, अलंकार, न्याय इत्यादि शास्त्रांना व संगीतादि कलांना उत्तेजन आणि उदार आश्रय मिळाला असला तर आश्चर्य नाही. त्याच्या अमदानीत उज्जैनीत ज्योतिःशास्त्रात विशेष प्रगति होवून कालगणनेकरिता ऋतु, मास व दिवस उल्लेखण्याची पद्धत मागे पडली आणि चांद्र मास, पक्ष व तिथि यांचा निर्देश करण्यात येऊ लागला हे उल्लेखनीय आहे.[१] सारांश, रुद्रदामन् हा प्राचीन काळचा एक शूर, वीर, उदार, सुसंस्कृत व कलानिपुण असा आदर्श नृपति होता. आर्य संस्कृति परकी रानटी लोकांना आत्मसात् करून त्यांचा कसा कायापालट घडवून आणत असे याचे तो उत्तम उदाहरण होता.

रुद्रदामन्‌ची राजधानी उज्जैनी येथेच असावी. तेव्हा सुराष्ट्र (काठेवाड) व सिंधु–सौवीर, यासारख्या प्रांतांवर त्याने प्रांताधिपति नेमले असावे. पण त्यांपैकी आनर्त व सुराष्ट्र यांवर नेमलेल्या पह्लववंशी कुलैपाचा पुत्र सुविशाख याचे नाव मात्र आपणांस माहीत आहे. आपल्या स्वामीप्रमाणे त्यालाही प्रजाहिताची कळकळ होती. म्हणून सुदर्शन तलावाच्या फुटलेल्या बांधाची दुरुस्ती करण्याविरुद्ध रुद्रदामन्‌चे मंत्री व कार्यसचिव विरुद्ध असताही त्याने ती दुरुस्ती स्वतःच्या जबाबदारीवर हाती घेऊन पूर्ण केली असे जुनागड लेखावरून कळते.[२]

रुद्रदामन्‌च्या स्वतंत्र कारकीर्दीचे शक संवत् ७२ (सन १५०) एवढेच वर्ष माहीत आहे. तो शक संवत् ५२ मध्ये आपल्या आजाबरोबर राज्यकारभार पाहत होता. त्याच्या नाण्यांवरून तो सुमारे ६० वर्षांच्या वयोवस्थेपर्यंत राज्य करीत असावा असे वाटते. तेव्हा त्याची कारकीर्द सन १६५ पर्यंत चालू असावी. तिच्या अंतिम भागात त्याचा पुत्र दामघ्सद (दामजद किंवा दामजदश्री) हा क्षत्रप म्हणून त्याला मदत करीत होता असे दिसते.[३]

रुद्रदामन्‌ने दीर्घ काळ राज्य केल्यामुळे त्याचा पुत्र दामघ्सद हा राज्यारोहण प्रसंगी बराच वयस्क झाला असावा. त्याच्या नाण्यांवरील त्याच्या आकृतीवरून तेच अनुमान होते. त्याने ‘महाक्षत्रप’ ही पदवी धारण केली होती.

१ सातवाहनांच्या सर्व लेखांत कालनिर्देश ऋतुमितीत आहे तर क्षत्रपांच्या सर्व लेखांत तो मास–पक्ष–तिथि–निर्देशात्मक आहे हे लक्षणीय आहे.

२ क्र. ५१, ओ १८.

३ *B. M. C.* (*Andhras*), p. 80.

त्याची नाणी थोडीच सापडली असल्यामुळे त्याची कारकीर्द सुमारे सन १६५ ते १७५ पर्यंत चालू असावी.[१]

त्याच्या नंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र जीवदामन् राज्य करू लागला. याच्या कालापासून पश्चिमेच्या क्षत्रपांच्या चांदीच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर शक संवताचे तत्कालीन वर्ष त्यांच्या मुखवटचामागे उमटविण्याची प्रथा पडली. या क्षत्रपांचे कोरीव लेख फारच थोडे सापडले आहेत. त्यांचा इतिहास बहुतांशी त्यांच्या नाण्यांवरूनच ज्ञात झाला आहे.

जीवदामन्ने महाक्षत्रप म्हणून आपली नाणी शक संवत् १०० ते १०३ पर्यंत आणि पुन: ११० ते ११३ पर्यंत पाडली होती. मध्यंतरीच्या वर्ष १०३ ते ११० या काळात त्याचा चुलता प्रथम रुद्रसिंह याची 'महाक्षत्रप' म्हणून पाडलेली नाणी मिळाली आहेत. त्यांवरून त्याने आपल्या पुतण्याला दूर सारून गादी बळकावली होती असे दिसते.[२] क्षत्रप रुद्रसिंहाचा वर्ष १०३ चा शिलालेख काठेवाडाच्या हालार जिल्ह्यातील गुंदा या गावी सापडला आहे.[३] त्यात तो आपल्या पुतण्याचा निर्देश करीत नाही. त्या लेखात रुद्रभूति नामक एका आभीर सेनापतीने विहीर खोदल्याचा निर्देश आहे. या शिलालेखावरून डॉ. अळतेकरांनी असे अनुमान केले आहे की यानंतर लौकरच रुद्रसिंहाने या आभीर सेनापतीच्या साहाय्याने आपल्या पुतण्यास पदच्युत करून गादी बळकावली आणि 'महाक्षत्रप' पदवी धारण केली असावी. काठेवाडात क्षत्रपांच्या नाण्यांबरोबर ईश्वरदत्त नामक महाक्षत्रपाची पहिल्या व दुसऱ्या वर्षाची चांदीची नाणी सापडली आहेत. तो आभीर असावा असे काही विद्वानांचे मत आहे. कारण त्यासारखी शिवदत्त आणि ईश्वरसेन अशी आभीरांची नावे नाशिकच्या लेण्यात आली आहेत. त्यांवरून डॉ. अळतेकरांनी असा तर्क केला आहे की रुद्रसिंहाने ईश्वरदत्त नामक आभीर [सेनापतीच्या] साहाय्याने आपला पुतण्या जीवदामन् याला पदच्युत केले. पण ईश्वरदत्तानें त्याला उलथून टाकून दोन वर्षे महाक्षत्रप म्हणून (सन १८८ ते १९० पर्यंत) राज्य केले; त्यानें रुद्रसिंहाला क्षत्रप पदावर राहू दिले. नंतर रुद्रसिंह ईश्वरदत्ताला पदच्युत करून 'महाक्षत्रप' म्हणून राज्य करू लागला. त्याची कारकीर्द सन १९७ पर्यंत चालली होती.

हा सर्व तर्क कच्च्या पायावर उभारला आहे. ईश्वरदत्त आभीर होता याला पुरावा नाही. त्याच्या कारकीर्दीची दोन वर्षे याच काळातील हे म्हणण्यास साधन नाही. त्याची कारकीर्द पं. भगवानलाल इंद्रजींनी सन २४९ ते २५१

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 80.

२ *Ibid*, pp. 86-94.

३ क्र. ५२.

मध्ये, व डॉ. रॅप्सनने सन २३६ ते २३९ आणि देवदत्त भांडारकरांनी सन १८८ ते १९१ या काळात घातली आहे. अलीकडे डॉ. शोभना गोखले यांनी इंदूर येथे सापडलेले नाणे प्रसिद्ध केले आहे. त्याने त्या प्रश्नावर महत्त्वाचा प्रकाश पडला आहे.

आतापर्यंत सापडलेल्या ईश्वरदत्ताच्या नाण्यांवर पश्चिमेच्या क्षत्रपांच्या नाण्यांवर असते तसे शक संवताचे वर्ष आढळले नव्हते, रॅप्सनने त्याच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर एक किंवा दोन आडव्या रेषांनी त्याच्या कारकीर्दीचे पहिले किंवा दुसरे वर्ष दाखविले आहे असे प्रतिपादिले होते. त्या नाण्यांच्या मागील बाजूवर तेच 'वर्षे प्रथमे' किंवा 'वर्षे द्वितीये' असे शब्दांत सांगितले असते असे रॅप्सनने म्हटले आहे.[१] इंदूरच्या नाण्याच्या पुढील बाजूवर संख्यावाचक तीन चिन्हांनी (१००, ५० व ४ यांनी) १५४ ही संख्या दाखविली आहे.[२] हे शक संवताचे (सन २३२ दर्शविणारे) वर्ष असावे. त्या नाण्याच्या मागील बाजूवरील वर्षाचा उल्लेख अस्पष्ट झाला आहे, पण तेथील शब्द 'वर्षे चतुर्थे' असे असावे असे पुढे दाखविले आहे. रॅप्सनने प्रसिद्ध केलेल्या ईश्वरदत्ताच्या नाण्यांवरही अशी शक संवताची १५१ व १५२ ही वर्षे असावी. रॅप्सनच्या कॅटलॉगातील त्याच्या क्र. ४७२ च्या नाण्यावर ५० चे चिन्ह दिसते. पुढे एकची निदर्शक आडवी एक रेघ आहे हे रॅप्सनने दाखविले आहे. तेव्हा त्या नाण्याचे वर्ष शक संवत् १५१ असावे. ते त्याच्या कारकीर्दीचे प्रथम वर्ष होते असे त्या नाण्याच्या मागील बाजूवर म्हटले आहे. या सर्व नाण्यांवर ईश्वरदत्ताची महाक्षत्रप पदवी उल्लेखिली आहे.

तेव्हा महाक्षत्रप ईश्वरदत्तानें निदान शक संवत् १५१ ते १५४ (सन २२९ ते २३२) या कालात राज्य केले असे दिसते. याच कालाची महाक्षत्रप दामसेन यांचीही नाणी सापडली आहेत. दामसेन हा काठेवाड – माळवा या प्रदेशात राज्य करीत होता. त्या प्रदेशात ईश्वरदत्त त्याच काळात सत्तेवर असणे शक्य नाही. म्हणून त्याचे राज्य महाराष्ट्रावर होते असे मानले पाहिजे. त्याने सातवाहन काळाच्या अखेरीस सत्ता बळकावून उत्तरेतील प्रदेशावर आक्रमण केले आणि म्हणून त्याची नाणी पश्चिमेच्या क्षत्रपांच्या राज्यात मिळतात.

रुद्रसिंहाने आपला पुतण्या जीवदामन् याला दूर सारून गादी बळकावली होती. पण सन १९७ च्या सुमारास जीवदामन्‌ने उठाव करून आपले राज्यपद मिळविले असे दिसते. कदाचित् रुद्रसिंह त्या सुमारास कालवश झाला असावा.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 124 f.

२ त्या नाण्याचा फोटो, पट्टिका २६, आकृती ५१ पाहा.

कारण काही असो, या सुमारास हा कौटुंबिक संघर्ष समाप्त झाला असावा. कारण रुद्रसिंहाचा पुत्र प्रथम रुद्रसेन पुढे जीवदामन्च्या कारकीर्दीत क्षत्रप म्हणून राज्यकारभार पाहत असताना दिसतो.

रुद्रसेनाने पुढे सुमारे २२ वर्षे महाक्षत्रप म्हणून राज्य केले. त्याला पृथ्वीसेन आणि दामजदश्री असे दोन पुत्र होते. त्यांनी क्षत्रप म्हणून पाडलेली नाणी मिळाली आहेत. पण त्यांपैकी एकही रुद्रसेनानंतर गादीवर न येता रुद्रसेनाचे धाकटे भाऊ संघदामन् आणि दामसेन एकामागून एक राज्य करताना दिसतात. हाच प्रकार दामसेनानंतरही झालेला दिसतो. तेव्हा जीवदामन् आणि प्रथम रुद्रसिंह यांच्या झगडयानंतर या वंशाने असे ठरविलेले दिसते की, जोपर्यंत राज्यकर्त्या राजाचे धाकटे भाऊ जिवंत आणि कार्यक्षम आहेत तोपर्यंत राज्यपद त्याच्या मुलांना न मिळता त्याच्या भावांस, यथाक्रम मिळावे.

रुद्रसेनाच्या काळी पश्चिमेच्या क्षत्रपांचे वैवाहिक संबंध दूरदूरच्या राजांशी झालेले दिसतात. रुद्रसेन शकवंशी असला तरी तो वंश त्याच्या कारकीर्दीपर्यंत हिंदू समाजात पूर्णपणे सामावला होता. म्हणून अशा वैवाहिक संबंधास तत्कालीन समाजाचा विरोध नव्हता. अंध्र देशात सन २३० च्या सुमारास उदयास आलेल्या इक्ष्वाकु वंशातील वीरपुरुषदत्ताने शक राजकन्येशी विवाह केल्याचा उल्लेख तत्कालीन कोरीव लेखात येतो.[१] ती या रुद्रसेनाची कन्या किंवा नात असावी. दूरच्या बिहार प्रदेशातील वैशाली येथे रुद्रसेनाची भगिनी प्रभुदामा हिची मुद्रा सापडली आहे.[२] तीत तिला महादेवी म्हटले आहे, पण तीत तिच्या पतीचा निर्देश नाही. तो कदाचित् कुषाणांच्या अस्तानंतर तेथे राज्य करीत असावा.

रुद्रसेनानंतर पूर्वोल्लिखित समयानुसार क्षत्रप पदावर असलेल्या त्याच्या पृथ्वीसेन नामक मुलास गादी न मिळता ती त्याचा धाकटा भाऊ संघदामन् याला मिळाली. त्याने एक-दोन वर्षेच 'महाक्षत्रप' म्हणून राज्य केले असावे असे त्याच्या नाण्यांवरून दिसते.[३] याचे कारण डॉ. अळतेकरांनी असे अनुमानिले आहे की, त्या काळी अजमेर–मारवाड या भागातील मालव गणाने बंड करून आपले स्वातंत्र्य उद्घोषित केले. आणि श्रौत यज्ञ करण्यास सुरुवात केली. पूर्वीच्या उदेपूर संस्थानाच्या सहारा जिल्ह्यातील नांदसा येथील यूपांवरील लेखांवरून (मालव संवत् २८२, सन २२६ च्या) त्याची माहिती मिळते.[४] संघदामन्चा या मालवगणाशी झगडा झाला असावा. त्यात तो मारला गेला असे दिसते.

---

१ *E. I.* XX, p. 19.
२ *A. R. A. S. I.* (1913-14), p. 136.
३ *B. M. C.* (*Andhras*), p. 126.
४ *E. I.*, XXVII, p. 252.

दामसेनाच्या कारकीर्दीच्या आरंभीच्या कालात त्याचे पुतणे पृथ्वीसेन आणि द्वितीय दामसेन क्षत्रप म्हणून राज्य करीत होते. नंतर त्याचा स्वत:चा पुत्र वीरदामन् हा क्षत्रप म्हणून राज्यकारभार पाहू लागला. पण तो अकाली निधन पावला असावा. तेव्हा त्याचा धाकटा भाऊ प्रथम यशोदामन् याला सन २३८ मध्ये महाक्षत्रपपद मिळाले असे दिसते.[१] यशोदामन्ने फक्त दोन वर्षेच राज्य केले. कदाचित् तो अकाली निधन पावला असावा. त्यानंतर त्याचा धाकटा भाऊ विजयसेन यास गादी मिळाली. त्याने सन २५० पर्यंत महाक्षत्रप म्हणून राज्य केले. त्याच्यानंतर त्याचा धाकटा भाऊ तृतीय दामजदश्री याने सुमारे पाच वर्षे राज्यपद उपभोगिले.[२]

दामसेनाच्या तीन्ही भावांना याप्रमाणे यथाक्रम महाक्षत्रपपद मिळाल्या-नंतर त्याचा नातू---वीरदामन्चा पुत्र---द्वितीय रुद्रसेन याला सन २५५ च्या सुमारास गादी मिळाली. त्याची कारकीर्द बावीस वर्षे (सन २५५ ते २७७ पर्यंत) टिकली. सन २३९ ते २७५ या कालात कोणाही क्षत्रपाची नाणी मिळाली नाहीत. तेव्हा ते पद रिकामे होते असे दिसते पण त्याचे कारण कळत नाही.

कांही वर्षांपूर्वी सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड येथे क्षत्रपांच्या नाण्यांचा संचय सापडला होता.[३] त्यामध्ये विजयसेना (सन २४० ते २५०) पासून विश्वसेना (सन २९४ ते ३०४) पर्यंतची क्षत्रपांची नाणी सापडली होती. त्यांवरून पं. भगवानलाल इंद्रजींनी असे अनुमान केले होते की, या कालात (सुमारे सन २५० ते ३१०) क्षत्रपांनी आभीरांच्या प्रदेशावर आक्रमण करून दक्षिण महाराष्ट्र काबीज केला होता. या काली क्षत्रप फारसे प्रबळ नव्हते म्हणून हे आक्रमण डॉ. अळतेकरांना संभवनीय वाटले नाही.[४] त्यांनी या संचयाची अशी उपपत्ति लावली की कऱ्हाड हे फार प्राचीन काळापासून विद्वान् ब्राह्मणांचे निवासस्थान असल्यामुळे तेथील ब्राह्मणांस दूरदूरच्या प्रदेशांतून धार्मिक कृत्यांच्या अनुष्ठानाकरिता निमंत्रणे येत असावी. अशा एखाद्या ब्राह्मणाला दक्षिणारूपाने मिळालेल्या नाण्यांचा हा संचय असावा.[५] ही दोन्ही अनुमाने संभवनीय वाटत नाहीत. क्षत्रपांच्या नाण्यांचे संचय तशीच तुरळक नाणीही केवळ कऱ्हाडमध्ये नव्हे तर पुणे जिल्ह्यात,[६] मध्य प्रदेशाच्या

१ *B. M. C. (Andhras)*, pp. 128-30.
२ *B. M. C. (Andhras)* 137-140.
३ *J. B. B. R. A. S.* p. VI, 16 f.
४ *M. S. G. H.* I, pp. 163.
५ *Loc. Cit.*
६ *J. N. S. I.*, XXXVIII, pp. 27 f.

छिंदवाडा जिल्ह्यात[१] व विदर्भातही[२] अनेक ठिकाणी सापडली आहेत. त्यांचे कारण हे की या प्रांतांवर राज्य करणाऱ्या राजांची नाणी त्या काळी प्रचलित नव्हती. उदाहरणार्थ, महाराष्ट्रात त्या काळी राज्य करणारे आभीर राजे यांची आणि विदर्भ (छिंदवाडा जिल्हा धरून) मधील वाकाटकांचीही कोणतीही नाणी अद्यापि सापडली नाहीत. तेव्हा या प्रदेशांत क्षत्रपांची नाणी व्यवहाराच्या सोईसाठी त्या काळी प्रचलित असावी.

द्वितीय रूद्रसेनानंतर त्याचा पुत्र विश्वसिंह हा सुमारे सन २७७ मध्ये गादीवर आला, पण त्याची कारकीर्द दोन-तीन वर्षेच टिकली. त्यानंतर त्याचा भाऊ भर्तृदामन् याला महाक्षत्रपपद मिळाले. याची कारकीर्द मात्र बराच दीर्घकाळ – २० वर्षे – चालली. तिच्या अखेरीस त्याचा पुत्र विश्वसेन हा क्षत्रप म्हणून राज्यकारभारात मदत करीत होता.

सन २८४ मध्ये इराणच्या सस्सानीयन राजवंशाने भारतावर आक्रमण करून सिथिया (शकस्थान) व सिंध येथे आपले पाय रोवले. भर्तृदामन्ने समकालीन सस्सानियन राजा नर्सेह याच्याशी मित्रत्वाचे संबंध ठेवले होते. भर्तृदामन्ची मुबलक नाणी काठेवाडात तसेच विदर्भादि इतर प्रदेशांत सापडली आहेत.[१] त्यांवरून त्याच्या कारकीर्दीतील शांतता व सुबत्ता प्रत्ययास येते.[३]

भर्तृदामन् हा चष्टनाच्या शाखेतील शेवटचा महाक्षत्रप होय. त्याच्यानंतर दुसऱ्या एका शक शाखेचे राज्य सुरू झाले. तिचा मूळ पुरुष स्वामी जीवदामन् हा होता. त्याचा पुत्र द्वितीय रुद्रसिंह याने भर्तृदामन् व त्याचा पुत्र विश्वसेन यांना पदच्युत करून गादी बळकाविली. या शाखेचा चष्टनशाखेशी कसा संबंध होता माहीत नाही. द्वितीय रुद्रसिंह व त्याचा पुत्र द्वितीय यशोदामन् यांनी क्षत्रप म्हणूनच नाणी पाडली. त्यांनी महाक्षत्रप पदवी कधीही धारण केलेली दिसत नाही. कुषाण सम्राट् प्रबल होते तोपर्यंत ते आपल्या प्रान्ताधिपतींना त्यांच्या विशिष्ट कामगिरीस्तव महाक्षत्रप पदवी बहाल करीत असत. त्यांच्या मागे ती पदवी शक प्रांताधिपतींच्या स्वातंत्र्याची द्योतक गणली जात असावी. अर्थातच जेव्हा हे क्षत्रप अन्य नृपतींचे मांडलिक होत तेव्हा त्यांना ही पदवी धारण करता येत नसावी. सन ३०५ ते ३३२ या कालात कोणत्या बलवत्तर राजाने या शक प्रांताधिपतींना महाक्षत्रप पदवी धारण करण्यापासून परावृत्त केले याविषयी निश्चित विधान करणे शक्य नाही. त्या काळी सिंधच्या सस्सानियनांची सत्ता प्रबळ नव्हती. त्यामुळे त्यांच्याकडून दबाव आला असण्याची

---

१ *J. R. A. S. B., III, N. S.* p. 94 f.

२ *S. I.*, III, pp. 215 f.

३ मेवासा येथील यष्टि–लेख शक वर्ष २०३ चा असून तो भर्तृदामन्च्या काळचा आहे. क्र. ६१ मधील विवेचन पाहा.

शक्यता नाही. या कालात विदर्भात वाकाटक नृपति प्रथम प्रवरसेन हा राज्य करीत होता. त्याने चार अश्वमेध करून आपला दरारा वाढविला होता. त्याच्या दबावामुळे माळवा-काठेवाडचे क्षत्रप 'महाक्षत्रप' पदवी धारण करण्यास धजले नसावे, असे डॉ. अळतेकरांनी म्हटले आहे.[१] पण वाकाटकांचा प्रभाव या काळी नर्मदेच्या उत्तरेस पडला असेल असे वाटत नाही. याच्या उलट क्षत्रपांचे शेजारी आभीर नृपति यांची सत्ता या काळात वर्धिष्णु होती. त्यांनी कोंकण, पश्चिम महाराष्ट्र, गुजराथ आणि अनूप (नेमाड जिल्हा) या प्रदेशांवर आपला अंमल बसविला होता हे त्यांच्या संवताच्या या देशांतील प्रसारावरून अनुमानिता येते.[२] दहा आभीरांनी १६७ वर्षे (सन २५० ते ४१७) राज्य केले असे पुराणे सांगतात. तेव्हा आभीरांच्या बलवत्तर सत्तेचा प्रसार हेच माळवा-काठेवाड येथील क्षत्रपांच्या महत्त्वाकांक्षेला पायबंद बसण्याचे कारण असावे. दुर्दैवाने आभीर राजांचे फारच थोडे लेख आतापर्यंत उपलब्ध झाले आहेत. पुढे मागे ते प्रकाशात आल्यास या प्रश्नावर प्रकाश पडेल.

शकांच्या या दुसऱ्या शाखेतील द्वितीय यशोदामन्‌चे शेवटचे ज्ञात वर्ष सन ३३२ आहे. यानंतर सुमारे १६ वर्षांचे पुनः अंधकारयुग येते. पुढे स्वामी तृतीय रुद्रसेनाने महाक्षत्रप म्हणून पाडलेली नाणी मिळू लागतात. त्या नाण्यांवरून त्याचा पिता द्वितीय रुद्रदामन् यानेही महाक्षत्रप पदवी धारण केली होती असे समजते, पण त्याची स्वतःची नाणी मिळाली नाहीत आणि त्याचा पूर्वोक्त द्वितीय शाखेच्या यशोदामन्‌शी कसा संबंध होता हेही समजत नाही. कदाचित् द्वितीय रुद्रदामन्‌ने स्थापिलेली शाखा पूर्वोक्त दोन शाखांहून भिन्न असेल. ही दुसरी राज्यक्रांति सन ३४५ च्या सुमारास घडून आली असावी.

द्वितीय रुद्रदामन्‌ने दोन-तीन वर्षेच राज्य केले असावे. त्यानंतर त्याचा पुत्र तृतीय रुद्रसेन गादीवर आला. त्याची कारकीर्द दीर्घकाळ—३० वर्षे— टिकली पण ती शांततेची नव्हती. कारण या काळात शक क्षत्रपांच्या नाण्यांचे संचय त्यांच्या राज्यात तसेच बाहेरच्या प्रदेशांतही जमिनीत पुरून ठेवलेले दिसतात. असा एक संचय जुनागड जवळ उपरकोट येथे[३] आणि दुसरा रतलाम जवळ सर्वाणिया[४] येथे सापडला आहे. या दोन्ही संचयांत सन ३५१ नंतरची तृतीय रुद्रसेनाची नाणी आढळली नाहीत. कांही तर नुकतीच पाडलेली दिसतात. तेव्हा सन ३५० च्या सुमारास क्षत्रपांच्या राज्यात भीतीचे वातावरण पसरले होते असे दिसते.

---

१ *M. S. G. H.* I, p. 165.

२ *C. I. I.*, IV, pp. xxxi f.

३ *J. B. B. R. A. S.*, 1890, pp. 203 f.

४ *A. R. A. S. I.*, 1913-14, pp. 227 f.

या दहशतीचे कारण मात्र निश्चितपणे समजत नाही. डॉ. अळतेकरांनी असे म्हटले आहे की, इराणचा राजा द्वितीय शापुर याने सन ३५६-३५७ मध्ये पूर्वेकडे स्वारी केली होती. त्याने कदाचित् आपल्या सिंधमधील तळातून काठेवाडावर आक्रमण केले असेल आणि त्यामुळे तृतीय रुद्रसेनाच्या राज्यात दहशतीचे वातावरण उत्पन्न झाले असेल.[१] पण याविषयी निश्चितपणे विधान करणे शक्य नाही. या संबंधात दुसरेही एक अनुमान संभवनीय वाटते. समुद्रगुप्ताच्या प्रयाग – प्रशस्तीत त्याने उच्छेदिलेल्या राजांच्या यादीत एक रुद्रदेव आहे.[२] काही विद्वानांच्या मते तो वाकाटक नृपति प्रथम रुद्रसेन असावा. पण तसे असते तर पुढे त्याच्या प्रथम पृथिवीषेण या पुत्राच्या कारकीर्दीत जो गुप्त – वाकाटकांचा वैवाहिक संबंध जुळून आला तो आला नसता. तेव्हा तो रुद्रदेव 'क्षत्रप तृतीय रुद्रसेन' असावा. अन्य विरोधी राजांच्याप्रमाणे समुद्रगुप्ताने त्याला एखाद्या चकमकीत ठार केल्यावर त्याचे राज्य खालसा केले नाही खरे, पण त्याच्या या कृत्याने पश्चिमी क्षत्रपांच्या राज्यात भीतीचे वातावरण उत्पन्न झाले असल्यास नवल नाही.

तृतीय रुद्रसेनानंतर क्षत्रपांचा इतिहास सुस्पष्ट नाही. त्याच्यानंतर त्याच्या बहिणीचा मुलगा स्वामी सिंहसेन आणि पुढे त्याचा मुलगा स्वामी चतुर्थ रुद्रसेन हे गादीवर आले. पण त्या दोघांची कारकीर्द पाच वर्षांतच (सन ३८८ मध्ये) संपली. नंतर गादीवर आलेला स्वामी सत्यसिंह याचा त्यांच्याशी कसा संबंध होता हे निश्चितपणे सांगता येत नाही. रॅप्सनने स्वामी सत्यसिंहाला सिंहसेनाचा भाऊ मानले आहे.[३] पण त्याची नाणी मिळाली नसल्याने त्याच्या पित्याचे नाव माहीत नाही. डॉ. अळतेकरांच्या मते तो स्वामी तृतीय रुद्रसेनाचा भाऊ असावा.[४] आणि म्हणून आपला क्षत्रपांच्या राज्यावर चतुर्थ रुद्रसेनापेक्षा जास्त अधिकार आहे असे वाटून त्यानें त्या रुद्रसेनाला पदच्युत केले असावे. यांतील कोणते मत यथार्थ आहे ते निश्चित पुराव्याच्या अभावी सांगणे शक्य नाही.

पूर्वोक्त तीन राजांची —स्वामी सिंहसेन, स्वामी चतुर्थ रुद्रसेन आणि स्वामी सत्यसिंह यांची – कारकीर्द सन ३८२ ते ३८८ या सहा वर्षांत समाप्त झाली यावरून या क्षत्रपांच्या राज्यातील अंतःकलह आणि अस्थिर राजकीय परिस्थिति ध्यानात येते. ती तत्कालीन द्वितीय चंद्रगुप्त या महत्त्वाकांक्षी गुप्त सम्राटाच्या नजरेतून सुटली असणे शक्य नाही. त्या काळापर्यंत गुप्तांची सत्ता विदिशेपर्यंत येऊन पोचली होती. विदिशेजवळच्या दुर्जनपूर गावी चन्द्रगुप्ताचा

१ *M. S. G. H.*, I, p. 166.
२ *C. I. I.* III (old ed.), p. 7.
३ *B. M. C.* (Andhras), p. cxlix.
४ *M. S. G. H.*, I, p. 167.

वडील भाऊ रामगुप्त याचे तीन मूर्तिलेख व अनेक नाणी सापडली आहेत.[१] तेव्हा गादीवर आल्यावर चन्द्रगुप्ताने आपला पिता समुद्रगुप्त याचे अनुकरण करून अवशिष्ट राहिलेले पश्चिमी क्षत्रपांचे राज्य जिंकण्याचा निश्चय केला असावा. या स्वारीच्या निमित्ताने विदिशेस आलेल्या त्याच्या शाब नामक मंत्र्याचा कोरीव लेख तेथे आढळला आहे.[२] त्यात त्याने 'संपूर्ण पृथ्वी जिंकण्याकरिता येथे आलेल्या राजा चन्द्रगुप्ताबरोबर आपण आलो होतो, तेव्हा ही उदयगिरि येथील गुहा कोरविली' असे म्हटले आहे. या लेखात कालोल्लेख नाही. पण तो ठरविण्यास साधने आहेत. शेवटचा ज्ञात क्षत्रप—सत्यसिंहाचा पुत्र स्वामी तृतीय रुद्रसिंह—याचे उपलब्ध नाण्यांवरील अखेरचे शक वर्ष ३१० + क्ष (सन ३८८ + क्ष) असे आहे. त्याचे राज्य जिंकल्यावर चंद्रगुप्ताने पाडलेल्या चांदीच्या नाण्यांवरचे वर्ष सन ४०९ आहे. त्याच्या सनकानीक-वंशी मांडलिकांचाही विदिशेजवळचा लेख त्याच सुमाराचा — गुप्त संवत् ८२ चा—(सन ४०१ चा)— आहे. तेव्हा गुप्तांनी क्षत्रप राज्य जिंकण्याचा काल सन ३९० ते ४०५ या पंधरा वर्षांत असला पाहिजे. सामान्यतः तो सन ३९५ मध्ये धरण्यात येतो.

या स्वारीत चन्द्रगुप्ताने आपल्या समकालीन वाकाटक नृपतीचे साहाय्य घेतले असावे. डॉ. अळतेकरांनी अनुमान केले आहे की चन्द्रगुप्ताने आपला जामात वाकाटक द्वितीय रुद्रसेन याचे साहाय्य घेण्याचा बेत केला होता, पण त्याच्या आकस्मिक निधनामुळे ती स्वारी पुढे ढकलावी लागली.[३] या अनुमानाला काहीही आधार नाही. चन्द्रगुप्ताचा समकालीन वाकाटक नृपति प्रथम पृथिवीषेण हा होता. त्याचा काळ सन ३५० ते ४०० असा त्याच्या विषयीच्या काही उल्लेखांवरून व अन्य साधनांवरून ठरविता येतो.[४] त्याच्या कारकीर्दीत ही घटना घडली असावी. तिचा काल सन ३९५ हाच दिसतो.

या प्रसंगी विजय प्राप्त झाल्यावर चंद्रगुप्ताने वाकाटकांशी वैवाहिक संबंध करण्याचा निश्चय करून आपली कन्या प्रभावतीगुप्ता वाकाटक युवराज (द्वितीय) रुद्रसेन याला दिली. हा समारंभ मोठ्या थाटाने गुप्तांची नवीन राजधानी उज्जैनी येथे झाला असावा. अशा विजयोत्सवप्रसंगी एखाद्या नवीन नाटकाचा प्रयोग करण्याची प्रथा होती. तिला अनुसरून, इतर प्राचीन संस्कृत नाटकांना दूर सारून, कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्र' नाटकाची निवड झाली असे त्या नाटकाच्या प्रस्तावनेवरून दिसते.[५]

१ *E. I.* XXXVIII, pp. 46 f. २ *C. I. I.* III, (old ed.), p. 35.
३ *M. S. G. H.* I., p. 167.
४ वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ, पृ. १२.
५ आमचा 'कालिदास' (तृतीयावृत्ति), पृ. १४५ इ.

क्षत्रपांचे राज्य खालसा केल्यावर पश्चिमेचे विख्यात बंदर भडोच हे गुप्तांच्या ताब्यात येऊन त्यांचा परदेशाशी व्यापार वाढला असावा. गुप्तांच्या राजवटीतील अपूर्व समृद्धीचे हेही एक कारण दिसते. तसेच त्यांची दुसरी राजधानी उज्जैनी येथे झाल्याने द्वितीय चंद्रगुप्ताचे संस्कृत भाषा व आर्य संस्कृति यांच्या जोपासनेकडे जास्त लक्ष लागले असावे. त्याच्या कालात उज्जैनी येथे अनेक विद्वानांची परीक्षा होऊन त्यांना ख्याति प्राप्त झाली असे एका सुभाषितात म्हटले आहे.[१]

## (३) विदर्भातील क्षत्रप

सन १९६४ पर्यंत क्षत्रपांचा अंमल विदर्भावर होता याची यत्किंचितही माहिती कोणासही नव्हती. त्या वर्षीच्या डिसेंबर महिन्यात प्रस्तुत लेखाची माहिती आम्हांस प्रथम कळली. पुढे त्याचे छाप आणवून आम्ही त्याचा अभ्यास केला आणि नंतर तो 'एपिग्राफिया इंडिका'[२] मध्ये व इतरत्र प्रसिद्ध केला. त्यावरून पश्चिम महाराष्ट्र व कोंकण इत्यादि प्रदेशांप्रमाणे कुषाणांची सत्ता एके काळी विदर्भावरही पसरली होती हे सुस्पष्ट झाले.

ह्या लेख शिलास्तंभाच्या एका अडीच फूट उंचीच्या तुकड्यावर ब्राह्मी लिपीत आणि प्राकृत भाषेत कोरला आहे. तुकड्याच्या शीर्षभागी अर्धकमळाची आकृति आहे. लेखात असे म्हटले आहे की ज्या स्तंभावर तो कोरला आहे तो महाक्षत्रपकुमार रुपिअम्म याचा छायास्तंभ आहे. छायास्तंभ म्हणजे प्रतिमायुक्त [स्मारक] स्तंभ. पण सापडलेल्या शिलाखंडावर कोणतीही प्रतिमा नाही. असाच प्रकार काठेवाडातील अनेक छाया–यष्टींच्या बाबतीत आढळतो. कदाचित् छायास्तंभाचा मूळ अर्थ कालाच्या ओघात लुप्त होऊन केवळ 'स्मारकस्तंभ' एवढाच अर्थ रूढ झाला असावा.

रुपिअम्म हे नाव भारतीय दिसत नाही. त्यामुळे नहपानाप्रमाणे ह्या क्षत्रप आरंभीच्या काळातला दिसतो. पुढे हे क्षत्रप शुद्ध भारतीय नावे धारण करताना दिसतात. उदाहरणार्थ, ऋषभदत्त, रुद्रदामन्, श्रीधरवर्मन् वगैरे.

ह्या रुपिअम्म 'महाक्षत्रप' होता. तेव्हा त्याने स्वतःच्या पराक्रमाने बराच प्रदेश जिंकून साम्राज्य सत्तेचा विस्तार केल्यामुळे त्याच्या सम्राटाने ही पदवी त्याला दिली असावी. त्याला कुमारही म्हटले आहे. पण येथे त्याचा अर्थ 'राजकुमारा'सारखा नाही. त्या काळी मोठ्या अधिकारांच्या नावाअखेर

---

१ काव्यमीमांसा, (G. O. S.), पृ. ५५.

२ *E. I.*, XXVII, pp. 201 f.

अशी संमानदर्शक पदवी लावण्याचा प्रघात होता असे नागार्जुनकोंड येथील कांही लेखांवरून कळते.

या लेखात कालाचा उल्लेख नाही. तथापि तो कुषाण सम्राट् कनिष्काच्या किंवा त्याचा उत्तराधिकारी हुविष्क याच्या काळी विदर्भात होऊन गेला असावा. त्या काळी वैनगंगाकाठचे पौनी हे विदर्भाच्या राजधानीचे नगर होते असे दिसते. कुषाणांच्या या किंवा यापूर्वीच्या क्षत्रपाने हा प्रदेश जिंकल्यामुळे सातवाहनांना किंवा त्यांच्या प्रांताधिपतीला येथून माघार घ्यावी लागली असावी.

क्षत्रपांचे हे आक्रमण किती वर्षे टिकले हे माहीत नाही. तथापि सन १२३ च्या सुमारास गौतमीपुत्र सातकर्णीने जेव्हा कुषाणांविरुद्ध मोहीम उघडली तेव्हा त्याने हा प्रदेश प्रथम जिंकला होता असे दिसते. नंतर त्याने पश्चिमेस चाल केली आणि नाशिकजवळ गोवर्धन येथे नहपानाशी घनघोर लढाई करून त्याचा पराजय केला.[१] पुढे त्याने नाशिकजवळच्या बौद्ध लेण्यांना भेट देऊन तेथे भूमिदान केले. त्याप्रसंगी काढलेल्या आज्ञापत्रात त्याने आपला निर्देश 'बेणाकटकस्वामी' (बेणातीरच्या प्रदेशाचा राजा) असा हेतुपूर्वक केलेला दिसतो.[२] नहपानाच्या कारकीर्दीचे शेवटचे ज्ञात वर्ष ४६ आहे. ते शक संवताचे आहे हे इतरत्र दाखविले आहे. तेव्हा ही लढाई सन १२४–२५ मध्ये झाली असावी.

क्षत्रपांचा विदर्भावर अंमल केव्हा बसला हे माहीत नाही, पण तो सन १२३ च्या सुमारास संपला एवढे मात्र सांगता येते.

## पश्चिमी क्षत्रपांच्या वंशावळी

**१ — क्षहरात क्षत्रप**




---

१ क्र. ११.

२ पूर्वोक्त, ओ. १. सं. मु., सर ८, पृ. २०३ इ. पाहा.

**२ –– कार्दमक क्षत्रप**




**३––विदर्भातील क्षत्रप**

रुपिअम्म

परिशिष्ट पहिले

# खारवेलाचा काल

कलिंग देशाचा थोर राजा खारवेल याच्या कालाविषयी विद्वानांत तीव्र मतभेद गेल्या शताधिक वर्षांत उत्पन्न झाले आहेत. त्याचा काल ठरविण्याचे एकमेव साधन ओरिसातील भुवनेश्वरजवळ असलेल्या हाथीगुंफेतील प्राकृत लेख हाच आहे. पण तो लेख आता अत्यंत खराब स्थितीत असल्यामुळे त्याच्या कांही भागांचे वाचन व अर्थ विद्वानांनी भिन्न भिन्न प्रकारे केले आहेत. त्या लेखातील काही विशिष्ट भागांवर लक्ष केंद्रित करून त्या वादग्रस्त प्रश्नावर काय प्रकाश पडतो हे पाहावयाचे आहे. या विवेचनाला महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाच्या दृष्टीने महत्त्व आहे; कारण हा राजा महाराष्ट्राच्या अतिप्राचीन सातवाहन वंशातील सातकर्णि राजाचा समकालीन होता. सातवाहन राजवटीचाही काल अनिश्चित असल्यामुळे त्यावरही खारवेलच्या कालानें काही प्रकाश पडेल.

आता सर्व संशोधकांनी मान्य केले आहे की हाथीगुंफा लेखात कोणताही कालोल्लेख नाही.[१] तेव्हा त्या लेखात निर्देशिलेल्या खारवेलाच्या कांही राजांशी समकालीनत्वावरूनच आपणांस त्याच्या कालाचे अनुमान केले पाहिजे. हाथीगुंफा लेखावरून पुढील राजे समकालीन होते असे दिसते : (१) खारवेल आणि सातकर्णि; (२) खारवेल आणि बहसतिमित; आणि (३) खारवेल आणि यवन राजा दिमित. याशिवाय, हाथीगुंफा लेखात म्हटले आहे की 'खारवेलाने तीन शतकांपूर्वी (किंवा १०३ वर्षांपूर्वी) नंद राजानें खोदलेला कालवा तनसुलिय मार्गाहून आपल्या नगरात आणला.' खारवेलाचा अनुमानित काल या विधानाशीही सुसंगत असला पाहिजे.

वरील तीन समकालीनत्वांपैकी दुसरे – खारवेल आणि बहसतिमित यांचे समकालीनत्व – विशेष महत्त्वाचे आहे. कारण त्यायोगे खारवेलाचा काल थोड्या फार फरकाने निश्चित होण्याचा संभव आहे. म्हणून ते प्रथम घेऊ.

---

१ पं. भगवानलाल इंद्रजींनी हाथीगुंफा लेखाच्या १६ व्या ओळीत मौर्यकालाच्या १६५ या वर्षाचा उल्लेख वाचला होता. त्या वाचनाला फ्लीट व ल्यूडर्स यांनी आक्षेप घेतला होता. जयस्वाल व बॅनर्जी यांनी पं. भगवानलालचे ते वाचन स्वीकारले होते. पण नंतर ए. इं., व्हॉ. २०, पृ. ७४ इ. वरील आपल्या लेखात त्यांनीही 'हाथीगुंफा लेखात कोणत्याही कालाचा उल्लेख नाही' हे मान्य केले आहे.

## १. खारवेल आणि बहसतिमित यांचे समकालीनत्व

हाथीगुंफा लेखातील ११ व १२ ओळींचे वाचन येणेप्रमाणे—
बारसमे वसे · · · सहसेहि वितासयति उत्तरापथराजानो · · · ·
मागधानं च विपुलं भयं जनेतो हथसं गंगाय पाययति [।*] मागधं च राजानं बहसतिमितं पादे वंदापयति [।*]

'उत्तरापथ' याचा येथे अर्थ 'उत्तर भारत' असा आहे. 'पृथूदकापलीकडचा प्रदेश'[१] असा राजशेखरानें दिलेला त्याचा अर्थ येथे विवक्षित नाही. जयसवालांनी 'हथी सुगंगाय पाययति' असे वाचून 'खारवेल आपले हत्ती पाटलीपुत्रातील सुगांग प्रासादात प्रवेशवितो'[२] असा अर्थ केला आहे, पण तो अग्राह्य आहे. 'पाययति' याचा अर्थ 'प्रवेशवितो' असा करणे शक्य नाही. तेव्हा 'हथसं गंगाय' असे वाचणे बरे. 'बहसतिमितं' हे वाचन बहुतेक निश्चित आहे आणि ते सर्व विद्वानांनी स्वीकारले आहे. तेव्हा वरील उताऱ्याचा अर्थ 'आपल्या कारकीर्दीच्या बाराव्या वर्षी खारवेलाने एकाएकी उत्तर भारताच्या राजांच्या छातीत धडकी उत्पन्न केली. मगधाच्या लोकांत मोठी भीति उत्पन्न करून त्याने आपल्या हत्ती-घोड्यांना गंगेचे पाणी पाजले आणि मगधाचा राजा बहसतिमित याला आपल्या पायांना नमस्कार करणे भाग पाडले' असा आहे.

हा मगधराज बहसतिमित कोण? त्याचे संस्कृत नाव 'बृहस्पतिमित्र' असावे, हे बहुतेकांनी मान्य केले आहे. जयसवालांनी तो शुंगवंश-संस्थापक पुष्यमित्र असावा असे प्रतिपादिले आहे, आणि त्याला प्रमाण असे दिले आहे की बृहस्पति (गुरु) ही पुष्यनक्षत्राची देवता आहे.[३] हे कारण विचित्र असल्यामुळे कोणीही हे समीकरण स्वीकारले नाही. पुराणांतील वंशावळींत हे नाव आढळत नाही. अशोकाच्या वंशजांमध्येही हे नाव दिसत नाही. पण उत्तर प्रदेशातील कोसम (प्राचीन कौशाम्बी) याच्या जवळच्या पभोसा गावच्या आषाढसेनाच्या लेणे–लेखात[४] त्याचा भाचा म्हणून बहसतिमिताचा उल्लेख आहे. आषाढसेनाची माता गोपाली ही उत्तर पांचाल देशाची राजधानी अहिच्छत्रा (सध्याचे रामनगर) येथील तेवणीपुत्र भागवत राजाची कन्या होती असेही त्या लेखावरून कळते. हा बहसतिमित

---

१ पाहा—'पृथूदकात्परत उत्तरापथः.' राजशेखराची 'काव्यमीमांसा', (गायकवाड ओरिएंटल सीरीज), पृ. ९४. पृथूदक म्हणजे सध्याचे पेहोवा.

२ ए. इं., व्हॉ. २०, पृ. ८० व ८८, टिप्पणी.

३ *J. B. O. R. S.*, III, p. 473.

४ *E. I.*, II, pp. 242 f.

ऊदाक राजाचा सामन्त होता व आषाढसेनाने त्या राजाच्या कारकीर्दीतील दहाव्या वर्षी ते लेणे पभोसा येथे खोदविले होते. हा ऊदाक पुराणांतील शुंगांच्या वंशावळीतील वसुमित्राचा पुत्र ओद्रक दिसतो. हा वसुमित्र शुंगराज्य–संस्थापक पुष्यमित्राचा नातू म्हणून वंशावळीत[१] तसेच कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'त उल्लेखिला आहे. बहसतिमित स्वत: वत्स देशावर राज्य करीत असला तरी पुष्यमित्र शुंगाच्या निधनानंतर त्याने आपली सत्ता मगधावर पसरविलेली दिसते. काही 'मित्र' राजांची नाणी पाटण्यात सापडली आहेत, व बुद्धगयेतील एका कठडयाच्या स्तंभावर काही 'मित्र' राजांची नावे कोरली आहेत.[२] त्यावरून पुष्यमित्र शुंगानंतर मगध काही मित्र राजांच्या अमलाखाली होता असे दिसते. बहसतिमित हा त्यांपैकी अगदी प्रारंभीचा राजा दिसतो. त्याचे राज्य वत्स देशापासून मगध देशापर्यंत पसरले होते. हाच राजा हाथीगुंफा लेखात खारवेलाचा समकालीन म्हणून उल्लेखिलेला असावा.

पुष्यमित्रानंतर शुंग राजांचे पाटलिपुत्रातून उच्चाटण झालेले दिसते. पुष्यमित्राच्या एकाही वंशजाचे लेख किंवा नाणी मगधात सापडली नाहीत. शुंग, काण्व व अन्ध्र (सातवाहन) राजांनी या क्रमाने पाटलिपुत्र येथे राज्य केले या प्रचलित समजुतीला काहीही आधार नाही. पुष्यमित्रानंतर शुंग सत्तेचे केंद्र पाटलिपुत्रात नसून मध्य भारतात विदिशा येथे होते. पुष्यमित्राच्या काळीही त्याचा पुत्र अग्निमित्र विदिशेस राज्य करीत होता हे कालिदासाच्या 'माल-विकाग्निमित्रा'त दाखविले आहे. त्याच्या वंशजांचीही विदिशा हीच राजधानी असावी. म्हणूनच नंतरच्या कालात तक्षशिलेच्या ॲटिअलकिडस या यवन राजाने आपला वकील हेलिओडोरस याला विदिशा येथे भागभद्र शुंगाच्या दरबारी पाठविले होते.[३] तसेच सातवाहन नृपति सातकर्णि यानें शुंगांच्या प्रदेशावर आक्रमण करून तेथे कांही काळ ताबा मिळविला, तेव्हा त्याच्या मुकादमाने आपला लेख जवळच्या सांची येथील महास्तूपाच्या तोरणावर कोरला होता.[४] नंतर पुराणे सांगतात त्याप्रमाणे विदिशा ही काण्वांची व नाग राजांची राजधानी झाली. गुप्तांच्या कारकीर्दीतही आरंभीच्या काळात ती त्या राजांची दुसरी राजधानी होती असे दिसते. म्हणून समुद्रगुप्त प्रथम

---

१ *D. K. A.*, p. 31, n. 13

२ *A. R. A. S. I.*, 1912-13, pp. 84 f. इंद्राग्निमित्र आणि ब्रह्ममित्र या राजांचे लेख बुद्धगयेमध्ये सापडले आहेत. *A. R. A. S. I.*, 1907-08, pp. 40 and 225; *ibid.* 1908-09, p. 147.

३ *J. B. B. R. A. S.*, XXIII, p. 104.

४ क्र. २ पाहा.

तेथे राहत होता. जवळच्या सागर जिल्ह्यातील एरण गावी त्याने विष्णूचे देवालय बांधले होते आणि तेथे आपला शिलालेख कोरविला होता. त्या लेखात एरिकिण नगराला 'स्वभोगनगरैरिकिणप्रदेश' (स्वतःच्या अमलाखाली असलेल्या भुक्तीतील एरिकिण प्रदेश) असे म्हटले आहे.[१] विदिशेजवळच समुद्रगुप्ताचा पुत्र रामगुप्त याचे तीन मूर्तिलेख सापडले आहेत.[२] तेव्हा ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंत विदिशा ही शुंग, काण्व, नाग व गुप्त राजांची राजधानी होती. म्हणूनच गुप्त राजा द्वितीय चन्द्रगुप्त विक्रमादित्य याचा आश्रित कालिदास याने तिचे 'दिक्षु प्रथितविदिशा-लक्षणा राजधानी' असे वर्णन 'मेघदूता'त केले आहे.[३] तेव्हा खारवेलाने मगधावर स्वारी केली तेव्हा तेथे कोणी शुंग राजा राज्य करीत नव्हता, तर मित्रकुलोत्पन्न बृहस्पतिमित्र नामक राजा होता, व त्याने पुष्यमित्र शुंग राजानंतर तो प्रदेश जिंकला होता असे दिसते.

पुष्यमित्राचे निधन सुमारे ख्रिस्तपूर्व १५० मध्ये झाले असावे. त्यानंतर लौकरच कौशाम्बीच्या बृहस्पतिमित्राची सत्ता तेथे प्रस्थापित झाली असावी. हाथीगुंफा लेखात म्हटले आहे की खारवेलाने आपल्या राज्यकाळाच्या बाराव्या वर्षी उत्तर भारतावर आक्रमण करून मगधाचा राजा बृहस्पतिमित्र याला पादवंदन करावयास लावले. खारवेल ख्रिस्तपूर्व १५० या वर्षी गादीवर आला असल्यास ही घटना ख्रिस्तपूर्व १३८ मध्ये घडली असावी. बृहस्पतिमित्र हा शुंगनृपति ओद्रक (ऊदाक) याचा सामन्त होता. हा ओद्रक पुष्यमित्राचा पणतू असल्याने ही घटना १३८ च्या सुमारास घडणे अगदी संभवनीय आहे.

हाथीगुंफा लेखात खारवेलाच्या राज्यकालाच्या तेराव्या वर्षापर्यंतच्याच घटनांचा उल्लेख आहे. त्यानंतर लौकरच त्याचे निधन झाले असावे. म्हणून त्याचा राज्यकाल ख्रिस्तपूर्व १५० ते १३५ असा ठरविता येतो. आता हा काल इतर समकालीनत्वांशी कितपत जुळतो ते पाहू.

## २. खारवेल आणि सातकर्णि यांचे समकालीनत्व

हाथीगुंफा लेखाच्या चौथ्या ओळीत खालील वर्णन आले आहे —

दुतिये च वसे अचितयिता सातकंनिं पछिमदिसं हयगजनररधबहुलं दंडं पठापयति [।*] कन्हबेंणागताय च सेनाय वितासिति असिकनगरं [।*]

---

१ *C. I. I.*, III, pp. 18 f.

२ *E. I.*, XXXVIII, pp. 46 f.

३ मेघदूत (सं. का. बा. पाठक), श्लो. २४.

या उताऱ्यात म्हटले आहे की दुसऱ्या वर्षी खारवेलाने घोडे, हत्ती, रथ व पायदळ यांचे सैन्य सातकर्णि राजाला न जुमानता पश्चिमेस पाठविले आणि ते सैन्य कन्हबेण्णा नदीला पोचल्यावर ऋषीक नगराच्या लोकांच्या छातीत धडकी उत्पन्न केली.

जयसवाल आणि राखालदास बॅनर्जी यांनी या उताऱ्यात 'मुसिकनगर' असे वाचून त्यात उल्लेखिलेली नदी ही सातारा जिल्ह्यात उगम पावून महाराष्ट्र, कर्णाटक आणि अन्ध्र प्रदेशांतून वाहत जाऊन मछलीपटण येथे समुद्रास मिळणारी कृष्णा नदी होय असे म्हटले आहे[१] आणि ढवळीकरांनी हे मुसिकनगर म्हणजे अशोकाचे लघु प्रस्तर लेख जेथे सापडले आहेत ते मस्की गाव असे सुचविले आहे.[२] पण बरूआ यांनी 'असिकनगर' हाच खरा पाठ आहे असे दाखविले आहे. शिवाय मुसिकनगराचा उल्लेख कोणत्याही प्राचीन लेखात आढळत नाही. याच्या उलट असिक (संस्कृत ऋषीक) याचा उल्लेख महाभारत–रामायणादि ग्रंथ व प्राचीन कोरीव लेख यांत आढळतो.[३] तेव्हा 'असिकनगर' हाच पाठ बरोबर आहे. बरुआंचे नंतरचे विधान 'असिक हे मुसिकाचे दुसरे नाव असावे' हे मात्र स्वीकारता येत नाही. 'असिक' हे देशनाम पुळुमावीच्या नाशिक येथील लेण्यात त्याचा पिता गौतमीपुत्र सातकर्णि याच्या अमलाखाली असलेल्या दक्षिणापथातील देशांच्या यादीत उल्लेखिले आहे.[४] आम्ही चाळीस-पंचेचाळीस वर्षापूर्वी असिक (ऋषीक) हे असक (अश्मक) याच्या बरोबर संस्कृत वाङमयात व प्राचीन कोरीव लेखांत येते हे दाखविले होते.[५] 'रामायणा'त सुग्रीवाने वानरांना सीतेच्या शोधार्थ ज्या दक्षिण देशांत जाण्यास सांगितले होते त्यांत विदर्भ आणि माहिषक या देशांबरोबर ऋषीकाचाही निर्देश होता.[६] 'महाभारता'त ऋषीकाचा विदर्भ आणि पश्चिम अनूप या देशांबरोबर उल्लेख आला आहे.[७] त्या आर्ष काव्याच्या दुसऱ्या एका श्लोकात कर्णाने जिंकलेल्या प्रदेशांमध्ये ऋषीकाचा अश्मकासहित निर्देश आहे.[८] दण्डीच्या 'दशकुमारचरिता'त जसा अश्मक देशाचा तसा ऋषीक देशाचाही अधिपति विदर्भाच्या राजाचा मांडलिक होता असे वर्णिले आहे.[९] या सर्व

---

१ ए. इं., व्हॉ. २०, पृ. ८३.

२ *J. A. S. Bom.* (New Series), XXXIII, pp. 37 f.

३ *I. H. Q.*, XIV, p. 463, n. 25.

४ क्र. १८, ओ. २.

५ *A. B. O. R. S.* XXV, pp. 167 f.

६ रामायण (निर्णयसागर प्रेस), किष्किंधाकांड, स. ४१, श्लो. १०.

७ महाभारत (चित्रशाळा प्रेस), भीष्मपर्व, ९, ६४, व उद्योगपर्व, ४, १८-१९.

८ पूर्वोक्त, कर्णपर्व, ८, २०.

९ दशकुमारचरित (B. S. S.), पृ. १३८.

उल्लेखांवरून ऋषीक देश अश्मक, अनूप आणि विदर्भ यांना लागून होता असे दिसते. असा देश फक्त खानदेशच असणे शक्य आहे. कारण तो उत्तरेस अनूप (नेमाड जिल्हा), पूर्वेस विदर्भ आणि दक्षिणेस मूलक व अश्मक (औरंगाबाद व अहमदनगर जिल्हे) यांना लागून आहे.

वरील उताऱ्यात म्हटले आहे की खारवेलाची सेना पश्चिमेस चाल करून कन्हबेण्णा नदीला पोचली. ही नदी वाईजवळ उगम पावणारी कृष्णा असणे शक्य नाही. कारण ती कलिंग देशाच्या दक्षिणेस वाहते, पश्चिमेस नाही. जयसवाल आणि बॅनर्जी यांच्या 'एपिग्राफिया इंडिका'तील हाथीगुंफा लेखास टीपा जोडणाऱ्या डॉ. अ. स. अळतेकरांना कन्हबेण्णा म्हणजे कृष्णा हे सिद्ध करताना पुष्कळच अडचण पडली. ते म्हणतात, 'खारवेल लांब प्रवाहाच्या आणि वाकडी तिकडी वळणे घेणाऱ्या कृष्णानदीला पोचला यात संशय नाही. तो पश्चिमेस गेला होता यातही संशय नाही; कारण, 'पछिमदिसं' हा शब्द हाथीगुंफा लेखात स्पष्ट आहे, पण तो नक्की कोठे कृष्णा नदीला पोचला हे अनिश्चित आहे.'[१]

कलिंग देशाच्या पश्चिमेस वाहणारी कन्हबेण्णा ही नदी कोणती हे ठरविण्यात या विद्वांनाना आलेली अडचण, वास्तविक पाहता, त्यांनी स्वतःच उत्पन्न केली आहे. कन्हबेण्णा ही कन्हान नदीचा संगम झाल्यावर भंडारा जिल्ह्यातून वाहणारी वैनगंगा होय असे मानल्यास कोणतीच अडचण उत्पन्न होत नाही. प्राचीन काळी तिला कृष्णवेणा असे नाव होते असे दिसते. ती कलिंग देशाच्या पश्चिमेस वाहत असल्याने हाथीगुंफा लेखातील तिचा निर्देश तिला बरोबर जुळतो. खारवेलाची सेना विदर्भात वैनगंगेपर्यंत आल्यावर ऋषीकाच्या (विदर्भाच्या पश्चिमेस लागून असलेल्या खानदेशाच्या) राजधानीत भीतीचे वातावरण उत्पन्न झाले असल्यास नवल नाही.[२]

शिवाय त्या लेखात म्हटले आहे की खारवेलाने सातकर्णीला न जुमानता आपली सेना पश्चिमेस पाठविली. त्या काळात विदर्भ व खानदेश सातवाहनवंशी सातकर्णीच्या राज्यात सामील होते, म्हणून हे वर्णन यथार्थ आहे. पण मस्की ज्या कृष्णा नदीच्या काठी आहे तेथपर्यन्त सातवाहनांची सत्ता त्या काळी पसरली नव्हती. पुढे कित्येक शतकांनी झालेल्या गौतमीपुत्र सातकर्णीच्या काळीही कुन्तल देश (ज्यामध्ये मस्की अन्तर्भूत होते तो) सातवाहनांच्या राज्यात सामील झाला नव्हता हे आम्ही वाटेगाव (सांगली जिल्हा) येथील सातवाहनांच्या नाणकसंचयाच्या परीक्षणावरून दाखविले आहे.[३] गौतमी-

---

१ ए. इं., व्हॉ. २०, पृ. ८३. २ *J. N. S. I.*, II, pp. 83 f.
३ *Ibid.* XXXIV, pp. 205 f.

पुत्राचा पुत्र आणि उत्तराधिकारी प्रथम पुळुमावि याच्या काळी प्रथम सातवाहनांचा अंमल कुंतलावर प्रस्थापित झाला.

खारवेलाचा समकालीन हा सातकर्णि कोण होता? पुराणांत अंध्र (सातवाहन) वंशातील या नावाचे अनेक राजे निर्देशिले आहेत. किंबहुना, आरंभीचे 'सातवाहन' हे वंशनाम प्रचारातून जाऊन त्या जागी 'सातकर्णि' हे रूढ झाले. म्हणून पुढील राजांनी 'सातकर्णी'ला आपल्या स्वतःच्या नावाची किंवा मातृनामदर्शक विशेषणाची जोड देऊन आपला निर्देश केलेला कोरीव लेखांत आढळतो. म्हणून आपणांस नंतरच्या सातवाहनांची नावे 'गौतमीपुत्र सातकर्णि', 'वासिष्ठीपुत्र सातकर्णि', 'चकोर सातकर्णि', 'यज्ञ सातकर्णि', 'विजय सातकर्णि' अशी आढळतात.

खारवेलाचा समकालीन सातकर्णि केव्हा होऊन गेला याविषयी विद्वानांनी भिन्न भिन्न मते प्रदर्शित केली आहेत. काही त्याला ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या आरंभी, तर दुसरे पहिल्या शतकाच्या शेवटी घालतात. त्याचा काल निश्चित करण्याकरिता आपणांस सातवाहन घराणे केव्हा उदयास आले हे पाहिले पाहिजे.

बहुतेक पुराणे अंध्र (म्हणजे सातवाहन) राजांनी ४५६ किंवा ४६० वर्षे राज्य केले असे म्हणतात.[१] त्यांचा अस्त ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास झाला असावा.[२] ह्याविषयी सर्वांचे एकमत आहे. तेव्हा ते सुमारे ख्रिस्तपूर्व २३० मध्ये—अशोकाच्या निधनानंतर लौकरच जेव्हा त्याच्या विशाल साम्राज्याचे तुकडे झाले तेव्हा—उदयास झाले असावे. काही पुराणांत या वंशातील राजांची संख्या ३० अशी दिली आहे, पण काहींत ती अठरा किंवा एकोणीस अशी आढळते. तसेच त्या राजांच्या राज्यकालातही वैविध्य आढळते. तेव्हा हा प्रश्न निश्चितपणे सोडविणे कठीण आहे. पण बहुतकरून हे घराणे अशोकाच्या निधनानंतर ख्रिस्तपूर्व २३० च्या सुमारास उदयास आले असावे असे मानणेच सयुक्तिक होईल. तसे नसल्यास महाराष्ट्राच्या इतिहासात शे-दीडशे वर्षांचे अंधकारयुग मानावे लागेल.

पुराणांत सिमुक (श्रीमुख) हा या वंशातील पहिला राजा होता असे म्हटले आहे. पण दक्षिणेच्या नाशिक, औरंगाबाद, हैदराबाद, अकोला, कोंडापूर येथे सातवाहन राजाची नाणी सापडली आहेत. त्यावरून तो या वंशाचा संस्थापक दिसतो. त्याच्यामुळेच या वंशाला 'सातवाहन' असे नाव प्राप्त झाले

---

१ *D. K. A.*, p. 43.

२ आम्ही मागे (पृ. ४५ वर) दाखविले आहे की ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास पश्चिम महाराष्ट्रात क्षत्रप ईश्वरदत्ताने व विदर्भात मुंड नामक ब्राह्मण वंशाने आपापली राज्ये स्थापिली, आणि दक्षिणेच्या इतर प्रदेशांत इतर राजवंश उदयास आले.

असावे.[१] सिमुकाचा भाऊ कृष्ण ह्याचे नाशिकच्या लेण्यातील लेखात ' सातवाहन-कुलातील राजा ' असे वर्णन आहे.[२] तो सातवाहनाचा पुत्र असता तर तसा निर्देश त्या लेखात केला नसता. म्हणून सातवाहन व सिमुक-कृष्ण यांच्यामध्ये निदान एक पिढी होऊन गेली असावी. तेव्हा सातवाहन आणि या पिढ्या यांनी ख्रिस्तपूर्व २३० ते २०० या कालात राज्य केले असावे.

सिमुक हा सातवाहन सत्तेचा खरा प्रतिष्ठापक होता. नाणेघाट लेखात त्याला ' दक्षिणापथपति ' म्हटले आहे[३] आणि त्याचे सैन्य कधीही पराभव पावले नव्हते असे वर्णन केले आहे. पुराणांत त्याचा राज्यकाल २३ वर्षे असा दिला आहे. त्याच्या निधनाच्या वेळी त्याचा पुत्र सातकर्णि हा अल्पवयस्क असल्यामुळे त्याचा भाऊ कृष्ण हा राज्य करू लागला असे दिसते.[४] त्याने १८ वर्षे राज्य केले. म्हणून या दोन भावांच्या राज्यकालाची बेरीज ४१ वर्षे येते. पुराणांतील राज्यकालांची वर्षे बरोबर असल्यास सातकर्णि (२०० उणे ४१=) सन १५९ मध्ये गादीवर आला असावा. अर्थात् तो खारवेलापेक्षा वयाने थोडा मोठा होता.

हा सातकर्णि बलाढ्य राजा होता. त्यानें अनेक श्रौत यज्ञ केले होते. त्यांपैकी दोन अश्वमेध होते त्यांवरून त्याची सत्ता दक्षिणेत निरंकुश होती असे दिसते.[५] त्याने उत्तरेतही स्वारी केली होती, व विदिशेच्या जवळचा प्रदेश काही काळ आपल्या ताब्यात ठेवला होता. या काळी त्याच्या मुकाद-माने सांचीच्या महास्तूपाजवळ आपला लेख कोरविला होता.[६] त्याच्या राज्यात विदर्भ समाविष्ट होता हे पौनी येथील स्तूपाच्या उत्खननात त्याचे नाणे सापडले आहे[७] यावरून स्पष्ट दिसते. पौनी हे वैनगंगेच्या काठी आहे. या नदीलाच पूर्वी कन्हबेण्णा म्हणत असत. खारवेलाने त्याला न जुमानता कन्हबेण्णापर्यंत आपले चतुरंग सैन्य पाठविले होते असे हाथीगुंफा लेखात म्हटले आहे. त्यावरूनही सातकर्णि हा त्या कालचा एक बलाढ्य राजा होता आणि पौनीपर्यंत त्याची सत्ता पसरली होती. हे स्पष्ट दिसते.

या खेपेस खारवेलाला काही विजय मिळालेला दिसत नाही. नाही तर हाथीगुंफा लेखात त्याचा उल्लेख आला असता. खारवेलाच्या स्वारीची वार्ता

---

१ *J. N. S. I.*, VII, pp. 1 f.; Vol. XI, pp. 22 f.

२ *E. I.*, VIII, p. 95.

३ पाहा—' बीरस सूरस अप्रतिहतचकस दखिनापठ [पतिनो] ' इ. हे वर्णन सिमुक सात-वाहनाचे दिसते.

४ *D. K. A.*, p. 39.

५ नागनिकेचा नाणेघाटातील लेख (क्र. ४), ओळ ११ पाहा.

६ क्रमांक २ पाहा.

७ *J. N. S. I.*, XXXV, pp. 106 f.

कळताच सातकर्णि विदर्भाच्या रक्षणार्थ धावला असावा, आणि त्यामुळे खारवेलाच्या सैन्याला माघार घ्यावी लागली असे दिसते.

नंतर दोन वर्षांनी खारवेलाने पुन: पश्चिमेकडे आक्रमण केले आणि रठिक आणि भोजक यांना आपल्या पुढे नम्र होण्यास लावले. हे सातवाहनांचे मांडलिक असावे. अशोकाच्या लेखांत यांचा उल्लेख येतो. त्यांपैकी कांहींचे सातवाहनांशी वैवाहिक संबंध झाले होते.[१] पुढे मात्र हे दक्षिणेच्या इतिहासात फारसे आढळत नाहीत. हाथीगुंफा लेखातील त्यांचा निर्देश खारवेलाच्या ख्रिस्तपूर्व १५०–१३५ या कालाशी सुसंगत आहे.

### ३. खारवेल आणि यवनराज दिमित यांचे समकालीनत्व

हाथीगुंफा लेखाच्या आठव्या ओळीत पुढील वर्णन आले आहे—

अठमे च वसे महता सेनाय . . . . गोरधगिरिं घातापयिता राजगहं उपपीडयति [।*] एतिना कंमपदानसंनादेन संबितसेनवाहनें विपमुंचितुं मधुरं अपयातो यवनराज[दिमित] . . . [।*]

या उताऱ्यात म्हटले आहे की आपल्या राज्यकालाच्या आठव्या वर्षी खारवेलाने गोरधगिरि (मगधातील बराबर टेकडी) लुटला आणि राजगृहाला भयत्रस्त केले. त्याच्या सैन्याच्या निर्घोषाने त्रस्त होऊन आपली सेना व वाहने टाकून यवनराजा दिमित मथुरेला पळून गेला. या यवनराजाचे नाव हाथीगुंफा लेखात अस्पष्ट झाले आहे; पण अवशिष्ट भागावरून ते दिमितच (डेमेट्रियसच) असावे.[२] हा उल्लेख आम्ही मागे ठरविलेल्या सन १५०–१३५ या खारवेलाच्या काळाला जुळतो काय?

डेमेट्रियस् हा बॅक्ट्रियाचा राजा म्हणून प्रसिद्ध आहे. त्याने भारतावर स्वारी केली होती; पण ती शेवटचा मौर्य राजा बृहद्रथ याच्या काळाच्या शेवटी झाली असे सामान्यत: मानले जाते. त्या स्वारीमुळे झालेल्या गोंधळाचे वर्णन 'गार्गी–संहिते'च्या युगपुराण या भागात यथातथ्य आले आहे. त्यात म्हटले आहे की त्या दुष्ट बलाढ्य यवनांना पाटलिपुत्रातून त्वरेने माघार घ्यावी लागली; कारण त्यांच्या स्वत:च्या देशातच भाऊबंदकीमुळे लढाई सुरू झाली होती.[३] या विधानाचा अन्वयार्थ विद्वानांनी असा लावला आहे की बॅक्ट्रियामध्ये

१ महारठि त्रनकयिर याचा पुतळा नाणेघाटात कोरला होता. तो बहुधा नागनिकेचा पिता असावा. क्र. ७ पाहा.

२ याचे नाव आता अस्पष्ट झाले आहे, पण त्यातील 'म' स्पष्ट आहे. हे नाव पुष्कळ विद्वानांना संमत आहे.

३ *H. C. I. P.*, II, pp. 96-97.

युक्रेटिडिसच्या उठावामुळे डेमेट्रियसला भारतातून परतावे लागले. या संधीचा फायदा घेऊन पुष्यमित्राने ख्रिस्तपूर्व १६४ च्या सुमारास बृहद्रथ मौर्याला ठार मारून मगधाची गादी बळकावली. तेव्हा हाथीगुंफा लेखातील दिमित खारवेलाच्या मगधावरील स्वारीची वार्ता ऐकताच पळून गेला असल्यास ती घटना त्याच्या ख्रिस्तपूर्व १५०–१३५ या काळाशी विसंगत होत नाही काय ?

यावर आमचे उत्तर हे की हाथीगुंफा लेखात उल्लेखिलेला दिमित प्रथम डेमेट्रियस नसून त्याचा पुत्र द्वितीय डेमेट्रियस होय. मॅक्डोनल्ड याने दाखविले आहे की कांही टेट्राद्रम्म आणि द्रम्म नाण्यांवर पुढील बाजूवर एका तरुण पुरुषाची आकृति आणि मागील बाजूवर भाला व ढाल घेतलेली पल्लास अथीनी देवता, आणि सभोवर 'बॅसिलिअस डेमेट्रिओ' ही आढळतात. ती नाणी प्रथम डेमेट्रियसची नसून त्याचा पुत्र द्वितीय डेमेट्रियसची असावी.[१] तो मथुरेच्या परिसरात राज्य करीत असावा. खारवेलाने राजगृहावर आक्रमण केल्याची वार्ता ऐकताच त्याने मगधातून पळ काढून उत्तम तटबंदी असलेल्या मथुरा नगरीत आश्रय घेतला असे दिसते.

तेव्हा हा उल्लेख आम्ही निश्चित केलेल्या खारवेलाच्या ख्रिस्तपूर्व १५०–१३५ या कालाच्या विरुद्ध जात नाही. पण तो उल्लेख खारवेल ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला. या मताला मात्र पूर्णपणे विरोधी आहे. कारण त्या कालात डेमेट्रियस नावाचा यवन राजा मथुरेजवळ राज्य करीत होता याला मुळीच आधार नाही.

## ४. नंदराजाच्या कालव्याचा पुरावा

आता खारवेलाचा हा काल हाथीगुंफा लेखाच्या ओळ ६ मधील एका विधानाला विरोधी आहे काय हे पाहू. तो उतारा असा —[२]

पंचमे च दानी वसे नंदराजतिवससत ओघाटितं तनसुलियवाटा पणाडि नगरं पवेसयति [।*].

या उताऱ्याचा अर्थ विद्वानांनी अनेक प्रकारे केला आहे. सकृद्दर्शनीच त्याचा अर्थ असा दिसतो की आपल्या राज्यकालाच्या पाचव्या वर्षी खारवेलाने पूर्वी नंदराजाने १०३ (किंवा ३००) वर्षांपूर्वी खोदलेला कालवा तनसुलिय मार्गापासून आपल्या राजधानीपर्यंत खोदून आणला.

---

१ *Cambridge History of India*, Vol. I, (1935), p. 452.

२ See Sircar's *Select Inscriptions* ( 1965 ), p. 216, *n. 5*.

डॉ. शशिकान्त यांनी अलीकडे प्रकाशित केलेल्या हाथीगुंफा लेखावरील आपल्या ग्रंथात असे म्हटले आहे की तो कालवा नन्द राजाने महावीर तीर्थंकरांच्या ख्रिस्तपूर्व ५२७ या वर्षी सुरू झालेल्या संवताच्या १०३ या वर्षी (म्हणजे ख्रिस्तपूर्व ५२७ उणे १०३ = ४२४ या वर्षी) खोदला होता.[१] वरील उताऱ्याचा हा अर्थ स्वीकारल्यास त्याचा आम्ही निश्चित केलेल्या खारवेलाच्या कालाला मुळीच विरोध येत नाही. पण महावीर तीर्थंकरांचा असा एखादा संवत् होता याला प्रमाण नाही. म्हणून काही विद्वानांचे म्हणणे असे की तो कालवा नन्द राजांच्या संवताच्या १०३ या वर्षी खोदला असावा. असा नन्द संवत् उत्तर चालुक्यवंशी षष्ठ विक्रमादित्याच्या येडरवे येथील लेखात उल्लेखिला आहे.[२] अल्वेरूनीही ख्रिस्तपूर्व ४५८ या वर्षी सुरू झालेल्या एका संवताचा उल्लेख करतो,[३] तो हा नन्दसंवत् असावा. तेव्हा त्या संवताचे १०३ हे वर्ष ख्रिस्तपूर्व ३५५ असे होईल. ते आम्ही ठरविलेल्या खारवेलाच्या कालाला विरोधी नाही. जैन परंपरेप्रमाणे महावीरानंतर ६० वर्षांनी नन्द वंशाचा उदय झाला आणि त्या वंशाचे राज्य १५५ किंवा १५० वर्षे टिकले. तेव्हा एखाद्या नन्द राजाने आपल्या वंशाच्या १०३ या वर्षी असा कालवा खोदला असणे सुतराम् शक्य आहे. वरील उताऱ्याचा हा अर्थ स्वीकारल्यास कोणतीच आपत्ति येत नाही.

कांही विद्वानांचे असे मत आहे की नन्द वंश ख्रिस्तपूर्व ३६४ या वर्षी उदयास आला. त्यांचे राज्य कलिंग देशापर्यंत पसरले होते यात संशय नाही. त्यांचा संवत् तेथे चालू असावा. तसे नसते तर त्या संवताच्या नक्की १०३ या वर्षाचा उल्लेख हाथीगुंफा लेखात आला नसता. हे विद्वान् म्हणतात त्याप्रमाणे नन्द वंशाचा उदय ख्रिस्तपूर्व ३६४ या वर्षी झाला आणि ख्रिस्तपूर्व ३२४ मध्ये चंद्रगुप्त मौर्याने त्यांचा उच्छेद केला तोपर्यंत ४० वर्षे त्यांचे राज्य टिकले हे स्वीकारले तरी प्रस्तुत उताऱ्यातील विधानाला मुळीच बाधा येत नाही. कारण त्यांत तो कालवा नन्दसंवताच्या १०३ या वर्षी खोदला एवढेच म्हटले आहे, तो कोणी खोदला हे सांगितले नाही. या मताप्रमाणे हे वर्ष ख्रिस्तपूर्व २६१ असे येते व ते अशोकाच्या ख्रिस्तपूर्व २७४ ते २३६ या राज्यकालात पडते. आपल्या साम्राज्यांतील दूरदूरच्या प्रदेशांतही अशी सार्वजनिक हिताची पूर्त कर्मे करण्याची मौर्यवंशाची राजनीति होती हे गिरनार येथील लेखात चंद्रगुप्त मौर्याच्या कारकीर्दीत निर्माण केलेल्या सुदर्शन तलावाच्या उल्लेखावरून सिद्ध झाले

---

१ See *Hāthīgumphā Inscription of Khāravela*, p. 34.

२ *See* the Yeḍarave inscription of Chālukya Vikramāditya (*Bom. Gaz.*, Vol. I, part ii, p. 437.)

३ Sachau, II, pp. 4-7.

आहे.[१] तेव्हा ख्रिस्तपूर्व २६१ या वर्षी अशोकानें कलिंगातला हा कालवा खोदला असला तर त्यात आश्चर्य नाही.

पण यावर असा आक्षेप संभवतो की असा नंदराज संवत् त्या काळी प्रचलित होता याला प्रमाण नाही. हा आक्षेप मान्य केल्यास 'नन्द राजाने तीनशे वर्षांपूर्वी खोदलेला कालवा' असा अर्थ करावा. हा काल अर्थातच अदमासाने सांगितलेला आहे. तो 'सुमारे तीन शतकांपूर्वी' या अर्थी घेतला पाहिजे. कारण खारवेलाने तो कालवा काही त्याच्या 'त्रिशतसांवत्सरिक उत्सवा'त खोदला नव्हता. नंद वंश ख्रिस्तपूर्व ३६४ या वर्षी उदयास आला असे मानले तरी त्यानें खोदलेला कालवा खारवेलाच्या ख्रिस्तपूर्व १५०–१३५ या कालाच्या पूर्वीच्या तिसऱ्या शतकातच निर्माण झाला होता. म्हणून हाथीगुंफा येथील त्या कालव्याविषयीच्या विधानाला बाध येऊ शकत नाही.[२]

तेव्हा पूर्वोक्त विधानाचा पुरावा, त्याचा कशाही रीतीनें अर्थ लावला तरी, तो आम्ही निश्चित केलेल्या ख्रिस्तपूर्व १५०–१३५ या खारवेलाच्या कालाला बाधक होत नाही हे स्पष्ट आहे.

---

१ *E. I.*, Vol. VI, pp. 1 f.

२ 'तिवससत' हे अगदी वाच्यार्थाने घ्यावयाचे नाही. तो कालवा काही 'त्रिशताब्दी-समारोहात' खारवेलाने आपल्या नगरात आणला नव्हता. त्याचा अर्थ इतकाच की तो कालवा पूर्वी खणल्याला दोन शतकांपेक्षा अधिक काळ झाला होता.

परिशिष्ट दुसरे

# नहपानाच्या लेखांतील संवत्

## नहपानकालीन लेखांतील वर्षे कोणत्या संवताची ?

उत्तर महाराष्ट्र, कोंकण, गुजराथ, माळवा, मध्य आणि दक्षिण राजपुतान या विशाल प्रदेशांवर राज्य करणाऱ्या नहपानाच्या कालाविषयी विविध मते व्यक्त झाली आहेत. रॅप्सनच्या मतानुसार त्याच्या लेखांत उल्लेखिलेली ४१ ४२, ४५ व ४६ ही वर्षे शक संवताची असावी. म्हणून तो ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादात झाला असावा. त्यानंतर चष्टन व रुद्रदामन् यांच ५२ व्या वर्षाचा लेख कच्छमध्ये अन्धौ गावामध्ये सापडला तेव्हा कांही विद्वानांनी रॅप्सनच्या मतावर जोरदार आक्षेप घेतला. त्यांचे म्हणणे असे की चष्टनाच्या लेखातील ५२ हे वर्ष शक संवताचे, यात संशय नाही; कारण त्याच्या सर्व वंशजांच्या लेखांत व नाण्यांवर त्याच संवताची वर्षे उल्लेखिली आहेत हे सर्वमान्य आहे. पण नहपानाच्या काळाची पूर्वोक्त वर्षे त्याच (शक) संवताची मानल्यास पुढील घटना (४६ ते ५२ या) सहा वर्षांच्या अवधीत घडल्या असे मानावे लागेल—(१) नहपानाच्या राजवटीची समाप्ति; (२) क्षहरातांचा समूळ उच्छेद; (३) चष्टनाचे राज्यारोहण, त्याची प्रथम क्षत्रप म्हणून, आणि नंतर महाक्षत्रप म्हणून कारकीर्द; (४) त्याचा पुत्र जयदामन् याची क्षत्रप म्हणून कारकीर्द; आणि (५) त्याचा पुत्र रुद्रदामन् याची क्षत्रप म्हणून कारकीर्द इतक्या घटना सहा वर्षांच्या अल्पावधीत घडल्या असणे असंभवनीय आहे तेव्हा नहपानाच्या लेखांतील वर्षे ख्रिस्तपूर्व ५८ या वर्षी सुरू होणाऱ्या विक्रम-संवताची मानावी, म्हणजे पूर्वोक्त पांच घटनांना पुरेसा अवधि मिळेल. या आक्षेपाला विशेष तथ्य नव्हते; कारण चष्टन हा नहपानाच्या नंतर क्षत्रप म्हणून नियुक्त केला गेला असे मानण्यास प्रमाण नाही. नहपान महाराष्ट्र कोंकण, गुजराथ, मध्यप्रदेश इत्यादींवर राज्य करीत असता चष्टन कच्छ-काठेवाडात त्याच काळी सत्ता गाजवीत असणे अशक्य नाही. दुसरे असे की, त्या काळी विक्रम संवताचा प्रचार महाराष्ट्र, कोंकण, गुजराथ वगैरे प्रदेशांत होता असे दिसत नाही. त्यानंतर कित्येक शतकांनी त्या प्रदेशांत विक्रम संवताचा प्रवेश झाला. तेव्हा नहपानाच्या लेखातील वर्षे विक्रम संवताची असणे संभवनीय नाही।

डॉ. अ. स. अळतेकरांनी निराळेच मत मांडले होते.[१] त्यांच्या मते नहपानाच्या लेखांतील ४१ ते ४६ ही वर्षे कोणत्याही संवताची नसून त्याच्या

---

१ *P. I. H. C.*, XIII, pp. 35 f.

स्वतःच्या कारकीर्दीची आहेत. नहपान ख्रिस्तोत्तर ५५ ते १०५ या काळात होऊन गेला असावा. या मताच्या पुष्टयर्थ त्यांनी खालीलप्रमाणे मते मांडली होती :—

(१) क्रमांक ३८ च्या नाशिक लेखात कार्षापण आणि सुवर्ण या दोन्ही नाण्यांचा उल्लेख आहे. त्यांतील कार्षापण ही नहपानाची चांदीची नाणी होत. सुवर्ण नाणी भारतात वीम कडफीसस या कुषाण वंशातील दुसऱ्या क्रमांकाच्या राजाने प्रथम पाडली. म्हणून सुवर्ण नाण्यांचे उल्लेख असलेला नहपानाचा लेख ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातला असणे शक्य नाही. अर्थात् त्याच्या लेखातील ४१ ते ४६ ही वर्षे विक्रम संवताची असणे अशक्य आहे. नहपान ख्रिस्तोत्तर ५५ ते १०५ या कालात होऊन गेला असल्यास सुवर्ण नाण्यांचे उल्लेख ठीक जमतात.

(२) पेरिप्लस या ग्रीक ग्रंथात अरिआके (अपरान्त किंवा उत्तर कोंकण) नम्बानसच्या अंमलाखाली होते आणि त्याची राजधानी मिन्नगर येथे होती असे म्हटले आहे. नम्बानस म्हणजे नहपान होय. पेरिप्लस ग्रंथ ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या द्वितीय पादात लिहिला गेला. त्या काळी उत्तर कोंकणातील नहपानाच्या लेखात पूर्वोक्त वर्षे विक्रम संवताची असणे शक्य नाही. नहपान ख्रिस्तोत्तर ५५ ते १०५ या काळात झाला असल्यास मात्र हे उल्लेख बरोबर जुळतील.

(३) भूमक आणि नहपान या दोघांच्याही नाण्यांवर वज्र आणि धनुष्य यांच्या आकृति आढळतात. त्या त्यांनी स्पॅलिरीसेस आणि द्वितीय आझेस या शक राजांच्या नाण्यांवरून उचलल्या असाव्या. हे राजे भूमक – नहपानांपूर्वी २५–३० वर्षेच होऊन गेले होते. तेव्हा हे अनुमान अगदी संभवनीय आहे.

(४) टॉलेमी (ख्रिस्तोत्तर १४०) हा आपल्या ग्रंथात सांगतो की, दक्षिणेतील प्रतिष्ठानचा पुळुमावि आणि उज्जैनीचा चष्टन हे समकालीन आहेत. चष्टन हा अन्धौ येथील लेखांवरून शक संवत् ५२ (ख्रिस्तोत्तर १३०) मध्ये राज्य करीत होता. आम्ही सुचविलेला ख्रिस्तोत्तर ५५ ते १०५ हा काळ नहपानाचा मानल्यास त्याचा उच्छेदकर्ता गौतमीपुत्र सातकर्णि हा त्यानंतर निदान सहा वर्षे व त्याच्यानंतर त्याचा पुत्र पुळुमावि निदान २४ वर्षे – म्हणजे ख्रिस्तोत्तर १११ + २४ = १३५ पर्यंत राज्य करीत असावा. अर्थात् तो ख्रिस्तोत्तर १४० च्या सुमारास दक्षिणापथात प्रतिष्ठान येथे राज्य करीत असणे सुसंभाव्य आहे. पुराणांत तर त्याची कारकीर्द २८ वर्षांची दिली आहे. ती मानल्यास मुळीच अडचण येत नाही.

(५) जुनागड येथील (क्र. ५१ च्या) लेखात रुद्रदामन्‌विषयी असे म्हटले आहे की, त्याने दक्षिणापथपति सातकर्णीचा दोनदा सरळ युद्धात पराजय केला होता, पण त्याच्याशी जवळचे नाते असल्यामुळे त्याने त्या सातकर्णीचा समूळ उच्छेद मात्र केला नाही. हा सातकर्णि पुराणातील शिवस्कन्द सातकर्णि

असावा. त्याने सुमारे ख्रिस्तोत्तर १४५ ते १५२ पर्यंत राज्य केले असावे. तो रुद्रदामन्चा जावई वासिष्ठीपुत्र सातकर्णि याचा पुत्र आणि उत्तराधिकारी असावा. हा स्कन्द सातकर्णि वासिष्ठीपुत्राच्या (रुद्रदामन्च्या कन्येहून भिन्न अशा) दुसऱ्या राणीपासून झाला असावा. म्हणून रुद्रदामन्ने त्याचा पराजय केल्यावर त्याला ठार केले नाही. तेव्हा रुद्रदामन्च्या लेखातील सर्व वर्णन सुसंगत आहे.

याप्रमाणे नहपानाच्या लेखांतील वर्षांविषयी पुढील तीन मते प्रचलित आहेत—(१) ती वर्षे शक संवताची असावी; (२) ती विक्रम संवताची असावी ; आणि (३) ती नहपानाच्या कारकीर्दीची असावी. यातील खरा पक्ष कोणता हे निश्चित झाल्याशिवाय सातवाहन–क्षत्रप राजवटींतील घटना नीट समजणार नाहीत. म्हणून या समस्येला फार महत्त्व आहे.

आम्ही ही समस्या एका अभिनव पद्धतीने सोडवून दाखवितो. त्याकरिता नहपानकालीन लेखांतील कालनिर्देश कसे केले आहेत हे सूक्ष्मपणे पाहिले पाहिजे—

(१) भारतातील कालनिर्देशाची प्राचीन पद्धति कारकीर्दीचे वर्ष उल्लेखून करण्याची होती. तीत कोणत्याही संवताचा उल्लेख नसे ; कारण अत्यंत प्राचीन काळी भारतात संवत् मुळी प्रचारातच नव्हते. हे निर्देश पुढील प्रकारे असत—

**(अ) लेखाच्या आरंभी राजनामाशी संलग्न असा कारकीर्दीच्या संवत्सराचा उल्लेख करून.**—यात क्वचित् 'वैजयिक' असे वर्षाचे विशेषण योजिले जात असे—

खालील उदाहरणे पाहा—

(१) नाशिक येथील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख (क्र. १८)—

रञो वासिठीपुतस सिरि पुळुमाविस सवछरे एकुनवीसे १०[+*] ९ गिम्हाण पखे वितिये २ दिवसे तेरसे १०[+*]३.

(२) अडोणी येथील [तृतीय] पुळुमावीचा प्रस्तर लेख (क्र. ३४)—

रञो सातवाहनानां सिरि पुळुमाविस सव ८ हेम २ दिव १.

(३) कानाखेडा येथील श्रीधरवर्म्याचा लेख (कॉ. इ. इं., व्हॉ. ४, पृ. १३)—

शकनन्दपुत्रेण महादण्डनायकेन श्रीधरवर्मणा . . . वैजयिके संवत्सरे त्रयोदशमे श्रावणवहुलस्य दशमीपूर्वकम् ।

**किंवा**

**(ब) लेखात अगोदरच राजनाम आले असल्यास, लेखाच्या शेवटी राजनामविरहित संवत्सराचा उल्लेख करून—**

खालील उदाहरण पाहा –

(१) नाशिक येथील गौतमीपुत्र सातकर्णीचा लेख (क्र. ११) —
सवछरे १०[+*]८ वासपखे २ दिवसे २.

(२) वाशिम येथील द्वितीय विन्ध्यशक्तीचा ताम्रपट (वाकाटक नृपति इ. पृ. ३३७) साव्वछरं ३०[+*]७ हेमंतपक्खं पढमं दिवस ४.

(३) मयिदवोलु येथील शिवस्कन्दवर्मन्‌चा लेख (ए. इं., व्हॉ. ६, पृ. ८६)–
संवछरं दसमं १० गिम्हपखो छठो ६ दिवसं पंचमं ५.

**(२) एखाद्या संवताच्या संवत्सराचा निर्देश करून** — जेव्हा एखाद्या निर्दिष्ट वा अनिर्दिष्ट संवताच्या संवत्सराचा उल्लेख करावयाचा असे तेव्हा तो पुढीलपैकी एका प्रकाराने केला जात असे —

**(अ) उत्तरकालीन लेखांतल्याप्रमाणे — आरंभी निर्देश करून** —
खालील उदाहरणे पाहा —

(१) तक्षशिला येथील पातिकाचा लेख (कॉ. इ. इं., व्हॉ. २, भाग १, पृ. २८) —
संवत्सरस्य अठसततमए २० [+*] २० [+*] २० [+*]१०[+*] ४ [+*] ४.

(२) पंजतार येथील कुषाण राजाचा शिलालेख (पूर्वोक्त, व्हॉ. २, भाग १, पृ. ७०) —
सं १ [×]१००[+*]२०[+*]१[+*] १ श्रवणस मसस दि पढमे १.

(३) मथुरेतील हुविष्काचा लेख [ए. इं., व्हॉ. २१, पृ. ५० इ.]
संवछरे २०[+*] ८ गुर्प्पिये दिवसे १.

**किंवा**

**(ब) तत्कालीन राजाचा नामोल्लेख करून त्याशी संलग्न असा संवत्सर – निर्देश करून** — खालील उदाहरणे पाहा —

(१) अन्धौ येथील चष्टन व रुद्रदामन् यांचा लेख (क्र. ४६).
राज्ञो चाष्टनस य्सामोतिकपुत्रस राज्ञो रुद्रदामस जयदामपुत्रस वर्षे द्विपंचाशे ५० [+*]२ फगुण बहुलस द्वितीय वा २.

(२) जुनागड येथील रुद्रदामन्‌चा प्रस्तर – लेख (क्र. ५१).
रुद्रदाम्नो वर्षे द्विसप्ततितमे ७० [+*]२ मार्गशीर्ष – बहुल – प्रतिपदि.

आतापर्यंत प्राचीन कालच्या लेखांतील विविध प्रकारच्या कालनिर्देशांच्या पद्धति आपण पाहिल्या. आता नहपानकालीन लेखांत कालनिर्देश कसे केले आहेत ते पाहा —

(१) लेखाच्या आरंभी, राजाच्या नावाशी संलग्न न करता —
नाशिक येथील लेख (क्र. ३८) – वसे ४० [+*]२ वेसाख – मासे.

(२) जरूर पडल्यास लेखाच्या मध्यात–पूर्वोक्त स्थळी–दतं कातिक शुधे पनरस पुवाक वसे ४० [+*]५.

(३) लेखाच्या शेवटी––

जुन्नर येथील लेख (क्र. ४४)–वसे ४० [+*]६.

वरील तीन पद्धतींपैकी दुसरी आणि तिसरी पद्धत कारकीर्दीच्या वर्षांच्या तसेच संवतांच्या वर्षांच्या निर्देशांत योजिलेली आढळते. त्यामुळे त्यांवरून ती वर्षे कारकीर्दीची किंवा एखाद्या संवताची याविषयी काहीही अनुमान करता येत नाही. पण **पहिली पद्धत मात्र संवताच्या वर्षांच्या निर्देशांतच आढळते.** म्हणून त्या पद्धतीने निर्देशिलेले वर्ष कारकीर्दीचे असणे शक्य नाही, ते एखाद्या संवताचेच असले पाहिजे असे अनुमान बिनधोक करता येते. तेव्हा क्र. ३८ च्या नाशिक येथील नहपानाच्या लेखातील ४२ हे वर्ष एखाद्या संवताचेच असले पाहिजे, ते नहपानाच्या कारकीर्दीचे नव्हे याविषयी संशय राहत नाही.

हा संवत् विक्रमसंवत् असणे शक्य नाही. कारण ख्रिस्ती शकाच्या पूर्वीच्या आणि नंतरच्याही चार-पाच शतकांत विक्रमसंवताचे लेख महाराष्ट्र, गुजराथ, मध्यभारत वगैरे ठिकाणी सापडले नाहीत. दुसरा संभाव्य संवत् तथाकथित शक संवत् होय. तो कनिष्काने सुरू केला होता हे मत आता सर्वमान्य होत आहे. चष्टन, भूमक, नहपान हे सर्व कुषाण सम्राटांचे क्षत्रप किंवा प्रांताधिपति होते. त्यांनी कुषाणांच्या संवताचा उपयोग करावा हे साहजिक आहे. तेव्हा जशी चष्टनादि पश्चिमेच्या क्षत्रपांच्या लेखांतील वर्षे कुषाण संवताची तशीच नहपानाच्या लेखांतील वर्षे त्याच संवताची असली पाहिजेत.

नहपानकालीन लेखातील वर्षे शक संवताची आहेत याचे एक अकाट्य प्रमाण हे की त्या सर्वांत कालनिर्देश करताना 'वर्ष' या शब्दाचा उपयोग केला आहे. कीलहॉर्नने दाखविले आहे की कोंकण, महाराष्ट्र, गुजराथ, काठेवाड वगैरे प्रदेशातील आरंभीच्या शकसंवताच्या **सर्व** मित्यांत '**वर्ष**' या शब्दाचाच उपयोग केला आहे. याला एकही अपवाद नाही.[१] याच्या उलट सातवाहनांच्या सर्व लेखांत त्याकरिता '**संवत्सर**' हाच शब्द योजलेला आढळतो. तेव्हा या प्रमाणावरूनही नहपानाच्या लेखातील वर्षे शक संवताची आहेत यात संशय नाही.

याशिवाय ही समस्या सोडविण्याचे आणखीही एक गमक आहे. ते हे की पूर्वोक्त मत स्वीकारल्यास शक संवताचा प्रसार दक्षिण भारतात कसा झाला याचीही समाधानकारक उपपत्ति लावता येते.

---

१ *I. A.*, XXVI, p. 153.

नहपानानें आपल्या लेखांत शक संवताचा उपयोग कालनिर्देशाकरिता केला असल्यास त्याच्या वंशजांनीही त्याचे अनुकरण केले असले पाहिजे हे उघड आहे. आम्ही इतरत्र[१] दाखविले आहे की गौतमीपुत्राने नहपानाचा उच्छेद केल्यावर त्या क्षहरात कुळातील काही लोक दक्षिणेत निसटले असावे. त्यांपैकी मान नामक एका शूर पुरुषाने दक्षिणेत (कुन्तल देशात) आपले राज्य स्थापले असे त्याच्या अलीकडे सापडलेल्या नाण्यांवरून स्पष्ट दिसते. नहपानाच्या नाण्यांवरीलप्रमाणे त्याच्या नाण्यांवर वज्र आणि खाली टोक केलेला बाण ही चिन्हे आहेत.[२] नाणकशास्त्रात ही चिन्हे केवळ क्षहरात वंशाचीच म्हणून ज्ञात आहेत. तेव्हा अशी नाणी पाडणारे मान व त्याचे वंशज हे क्षहरातवंशी होते यात संशय नाही. मान प्रथम सातवाहनांचा मांडलिक म्हणून राज्य करीत होता. त्याने महासेनापति ही पदवी आपल्या काही नाण्यांवर घातली आहे, पण पुढे तो स्वतंत्र झाला असावा; कारण त्याच्या इतर कांही नाण्यांवर त्याची राजन् ही पदवी स्पष्ट आहे. तो आपणास शक म्हणवतो. त्या काळात तो बराच बलाढ्य झाला असावा. कारण त्याचा उल्लेख महिषांचा (माहिषक देशाचा) अधिपति म्हणून पुराणांत आला आहे. हा माहिषक देश म्हणजे पूर्वीच्या हैदराबाद संस्थानाचा दक्षिण भाग होय हे आम्ही पूर्वीच दाखविले होते ते अलीकडे सापडलेल्या गूंटुपल्ली लेखांवरून[३] सिद्ध झाले आहे.

या मान राजाचे व त्याच्या वंशजांचे कोरीव लेख सापडले नाहीत. तथापि ते शकवंशी असल्यामुळे त्यांनी त्यांमध्ये कालनिर्देशार्थ शक संवताचाच उपयोग केला असावा. या प्रदेशात तो संवत् दीर्घकाल चालू असल्यामुळे साहजिकच कुन्तल देशात नंतर उदयास आलेल्या बादामीच्या चालुक्यांनीही आपल्या लेखांत त्याच संवताचा उपयोग केला असावा. उत्तरेतील शक संवताचा दक्षिणेत प्रसार कसा झाला याची हीच समाधानकारक उपपत्ति होय. तिजवरून नहपानाच्या लेखातही शक संवताचाच उपयोग केला असला पाहिजे हे निष्पन्न होते.

आता आपण या मतावर जे आक्षेप घेतले जातात त्यांचे परीक्षण करू.

**आक्षेप पहिला** — नहपानकालीन लेखांतील वर्षे शक संवताची मानल्यास त्याच्या उच्छेदानंतर चष्टन व रुद्रदामन् यांच्या संयुक्त राजवटीच्या प्रतिष्ठापनेला पुरेसा अवधि मिळत नाही.

**परीक्षण** — या आक्षेपात काही तथ्य नाही हे आम्ही पूर्वीही दाखविले होते. त्यानंतर आता चष्टनाच्या काळचे शक संवत् ६ व ११ चे लेख कच्छ

---

१ मागे, पृ. [४०].

२ 'सातवाहनांची व क्षत्रपांची नाणी' प्रकरण पाहा.

३ *Andhra Epigraphical Series*, No. 3 पाहा. *Oriental Journal*, *XIX*, pp. 53–60.

जिल्ह्यात सापडले आहेत (क्र. ४५ व ६३). त्यांवरून हा आक्षेप पूर्णपणे निर्मूल ठरला आहे. कनिष्काने चष्टनाला शक संवत् ६ पूर्वीच कच्छ येथे आपला क्षत्रप म्हणून पाठविले होते. त्याने भूमकाला तसेच गुजराथ व मध्य भारत यांवर नेमले असावे. तेव्हा चष्टन हा भूमक व नहपान यांच्या नंतर क्षत्रप झाला नसून त्यांच्या पूर्वीच त्याची नियुक्ति झाली होती हे सुस्पष्ट आहे. तेव्हा या आक्षेपात काही तथ्य नाही.

**आक्षेप दुसरा**—वरील मताप्रमाणे नहपानाचा उच्छेद शक संवत् ४६ (सन १२४) नंतर झाला असावा. तो अगदी त्याच वर्षी झाला असे मानले तरी त्यानंतर गौतमीपुत्र सातकर्णि निदान सहा वर्षे (सन १३० पर्यंत) जिवंत होता आणि त्या अवधीत त्याने दक्षिण भारतातील काही प्रदेश आणि उत्तर भारतातील सुराष्ट्र, आकरावन्ती, कुकुर वगैरे देश जिंकले होते. नंतर पुळुमावि गादीवर आला. त्याच्या एकोणिसाव्या वर्षीच्या (सु. सन १४९ मधील) लेखात गौतमीपुत्राच्या या देशांवरील आधिपत्याचा उल्लेख आहे. पण त्याच काळच्या शक संवत् ७२ (=सन १५० च्या) जुनागड लेखात ते प्रदेश रुद्रदामन्च्या साम्राज्यात अंतर्भूत होते असे म्हटले आहे, हे कसे? सन १४९ मध्ये ते प्रदेश पुळुमावीच्या हातून गेले होते असे मानल्यास गौतमी बलश्रीने आपल्या पुत्राच्या वर्णनात त्यांचा निर्देश केला असता काय? रुद्रदामन्ने पुळुमावीचा पराजय करून हे प्रदेश जिंकले होते असे मानण्यास यत्किंचितही पुरावा नाही. त्याने ते त्याच्या उत्तराधिकाऱ्याकडून घेतले असावे. तेव्हा गौतमीपुत्राने सन १२४ पूर्वीच नहपानाचा पराभव केला असावा. अर्थात् नहपानाच्या लेखातील वर्षे शक संवताची नव्हत.

**परीक्षण**—गौतमीपुत्राने सुराष्ट्र, आकरावन्ती वगैरे प्रदेश सन १३० पर्यंत जिंकून घेतले होते यात संशय नाही. कारण गौतमी बलश्रीने केलेल्या त्याच्या वर्णनात त्याचा त्या देशांवरच्या आधिपत्याचा उल्लेख आहे. कदाचित् या काळात चष्टनाने आपली नात (रुद्रदामन्ची मुलगी) गौतमीपुत्राचा पुत्र वासिष्ठीपुत्र सातकर्णि यास दिली असावी. गौतमीपुत्राच्या निधनानंतर चष्टनाने नर्मदेच्या उत्तरेचे प्रदेश पुळुमावीचा पराजय करून परत मिळविलेले दिसतात. कारण टॉलेमी सांगतो की सन १४० मध्ये चष्टन उज्जैनी येथे आणि पुळुमावि प्रतिष्ठान येथे राज्य करीत होता. असे असले तरी पुळुमावीच्या १९ व्या वर्षीच्या (सु. सन १४९ च्या) लेखात गौतमीपुत्र सातकर्णीच्या उत्तर भारतातील विजयांचा उल्लेख येणे असंभवनीय नाही. कारण ती त्या काळची वस्तुस्थिति होती. पुढे पुळुमावीने उत्तरेतील प्रदेशांचा लोभ सोडून दक्षिणेतच आपल्या साम्राज्याचा विस्तार करण्याचे ठरविले असे दिसते. नंतर त्याने कुन्तल देश जिंकला हे क्र. २२ च्या लेखावरून सुस्पष्ट आहे. तेव्हा त्याने 'दक्षिणापथेश्वर'

अशी पदवी धारण केली. तिचा उल्लेख त्याच्या सु. सन १४९ च्या लेखात आला आहे. रुद्रदामन्‌नेही त्याच्या त्या पदवीचा उल्लेख आपल्या शक संवत् ७२ (सन १५०) च्या जुनागड लेखात 'दक्षिणापथपति' असाच केला आहे हे पुढे दाखविले आहे. तेव्हा या मतात कोणतीही आपत्ति नाही.

**आक्षेप तिसरा** — वरील उपपत्ति स्वीकारल्यास रुद्रदामन्‌ने सातकर्णीचा पराजय केला नसून पुळुमावीचा केला असे मानावे लागेल. ते रुद्रदामन्‌च्या जुनागड लेखातील विधानाविरुद्ध जाईल. तेव्हा नहपानाच्या लेखांतील वर्षे शक संवताची असणे शक्य नाही.

**परीक्षण** — यात कोणतीही विसंगति नाही. गौतमीपुत्राच्या निधनानंतर चष्टनाने आपला शूर नातू रुद्रदामन् याच्या साहाय्याने पुळुमावीचा पराजय करून सुराष्ट्र, आकरावन्ती इत्यादि देश परत मिळविले होते हे आपण मागे पाहिले. नंतर रुद्रदामन्‌ने त्याचा पराजय करून कोंकणही जिंकून घेतले असावे. हा पुळुमावीचा दुसरा पराजय. (पुढे ते त्याने आपला जावई वासिष्ठीपुत्र सातकर्णीला दिलेले दिसते. क्र. २५ पाहा.) अशा रीतीने रुद्रदामन्‌ने पुळुमावीचा दोनदा पराजय केला तरी तो आपल्या जावयाचा वडील भाऊ म्हणून त्याने त्याचा उच्छेद केला नाही असे जुनागड लेखात म्हटले आहे. त्यात त्याचा निर्देश 'सातकर्णि' असा केला आहे, याचे कारण हे की प्रथम सातकर्णीनंतर हे घराणे 'सातवाहन' नावाने प्रसिद्ध नसून 'सातकर्णि' या नावानेच विख्यात होते. म्हणून त्यातील अनेकांनी मृगेन्द्र सातकर्णि, कुन्तल सातकर्णि, सुंदर सातकर्णि, चकोर सातकर्णि, गौतमीपुत्र सातकर्णि, वासिष्ठीपुत्र सातकर्णि, स्कन्द सातकर्णि, कुम्भ सातकर्णि, यज्ञ सातकर्णि, कर्ण सातकर्णि, कौशिकीपुत्र सातकर्णि इत्यादि नावे धारण केली होती. तेव्हा रुद्रदामन्‌ने पुळुमावीचा उल्लेख सातकर्णि असा केला असला तर नवल नाही. त्या सातकर्णीला त्याने 'दक्षिणापथपति' असे म्हटले आहे. हीच पदवी पुळुमावीने धारण केली होती हे क्र. १८ च्या लेखात म्हटले आहे. दुसऱ्या कोणी ही पदवी त्या कालात धारण केल्याचा उल्लेख नाही.

**आक्षेप चौथा** — 'पेरिप्लस' (सु. ख्रिस्तोत्तर ८०) मध्ये म्हटले आहे की, अरिआके (अपरान्त) हा देश नम्बानुस याच्या अमलाखाली होता आणि त्याची राजधानी मिन्नगर होती. नम्बानुस हा नहपान असावा असा काहीचा तर्क आहे. हा उल्लेख वरील मताच्या विरुद्ध जातो.

**परीक्षण** — 'पेरिप्लस' मधील नाव 'मोंबारुस' असे आहे. ते नहपानाचे असू शकत नाही. त्याने कोण विवक्षित होता हे सांगता येत नाही. तेव्हा या आक्षेपात काही तथ्य नाही. याविषयी अधिक विवेचन मागे पृ. [५५-५६] वर पाहा.

शिवाय नहपानकालीन लेखातील वर्षे त्याच्या कारकीर्दीची मानण्यात एक मोठी अडचण आहे. भूमक आणि नहपान हे दोघेही क्षत्रप किंवा प्रांताधिपति होते. भूमक हा नहपानापूर्वी होऊन गेला हे सर्वसंमत आहे. नहपानाने निदान ४६ वर्षे राज्य केले असे मानल्यास त्याच्यापूर्वी भूमक निदान १० वर्षे क्षत्रप पदावर होता असे मानावे लागेल. दोघांच्या कारकीर्दीची वर्षे निदान ५६ होतात. ते अर्थातच कोणा कुषाण राजाचे क्षत्रप असावे. तो कुषाण सम्राट् कुजूलकडफीससच असणे शक्य आहे. पण त्याचे राज्य गुजराथ, महाराष्ट्र इत्यादि प्रदेशांवर पसरले होते असे मानण्यास काही प्रमाण आहे काय ? कुषाणांची सत्ता कनिष्काच्या काळी दक्षिणेत पसरलेली दिसते. त्यापूर्वीच्या त्यांच्या दक्षिणेतील आधिपत्याची चिन्हे अद्यापपर्यंत तरी मिळाली नाहीत.

शिवाय नहपानाने ४६ वर्षे इतके दीर्घ काल महाराष्ट्र, गुजराथ, मध्य-भारत, सुराष्ट्र इत्यादि प्रदेशांवर राज्य केले असल्यास त्याच्या कारकीर्दीच्या ४० व्या वर्षापूर्वीचे लेख मुळीच सापडू नयेत, ते सर्व ४० नंतरचेच असावे हे असंभाव्य वाटते.

तेव्हा 'नहपानाच्या काळच्या लेखातील वर्षे शक संवताची होत' हाच पक्ष तर्कसंगत व उपलब्ध पुराव्याशी जुळणारा आहे.

## परिशिष्ट तिसरे

# शक संवताचा संस्थापक

प्रस्तुत ग्रंथात चष्टनाचे आणि त्याच्या वंशजांचे अनेक लेख व नाणी वर्णिली आहेत. त्यांत उल्लेखिलेली वर्षे शक संवताची आहेत याविषयी सर्व विद्वानांचे ऐकमत्य आहे. पण तो संवत् कोणी सुरू केला याविषयी मात्र विविध मते व्यक्त झाली आहेत. (१) व्होनोनेस, (२) नहपान, (३) चष्टन आणि (४) कनिष्क–यांनी तो संवत् चालू केला अशी चार भिन्न मते याविषयी प्रतिपादिली आहेत. त्यांचा विचार येथे संक्षेपाने करावयाचा आहे.

(१) **पहिले मत – व्होनोनेस हा संस्थापक** — व्होनोनेसने हा संवत् सुरू केला हे मत प्रथम भगवानलाल इंद्रजी यांनी प्रतिपादिले.[१] पुढे त्यांनी आपले मत बदलले तरी देवदत्तपंत भांडारकरांनी त्याचा पाठपुरावा केला.[२] याला प्रमाण एकच. ते हे की हा संवत् शक नावाने ज्ञात आहे आणि त्याच्या आरंभकाळी (सन ७८ मध्ये) व्होनोनेस हाच शकवंशी राजा राज्य करीत होता. पण हे प्रमाण सबळ नाही. इतर अनेक संवतांच्याप्रमाणे या संवताचे नाव आरंभीच्या लेखांत येत नाही. दुसरे असे की व्होनोनेस हा शकवंशी नसून पार्थियन् (पह्लव) होता. पण सर्वात महत्त्वाचा आक्षेप हा की त्याचा अंमल दक्षिणेत गुजराथ, काठेवाड, माळवा येथपर्यंत पसरला होता याला प्रमाण नाही.

(२) **दुसरे मत – नहपान हा संस्थापक** — नहपानाने हा संवत् सुरू केला हेही मत असेच असंभवनीय आहे. नहपान हे नाव इराणी आहे. नहपानाचा जावई ऋषभदत्त याला नाशिकच्या क्र. ४० च्या लेखात शक म्हटले आहे. म्हणून त्यालाही शकवंशी मानले तरी तो क्षत्रप म्हणजे प्रांताधिपति होता. त्याने शक संवतासारखा एखादा संवत् सुरू केला असणे संभवनीय नाही. दुसरे असे की संवत् चालू होण्यास अनेकांनी कांही काळ त्याचा उपयोग केला असला पाहिजे. नहपानाच्या वंशजांनी महाराष्ट्रात राज्य केले नाही. काठेवाड-गुजराथ मधील क्षत्रप त्याचे वंशज किंवा मांडलिक होते याला पुरावा नाही. म्हणून नहपानाच्या काळच्या लेखांत शक संवताचा उपयोग केला आहे असे आम्ही इतरत्र[३] सिद्ध केले असले तरी तो त्या संवताचा संस्थापक असणे शक्य नाही.

---

१ *Bom. Gaz.*, XIV, p. 617.

२ *J. B. B. R. A. S.*, XX (1902), pp. 283 f.

३ परिशिष्ट क्रमांक २ पाहा.

(३) **तिसरे मत – चष्टन हा शक संवताचा संस्थापक** — हे मत प्रथम कनिंग्ह्यामने पुढे मांडले.[१] त्याच्या मते नहपान हा ख्रिस्तपूर्व ५० च्या सुमारास होऊन गेला. गौतमीपुत्र सातकर्णीने त्याचा नव्हे पण त्याच्या वंशजांचा उच्छेद केला. तो सातकर्णि आणि चष्टन हे समकालीन होते. तसेच जयदामन् व पुळुमावि हेही समकालीन होते. तेव्हा चष्टनाने ख्रिस्तोत्तर ७८ मध्ये हा संवत् सुरू केला असावा.

हे मत ग्राह्य वाटत नाही. आता हे सर्वमान्य झाले आहे की गौतमीपुत्र सातकर्णीने खुद्द नहपानाचाच – त्याच्या वंशजांचा नव्हे – उच्छेद केला होता. तेव्हा हे मत सिद्ध करण्यास प्रमाण नाही.

पण नंतर जूव्हो डुब्रुइल याने हे मत हिरीरीने मांडले.[२] त्याच्या मते नहपान हा ख्रिस्ती शकाच्या आरंभी झाला असावा. त्याच्या काळच्या लेखांतील वर्षे शक संवताची नाहीत. चष्टनाच्या वंशजांच्या लेखांतील व नाण्यांवरची वर्षे मात्र शक संवताची आहेत. इतर कोठल्याही लेखांत त्या संवताचा उपयोग केलेला आढळत नाही. तेव्हा ज्याच्या वंशजांनी या संवताचा उपयोग केला तोच त्या संवताचा संस्थापक असला पाहिजे. म्हणून चष्टनानेच हा संवत् चालू केला असावा.

हे प्रमाणही प्रत्ययोत्पादक नाही. चष्टन हाही एक क्षत्रप होता. त्याने एखादा संवत् स्थापला असणे शक्य नाही. त्याने आपल्या सम्राटाचा संवत् आपल्या लेखांत उल्लेखिला असला पाहिजे. त्याच्याशिवाय नहपानाच्या लेखांतही त्याचा उपयोग केला आहे हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. चष्टन हा काही नहपानाचा स्वामी नव्हता. तेव्हा तो त्या संवताचा संस्थापक असणे शक्य नाही.

अलीकडे डॉ. जमीनदार यांनी या मताचा पाठपुरावा विविध प्रमाणांनी केला आहे.[३] त्यांचेही परीक्षण केले पाहिजे. ती प्रमाणे येणेप्रमाणे —

(१) चष्टन व त्याचे वंशज हे शकवंशी होते. हा संवत्ही 'शक संवत्' या नावानेच ज्ञात आहे.

(२) हे पश्चिमेचे क्षत्रप स्वतंत्र होते. ते काही कुषाणांचे मांडलिक नव्हते. त्यांनी हा संवत् चालू केला असणे अशक्य नाही.

(३) चष्टनाचे वंशज कनिष्काचे मांडलिक असते तर त्यांनी त्याच्या नाण्यांचे अनुकरण केले असते. पण तसे दिसत नाही.

---

१ *Num. Chron.*, (1874), Vol. XIV (N. S.), p. 161.

२ *Ancient History of the Deccan*, pp. 26 f.

३ 'सम्बोधि' मधील त्यांचा लेख पाहा.

(४) चष्टनाने गौतमीपुत्राकडून आपला प्रदेश जिंकून परत मिळविला होता. त्याच्या स्मृत्यर्थ त्याने हा संवत् सुरू केला असावा.

(५) या संवताचा आरंभीचा – अकराव्या वर्षाचा – लेख आता सापडला आहे. त्यावरून त्या संवताचा आरंभ चष्टनाने केला असला पाहिजे.

ही प्रमाणे अकाटच नाहीत. या संवताचे 'शक संवत्' हे नाव आरंभीच्या लेखांत येत नाही. किंबहुना, कोणत्याही संवताचे नाव त्याच्या आरंभीच्या लेखांत येत नसते. काही कालावधीनंतर ते त्याला प्राप्त होत असते. गुप्त संवताचे नाव त्याच्या १३७ व्या वर्षाच्या जुनागड लेखात प्रथम आढळते.[१] आभीर शकाचे नाव कोठेही येत नाही. पुढे बाराव्या शतकात त्याची 'कलचुरि-संवत्' व 'चेदि-संवत्' अशी नावे कलचुरि राजांनी त्याचा कित्येक शतके उपयोग केल्यामुळे आणि चेदि देशात त्याचा प्रचार असल्यामुळे त्याला मिळाली.[२] तसेच या संवताचा उपयोग शकवंशी चष्टनाच्या वंशजांनी कित्येक शतके केल्यामुळे त्याला शकसंवत् हे नाव मिळाले असे दिसते.

(२) चष्टन हा आरंभी एक क्षत्रप अर्थात् कोणा साम्राज्यसत्तेचा अंकित होता. तो व त्याचे वंशज पुढे स्वतंत्र झाले तरी त्यांनी आपली पूर्वीची पदवी टाकली नाही. यासारखी अनेक उदाहरणे प्राचीन भारतीय इतिहासात आढळतील. पुष्यमित्र शुंगाने दोन अश्वमेध यज्ञ केल्यावरही आपली मूळची 'सेनापति' पदवी टाकली नव्हती.[३] तेव्हा हे क्षत्रप पुढे स्वतंत्र झाले तरी आरंभी ते कोणातरी सम्राटाचे अंकित होते हे असिद्ध होत नाही.

(३) चष्टनाच्या वंशजांनी कुषाण सम्राटांच्या नाण्यांचे अनुकरण केले नाही, दुसऱ्या प्रकारची नाणी पाडली, याचे कारण ते ज्या प्रदेशात राज्य करीत होते तेथे पूर्वी ग्रीक राजे अपोल्लोडोटस् आणि मीनँडर यांची तसली नाणी प्रचलित होती[४] हे आहे. त्यांचा लोकांना सराव झाल्यामुळे त्यांनी आपली नाणी तशीच पाडली. भारतीय नाणक शास्त्रात हे अनेक ठिकाणी आढळते. गुप्तांनी माळवा व काठेवाड हे प्रदेश जिंकल्यावर क्षत्रपांच्या नाण्यांसारखी आपली नाणी पाडली होती यावरून हे स्पष्ट होईल.

(४) प्रत्येक राजा एखाद्या संस्मरणीय विजयानंतर आपला संवत् चालू करतो असे नाही. गौतमीपुत्राने नहपानावर नेत्रदीपक विजय मिळविल्यावरही एखादा संवत् सुरू केल्याचे दिसत नाही. चष्टनाने तसे केले होते याला प्रमाण नाही.

---

१ *C. I. I.*, III (first ed.), p. 60.

२ *Ibid.*, IV, pp. 447 and 519.

३ अयोध्या येथील धनदेवाचा शिलालेख पाहा. *E. I.*, XX, pp. 57 f.

४ Brown, *the Coins of India*, p. 31.

(५) चष्टनाचा अकराव्या वर्षाचा लेख आता सापडला आहे खरा. त्यावरून तो बऱ्याच पूर्वीपासून कच्छमध्ये राज्य करीत होता एवढेच सिद्ध होते. तो शकसंवताचा संस्थापक होता हे सिद्ध होत नाही. शिवाय आपण हेही लक्षात घेतले पाहिजे की त्या संवताचा उपयोग त्या काळी त्याच्यासारख्याच एका अन्य क्षत्रपाच्या–नहपानाच्या–लेखात केला आहे. तेव्हा तो संवत् त्या दोघांचाही स्वामी असलेल्या कोणा सम्राटाने चालू केला असला पाहिजे.

(४) **चौथे मत – कनिष्क हा शक संवताचा संस्थापक** — हे मत आता बहुतेकांना मान्य झाले आहे. फर्ग्यूसनने ते प्रथम पुढे मांडले.[१] त्याने माणिकियाल स्तूपात कनिष्काच्या नाण्यांसहित सापडलेल्या रोमन् राजांच्या नाण्यांवरून ते सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. ओल्डनवर्गने कनिष्काच्या नाण्यांवर 'शक' शब्द वाचून त्याला पुष्टि दिली.[२] कनिंग्ह्यामने ते वाचन चूक असून तेथील शब्द 'सनव' असा दाखविला असला[३] तरी हे मत अग्राह्य होत नाही. कारण हा संवत् 'शक' या नावाने पुढे प्रसिद्ध होण्याचे कारण तो कोणा शक राजाने प्रचलित केला होता हे नसून काठेवाड–माळव्याच्या शक राजांनी कित्येक शतके त्याचा उपयोग केला होता हे आहे.

कनिष्काचे साम्राज्य भारताच्या विस्तृत भागावर पसरले होते. उत्तरेत ते पंजाब, उत्तरप्रदेश, मध्यप्रदेश, बिहार वगैरे प्रांतांवर स्थापित झाले होतेच,[४] पण अलीकडील संशोधनावरून ते महाराष्ट्र, विदर्भ व दक्षिण कोसल या प्रदेशांवरही पसरले होते हे सिद्ध झाले आहे.[५] या विस्तृत साम्राज्याच्या शासनार्थ त्याने अनेक क्षत्रप (प्रांताधिपति) नेमले असले पाहिजेत. चष्टन, भूमक व नहपान हे सर्व कुषाणांचेच क्षत्रप होत. विदर्भात रुपिअम्म नामक महाक्षत्रपाचा छायास्तंभलेख सापडला आहे.[६] तो कुषाणांचाच प्रांताधिपति असावा. कनिष्काने आपला संवत् स्थापला होता, तो त्याचे उत्तराधिकारी हुविष्क व वासुदेव यांनी चालू ठेवला होता हे कोरीव लेखांवरून सिद्ध झाले आहे. चष्टन, भूमक, नहपान, रुपिअम्म इत्यादि प्रांताधिपतींनी आपल्या सम्राटांच्या संवताचा उपयोग आपल्या लेखांत केला असणे सुतराम् संभवनीय आहे. नहपान आणि चष्टन यांच्या लेखांतील वर्षे शक संवताची आहेत याबद्दल आता मुळीच संशय नाही. तेव्हा तो संवत् एका कुषाण सम्राटाने–कनिष्काने–प्रचलित केला असला पाहिजे.

---

१ *J. R. A. S.* (N. S.), XII, pp. 264 f.

२ *I. A.* (1881), pp. 213 f.   ३ *Num. Chron.*, 1890, pp. 111 f.

४ या प्रदेशांत त्याचे लेख सापडले आहेत.

५ *J. N. S. I.*, XXVIII, pp. 1-5.

६ क्र. ६२ पाहा.

## परिशिष्ट चौथे

# नाशिक येथील देवी – लेणे

नाशिकजवळच्या पांडव लेण्यातील क्र. ३ चे लेणे गौतमीपुत्र सातकर्णीने बौद्ध भिक्षूंकरिता कोरविले होते म्हणून त्याला 'गौतमीपुत्राचे लेणे' असे नाव पडले आहे. पण वस्तुत: त्याचे पूर्वीचे खरे नाव 'देवीलेण' (राणीचे लेणे) असे स्वत: गौतमीपुत्राला अभिप्रेत होते. कारण त्याने ते तेथे आपल्या गौतमी बलश्री या मातेच्या नावे कोरविले होते. ते नाव क्र. १९, ओ. ३ मध्ये आले आहे.

या लेण्यात गौतमीपुत्राचे दोन आणि त्याचा पुत्र आणि उत्तराधिकारी वासिष्ठीपुत्र पुळुमावि याचे तीन असे पाच लेख कोरले आहेत. त्यांतील ऐतिहासिक माहिती इतरत्र दिली आहे. येथे त्या लेण्याच्या दरवाजावरच्या शिल्पपट्टांवरून काय माहिती मिळते ते पाहावयाचे आहे.

या लेण्याच्या हॉलला (मंडपाला) जाण्याच्या दरवाजावर सुंदर शिल्पकाम केले आहे. त्यात एकंदर एक फूट चौरस आकाराचे एकोणीस शिल्पपट्ट आहेत. त्यांपैकी सात दरवाजाच्या शीर्षपट्टीवर असून सहा सहा दरवाजाच्या डाव्या उजव्या खांबांवर आहेत. शीर्षपट्टीवरील मधल्या शिल्पपट्टात छत्रयुक्त बौद्ध स्तूप असून त्याच्या दोन्ही बाजूंस एक एक सेवक उभा आहे. त्याच्या पलीकडे डावीकडील शिल्पपट्टात धर्मचक्र दिसते. पलीकडील दोन्ही बाजूंच्या दोन शिल्पपट्टांत बौद्ध उपासक हात जोडून उभे आहेत. या शीर्षपट्टीतील शिल्पांत विशेष असे काही नाही. त्या काळी महायानाचा प्रसार झाला नसल्याने मध्यभागी बुद्ध मूर्तीच्या ऐवजी स्तूपाची आकृति कोरली आहे, एवढेच लक्षणीय आहे.

दोन्ही बाजूंच्या खांबांवर मात्र इतरत्र आढळतात तशी मिथुने किंवा प्रेमी युगले काढली नसून प्रत्येक बाजूस एक कथा उत्कीर्ण केली आहे. बॉंबे गॅझेटीयर, नाशिक जिल्हा (जुनी आवृत्ति), पृ. ५४६-४७ वर त्यांचे वर्णन येणेप्रमाणे केले आहे —

दोन्ही खांबांवर प्रत्येकी सहा शिल्पपट्ट आहेत. त्यांपैकी दोन्ही बाजूंच्या अगदी खालच्या शिल्पपट्टांत एक खुजा मनुष्य (यक्ष ?) वरील पट्टांना उचलून धरीत असलेला दाखविला आहे. नंतरच्या डाव्या उजव्या पाच पाच शिल्पपट्टांत मात्र निरनिराळ्या कथा उत्कीर्ण केल्या आहेत.

डावीकडच्या खांबावरील खालून दुसऱ्या शिल्पपट्टात एक पुरुष व एक स्त्री उभी असून पुरुषाने स्त्रीचा डावा हात धरला आहे. त्यावरील तिसऱ्या

शिल्पपट्टात ती दोघे प्रेमाने एकमेकांच्या गळ्यात हात घालून उभी असलेली दिसतात. त्यावरील चौथ्या शिल्पपट्टात उजव्या बाजूचा पुरुष डाव्या बाजूच्या स्त्रीचा अनुनय करताना दिसतो. त्यावरच्या पाचव्या शिल्पपट्टात तोच मनुष्य तिला वळजवरीने उचलून नेत असताना दाखविला आहे. त्यावरच्या सहाव्या शिल्पपट्टात पूर्वोक्त तिसऱ्या शिल्पपट्टातील पुरुष तिला सोडवून उचलून आणताना दिसतो.

या शिल्पपट्टांचा अर्थ गॅझेटीयरच्या संपादकांनी पुढीलप्रमाणे लावला आहे. पहिल्या दोन पट्टांत एक युगल प्रेमाने राहत होते. तिसऱ्या शिल्पपट्टात एक भिक्षुणी तिला अरण्यातील साधूकडे जाण्याविषयी मन वळवीत आहे. तो साधु शेवटी तिचे वळजवरीने हरण करतो. पण शेवटी तिचा पति तिला त्याच्या तावडीतून सोडवून आणतो. या शिल्पपट्टांचा हा अर्थ मान्य केला तरी ते येथे का कोरविले हा प्रश्न उरतोच !

उजवीकडच्या द्वारस्तंभावरील शिल्पपट्टांतील कथा याहून निराळी दिसते. त्यांतील खालून दुसऱ्या पट्टात एक मोठ्या दिमाखाची केशरचना केलेली स्त्री हंसाला कमलदंड खाऊ घालत असलेली दाखविली आहे. त्यावरच्या तिसऱ्या पट्टात एक पुरुष एका स्त्रीचा अनुनय करताना दाखविला असून त्या स्त्रीने आपले पाय धरणाऱ्या एका मुलाच्या डोक्यावर हात ठेवलेला दिसत आहे. नंतरच्या चौथ्या पट्टात ती दोघे प्रेमाने आपल्या हाताचा विळखा घालून उभी असलेली आणि तो मुलगा हात जोडून बसलेला दाखविला आहे. पाचव्या पट्टात त्या स्त्रीने एका वृक्षाखाली बसून त्या मुलाच्या गळ्याभोवती आपल्या हाताचा विळखा घातला असून एक पुरुष जवळ उभा असतानाही त्याच्याकडे ती ढुंकूनही पाहत नसलेली दिसत आहे. सहाव्या पट्टात तो पुरुष त्या स्त्रीला बलात्काराने उचलून नेताना दाखविला आहे.

या शिल्पपट्टांचा अर्थ बॉंबे गॅझेटीअरच्या नाशिक जिल्ह्याच्या संपादकांनी असा लावला आहे की, त्या छचोर स्त्रीचे तिच्या नोकरावर प्रेम बसले होते. ती दोघे अरण्यात पळून गेली, पण शेवटी तिच्या पतीने तिचा शोध लावून तिला वळजवरीने घरी आणले. पण या गोष्टीचा बौद्ध विहाराशी संबंध काय, हे त्यात सांगितले नसल्याने हाही अर्थ स्वीकारता येत नाही.

शिल्पपट्टांनी एखादी कथा सूचित करण्याची प्रथा फार जुनी आहे. मात्र त्यांचा अर्थ लावताना कल्पनाशक्तीचा उपयोग संयमाने केला पाहिजे. नाहीतर विदिशेजवळच्या लेण्यातील महावराह प्रलयकाळी पृथ्वीला वर उचलून धरीत आहे याचा 'द्वितीय चंद्रगुप्ताने आपली भावजय ध्रुवस्वामिनी हिला शकनृपतीच्या तावडीतून सोडविले' असा अर्थ काशीप्रसाद जयसवालांनी केला त्यासारखी गत व्हावयाची !

एखाद्या स्त्रीला बलात्काराने उचलून नेत असलेल्या पुरुषाची शिल्पे काही शिल्पपट्टांवर व टेराकोट्टा पदकांवर आढळली आहेत. पण ती सर्व एकाच प्रसंगाची द्योतक नसून प्रत्येक ठिकाणी त्याचा अर्थ भिन्न भिन्न दिसतो. उदाहरणार्थ, ओरिसातल्या उदयगिरीवरील शिल्पपट्टात त्याचा अर्थ 'श्रीलंकेवरील स्वारी' असा फर्ग्यूसन – बर्जेसनी केला आहे. कौशाम्बी येथील एका पदकावर एक राक्षस एका स्त्रीला बलात्काराने उचलून नेत आहे आणि तिचे अलंकार खाली पडले आहेत असे दाखविले आहे. हे दृश्य रावणाच्या सीताहरणाचे असावे. अंध्र प्रदेशातील अमरावती येथे कोपिंग (वरवंडी) पत्थरावर चार देवांनी एका अप्सरेला उचलून नेऊन शक्राला अर्पण केल्याचे दृश्य आहे. या प्रमाणे स्त्रीहरणाचे विविध प्रसंग भिन्न भिन्न शिल्पपट्टांत दाखविले आहेत.

नाशिक येथील क्र. ३ च्या लेण्यातील दरवाजाच्या खांबांवरील शिल्पपट्टांचा अर्थ आम्ही पुढीलप्रमाणे लावतो —

**डावीकडच्या खांबावरील शिल्पपट्ट** — दुसऱ्या व तिसऱ्या शिल्पपट्टांत गौतमीपुत्र सातकर्णीचा पिता राज्यलक्ष्मीचा प्रेमाने उपभोग घेताना दाखविला आहे. त्यावरच्या चौथ्या पट्टात, शक क्षत्रप नहपान राज्यलक्ष्मीचा अनुनय करताना व पाचव्या पट्टात तिचे बलात्काराने अपहरण करताना दिसतो. शेवटच्या सहाव्या पट्टात गौतमीपुत्राने त्याचा पराभव करून राज्यलक्ष्मीला परत आणल्याचे दाखविले आहे. या दोन व्यक्तींच्या केशरचनेवरून त्या भिन्न असून त्यांनी नहपान व गौतमीपुत्र सातकर्णि दाखविले आहेत असे दिसते.

उजवीकडचा शिल्पपट्ट यात तीच कथा पुढे नेली आहे. दुसऱ्या व तिसऱ्या पट्टांत राज्यलक्ष्मी गौतमीपुत्राबरोबर आनंदाने नांदत आहे असे दिसते. राज्यलक्ष्मी चंचल व छचोर असते हे तिच्या वेषभूषेवरून सूचित केले आहे. जवळच बसलेला मुलगा पुळुमावि असावा. तो युवराज असल्याने राज्यलक्ष्मीने त्याच्या डोक्यावर हात ठेवला आहे. पाचव्या पट्टाचे वरील वर्णन ठीक दिसत नाही. त्या पट्टात शत्रूने (बहुधा रुद्रदामन्‌ने) तिचे अपहरण करण्याचा प्रयत्न केलेला दाखविला असावा. गौतमीपुत्राच्या निधनानंतर क्षत्रप रुद्रदामन्‌ने पुळुमावीचा पराभव करून उत्तरेकडचे काही प्रदेश जिंकले होते हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. त्यानंतर पुळुमावीने राज्यलक्ष्मीला पुनः खेचून आणल्याचे दृश्य उजवीकडच्या सर्वांत वरच्या पट्टात दिसत आहे.

क्र. ३ चे लेणे खोदण्यास गौतमीपुत्राच्या कारकीर्दीत सुरुवात झाली होती; व त्याला शिल्पादिकांनी अलंकरणाचे काम पुळुमावीच्या कारकीर्दीच्या एकोणिसाव्या वर्षापर्यंत चालू होते हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. तेव्हा त्या लेण्याच्या दरवाजाच्या स्तंभांवरील पट्टांत त्या दोघांच्या कारकीर्दीतील मुख्य घटनांची दृश्ये दिसावी हे साहजिक आहे.

## प्रकरण दुसरे

# राज्यशासन

सातवाहनांच्या अमलाखाली सामान्यतः नर्मदेच्या खालचा प्रदेश आणि पश्चिमेच्या क्षत्रपांच्या सत्तेखाली कच्छ, काठेवाड, गुजराथ आणि माळवा हे देश होते. यातील पहिल्यास दक्षिणापथ अशी संज्ञा होती. 'नर्मदाया दक्षिणेन देशो दक्षिणापथः।' असे वात्स्यायनाच्या 'कामसूत्रा'चा टीकाकार यशोधर म्हणतो.[१] राजशेखरानेही त्याच अर्थाची 'माहिष्मत्याः परतो दक्षिणापथः।' अशी दक्षिणापथाची व्याख्या करून त्यात महाराष्ट्र, माहिषक, विदर्भ, कुन्तल, कोंकण, काञ्ची, केरळ, चोल, पाण्डय, पल्लव वगैरे दक्षिण भारतातील सर्व देशांचा अन्तर्भाव केला आहे.[२] सातवाहन राजवंशातील आरंभीचा सम्राट सिमुक याने 'दक्षिणापथपति' ही पदवी धारण केली होती हे नाणेघाटातील नागनिकेच्या लेखावरून कळते.[३] पण ती या व्यापक अर्थाने नव्हे. त्याच्या अंमलाखाली (विदर्भासहित) महाराष्ट्र व कोंकण एवढेच प्रदेश असावे. पश्चिमेच्या क्षत्रपांच्या अंमलाखालील देशांची प्राचीन नावे पुढीलप्रमाणे होती – कच्छ, सुराष्ट्र (काठेवाड), लाट (दक्षिण गुजराथ), आनर्त (उत्तर गुजराथ) आणि आकरावन्ती (पूर्व व पश्चिम माळवा).

आता या देशातील अन्तर्गत विभागांचा विचार करू. सामान्यतः भौगोलिक उल्लेख शिलालेखांपेक्षा ताम्रपटांत मुख्यत्वाने आढळतात. पण सातवाहन व क्षत्रप यांचे ताम्रपट आतापर्यन्त मुळीच सापडले नाहीत. दक्षिण भारतातील आतापर्यन्त सापडलेला कालक्रमाने पहिला ताम्रपट सातवाहन राजवटीच्या अखेरीस दिलेला मुण्डवंशी आदित्यराजाचा मल्हारा ताम्रपट (क्र. ६४) होय. त्यानंतर पल्लव शिवस्कन्दवर्म्याचे मयिदवोलू व हीरहडगल्लि ताम्रपट येतात. तेव्हा येथे संपादिलेल्या कोरीव लेखांत फारच थोड्या भौगोलिक संज्ञा आढळतात यात नवल नाही.

सर्वात मोठ्या प्रदेशाला 'जनपद' अशी संज्ञा होती. तिचा निर्देश जुनागड येथील रुद्रदामनच्या लेखात आला आहे. जनपदाच्या मोठ्या विभागांना 'राष्ट्र' म्हणत, पण त्याचा उल्लेख सातवाहन – क्षत्रपांच्या लेखांत येत नाही. हीरहडगल्लि ताम्रपटात सातवाहनिरट्ठाचा (सातवाहन राष्ट्राचा) निर्देश आहे.[४] बेल्लारी

१ 'नर्मदाया दक्षिणेन देशो दक्षिणापथः।' कामसूत्राची जयमङ्गला टीका.

२ काव्यमीमांसा, (G. O. S.), p. 33.

३ क्र. ३, ओ. २.

४ ए. इं., १, पृ. ५. इ.

जिल्ह्यातील हा भाग सातवाहनांनी जिंकून तेथे आपले स्वामित्व प्रस्थापित केल्यावर त्या प्रदेशाला हे नाव मिळाले असावे. या प्रदेशावरील अधिकाऱ्यास 'राष्ट्रिक' अशी संज्ञा असे ती मल्हारा ताम्रपटात आली आहे.[१] तिचे प्राकृत रूप 'रठिक' हे अशोकाच्या व खारवेलाच्या लेखांत आले आहे. हा राष्ट्रविभाग आकाराने मोठा असल्यास त्यावरील अधिकाऱ्यास महारठि म्हणत. सातवाहन-काळी महारठि व महाभोज हे मोठे जागीरदार किंवा सामन्त असत. त्यांना स्वतःच्या प्रदेशाकरिता स्वतःच्या नावे नाणी पाडण्याचा अधिकार असे. अशी नाणी सदकण कळलाय या महारठीची कर्नाटकात सापडली आहेत.[२] सातवाहनांच्या लेखांवरून ठाणे व कुलाबा जिल्ह्यांत 'महाभोज' आणि नाशिक व पुणे जिल्ह्यांत 'महारठि' सरंजामदार होते असे दिसते.

यानंतरचा भूविभाग 'आहार' होय. तत्कालीन काही आहारांचे उल्लेख कोरीव लेखांत येतात. उदाहरणार्थ, क्र. ३४ मधील 'सातवाहनिहार'[३] पाहा. मामालाहार[४]मध्ये कोंकणच्या मावळ प्रदेशाचा अंतर्भाव होत असे. शोर्पारगाहार-मध्ये उत्तर कोकणातील सोपाऱ्याभोवतालचा प्रदेश समाविष्ट होता. गुजराथेत 'कापुराहार' नामक विभाग होता. त्यामध्ये सुरत जिल्ह्याचा अंतर्भाव होई. आहाराच्या खालच्या विभागाला विषय (जिल्हा) म्हणत. पण येथील लेखांत त्याचा उल्लेख आला नाही. प्रथम रुद्रदामन्च्या जुनागड लेखांत त्याचा उपयोग केला आहे खरा,[५] पण तेथे तो लेखकाने यमकाकरिता वापरला आहे. तेथे त्याचा अर्थ देश असा आहे. सामान्यतः नद्यांजवळच्या प्रदेशांची नावे त्या त्या नदीनामांच्या अंती 'कट' किंवा 'कड' शब्द लावून बनविली जात. बेणाकट, वरदाकड, करहाकट पाहा. विषयापेक्षा लहान विभागाला 'पथक' म्हणत. उदाहरणार्थ 'प्रतिष्ठानपथक' पाहा. कांही राजे स्वतःच्या नावे नवीन नगरे वसवीत. विजय सातकर्णीने आपल्या नावे विजयपुरी (सध्याचे नागार्जुनकोंड) स्थापून तेथे आपली राजधानी केली.[६] तिचा उल्लेख नंतरच्या इक्ष्वाकूंच्या लेखांत येतो. पुळुमावीने वसविलेले नवनगर[७] कोठे होते माहीत नाही.

---

१ क्र. ६४, ओ. ३४ येथे 'राष्ट्रिक' बद्दल चुकीने 'काष्ठिक' कोरले आहे.

२ *B. M. C.* (*Andhras*), p. 57. कोल्हापूरजवळ कुरवंशी महारठींची नाणी सांपडली आहेत. 'नाणे' प्रकरण पाहा.

३ क्र. ३४, ओ. २.

४ क्र. २२, ओ. २.

५ 'समग्राणां तत्प्रभावाद्य [थावत्प्राप्तधर्मार्थ –] कामविषयाणां विषयाणां पत्या–' क्र. ५१, ओ. ११ पाहा.

६ विजयसातकर्णीचा लेख नागार्जुनकोंड येथे सापडला आहे. क्र. ३२ पाहा.

७ क्र. १९, ओ. १.

कर्नाटकातील चुटुकड सातकर्णींची राजधानी वैजयन्ती (सध्याची वनवासी) सुप्रसिद्ध होती. प्रतिष्ठान ही सातवाहनांची राजधानी दीर्घकाळ होती. त्यांची आरंभीची राजधानी जुन्नरजवळ असावी असे वाटते.[१] पण तिचे नाव माहीत नाही. याशिवाय गिरिनगर (गिरनार पर्वताजवळचे जुनागड), उज्जयिनी, शूर्पारक (सोपारा), वगैरे नगरे प्रसिद्ध होती. भरुकच्छ (भडोच), कलियाण (कल्याण) व चेउल (चौल) ही मोठी बंदरे होती. अजमेरजवळचे पुष्कर आणि काठेवाडातील प्रभास ही पुण्यतीर्थे म्हणून विख्यात होती. नाशिकजवळचे गोवर्धन हे तन्नामक आहाराचे मुख्य ठिकाण म्हणून नाशिकपेक्षा जास्त विख्यात होते. त्या काळी नाशिकची ख्याति पुण्यक्षेत्र म्हणून होती. आता त्याच्या उलट परिस्थिति आहे. नाशिक हे जिल्ह्याचे मुख्य ठिकाण झाले आहे आणि गोवर्धन खेडे बनले आहे.

गावाची नावे ग्राम, पद्र इत्यादि-पदान्त असत. उदाहरणार्थ करजिकग्राम, चिखलपद्र, पिसाजीपद्रक, शाल्मलीपद्र इत्यादि. काही गावे व शेते यक्ष व यक्षिणी यांच्या नावाने ओळखिली जात. उदाहरणार्थ 'अजकालकिय' हे शेत अजकालक किंवा अजकालापक या यक्षाच्या नावे, आणि 'सुदिसना' हे गाव सुदर्शना या यक्षिणीच्या नावे प्रसिद्ध होते.

सातवाहन–क्षत्रप काली उत्तर भारतात काही ठिकाणी गणराज्ये अस्तित्वात होती. त्यांपैकी मालय (मालव), उत्तमभद्र व यौधेय यांचा उल्लेख प्रस्तुत संग्रहात आला आहे. मालवगण हा पूर्वी दक्षिण पंजाबात राज्य करीत होता. त्याने आणि त्याच्या शेजारच्या क्षुद्रक गणाने अलेक्झांडर परत जात असता त्याला जोराचा प्रतिकार केला होता. पुढे उत्तर भारतावर परकी टोळयांच्या धाडी आल्या तेव्हा हे स्वातंत्र्यप्रिय **मालव** गणाचे लोक दक्षिणेस सरकत पूर्व राजस्थानात पूर्वीच्या जयपूर संस्थानातील नगर किंवा कर्कोटनगर येथे काही काल स्थायिक झाले. त्यांनी उत्तमभद्र या दुसऱ्या गणावर हल्ला केला तेव्हा नहपानाचा शक जामात ऋषभदत्त त्यांच्या साहाय्यास धावला. तेव्हा ते पळून गेले. या काळात त्यांनी मध्य भारतातील उज्जयिनीसभोवारचा प्रदेश व्यापला नव्हता. म्हणून या काळी त्या प्रदेशाचे नाव मालव नसून आकरावन्ती होते. यौधेय गण हा पंजाबात सत्ता गाजवीत होता. या कालात त्याने सभोवारच्या अनेक राजांचा पराजय करून आपला दरारा प्रस्थापित केला होता. पण त्यांनाही रुद्रदामन्ने जिंकून कीर्ति मिळविली होती.[२]

---

१ कदाचित् जुन्नर हे 'जीर्णनगर'चे अपभ्रष्ट रूप असेल. पुळुमावीने 'नवनगर' स्थापल्यावर जुन्या राजधानीला ते नाव प्राप्त झाले असेल.

२ क्र. ५१, ओ. १२.

मालव व यौधेय यांसारखी गणराज्ये सातवाहन—क्षत्रपांच्या प्रदेशांत नव्हती. तेथे एकतंत्री राज्य–पद्धति प्रचलित होती. गौतमीपुत्र, वासिष्ठीपुत्र, माढरीपुत्र इत्यादि सातवाहन राजनामांवरून कांहींनी असा तर्क केला आहे की, त्या काली मातृसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वात असावी. पण तो तर्क बरोबर नाही. मातेवरून मुलाचे नाव ठेवण्याची पद्धति फार जुनी आहे. तिचे उपनिषदांतील 'देवकीपुत्र कृष्णा'चे उदाहरण मागे दिले आहे. ही पद्धति राजकुलातच नसून सामान्य जनातही प्रचलित होती. उदाहरणार्थ, 'कोसिकिपुत मितदेव'[1] हे एका सामान्य मनुष्याचे व 'वाराहीपुत्र अश्विभूति'[2] हे एका ब्राह्मणाचे नाव पाहा.

राजाची सत्ता सामान्यतः अनियंत्रित असली तरी त्यावर धर्माचा व जनमताचा अंकुश असे. त्याने धर्मशास्त्रानुसार राज्यकारभार चालवावयाचा असे. अन्यायी किंवा दुर्बल राजांमुळे राज्यात अव्यवस्था माजल्यास प्रजेतील सर्व वर्णांचे लोक त्याविरुद्ध उठून त्याला पदच्युत करीत. उज्जैनीस पालक राजाच्या कारकीर्दीत झालेली राज्यक्रान्ति सामान्य जनांच्या उठावामुळे झाली होती हे 'मृच्छकटिक' नाटकात दाखविले आहे. अशा प्रसंगी 'ब्राह्मणांनीही शस्त्रधारण करावे' अशी तत्कालीन धर्मशास्त्रकारांची शिकवण असे. मनूने म्हटले आहे—

शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते।

(धर्मावर संकट आले असता सर्व द्विजांनी शस्त्र धारण करावे.)

असे प्रसंग सातवाहनकाळात दोनदा आलेले दिसतात. अशोकाच्या निधनानंतर केन्द्रिय सत्ता दुर्बळ झाल्यामुळे महाराष्ट्रात बंडाळी माजली. तेव्हा सातवाहन नामक ब्राह्मणाने पुढे होऊन तिला पायबंद घातला आणि आपले राज्य स्थापले. दुसरा प्रसंग सन २३० च्या सुमारास शेवटचा सातवाहन राजा पुळुमावि याच्या निधनानंतर आला. त्या वेळी विदर्भातील मुण्ड या श्रोत्रिय घराण्यातील राष्ट्रमहाराज या शूर पुरुषाने सुवा टाकून तरवार घेतली आणि विदर्भात शांतता व सुव्यवस्था स्थापन केली.

राजाच्या निधनानंतर त्याचा वारसा त्याच्या ज्येष्ठ मुलाकडे जाई. अशा प्रसंगी कुटुंबात बखेडे होऊ नयेत म्हणून क्षत्रपांनी सर्वानुमते असा नियम केलेला दिसतो की, जोपर्यन्त मृत महाक्षत्रपाचे धाकटे भाऊ जिवंत व कर्तबगार असतील तोपर्यन्त राज्याचा वारसा त्याच्या मुलाकडे न जाता त्या भावांकडे वयानुक्रमाने जावा. त्याने मृत भावाच्या मुलाला क्षत्रप म्हणून राज्यकारभारात

---

१ क्र. १७, ओ. २.

२ क्र. ४३, ओ. ४.

मदत करण्यास घ्यावे. ही पद्धति क्षत्रपांच्या कुळात काही काळ चालू होती असे त्यांच्या नाण्यांवरून दिसते.

महाराष्ट्रात या उलट काही काळ दुसरीच पद्धति अमलात होती. गौतमीपुत्र सातकर्णि निधन पावला तेव्हा त्याला तीन पुत्र–पुळुमावि, स्कन्द आणि सातकर्णि असे–होते. हे तिघेही 'वासिष्ठीपुत्र' असल्याने सख्खे भाऊ होते. गौतमीपुत्राच्या निधनानंतर पुळुमावि हा शूर आणि कर्तबगार असल्याने गादीवर आला. पण त्याच्या निधनानंतर त्याच्या राज्याची विभागणी स्कन्द सातकर्णि आणि सातकर्णि या त्याच्या दोन भावांत झालेली दिसते. पुढे हे दोन्ही विभाग पुनः स्कन्दाच्या निधनानंतर एक झाले असे नाण्यांच्या पुराव्यावरून माहीत होते.

आपणांस राज्य कारभारात मदत करण्याकरिता राजा अनेक मंत्र्यांची व अधिकाऱ्यांची नेमणूक करी. प्राचीन ताम्रपटांत अशा अधिकाऱ्यांना दानाची माहिती देण्याच्या उद्देशाने त्यांच्या पदांची नावे येतात. सातवाहन क्षत्रपांचे ताम्रपट मुळीच मिळाले नसल्याने आपणांस त्यांच्या अधिकाऱ्यांची फारच थोडी माहिती मिळते.

रुद्रदामन्च्या जुनागड लेखात या अधिकाऱ्यांचे 'मतिसचिव' आणि 'कर्मसचिव' असे दोन भेद केले आहेत.[१] पहिल्याचे काम राजाला सल्ला देण्याचे. त्याला मंत्री म्हणत. दुसऱ्याचे काम राजाज्ञा अमलात आणण्याचे. त्याला 'अमात्य' म्हणत. अशोकाच्या काळी त्यांना 'महामात्र' अशी संज्ञा होती. तिचा उल्लेख सातवाहनांच्या अत्यंत प्राचीन लेखात आला आहे.[२] पुढे ही संज्ञा प्रचारातून गेली. सातवाहनांच्या लेखांत भूमिदानांचे व्यवस्थापक म्हणून अनेक अमात्यांचा उल्लेख आला आहे. ते अर्थात् विविध प्रदेशांत नेमलेले होते. जे खुद्द राजधानीत राजाच्या मंत्रिमंडळात असत त्यांना राजामात्य अशी संज्ञा असे. ती एका लेखात आली आहे. याशिवाय सेनेचा मुख्य सेनापति, महसूल खात्याचा मुख्य रज्जुक,[३] खजीनदार भांडागारिक,[४] नगरातील पांणीपुरवठ्याची व्यवस्था पाहणारा 'पनियघरक',[५] बांधकामावर देखरेख करणारा 'कर्मान्तिक',[६] कामावरचा मुकादम 'आवेशनिक'[७] इत्यादिकांची नावे सातवाहनांच्या लेखात प्रसंगवशात् आली आहेत.

---

१ क्र. ५१, ओ. १७.
२ क्र. १, ओ. २.
३ क्र. ३५, ओ. १
४ क्र. १०, ओ. २–३.
५ क्र. २४, ओ १.
६ क्र. ३७, ओ २.
७ क्र. २, ओ. २.

सातवाहन कालाच्या आरंभी मोठमोठ्या राजकीय संज्ञा प्रचारात आल्या नव्हत्या. गौतमीपुत्रासारख्या विशाल साम्राज्याच्या अधिपतीला कोरीव लेखांत तसेच नाण्यांवरील लेखांतही 'राजा' असेच म्हटले आहे. क्वचित् 'महाराज' पदवीचा उल्लेख केलेला दिसतो. सिमुक व पुळुमावि यांना 'दक्षिणापथपति' व 'दक्षिणापथेश्वर' म्हटले आहे. पण नंतरच्या काळातल्या 'परमभट्टारक', 'महाराजाधिराज', 'परमेश्वर' या शब्दावडम्बरी पदव्या अद्यापि प्रचारात आल्या नव्हत्या. त्याप्रमाणेच त्यांच्या विविध खात्यांच्या अधिकाऱ्यांची व मंत्र्यांची नावेही आरंभीच्या काळात बनविली नसावी. पण त्या काळाच्या अखेरीस ती प्रचारात आलेली दिसतात. इतरत्र दाखविल्याप्रमाणे मल्हारा येथील आदित्यराजाचा ताम्रपट सातवाहनांच्या अस्तानंतर दिला होता. त्यात अनेक शासनिक संज्ञा उत्क्रांत झालेल्या आढळतात.[१] त्यांचाच प्रयोग नंतरच्या गुप्त आणि वाकाटक ताम्रपटांत केलेला आढळतो. त्यांपैकी काही प्रमुख संज्ञांचा येथे विचार करू.

**उपरिक**—मल्हारा ताम्रपटात सर्व अधिकाऱ्यांमध्ये याचा प्रथम उल्लेख आहे त्यावरून त्याचे श्रेष्ठत्व प्रत्ययास येते. त्याचा दर्जा प्रांतिक गव्हर्नराचा असावा. तो कुमारामात्यांची नेमणुक करी. पुढे गुप्तकाळातही तो 'भुक्ति' या विशाल देश विभागाचा अधिपति असे.

**कुमारामात्य**—याच्या निश्चित् स्वरूपाबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. अनेक खाती याच्या अधिकारात येत. सध्याच्या आय्. सी. एस्. किंवा आय्. ए. एस्. अधिकाऱ्यांसारखा याचा दर्जा असावा.

**राष्ट्रिक**—मल्हारा ताम्रपटात याची पदवी 'काष्ठिक' अशी चुकीने खोदलेली दिसते. हा 'राष्ट्र' नामक विभागाचा शासक असावा.

**दण्डपाशिक**—हा सध्याच्या पोलिस कमिशनरासारखा रक्षाधिकारी दिसतो.

**चाट व भट**—हे अनुक्रमे सध्याचे पोलिस शिपाई व सैनिक दिसतात. सध्याच्या प्रमाणे यांची लोकांना त्रास देण्याची प्रवृत्ति तेव्हाही प्रसिद्ध होती. म्हणून दान दिलेल्या गावांत जाण्याची यांना मनाई असे. याला एकच अपवाद होता. चोरांना किंवा राजद्रोही इसमांना शासन करावयाचे असेल तर मात्र त्यांना अग्रहार ग्रामांत सुद्धा जाऊन अपराध्यांस पकडता येत असे.[२]

---

१ या संज्ञा गुप्तांच्या दानपत्रांत आढळत असल्या तरी त्या त्यांनीच प्रथम बनविल्या होत्या असे मानण्यास प्रमाण नाही. मल्हारा ताम्रपट गुप्तपूर्व काळातील आहे हे इतरत्र दाखविले आहे.

२ नंतरच्या काही ताम्रपटांत 'अभटच्छात्रप्रावेश्यः' याला 'चोरराजापथ्यकारिदण्डवर्जम्' अशी पुस्ती जोडलेली असते.

**दूतप्रेषणिक**—ग्रामदानपत्राच्या शेवटी 'दूतका'चा उल्लेख येतो. दिलेल्या दानाची माहिती योग्य मनुष्यास देऊन त्या जमिनीचा ताबा त्याला मिळवून देणे हे त्याचे काम असे.

**विनियुक्तक**—ही संज्ञा सामान्यतः सर्व कर्मचाऱ्यांना—जे विशिष्ट कामाकरिता नेमले जात त्यांना—लावली जात असे.

याशिवाय विविध खात्यांचे अधीक्षक वगैरे नेमले जात असावे. पण त्यांचे उल्लेख कोरीव लेखांत आले नाहीत.

वरील अधिकाऱ्यांचे उल्लेखही फक्त एकाच ताम्रपटात आढळले आहेत. याचे कारण सातवाहनकाळी ताम्रपट देण्याचा फारसा प्रघात नव्हता. त्यानंतरच्या आभीर राजांच्या काही मांडलिकांचे[१] तसेच दक्षिणेतील पल्लव राजपुरुषांचे[२] थोडे ताम्रपट सापडले आहेत पण ते अत्यंत लहान आकाराचे आहेत. त्यांत वरील संज्ञा आढळत नाहीत. तथापि त्या काळी त्या प्रचारात नव्हत्या असे निश्चितपणे म्हणता येत नाही.

सातवाहन काळातील नगर व ग्राम यातील शासनव्यवस्थेविषयी फार थोडी माहिती उपलब्ध आहे. नगरातील व्यवस्था पाहण्याकरिता निगमसभा असे. 'निगम' याचा मूळ अर्थ व्यापारी असा आहे. पण कोरीव लेखांत उल्लेखिलेल्या निगमसभांत नगरातील प्रतिष्ठेचे व वृद्ध लोक सभासद नेमले किंवा निवडले जात असावे. तेथे निगम याचा अर्थ 'नगर' असा दिसतो. आपस्तंबाने म्हटले आहे की राजाने गावांतील तसेच नगरांतील प्रजेच्या संरक्षणाकरिता (आणि व्यवहाराकरिता) शुद्ध आचरणाचे सत्यशील असे आर्य (सज्जन) नेमावे. त्यांचे नोकरही त्याच प्रकारचे असावे.[३] अशा निगमसभेत सर्व भूमिदाने प्रथम जाहीर करावी लागत. ऋषभदत्त हा वास्तविक तत्कालीन शासकाचा (क्षत्रपाचा) जामात होता. पण त्यानेही आपले दान निगमसभेत जाहीर केले होते.[४] नंतर ते निगम—सभेच्या नोंदणी खात्यात (रजिस्ट्रेशन डिपार्टमेंट-मध्ये) नोंदले जाई.[५] त्याच्या प्रती तेथील लेण्यांतील भिक्षुमुख्यांच्या स्वाधीन केल्या जात. त्यांस एका लेखात 'महास्वामिक' म्हटले आहे.[६]

---

१ *C. I. I.* IV, pp. 5 f.

२ ए. इं., १, पृ. ५ इ.; ६, पृ. ८६ f.

३ ग्रामेषु नगरेषु चार्याञ्छुचीन् सत्यशीलान् प्रजागुप्तये निदध्यात्। तेषां पुरुषास्तथागुणा एव स्युः। आ. ध. सू., २.१०.२६.५–६.

४ क्र. ३८, ओ. ४.

५ पूर्वोक्त.

६ क्र. ११, ओ. ५

खेडेगावात पंचायत पद्धति प्रचलित असावी. पण तिचा उल्लेख या काळाच्या कोरीव लेखांत येत नाही. गावातल्या मुख्यास ग्रामणी म्हणत. तो सध्याच्या पोलिसपाटलासारखा असे. त्याचा उल्लेख 'सप्तशती'च्या काही गाथांत येतो. तीत गावाचे रक्षण करणाऱ्या तरुण ग्रामणीपुत्राविषयी[1] काही गाथा आहेत. काही लेखांत कुटुंबींचा निर्देश आढळतो ते सध्याचे कुणबी होत. जरा संपन्न स्थितींतील ग्रामिकांना 'गृहपति' अशी मानाची संज्ञा असे.[2]

सातवाहनांच्या काळात 'मनुस्मृती'ला सध्याचे स्वरूप प्राप्त झाले. ती स्मृति महाराष्ट्रात किंवा गुजराथ–माळव्यात रचली होती याला प्रमाण नाही. तथापि तिच्यातील विचार त्या काळात प्रचलित होते यात संशय नाही. तिच्या सातव्या अध्यायात राजकर्तव्यांचे वर्णन आहे. पुळुमावीच्या नाशिक येथील लेण्यातील लेखात आणि रुद्रदामन्‌च्या जुनागड येथील प्रस्तर–लेखात अनुक्रमे गौतमीपुत्र सातकर्णि व रुद्रदामन् यांचे जे वर्णन आले आहे त्यावरून आदर्श नृपतीची तत्कालीन कल्पना काय होती व राजाची प्रमुख कर्तव्ये कोणती याविषयी कल्पना करता येते.

राजाचे प्रमुख कर्तव्य स्वदेशाचे परकी आक्रमणापासून आणि स्वदेशात आपल्या प्रजेचे चोर, हिंस्र पशु व रोगराई यांपासून रक्षण करणे हे होय.[3] रुद्रदामन् हे कर्तव्य चोख रीतीने पाळीत होता, असे वर्णिले आहे. प्राचीन काळी आणखी एक प्रमुख राज–कर्तव्य मानले जात असे ते हे की प्रजेमध्ये वर्णसंकर माजू न देणे. त्या काळी चातुर्वर्ण्य व्यवस्था प्रचलित होती. प्रत्येक वर्णाने आपापली शास्त्रविहित कर्मे केल्यास समाजव्यवस्था ठीक राहते अशी तत्कालीन लोकांची श्रद्धा होती. तदनुसार गौतमीपुत्र सातकर्णीचे वर्तन असे.[4] तथापि, त्या काळी हिंदु धर्म कोत्या बुद्धीचा झाला नसल्याने त्यात परधर्मीयांनाच नव्हे तर परदेशीयांनाही मज्जाव नसे. सातवाहन राजे स्वत: ब्राह्मणजातीय होते. गौतमीपुत्र सातकर्णीला नाशिकच्या लेखात एकब्राह्मण (अनुपम ब्राह्मण) म्हटले आहे. त्यावरून हे स्पष्ट आहे. तथापि त्याच्या वासिष्ठीपुत्र सातकर्णि मुलाने शक क्षत्रप रुद्रदामन्‌च्या कन्येशी विवाह केला होता.[5] त्यावरून परदेशी यवन, शक, पल्लव यांना हिंदुधर्मात मानाचा प्रवेश दिला जात होता हे सुस्पष्ट आहे.

---

१ गाथा, क्र. १.३१ पाहा.
पहरचणमग्गविसमे जाआ किच्छेण लहइ से णिद्दं ।
गामणिउत्तस्स उरे पल्ली उण सा सुहं सुवई ।।

२ गाथा क्र. २.७; २.७२.

३ क्षेगकृद्राजा यस्य विषये ग्रामेरण्ये वा तस्करभयं न विद्यते । आ. ध. सू. २. १०. २५. १५.

४ क्र. १८, ओ. ६.

५ क्र. २५, ओ. २.

राजाचे आणखी एक प्रमुख कर्तव्य हे की त्याने योग्य असेच कर प्रजेवर बसवावे. आणि त्यामुळे प्राप्त झालेल्या धनाचा उपयोग प्रजेच्या कल्याणार्थ करावा. गौतमीपुत्र सातकर्णि याही बाबतीत कमी पडत नव्हता असे नाशिकच्या लेखावरून दिसते.[१]

याशिवाय राजाने प्रजेच्या सुखदु:खांत सहभागी होणे, तिच्या कल्याणार्थ तलावासारखी लोकोपयोगी कृत्ये करणे, विद्येला उत्तेजन देणे, युद्धाखेरीज इतरत्र हिंसेपासून निवृत्त होणे इत्यादि राजकर्तव्ये आहेत, तीही या दोन राज-श्रेष्ठांनी पाळली होती असे त्यांच्याविषयीच्या लेखांत म्हटले आहे.[२]

प्राचीन काळी कल्याणकारी राज्याचा (Welfare State चा) आदर्श शासकांपुढे ठेवला जात असे. वेदिश्री सारखे आर्यवंशी राजे यज्ञयागांप्रमाणे पूर्तकर्मे (वापी, कूप, तडाग यांसारखी लोकोपयोगी कृत्ये) करीत यात नवल नाही. पण ऋषभदत्तासारखे शकवंशी शासकही हिंदू संस्कृतीने आत्मसात् केल्यामुळे तसली लोकोपयोगी कृत्ये करण्यात आनंद मानू लागले होते. नाशिकच्या लेण्यातील आपल्या लेखात[३] ऋषभदत्त सांगतो की त्याने भरुकच्छ (भडोच), दशपुर (मंदसोर), गोवर्धन आणि शोर्पारग (सोपारा) येथे प्रवाश्यांकरिता धर्मशाळा बांधल्या होत्या ; तसेच बगीचे, तलाव, पाणवठे निर्माण केले होते ; इबा, पारदा, दमण, तापी, करबेणा आणि दाहनुका या नद्या पार करण्याकरिता धर्मार्थ तरींची सोय केली होती ; तसेच या नद्यांच्या दोन्ही तीरांवर विश्रांति-स्थाने उभारली होती व पाणपोई घातल्या होत्या. सारांश, प्रवासी जनांचा प्रवास सुखकर होईल असे उपाय योजिले होते.

राजाच्या कर्तव्यात न्यायदान हे एक प्रमुख कर्तव्य मानले जाते. याविषयी उल्लेख कोरीव लेखांत येत नाहीत, पण आपस्तंब धर्मसूत्रात कांही आले आहेत. न्यायनिर्णयाचे एक प्रमुख तत्त्व हे की संशयावरून कोणालाही शिक्षा होऊ नये. आश्चर्याची गोष्ट ही की आपस्तंबाने त्याचा निर्देश केला आहे.[४] त्या काळच्या शिक्षा कठोर दिसतात. उदाहरणार्थ आपस्तंब सांगतो की पुरुषवध, चौर्य, भूमीचा अपहार या गुन्ह्यांबद्दल अपराध्याची सर्व मालमत्ता जप्त करून त्याला देहान्ताची शिक्षा द्यावी. पुष्कळशा गुन्ह्यांच्या बाबतीत प्रायश्चित्ते सांगितली आहेत.

'मृच्छकटिका'च्या नवव्या अंकात चारुदत्तावर वसन्तसेनेचा खून करण्याचा आरोप ठेवून खटला चालविला आहे. त्यात सातवाहन काळाच्या

१ क्र. १८, ओ. ५.

२ क्र. १८, ओ. ५ व क्र. ५१, ओ. ९ पाहा.

३ क्र. ४३, ओ. २.

४ न च सन्देहे दण्डं कुर्यात् । आ. ध. सू. २.५.११.२.

मध्यात क्षत्रपांच्या राज्यात न्याय – निर्णय कसा केला जात असे याचे सुन्दर चित्र दृष्टीस पडते. त्या काळी न्यायव्यवस्था चांगलीच प्रगत झाली होती यात संशय नाही.

अलीकडील राज्यशास्त्रात विश्वस्तवृत्तीची (ट्रस्टीशिपची) नवी कल्पना आली आहे. भूमि ही ईश्वरदत्त देणगी आहे. ती ज्याला मिळाली आहे त्याने अथक परिश्रम करून तिच्यातून शक्य ते उत्पन्न काढले पाहिजे. आळसानें कोणी तसे न केल्यास तो समाजाविरुद्ध गुन्हा मानण्यात येतो. या कल्पनेमुळेच कामगारांचे संप व मालकांची टाळेबंदी ही निषिद्ध मानली जातात आणि शासन त्यात हस्तक्षेप करते. यासारखाच विचार अडीच हजार वर्षापूर्वी रचलेल्या 'आपस्तंब – धर्मसूत्रां 'त आढळतो. आपस्तंब म्हणतो, जर एखाद्याने कसण्याकरिता जमीन घेतली आणि योग्य ते परिश्रम न केल्यामुळे तीतून उत्पन्न न निघाले तर, तो श्रीमंत असल्यास, त्याला नुकसान भरपाई करावयास लावावे. तसेच शेतावरील कर्मचारी काम टाकून निघून गेल्यास त्यास दण्डताडन करावे.[१] सकृद्दर्शनी यात धनिक वर्गाविषयी कोणास पक्षपात आढळेल पण एकंदरीत हे नियम समाजाच्या अंतिम हिताचे ठरतील.

१ क्षेत्रं परिगृह्योत्थानाभावात् फलाभावे यः समृद्धः स भावि तदपहार्यः। अवशिनः कीनाशस्य कर्मन्यासे दण्डताडनम। आ. ध सू. २·११·२८.१-२.

प्रकरण तिसरे

# धार्मिक परिस्थिति

सातवाहन-क्षत्रप काली भारतात हिंदू, बौद्ध व जैन धर्म प्रचलित होते. त्यांपैकी जैन धर्माचे लेख अद्यापि त्यांच्या राज्यात सापडले नाहीत. नाही म्हणावयास जुनागडजवळ सापडलेल्या जयदामन्च्या नातवाच्या कारकीर्दीतील एका खंडित लेखात केवलिज्ञान प्राप्त झालेल्या कोणा मुनीला काही दान दिल्याचा उल्लेख दिसतो तो लेख जैनधर्मविषयक असेल. बाकीच्या लेखांपैकी बहुतेक बौद्धधर्मीयांना दिलेल्या दानाविषयी आणि काही यष्टि किंवा स्मारकशिला उभारण्यासंबंधी आहेत. सातवाहन राजे स्वतः हिंदूधर्मी होते. उज्जैनीचे क्षत्रपही त्याच धर्माचे असावे ; कारण त्यांच्या लेखांत तसा स्पष्ट उल्लेख नसला तरी रुद्रदामन्, रुद्रसिंह, रुद्रसेन इत्यादि त्यांच्या नावांवरून तसे अनुमान करता येते. तसेच ते गोब्राह्मणांना पूज्य मानीत होते,[१] यावरून ते अनुमान समर्थित होते. तथापि नागनिकेचा नाणेघाटातील आणि ऋषभदत्ताचा नाशिकच्या लेण्यातील लेख वगळल्यास सातवाहन-क्षत्रपांनी हिंदू देवदेवतांस आणि ब्राह्मणांस दान दिल्याचे उल्लेख त्यांच्या लेखांत आढळत नाहीत. तेव्हा केवळ उपलब्ध कोरीव लेखांच्या संख्येवरून अनुमान काढले तर त्यांच्या राज्यात हिंदूधर्मीयांची संख्या नगण्य होती असे मानावे लागेल. पण तसे अनुमान चुकीचे होईल.

नागनिकेच्या नाणेघाटातील लेखात सातकर्णीने आणि तिने मिळून, आणि तिने स्वतःही अनेक श्रौत यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. त्या यज्ञांत ब्राह्मणांना ज्या दक्षिणा दिल्या त्या लक्षात घेतल्यास त्या काळी महाराष्ट्रातील हिंदु धर्माची परिस्थिति स्पष्ट होईल. त्यांपैकी काही यज्ञांचा येथे निर्देश करू. भगलदशरात्र यज्ञात दहाहजार-एक गाई आणि छंदोपवमान यज्ञात एकहजार-एक गाई दक्षिणा म्हणून दिल्या होत्या. सातकर्णीने अश्वमेध यज्ञ दोनदा केला होता. त्यांपैकी दुसऱ्या यज्ञात रूपालंकारासहित एक अश्व, १४००० कार्षापण, एक गाव, कांही हत्ती अशी दक्षिणा दिली होती.[२] अशा अनेक यज्ञांचे व त्यात दिलेल्या दक्षिणांचे उल्लेख नाणेघाटातील लेखात आले होते. त्यांपैकी फारच थोड्या यज्ञांची नावे तो लेख खंडित झाल्यामुळे आता वाचता येतात. तथापि, अवशिष्ट भागातही पुढील यज्ञांचे व त्यांत दिलेल्या उदार दक्षिणांचे उल्लेख आले आहेत ––

१ रुद्रदामनच्या जुनागड लेखातील ( क्रमांक ५१, ओ. १५ ) 'वर्षसहस्राय गोब्राह्म- . . . . र्थं' हा निर्देश पाहा.

२ क्रमांक ३, ओ. ११ पाहा.

अग्न्याधेय, अन्वारंभणीय, अंगारिक, दोन अश्वमेध, भगलदशरात्र, गर्गत्रिरात्र, गवामयन, अंगिरसामयन, शतातिरात्र, अंगिरसत्रिरात्र, छंदोपवमानत्रिरात्र, इत्यादि. या यज्ञांकरिता शेकडो श्रोत्रियांना आमंत्रण केले असले पाहिजे. त्यांना हजारो गाई देण्याकरिता केवढी मोठी गाईंची खिल्लारे त्या काळी महाराष्ट्रात असतील याची कल्पना करावी. ही झाली वेदवेत्त्या ब्राह्मणांची संख्या. यावरून हिंदूधर्मीयांच्या संख्येचे अनुमान करता येईल. सातवाहनकाळी कृष्ण यजुर्वेदाच्या आपस्तंब शाखेचा तसेच सामवेदाच्या काही शाखांचाही प्रसार दक्षिणेत झाला होता. त्यावरूनही वैदिक धर्माचा तत्कालीन प्रभाव अजमावता येतो.

याशिवाय पौराणिक धर्माचाही त्या काळी जनतेत प्रसार होता हे दाखविता येते. तत्कालीन एकही देवालय आता अस्तित्वात नाही. तथापि त्यांचे तत्कालीन अस्तित्व अनुमानण्यास आवश्यक तो पुरावा आहे. ऋषभदत्ताने नाशिकच्या एका लेखात भगवान् देव आणि ब्राह्मण यांना सत्तर हजार कार्षापण दिल्याचा उल्लेख आहे.[1] ब्राह्मणांना अर्थातच ही दक्षिणा दिली असणार. पण देवांना ही देणगी कोणत्या रूपाने दिली असेल ? अर्थात् त्यांच्या देवालयांच्या विश्वस्तांना किंवा पुजाऱ्यांना देवांचे नंदादीप, पूजा व नैवेद्य यांकरिता ती दिली असली पाहिजे. अर्थात् त्या देवांची देवालये त्या काळी असली पाहिजेत. तशी देवालये त्या काळी होती याविषयी पुरावा आहे. विदिशेजवळ भगवान् वासुदेवाचे (कृष्णाचे) सुप्रसिद्ध देवालय होते. त्याचा ध्वजस्तंभ तक्षशिलेचा अन्तलिकित (अँटिअलकिडस) राजाचा शुंगांच्या दरबारात नेमलेला वकील हेलियोदोर (हेलिओडोरस) याने उभारून त्यावर आपला लेख कोरून ठेवला होता हे सर्वविदित आहे.[2] घोसुंडी (चितोडगड जिल्हा) येथे संकर्षणाचे (बलरामाचे) आणि वासुदेवाचे (कृष्णाचे) देवालय ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात होते हेही एका कोरीव लेखावरून समजते.[3] सातवाहनांच्या आरंभीच्या काळात वासुदेव व बलराम यांची पूजा प्रचलित होती हे नाणेघाटातील नागनिकेच्या लेखाच्या आरंभी त्यांना नमन आहे त्यावरूनही स्पष्ट दिसते.

श्रौत यज्ञांचे अनुष्ठान आणि पौराणिक देवांची पूजा ही केवळ सातवाहन कालाच्या आरंभीच नव्हे तर त्या कालाच्या अखेरीपर्यंत प्रचलित होती. बौद्ध धर्माच्या सार्वत्रिक प्रसारामुळे त्यांत खंड पडला नव्हता. या बाबतीत अलीकडे विदर्भात सापडलेल्या मल्हारा ताम्रपटाचा पुरावा बिनतोड आहे. आम्ही इतरत्र[4] दाखविले आहे की हा ताम्रपट सातवाहनांच्या अस्तानंतर

१ क्रमांक ४३, ओ. १ मधील 'देवताभ्य: ब्राह्मणेभ्यश्च षोडशग्रामदेन' हा उल्लेख पाहा.
२ *J. B. B. R. A. S.*, XXIII, pp. 104 f.
३ *E. I.*, XVI, p. 27.
४ क्रमांक ६४ पाहा.

लौकरच दिला गेला होता. त्यात विदर्भातील एका विद्वान् व सच्छील ब्राह्मण वंशाच्या सहा पिढ्यांचा इतिहास आला आहे. यांतील पहिल्या तीन पिढ्यांतले पुरुष –सोम, वर्धन आणि मुंड हे – वेदवेत्ते, यज्ञानुष्ठानात सदैव व्यग्र, यम-नियमांचे आचरण करणारे आणि संयत वृत्तीने राहणारे सच्छील ब्राह्मण होते. चौथ्या पिढीतल्या राष्ट्रमहाराजाने आपल्या गुणाने (शौर्याने) राजपद मिळविले असे त्यात म्हटले आहे. तो त्या कुलातील पहिला राजा होय. त्याच्या राजकुल नामक पुत्राने अश्वमेध यज्ञ करून आपल्या राज्याचा विस्तार केला होता. सोम ब्राह्मणापासून पाचव्या पिढीतील आदित्यराजाने अनेक ब्राह्मणांस कित्येक गाव दान दिले असे त्या ताम्रपटात उल्लेखिले आहे. आम्ही इतरत्र दाखविल्याप्रमाणे या वंशातील पहिले तीन पुरुष सातवाहनकालाच्या अखेरीस होऊन गेले असावे. त्यांच्याप्रमाणे महाराष्ट्रातील इतर अनेक भागांत वेदवेत्ते ब्राह्मण यज्ञयागादिकांचे अनुष्ठान करून श्रुतिस्मृत्युक्त मार्गाने आपले जीवन व्यतीत करीत असावे. त्यांचे उल्लेख किंवा त्यांना दिलेली दाने अद्यापि मिळाली नसली तरी तसे श्रोत्रिय ब्राह्मण त्या कालात नव्हतेच असे म्हणता येणार नाही.

पण असे यज्ञयाग मोठ्या खर्चाचे व दीर्घकाळ चालणारे असल्याने ते सामान्य जनांच्या शक्तीबाहेर होते. त्यांच्याकरिता भक्तिमार्गाचा उपदेश भगवद्गीतेत केला आहे. मल्हारा ताम्रपटाच्या आरंभी 'नमः पुरुषोत्तमाय।' असे पुरुषोत्तमाला (विष्णूला) नमन आहे. तेव्हा पूर्वोक्त श्रोत्रिय कुल भागवत-संप्रदायी होते असे दिसते. त्या काळापूर्वीच भक्तिमार्गाचा प्रसार भारतात झाला होता. विदिशेजवळच्या ध्वजस्तंभावरील लेख कोरविणारा हेलियोदोर आपणांस 'भागवत' (भगवान् विष्णूचा उपासक) म्हणवितो. या कालात महाभारताला सध्याचे 'शतसाहस्री संहिते'चे रूप प्राप्त झाले होते हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[1] त्याशिवाय अनेक पुराणांना त्यांचे प्राथमिक रूप प्राप्त होऊन, त्यांतील कथांचा लोकांमध्ये प्रसार झाला होता. म्हणून पुळुमावीच्या नाशिक येथील लेखात गौतमीपुत्राची पराक्रमात राम, केशव (कृष्ण), अर्जुन आणि भीमसेन यांच्याशी, आणि तेजस्वीपणात नाभाग, नहुष, जनमेजय, सगर, ययाति, परशुराम आणि अंबरीष यांच्याशी तुलना केली आहे.[2] या वर्णनावरून तत्कालीन लोकांचा पौराणिक कथांशी परिचय आणि पौराणिक हिंदु धर्मा-विषयी त्यांची निष्ठा ही व्यक्त होतात.

पौराणिक हिंदुधर्मात यमनियमांप्रमाणे व्रते, उपवास, दान, तीर्थयात्रा, पूर्त (लोकोपयोगी कर्मे) इत्यादींचा पुण्योपार्जनाची साधने म्हणून उपदेश केला

---

१ सं. मु., सर ६, पृ. २७ इ.

२ क्रमांक १८, ओ. ८ पाहा.

आहे. सातवाहन कालात या सर्वांचा प्रचार होता. नागनिका ही महिना-महिना उपवास करीत असे. ती स्वतःच्या गृहात तपस्विनीप्रमाणे राहत असे, ती दीक्षा, व्रते, यज्ञ यांच्या अनुष्ठानात निपुण होती असे तिचे वर्णन आले आहे.[१] दुसरी वृद्ध सातवाहन राणी गौतमी बलश्री ही तप, दम, नियम व उपवास करणारी आणि सत्यवचन, दान, क्षमा, अहिंसा यांचे निष्ठापूर्वक आचरण करणारी होती असे म्हटले आहे.[२] तीर्थस्थली जाऊन स्नान करणे व तेथे दान देणे हा पुण्योपार्जनाचा उपाय गणला जाई. म्हणून मालवगणावर विजय मिळविल्यावर ऋषभदत्त मुद्दाम पुष्कर क्षेत्राला त्याकरिता गेला होता. गोसहस्रदान, लक्ष ब्राह्मण भोजन, स्वतःच्या खर्चाने ब्राह्मणांची लग्ने लावून देणे हेही तत्कालीन समजुतीप्रमाणे पुण्योपार्जनाचे उपाय होते. मात्र त्यांचा तसा निर्देश तत्कालीन मनुस्मृतीत आढळत नाही.

पूर्तकर्मांत तलाव खणणे, प्रपा (पाणपोई) घालणे, नद्या पार करण्याकरिता धर्मार्थ तरींची सोय करणे, धर्मशाळा बांधणे इत्यादिकांचा समावेश होता. ऋषभदत्ताने ही सर्व पुण्योपार्जनकृत्ये केली होती.[३]

दान करावयाचे ते पवित्र दिवशी केल्यास ते विशेष फलदायी होते, म्हणून ते संक्रान्ति, सूर्य–किंवा चंद्रग्रहण, एकादशी, शिवरात्रि, पौर्णिमा या प्रसंगी करावे ही कल्पना त्या काळात आढळत नाही. अशा तिथ्यादिकांचे उल्लेख हिंदू लेखांत येतात बौद्ध लेखांत आढळत नाहीत आणि हिंदू लेख तर सापडले नाहीत हेही तसे उल्लेख न सापडण्याचे कारण असावे.

मागे पुण्योपार्जनाचे एक साधन म्हणून दानाचा उल्लेख आला आहे. पण असे दान न स्वीकारणारे निःस्पृह ब्राह्मणही त्या काळात कमी नसावे. मागे उल्लेखिलेल्या मल्हारा ताम्रपटात मुण्ड ब्राह्मणाचे वर्णन या संदर्भात उल्लेखनीय आहे. त्याच्याविषयी म्हटले आहे[४] —

प्रतिग्रहादिग्धकरस्य यस्य
नित्यव्रतस्यापि हि दीक्षितस्य ।
यज्ञे वसोर्वासवतुष्ट(ष्टिं)मुक्ता
पपात धारा त्रिदिवादनल्पा ॥

त्या मुण्ड ब्राह्मणाचा हात दान घेण्याने कधीहि विटाळला नव्हता. तो नेहमी व्रतनिष्ठ आणि यज्ञाकरिता दीक्षित असे. म्हणून त्यांच्या यज्ञात संतुष्ट झालेला इन्द्र स्वर्गातून धनाची मोठी वृष्टि करीत असे.

---

१ क्रमांक ३, ओ. ५.
२ क्रमांक १८, ओ. ९.
३ क्रमांक ४३, ओ. १—३.
४ क्रमांक ६४, ओ. १४—१७.

कालिदासाने तर अशी वृष्टि खरोखरीच झाली असे 'रघुवंशा'त वर्णिले आहे.[१] वरील श्लोकाचा अर्थ इतकाच घ्यावयाचा की तो मुण्ड ब्राह्मण यज्ञाकरिता दान घेत नसला तरी इतर जन त्याच्या यज्ञाची सर्व सामग्री आपण होऊन जमवून देत असत. अगदी या तऱ्हेच्याच साधुपुरुषाचे विदर्भाच्या अमरावती नगरातील अलीकडील उदाहरण आम्ही इतरत्र उल्लेखिले आहे.

आता आपण बौद्ध धर्माकिडे वळू. बुद्ध – निर्वाणानंतर जवळ जवळ तीनशे वर्षे त्याच्या धर्माचा प्रसार दक्षिण भारतात झाला नव्हता. बौद्धांच्या प्राचीन वाङ्मयात महाराष्ट्राचे नाव येत नाही. प्राचीन पालि वाङ्मयात खालील सोळा महाजनपदांचा किंवा देशांचा उल्लेख आढळतो.[२] – अंग, मगध, काशी, कोसल, वृजि, मल्ल, चेदि, वत्स, कुरु, पांचाल, मत्स्य, शूरसेन, अश्मक, अवन्ति, गान्धार आणि काम्बोज. यांमध्ये अश्मकाखेरीज बाकी सर्व देश उत्तरेतील आहेत. गोदावरी तीरावरील प्रदेशास अश्मक असे नाव होते. 'सुत्तनिपाता'त त्याचा उल्लेख आला आहे. काही विद्वानांच्या मते अश्मक (किंवा अश्वक) हा अवन्ति देशाच्या वायव्येस असावा. आणि गोदातीरचा अश्मक ही नंतरची वसाहत असावी.[३] 'सुत्तनिपाता'त या गोदातीरच्या अश्मक देशाचा उल्लेख येण्याचे कारण त्या देशातील बावरि नामक ब्राह्मणाने आपल्या शिष्यांस बुद्धाचे दर्शन घेऊन त्यास काही प्रश्न विचारण्यासाठी पाठविले होते हे होय. बुद्धाच्या काळात मगध, कोसल, वत्स व अवन्ति ही उत्तर भारतीय राज्येच प्रबळ होती. मगधात बिंबिसार, कोसलात प्रसेनजित्, वत्सात उदयन आणि अवन्तीत चण्ड-महासेन–प्रद्योत हे बलाढ्य राजे राज्य करीत होते. त्यांची आपापसात कधी मैत्री व शरीरसंबंध तर कधी युद्धे होत असत. बुद्धचरित्रात महाराष्ट्राचे किंवा तेथील एखाद्या राजाचे नाव येत नाही.

महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा प्रवेश मौर्यकालात झाला. श्रीलंकेत 'दीपवंस' व 'महावंस' नामक इतिहासग्रंथ ख्रिस्तोत्तर चौथ्या–पाचव्या शतकात लिहिले गेले. त्यांमध्ये वर्णिले आहे की अशोकाच्या कारकीर्दीत पाटलिपुत्र येथे तिसरी बौद्ध संगीति (Buddhist Council) भरली होती. त्या प्रसंगी मोग्गली-पुत्त तिस्स याने अध्यक्षस्थान स्वीकारले होते. संगीतीचे काम आटोपल्यावर महास्थविर तिस्साने निरनिराळ्या देशांत धर्मोपदेशक पाठवून बौद्ध धर्माचा प्रसार करण्याचे ठरविले. त्यात कोणत्या देशात कोणत्या स्थविराला पाठविले होते हेहि त्या ग्रंथात दिले आहे. स्थविर मज्झन्तिकाला काश्मीर व गान्धारमध्ये

---

१ सर्ग ५, श्लोक २९.

२ अंगुत्तरनिकाय, पालि टेक्स्ट सोसायटी, व्हॉ. ४, २५२ इ.

३ Bhandarkar, *Carm. Lect.* 1918., pp. 53 f.

महारक्षिताला यवन देशात, मज्झिमाला हिमालयात, धर्मरक्षिताला अपरान्तात (उत्तर कोकणात), महाधर्मरक्षिताला महाराष्ट्रात, महादेवाला महिषमंडळात (दक्षिण हैदराबाद व त्या लगतच्या प्रदेशात), रक्षिताला वनवासीत (उत्तर कानडा जिल्ह्यात), सोण व उत्तर यांना सुवर्णभूमीत (ब्रह्मदेशात), आणि महेन्द्र व त्याचे सहचारी यांना श्रीलंकेत पाठविले होते. ही बौद्ध संगीति अशोकाच्या कारकीर्दीच्या सतराव्या वर्षी भरली होती. तेव्हा अशोकाच्या कारकीर्दीच्या सतराव्या-अठराव्या वर्षी महाराष्ट्रात बौद्ध धर्म प्रसाराला सुरवात झाली असावी.

अशोकाच्या प्रस्तर लेखांवरूनही त्या काळी धर्मप्रसारार्थ असा प्रयत्न केला होता असे दिसते. अशोक आपल्या तेराव्या प्रस्तर–लेखात म्हणतो, " सहाशे योजनांवर जेथे अंतियोग ( Antiochus ) नामक यवनराजा, तसेच आणखी चार राजे–तुरमय (Ptolemy), अंतेकिन (Antigonus), मग (Magas) आणि अलिकसुंदर (Alexander), तसेच चोल, पाण्डच, यवन, कंबोज, नाभक, नाभपंक्ति, भोज, पेतनिक, अंध्र, पुलिंद हे सर्व देवानां-प्रियाच्या धर्मोपदेशाचे अनुकरण करीत आहेत".[१] यातील भोज म्हणजे विदर्भ आणि पेतेनिक (किंवा पैठणिक) म्हणजे पैठणजवळचा प्रदेश यांचे उल्लेख आपल्या प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. तसाच त्यात अपरान्त (उत्तर कोंकण) याचा उल्लेख आला आहे. या प्रस्तर-लेखाचा काळ अशोकाच्या राज्याभिषेकापासून बारावे किंवा तेरावे वर्ष हा असावा. श्रीलंकेतील 'महावंसा'त हे वर्ष सतरावे असे दिले आहे. अशोकाला राज्याभिषेक तो गादीवर आल्यानंतर चार वर्षांनी झाला होता हे लक्षात घेतल्यास या दोन्ही उल्लेखांची संगति लावणे कठीण होणार नाही. तेराव्या प्रस्तर-लेखात उल्लेखिलेले सर्व पाश्चात्य राजे ख्रिस्तपूर्व २६० (कांहींच्या मते २५०) या वर्षी हयात होते. त्यावरून ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास महाराष्ट्रात बौद्ध धर्मप्रसारास सुरुवात झाली असे म्हणावयास हरकत नाही.

अशोकाच्या राज्यारंभापासून बाराव्या किंवा तेराव्या वर्षी महाराष्ट्रात बौद्ध धर्माच्या प्रसारास आरंभ झाला याचे एक गमक विदर्भात सापडले आहे. चांदा जिल्ह्यातील देवटेक गावी सापडलेला ब्राह्मी लिपीतील एक खंडित लेख कांही वर्षांपूर्वी आम्ही प्रसिद्ध केला होता.[२] त्यात प्राण्यांचे बंधन किंवा हिंसा करू नये अशी एका स्वामीची (अधिपतीची) आज्ञा जाहीर केली होती. लेखाच्या अक्षरवटिकेवरून हा स्वामी अशोकच असावा असे दिसते. या लेखाच्या

---

१ अशोकाचा तेरावा प्रस्तर-लेख पाहा.

२ *S. I.* (second ed.), pp. 125 f.

शेवटी चौदावे वर्ष उल्लेखिले आहे. अशोकाने विदर्भात नेमलेल्या धर्ममहामात्राने त्याच्या राज्याभिषेकाच्या चौदाव्या वर्षी ही राजाज्ञा सर्व लोकांस कळविलेली दिसते. त्यावरून विदर्भात तसेच महाराष्ट्राच्या इतर प्रदेशांत राजाज्ञेवरून बौद्ध धर्माच्या अहिंसा तत्त्वाचा कसा प्रचार चालू होता ते समजेल.

महाधर्मरक्षिताने महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा कसा प्रसार केला यासंबंधी 'महावंसा'त खालील गाथा आल्या आहेत—

**महारट्ठं इसी गन्त्वा सो महाधम्मरक्खितो।**
**महानारदकस्सपाव्हं जातकं कथयी तहिं ।।**
**मग्गफलं पापुणिंसु चतुरासीति सहस्सका।**
**तेरसं तु सहस्सानि पब्बजिंसु तदन्तिके ।।**

(तो महात्मा महाधर्मरक्षित महाराष्ट्रात गेला आणि तेथे त्याने महानारदकस्सप जातकाची कथा सांगितली. तेव्हा चौऱ्यांशी हजार लोक बौद्ध मार्गाचे फल प्राप्त करते झाले आणि तेरा हजार लोकांना त्याने भिक्षु केले.)

एका जातकाच्या प्रचाराने इतके लोक बौद्ध धर्माची दीक्षा घेते झाले हे विधान एखाद्या पुराण ग्रंथात शोभण्यासारखे आहे. तथापि या जातकात वर्णिलेल्या पद्धतीने महाधर्मरक्षिताने महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा प्रचार केला असणे अशक्य नाही. हे महानारदकस्सपजातक त्रिपिटकातील जातकसंग्रहात ५४४ क्रमांकाचे आहे. त्याची कथा संक्षेपाने पुढे दिली आहे —

"प्राचीन काळी विदेह देशाच्या मिथिला नगरीत अंगति नामक राजा राज्य करीत होता. त्याला रुजा नामक एक अत्यंत सुन्दर व धार्मिक वृत्तीची कन्या होती. एकदा पौर्णिमेच्या महोत्सवप्रसंगी राजाने आपल्या तीन मंत्र्यांना आपण ही चांदण्याची रात्र कशी घालवावी याविषयी सल्ला विचारला. तेव्हा एका मंत्र्याने शत्रूवर स्वारी करावी असे सुचविले ; दुसऱ्याने ऐषआरामात, नृत्यगीतवाद्यांत काल घालवावा असे आपले मत दिले ; तर तिसऱ्याने एखाद्या धर्मशास्त्रविशारद अशा श्रमणाला किंवा ब्राह्मणाला हा प्रश्न विचारून त्याच्या उपदेशाप्रमाणे वागावे असा सल्ला दिला. राजाला हा शेवटचा सल्ला पसंत पडला. तेव्हा ते सर्वजण एका काश्यपगोत्री गुणनामक नग्न क्षपणकाकडे गेले. त्याने राजाला दैववादाचा उपदेश केला. तो म्हणाला, 'राजा, परलोक वगैरे सर्व मिथ्या आहे. सद्वर्तनाचा काही उपयोग नाही ; प्रत्येकाला त्याच्या दैवात असेल तेच मिळते. प्रत्येकाला चौऱ्यायशी महाकल्पांतून जावेच लागते. तोपर्यंत पुण्य केले तरी सुटका नाही, आणि पाप केले तरी ही मर्यादा वाढत नाही.' राजाने हा उपदेश ऐकून विषयोपभोगात आपला सर्व काळ घालविण्याचा निश्चय केला. राज्यकारभार आपल्या मंत्र्यांवर सोपवून तो ऐषआरामात गढून गेला. पण त्याची कन्या रुजा ही अत्यंत धार्मिक वृत्तीची होती. तिने

त्याला सद्वर्तनाचा उपदेश केला. तिला आपल्या पूर्वजन्माचे ज्ञान असल्यामुळे तिने आपल्या पूर्वजन्मी केलेल्या पापामुळे आपणास रौरव नरकात अनेक वर्षे कसे पिचत पडावे लागले, नंतर आपण मर्कट, वृषभ वगैरे योनींतून कसे गेलो, शेवटी सद्वर्तनाने आपणास सध्याचा मनुष्यजन्म कसा प्राप्त झाला वगैरेंचे वर्णन करून राजाचे मन सदाचरणाकडे वळविण्याचा प्रयत्न केला. पण त्यात तिला यश आले नाही. तेव्हा तिने लोकरक्षक महात्म्यांची प्रार्थना केली. तिची प्रार्थना ऐकून नारदकस्सप नामक बोधिसत्त्व परिव्राजक – वेषाने तेथे आला. राजाने त्याचा सन्मान करून परलोकाच्या अस्तित्वाविषयी प्रश्न केला. 'परलोक आहे यात संशय नाही, पण लोभ – मोहाने ग्रस्त झालेल्या लोकांना तो नाहीसा वाटतो' असे परिव्राजकाने सांगताच राजाने म्हटले, "असे असेल तर मला आता ५०० नाणी द्या, मी तुम्हांस स्वर्गात १००० नाणी परत करीन." त्यावर परिव्राजक म्हणाला, "राजा, तू मृत्यूनंतर स्वर्गात थोडाच जाणार आहेस. तू आपले पापाचरण सोडले नाहीस तर नरकात जाशील व तेथे विविध यातना भोगीत राहशील. तेथे तुझ्याकडे नाणी परत मागण्यास कोणी जावे ?" नंतर नारदाने नरकातील अनेक भयंकर दुःखांचे अंगावर शहारे आणणारे शब्दचित्र काढले तेव्हा भयभीत होऊन राजा त्याला शरण गेला. नंतर नारदाने अनेक प्राचीन सद्वर्तनी राजांची उदाहरणे देऊन त्याला सद्धर्माचा उपदेश केला आणि स्वतः अन्तर्धान पावला".

या जातकात पापाचरणामुळे नरकात कशा यातना भोगाव्या लागतात याचे हृदयद्रावक चित्र काढले आहे. 'महावंसा'तील वर्णनात तथ्य असल्यास अशा गोष्टींनी महाधर्मरक्षितादि प्रचारकांनी बौद्ध धर्माचा प्रसार केला असेल. अशोकानेही अशाच साधनांचा उपयोग धर्मप्रसाराकरिता केला होता असे त्याच्या प्रस्तरशासनांवरून दिसते. चौथ्या प्रस्तरशासनात अशोक म्हणतो, "पुष्कळ काळ, शेकडो वर्षे, प्राण्यांचा नाश, जीवांची हिंसा, नातलग, ब्राह्मण, श्रमण यांविषयी अनादर वाढत चालला होता. पण आता देवांनाप्रिय प्रियदर्शी राजाच्या धर्माचरणाने भेरीघोष हा (युद्धघोष न होता) धर्मघोष झाला आहे. त्याने विमाने (आकाशातील दिव्य वाहने किंवा स्वर्गातील प्रासाद), हत्ती, अग्निस्कन्ध इत्यादि दिव्य देखावे दाखविले आहेत. त्यांमुळे शेकडो वर्षे झाली नव्हती अशी धर्मवृद्धि झाली आहे." नारदकस्सप बोधिसत्त्वाने जे शब्दांनी वर्णिले होते ते अशोकाने देखाव्यांच्या रूपाने दाखवून पुण्याचरणामुळे स्वर्गातील प्रासादांत किंवा दिव्य विमानांतून व हत्तींवरून कसा विहार करता येतो, उलट पापाचरणामुळे कसे अग्निस्तंभ कवटाळावे लागतात, हे लोकांना पटवून दिले.

महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा प्रसार होऊ लागल्यावर तेथील भिक्षूंची संख्या वाढू लागली, आणि त्यांच्या राहण्याकरिता विहार, धर्मोपदेशकांकरिता

चैत्यगृहे किंवा गन्धकुटी, आणि पूजेकरिता स्तूप ठिकठिकाणी पर्वतांतून कोरण्यात आले. महाराष्ट्रातील लेणी व त्यांतील कोरीव लेख ही प्राचीन काळी महाराष्ट्रात झालेल्या बौद्धधर्मप्रसाराची चिन्हे होत.

भारताच्या इतर काही भागांतही पर्वतांतून किंवा विशाल खडकांतून कोरलेली लेणी आहेत; पण महाराष्ट्रातील लेण्यांप्रमाणे ती विपुल, विशाल व सुंदर नाहीत. महाराष्ट्रातील लेण्यांची संख्या जवळजवळ हजार आहे. त्यांतील काही अगदी लहान, तर इतर कांही अत्यंत विशाल असून त्यांचे स्थापत्य व शिल्प, व काहींत सुदैवाने अद्यापि अवशिष्ट असलेली चित्रे, ही अत्यंत सुंदर व आश्चर्यकारक आहेत. यांविषयी माहिती पुढील एका प्रकरणात दिली आहे.

ही लेणी तीन प्रकारची आहेत. काही स्तूपरूपी आहेत. स्तूप म्हणजे पूज्य व्यक्तीच्या अवशेषांवर उभारलेला व दगड, माती, विटा यांनी बनविलेला किंवा पर्वतात कोरलेला अर्धगोलाकृति ढिगारा. यालाच दागोब (धातुगर्भ) व चैत्य अशी दुसरी नावे आहेत. दुसरा प्रकार विहार. हे विहार भिक्षूंना राहण्या-करिता बांधले किंवा कोरले जात. ते एका विशिष्ट भिक्षुसंघाच्या ताब्यात दिले असले तरी ते चारी दिशांच्या भिक्षूंकरिता पावसाळ्यात आश्रयार्थ दिले असत आणि तसा स्पष्ट उल्लेख प्रत्येक दानलेखात केला असे. तिसरा प्रकार चैत्यगृह किंवा गन्धकुटी. त्याचा उपयोग भिक्षूंच्या प्रार्थनेकरिता केला जात असे. विहार व चैत्यगृहांजवळ पिण्याच्या पाण्याची टाकी खोदली जात. त्यांना 'पोढी' म्हणत.

क्षत्रप व सातवाहन वंशांतील राज्यकर्त्यांचा बौद्ध धर्माला उदार आश्रय असे. ऋषभदत्ताने व त्याची पत्नी दक्षमित्रा हिने नाशिक येथे एक लेणे कोरविले होते. गौतमीपुत्र सातकर्णि, पुळुमावि, यज्ञ सातकर्णि वगैरे सातवाहनांनीही लेणी कोरवून भिक्षुसंघांना अर्पण केली होती. तसेच त्यांच्या अनेक मांडलिकांचा व सरदारांचाही बौद्ध धर्मास आश्रय होता. त्यांनी व त्यांच्या कुटुंबियांनी अनेक लेणी कोरविली होती. या मांडलिकांना महाभोज व महारठी अशा पदव्या होत्या. उदाहरणार्थ, कुडा येथील लेखात महाभोजी विजयेचा पुत्र महाभोज स्कन्दपालित याचा,[१] महाड येथील लेण्यात कुमार काणभोजाचा[२], भाजे येथील लेण्यात महारठि कौशिकीपुत्राचा,[३] बेडसा येथील लेण्यात महाभोजा बालिका महादेवी महारथिनी सामडिनिकेचा[४] आणि कार्ल्याच्या चैत्यगृहात महारथी गौप्तीपुत्र अग्निमित्रणकाचा[५] उल्लेख आहे.

१ *I. C. T. W. I.*, p. 4.
२ *A. S. W. I.*, IV, p. 88
३ *Ibid.*, p. 83.     ४ *Ibid.*, p. 90.
५ *I. C. T. W. I.*, p. 28.

केवळ राजे, क्षत्रप, त्यांचे मांडलिक, सरदार वगैरेंनीच महाराष्ट्रात बौद्धधर्माला देणग्या दिल्या होत्या, असे नाही. ख्रिस्तपूर्व व ख्रिस्तोत्तर दोन-तीन शतकांत महाराष्ट्रात सामान्य जनांनीही बुद्ध धर्माचा पुरस्कार केला होता. लेणे कोरविणे हे स्वर्गप्राप्तीचे साधन मानले जात असे. अजंटा येथील सव्वीस क्रमांकाच्या लेण्यातील लेखात म्हटले आहे—[१]

**यावत्कीर्तिर्लोके तावत्स्वर्गेषु मोदते देही।**
**चन्द्रार्ककालकल्पा कार्या कीर्तिर्महीध्रेषु ।।**

[जोपर्यंत विहार—चैत्यांसारखे पुण्यकृत्य या जगात विद्यमान आहे, तोपर्यंत ते करणारा मनुष्य स्वर्गलोकात आनंदाने राहतो. म्हणून पर्वतांमध्ये यावच्चन्द्रदिवाकरौ टिकणारी लेणी कोरवावी.]

पर्वतांतल्या लेण्यांप्रमाणे दगड, विटा, मातीचे स्तूप, चैत्ये व विहार बांधले जात. विदर्भात पौनी येथे बौद्ध धर्माचे एक सुप्रसिद्ध केंद्र होते. तेथे नागपूर विद्यापीठाने केलेल्या उत्खननाने दोन स्तूप निदर्शनास आणले आहेत.[२] त्यांपैकी एक सांची, भारहूत येथील स्तूपासारखा कठडा वगैरेंनी सुशोभित केला होता. लेण्यांतल्या प्रमाणे येथेही अनेक धार्मिक स्त्री-पुरुषांनी लेख कोरवून आपल्या देणग्यांचे उल्लेख केले आहेत. लेणी व स्तूप यांना देणग्या देणाऱ्यांमध्ये समाजातील सर्व थरांचे लोक होते. त्यांमध्ये भदन्त किंवा भिक्षु, प्रव्राजिका किंवा भिक्षुणी, ब्राह्मण, ब्राह्मणी, यवन, शक, त्यांच्या स्त्रिया, माळी, सुवर्णकार (सोनार), लोहवणिज, वंशकार (बुरुड), कांस्यकार, गृहपति (गृहस्थ), सार्थवाह (व्यापारी), हालिक (शेतकरी), त्यांच्या स्त्रिया, श्रेष्ठी (सावकार), गांधिक इत्यादि अनेक वंशांचे, जातींचे व धंद्यांचे लोक आढळतात. महाराष्ट्रातील पर्वत लेणी कोरण्यास चांगले असल्यामुळे तेथे ती कोरवून घेऊन भिक्षुसंघास अर्पण करण्याकरिता दूरदूरचे लोक येत असत. कान्हेरी (प्राचीन कृष्णगिरि) येथील स्तूप गौतम बुद्धाचा अग्रशिष्य सारिपुत्र याच्या स्मरणार्थ सिंध प्रदेशातून आलेल्या बुद्धरुचीने बांधला होता.[३] कार्ल्याच्या भव्य चैत्य लेण्यात खालील लेख आढळतो—[४]

**वैजयंतिये सेठिणा सेलघरं भूतपालेन परिनिठपितं जंबुदीपम्हि उत्तमं।**

त्यावरून सर्व जंबुद्वीपात (भारतात) अद्यापि अत्युत्कृष्ट असे गणले गेलेले हे चैत्य लेणे वैजयंतीचा श्रेष्ठी (सावकार) भूतपाल याने कोरविले होते, असे समजते. वैजयंती ही उत्तर कानडा जिल्ह्यातील सध्याची वनवासी.

---

१ अजंटा येथील क्रमांक २६ च्या लेण्यातील लेख पाहा. *A. S. W. I.* IV, pp 13,-4.
२ *Pavni Excavations*, pp. 25 f.
३ *C. I. I.* IV, pp. 29 f.
४ *I. C. T. W. I.*, p. 28.

ती एका सातवाहन शाखेची राजधानी होती. इतक्या दूरच्या प्रदेशातून येऊन त्या सावकाराने हे सुंदर लेणे कोरविले होते. तेव्हा करहाड (कऱ्हाड), धेनुकाकट, शूर्पारक (सोपारा), कलिअण (कल्याण), चेमुल (चौल), वस्य (वसई), स्थानक (ठाणे) इत्यादि जवळपासच्या स्थलांच्या दात्यांचा निर्देश पश्चिम भारतातील लेण्यांच्या लेखांत आला असला तर त्यात आश्चर्य नाही.[१]

गौतम बुद्धाच्या काळीही भिक्षूंमध्ये किरकोळ मुद्यांवर मतभेद उत्पन्न झाले होते. अशोकाने केलेल्या धर्मप्रसारामुळे दूरदूरच्या प्रदेशांत बौद्ध धर्माची केंद्रे अस्तित्वात आली. त्या काळी दळणवळणाची साधने कमी आणि त्यामुळे उत्पन्न झालेला केंद्रिय नियंत्रणाचा अभाव या कारणांनी भारताच्या अनेक भागांत भिन्नभिन्न निकाय (बौद्ध संघ) निर्माण झाले. त्यांची संख्या अठरा भरते. त्यांच्यांत किरकोळ बाबींवर मतभेद असल्यामुळे पुढे त्यांच्यापैकी कांही इतर शाखांत विलीन झाले. गौतमबुद्धाच्या परिनिर्वाणानंतरच्या दुसऱ्या शतकात अस्तित्वात आलेल्या महासंघिक संघाच्या आठ शाखा निर्माण झाल्या. त्यांत एक–व्यावहारिक, लोकोत्तरवाद, अपरशैलिक आणि पूर्वशैलिक या प्रमुख होत्या. हा संघ वैशालीमध्ये उत्पन्न झाल्यावर तो पूर्वेकडील प्रदेशांत पसरला आणि तेथून दक्षिणेत आला.[२] अंध्र प्रदेशातील धान्यकटक (सध्याचे धरणीकोट) हे महासंघिकाचे मुख्य केंद्र होते. तेथील लेखांत त्याच्या सर्व शाखांचे उल्लेख आढळतात. म्हणून ते सातवाहनकाली दक्षिणेतील प्रमुख बौद्ध केंद्र झाले होते यात संशय नाही.[३] या महासंघिक शाखेचे भिक्षु महाराष्ट्रातील कार्ले आणि कान्हेरी येथील लेण्यांतील लेखांत उल्लेखिले आहेत.

दुसरा प्रमुख बौद्ध संघ स्थविरवाद हा महासंघिकानंतर सुमारे एक शतकाने निर्माण झाला. त्याच्या सर्वास्तिवाद आणि हैमवत (किंवा मूलस्थविरवाद) अशा दोन शाखा मुख्य होत्या. सर्वास्तिवादाचा प्रसार उत्तरेत मथुरेपासून पंजावातील नगरहारापर्यंत आणि तक्षशिलेपासून काश्मीर पर्यंत होता. सर्वास्तिवादाची भदायनीय (किंवा भदावनीय) शाखा विदर्भात पौनी येथे प्रमुख होती.[४] पुढे या शाखेचे भिक्षु नाशिक[५] व कान्हेरी[६] येथे गेलेले दिसतात. त्यांना सातवाहनांनी अनेक लेण्यांच्या व ग्रामांच्या देणग्या दिल्या होत्या.

---

१ *I. C. T. W. I.*, pp. 28 f.

२ *2000 Years of Buddhism*, pp. 112 f.

३ *Amarāvatī Sculptures in the Madras Museum*, pp. 14 f.

४ येथून ते पश्चिम महाराष्ट्रात गेले.

५. क्रमांक १८, ओ. १०.

६ क्रमांक २८, ओ. ९-१०.

याशिवाय आणखीही कांही शाखांचे उल्लेख महाराष्ट्रातील लेखांत येतात, जसे सोपारा, जुन्नर आणि कार्ले येथील धर्मोत्तरीय[१], व सौवर्षक[२] किंवा काश्यपीय, जुन्नर येथील चैत्यक[३] आणि अपराजित.[४]

सातवाहनकाळात दक्षिणेत हीनयानाचा सर्वत्र प्रसार होता. म्हणून लेण्यांतील चैत्याची (स्तूपाची) पूजा होत असे, बुद्धमूर्तीची नव्हे. पुढे कनिष्काच्या कारकीर्दीत महायानाचा उदय होऊन बुद्धमूर्तीची पूजा होऊ लागली. सातवाहन कालाच्या अखेरीस नागार्जुन हा महायानांचा प्रमुख तत्त्वज्ञ झाला. पण त्याच्या तत्त्वज्ञानाचा व धार्मिक मताचा प्रभाव सातवाहन काळात पडू लागला नव्हता.

स्तूपाची पूजा पुष्पे, धूप, दीप इत्यादिकांनी केली जात असे. दीपाला विशेष महत्त्व असे. स्तूपासमोर दिवा सतत तेवत ठेवणे विशेष पुण्यप्रद मानले जाई. बौद्ध चैत्यात सदैव दिवा तेवत राहावा म्हणून दान दिले जात असे.[५]

चैत्य व विहार लेण्यांची व्यवस्था एका मुख्य भिक्षूकडे असे त्याला 'महास्वामी' असे म्हणत. तो संघाला मिळालेल्या देणग्यांची व ग्रामदानांची व्यवस्था करी. भिक्षूंची राहण्याची व चीवरांची व्यवस्था उदार दाते जवळच्या श्रेणींमध्ये (व्यापारी पेढ्यांमधे) कायम ठेवी ठेवून करीत असत. क्र. ३८ च्या लेखात प्रत्येक भिक्षूला दरवर्षी १२ कार्षापण चीवराकरिता मिळावे अशी व्यवस्था ऋषभदत्ताने केली असल्याचे नमूद केले आहे. याशिवाय त्याने भिक्षूंच्या कुशणमूलाकरिताही काही ठेव ठेवली होती. 'कुशणमूला'चा अर्थ विद्वानांना कळला नव्हता. त्याचा अर्थ आरोग्याला आवश्यक औषधे असा आहे.[६] नाशिक येथील क्र. १० च्या लेण्यातील एका लेखात त्याला 'गिलानभेषज' म्हटले आहे.[७]

भिक्षूंनी जवळच्या लोकवस्तीत भिक्षा (पिण्डपात) मागून स्वोदर-पूर्ति करावी असा नियम असे. भिक्षेमध्ये मुद्दाम स्वतःकरिता मांस तयार केले नसेल तर ते घेण्याची अनुज्ञा असे. बौद्ध धर्मात हिंसा निषिद्ध आहे. पण त्या काळी लोक बहुतांशी मांसभोजी असल्याने अशी अनुज्ञा दिली नसती तर भिक्षूंना बहुधा नेहेमी उपोषणच करावे लागले असते.

भिक्षूंनी हिवाळ्यात व उन्हाळ्यात धर्मप्रचारार्थ हिंडून वर्षाकाळात एखाद्या विहारात आश्रय घ्यावयाचा असे. तो विहार एखाद्या विशिष्ट संघ-

---

१ *I. C. T. W. I.*, p. 32.

२ क्रमांक २०, ओ. २.

३ *A. S. W. I.*, IV, p. 95.

४ *I. C. T. W. I.*, p. 44. ५ *Ibid.*, p. 11.

६ परिशिष्ट ६ पाहा. 'कुशणमूल' हे तेथे 'कुशलमूल'बद्दल चुकीने कोरले आहे.

७ *C. I. I.*, IV, p. 3.

शाखेच्या स्वाधीन केला असला तरी त्यात चारी दिशांच्या भिक्षूंस आश्रय दिला पाहिजे असा नियम असे. म्हणूनच लेण्याचे दान करताना ते 'चारी दिशांच्या भिक्षुसंघांकरिता अमुक भिक्षुसंघाच्या स्वाधीन केले' असा स्पष्ट निर्देश घालण्यात येई.

बुद्धाने भिक्षूंना व भिक्षुणींना सोन्या-चांदीचे दान स्वीकारण्यास मनाई केली होती. वैशाली येथील संगीतीत हा नियम शिथिल करावा अशी मागणी पुढे आली. पण ती संमत झाली नाही. तथापि नंतर हा नियम पाळला जात होता असे दिसत नाही. कारण कित्येक कोरीव लेखांत भिक्षु-भिक्षुणींनी लेण्यांतील शिल्पे, क्वचित् सबंधही लेणी, कोरविण्याचा खर्च भागविल्याचे उल्लेख आहेत. कार्ले येथे दोन हस्तिशिल्पांचे दान आचार्य इंद्रदेव नामक भिक्षूने केले होते.[१] दुसऱ्या एका भद्रसेन नामक भिक्षूने मिथुनाचे (दंपतीचे) शिल्प स्वखर्चाने कोरविले होते.[२] कुडा येथील एक सबंध लेणे व जवळची टाकी परिव्राजिका (भिक्षुणी) पद्मिनिका हिने स्वखर्चाने कोरविली होती.[३] या भिक्षु-भिक्षुणीं-जवळ इतके धन कोठून आले? एक तर ते त्यांच्या शिष्य-शिष्यिणींनी दिले असावे किंवा त्यांनी आपल्या सधन नातलगांकडून धर्मार्थ मिळविले असावे.

विहारांमध्ये भिक्षूंप्रमाणे भिक्षुणींचीही राहण्याची व्यवस्था केली असे. या भिक्षुणी वहुधा पतिनिधनानंतर संन्यासिनी झालेल्या असाव्या. क्वचित् कांहीना लग्नापूर्वीही संघप्रवेशाची अनुज्ञा मिळाली असेल. कुडा येथील एका लेखात दोन भिक्षूंच्या पद्मिनिका नामक भाचीने आपल्या दोन शिष्यिणीं-सहित धर्मदाय म्हणून लेणे व टाके कोरल्याचा उल्लेख आहे.[४] या पद्मिनिकेच्या पतीचा किंवा मुलाचा त्या लेखात पुण्यप्राप्तीच्या उद्देशाने निर्देश नाही. तिच्या भिक्षू झालेल्या मामांचा मात्र आहे. त्यावरून त्यांचे उदाहरण पाहून तिनेही बौद्ध धर्माची दीक्षा घेतलेली दिसते.

काही भिक्षू विहारांत अध्यापनाचे कार्य करीत. त्यांना 'गणाचार्य' म्हणत. भिक्षूंना भिक्षुणींना अंतेवासी (शिष्य) करण्याची अनुज्ञा असे, पण भिक्षुणींना भिक्षु शिष्य करण्याची परवानगी नव्हती.

सातवाहनकाली यवन, शक व पल्लव यांच्या अनेक टोळ्या भारतात आल्या. त्यांपैकी कित्येकांनी येथे कायमचे वास्तव्य केले आणि हिंदू धर्म किंवा बौद्ध धर्म स्वीकारला. विदिशेजवळच्या विष्णुमंदिराचा गरुडध्वज तक्षशिलेच्या यवनराजाचा दूत हेलियोदोर (हेलिओडोरस) याने उभारल्याचा उल्लेख

१ *I. C. T. W. I.*, p. 29.
२ *Ibid.*, p. 35.
३ *A. S. W. I.*, IV, p. 85.
४ *I. C. T. W. I.*, p. 6.

मागे आला आहे. अशी उदाहरणे अनेक असतील; पण तत्कालीन हिंदू मंदिरे आता अवशिष्ट नसल्याने आणि ती असती तरी बौद्ध विहारांतल्याप्रमाणे हिंदू मंदिरांत आपली नावे कोरून ठेवण्याचा प्रघात नसल्यामुळे त्यांचे उल्लेख आढळले नसावे. बौद्ध लेण्यांमध्ये मात्र ते पुष्कळ आहेत. सिंधमध्ये ग्रीक राजा डेमेट्रियस याने आपल्या नावे दत्तामित्री नामक नगर स्थापले होते. नाशिक येथील एका लेखात दांतमित्री (दन्तामित्री) येथील यवन धम्मदेवाचा पुत्र इंद्राग्निदत्त याच्या दानाचा उल्लेख आहे.[१] यवन म्हणजे आशियामायनर मधील आयोनिया देशातील ग्रीक होय. कार्ले येथे सीहधय आणि धम्म या यवनांनी दिलेले दान नोंदले आहे.[२] नाशिकच्या क्र. १० च्या लेण्यात विष्णुदत्ता नामक शकनिकेने (शक स्त्रीने) आजारी भिक्षूंच्या औषधाकरिता जवळच्या श्रेणीत कायमची ठेव ठेवली होती.[३] शकवंशी ऋषभदत्त व त्याची पत्नी दक्षमित्रा यांनी नाशिक येथे एक लेणे कोरविले होते. ऋषभदत्ताने तर भिक्षूंची चीवरे, औषधे व आहार यांकरिता अक्षयनीवि ठेवून कायमची व्यवस्था केली होती.[४] कार्ले येथील एक विहार अबुलामा येथील सेतफरणाचा पुत्र हरफरण याने खोदविला होता. नावावरून तो पह्लववंशी दिसतो.[५]

या काली हिंदू धर्म व बौद्ध धर्म यांत सामंजस्य व सलोखा दिसतो. कृष्णराज स्वतः वैदिक धर्माचा अनुयायी होता, पण त्याच्या महामात्राने बौद्ध भिक्षूंकरिता एक लेणे कोरविले होते. गौतमी बलश्री ही स्वतः हिंदू राजवंशातील पट्टराणी होती; पण तिची बौद्ध धर्मावर निःसीम निष्ठा होती. तिने आपला पुत्र सातकर्णि याला सांगून नाशिकच्या भिक्षूंना ग्रामदान करविले होते व त्यांच्याकरिता एक विशाल लेणे कोरविले होते. कुडा येथील क्र. १३ च्या लेखात अयितिलु या ब्राह्मण उपासकाची ब्राह्मण पत्नी भायिला हिच्या चैत्य-गृहरूपी दानाचा निर्देश आहे.[६] बौद्ध भिक्षूंनाही राजे लोकांनी हिंदू धर्मीयांना दिलेल्या दानांबद्दल वैषम्य वाटत नव्हते. म्हणून त्यांनी ऋषभदत्ताने हिंदू देव-देवतांना व ब्राह्मणांना दिलेल्या अनेक दानांचे वर्णन आपणांस दिलेल्या विहारात प्रमुख ठिकाणी कोरण्यास आक्षेप घेतला नसावा. पुढे हिंदू व बौद्ध तत्त्वज्ञानांची परिणति होऊन त्यांच्या अनुयायांनी वादविवादात तीव्र वाक्प्रहार केलेले त्यांच्या ग्रंथांत दिसत असले तरी व्यवहारात त्यांच्यामध्ये सामंजस्य होते यात संशय नाही.

---

१ *A. S. W. I.*, IV, p. 115.

२ *I. C. T. W. I.*, p. 31.

३ *C. I. I.*, IV, p. 3.

४ क्रमांक ३८, ओ. १-३ पाहा.

५ क्रमांक २०, ओ. २.

६ *A. S. W. I.*, IV, p. 86.

ब्राह्मणांना दिलेल्या गावाच्या किंवा शेताच्या दानाला 'ब्रह्मदाय' म्हणत, तसे भिक्षूंना दिलेल्या शेताला 'भिखुहल'[१] असे नाव होते. ही दाने देताना राजे लोक तत्संबंधी सवलती नमूद करीत. त्या गावात किंवा शेतात कोणीही प्रवेश करू नये, त्यात कोणीही ढवळाढवळ करू नये, त्यात मिठाकरितां खणू नये, त्यात राजाच्या सैनिकांनी किंवा पोलिसांनी जाऊ नये, इतरही सर्व सवलती त्यांना द्याव्या असे प्रत्येक ग्रामदानात किंवा भूदानात स्पष्टपणे नमूद केले असे. एका लेखात दान दिलेल्या गावाला 'ससिद्धिकं' असे विशेषण लावले आहे. याच तऱ्हेचे 'अभ्यन्तरसिद्धिकं' किंवा 'अभ्यन्तरसिद्धचा' अशा शब्दाचे प्रयोग नंतरच्या ताम्रपटांत येतात.[२] त्यांचा अर्थ त्या गावात किंवा प्रदेशात काही गुन्हा घडला तर त्याच्या 'निकाल करण्याच्या हक्कासहित' असा दिसतो. याचा अर्थ 'सदण्डदशापराधः' असेही विशेषण नंतरच्या ताम्रपटांत योजिलेले आढळते.

काही विद्वानांनी अशा ग्रामदानांमुळे देशात सरंजामशाही उत्पन्न झाली असे विधान केले आहे.[३] ते अत्यंत भ्रामक आहे. अशी दाने कितीशी दिली जात व ती ज्यांना दिली जात त्या ब्राह्मणांना व भिक्षुसंघांना सरंजामदारांचे सामर्थ्य कसे प्राप्त होणार याचा विचार त्यांनी केला नाही. त्यांची तुलना युरोपांतील सरंजामदारांशी करणे अत्यंत अनुचित आहे. त्यांना जे परिहार (सवलती) दिले जात ते त्यांना राजसेवकांकडून त्रास होऊ नये, त्यांना शांततेत आपापले धर्माचरण करावे हा हेतु असे. त्या दानांना राजकीय हेतु चिकटविणे अत्यंत अयोग्य आहे.

हे प्रकरण संपविण्यापूर्वी सातवाहन कालात सामान्य जनांत प्रचलित असलेल्या देवतादिकांचा उल्लेख केला पाहिजे. त्या काली यक्षपूजा प्रचलित होती. भारहूत येथील स्तूपाच्या कठड्यावर अनेक यक्ष व यक्षिणींच्या प्रतिमा कोरल्या असून त्यांखाली त्यांची नावे दिली आहेत.[४] तशा प्रतिमा पौनी येथील स्तूपाच्या कठड्यावर आढळल्या नाहीत, तरी त्या काळी यक्षपूजा प्रचलित होती याची काही गमके कोरीव लेखांत आढळतात. काही शेताना यक्ष-यक्षिणींची नावे दिली होती. नाशिक येथील एक शेत अजकालकिय नावाचे होते.[५] ते अजकालक यक्षाच्या नावाने प्रसिद्ध होते. दुसरे दान त्याच प्रदेशातील

---

१ क्रमांक १९, ओ. ३.

२ *C. I. I.*, IV, p. 154 n.

३ See C. J. K. Satyanarayana's *A Study of the History and Culture of the Andhras*, p. 257 f.

४ *C. I. I.*, II, ii, pp. 74 and 80.

५ क्रमांक ११, ओ. २.

एक गाव 'सुदर्शना' याचे होते. तो गाव तन्नामक यक्षिणीचा गणला जात होता.[१] तिची प्रतिमा भारहूत येथे कोरली होती आणि तिच्या खाली तिचे नावही दिले होते. नाशिक जिल्ह्यातील या क्षेत्रांवरून तत्कालीन यक्षपूजेचे अनुमान करता येते.

दुसरी उपासना मातृदेवतेची. महाराष्ट्रातील अनेक ठिकाणच्या उत्खननांत मातृदेवतेच्या भाजक्या मातीच्या मूर्ति सापडल्या आहेत. या खुर्चीवर बसल्या-सारख्या किंवा आसन घातलेल्या आणि नग्न रूपात असतात. त्यांचे स्तन व जघनभाग उठावदार दाखविले असतात. त्यांच्या डोकीवरचे केस मोकळे सोडलेले असून, गळ्यात, कमरेत व हातात अनेक अलंकार घातलेले दाखविले असतात.[२] या मूर्तींची पूजा समृद्धीकरिता (Fertility करिता) केली जात असावी.

१ क्रमांक १९, ओ. २.

२ पट्टिका १८, आकृति २६ पाहा.

## प्रकरण चौथे

# सामाजिक परिस्थिति

सातवाहन-क्षत्रपकालीन सामाजिक परिस्थितीच्या ज्ञानाची साधने फारशी नाहीत. त्या ज्ञानाचे एक मुख्य साधन ताम्रपट हे असते. पण या वंशांचे ताम्रपट आतापर्यंत मिळालेच नाहीत. तत्कालीन वाङ्मयही फारसे उपलब्ध नाही. आहे ते मूळच्या शुद्ध रूपात आता राहिले नाही. अवशिष्ट धार्मिक वाङ्मय एक तर फार प्राचीन काळचे किंवा बऱ्याच नंतरचे आहे. याला एक अपवाद आहे तो आपस्तंब – धर्मसूत्राचा. कृष्ण यजुर्वेदाची ही शाखा दक्षिणेत निर्माण झाली असे दिसते. चरणव्यूहावरच्या एका टीकेंत म्हटले आहे की 'तैत्तिरीय (कृष्ण) यजुर्वेदाची आपस्तंब शाखा दक्षिणेत आग्नेय दिशेच्या अन्ध्रादि गोदावरीतीरच्या प्रदेशांत विद्यमान आहे.[१]' त्या शाखेच्या ब्राह्मणांचे उल्लेख दक्षिणेतील राजांच्या अनेक ताम्रपटांत येतात. पण उत्तर भारतीय प्राचीन राजांच्या ताम्रपटांत ते मुळीच आढळत नाहीत. सध्याही महाराष्ट्राच्या नाशिक, पुणे, अहमदनगर, सोलापूर, कोल्हापूर इत्यादि जिल्ह्यांत तसेच कर्नाटक, मद्रास व अंध्र प्रदेशांत आपस्तंबीयांची मोठी संख्या आहे. गोदातीरचे या शाखेचे ब्राह्मण अद्यापि वेदविद्येबद्दल प्रसिद्ध आहेत. उत्तर भारतातील वाराणसी सारख्या नगरांत आढळणारे आपस्तंबी शाखेचे ब्राह्मण कारणपरत्वे दक्षिणेतून तेथे गेलेले असे आहेत.

दक्षिणेतील देशांचे उल्लेख प्राचीन वैदिक वाङ्मयात येत नाहीत. पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'दाक्षिणात्य' शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे खरी, पण दक्षिणेतील चोल, पाण्डच इत्यादि देशांचा उल्लेख कात्यायनाच्या वार्त्तिकांतच प्रथम आढळतो. तेव्हा आर्यसंस्कृतीचा दक्षिणेतील प्रसार बऱ्याच काळानंतर झाला असावा. उपलब्ध प्रमाणांचा विचार करून ब्यूह्लरने आपस्तंब शाखेचा उदय ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापूर्वी – कदाचित् चौथ्या – पाचव्या शतकांत[२] – मानला आहे. विंटर्निट्झनेही तो ख्रिस्तपूर्व चौथ्या-पाचव्या शतकांत घातला आहे.[३] 'आपस्तंब – धर्मसूत्रा'तील राजविषयक प्रकरण पाहिले तर ते एखाद्या लहानशा राजाच्या काळी – दक्षिणेतील आर्यसंस्कृतीच्या प्रसाराच्या

---

१ पुढील चरणव्यूह–भाष्यातील (किंचित् अशुद्ध) उतारा पाहा—अन्ध्रादिदक्षिणाग्नेयी आगोदासागरावधिः। यजुर्वेदस्तैत्तिरीय आपस्तंबो प्रतिष्ठितः।। चरणव्यूह–भाष्यानुवाद, (१९५४), पृ. ४७. *S. B. E.* Vol. II, p. xxx.

२ ***Ibid*. p. xliii.**

३ *H. I. L.*, Vol. III, p. 539.

आरंभ काळात–लिहिले असावे असे वाटते. त्या काळी सातवाहनांच्या सारख्या साम्राज्याचा उदय झाला नव्हता. तथापि त्या धर्मसूत्रात वर्णिलेली धार्मिक व सामाजिक परिस्थिति त्यानंतर निदान तीन-चार शतके बदलली नसावी. म्हणून 'आपस्तंब–धर्मसूत्रा'चा उपयोग सातवाहनकालीन परिस्थिति वर्णण्याकरिता करणे वावगे होणार नाही.

याशिवाय सातवाहन–क्षत्रपकालीन कोरीव लेख, त्या काळी भारतात आलेल्या ग्रीक प्रवाश्यांची वर्णने, 'गाथासप्तशती' 'मृच्छकटिका'सारखे तत्कालीन उपलब्ध ग्रंथ, उत्खननापासून प्राप्त झालेली माहिती, यांचाही उपयोग केला पाहिजे.

सातवाहनकाली वर्णाश्रमव्यवस्था प्रचलित होती. आर्यांचे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य असे तीन वर्ण होते. आर्येतरांचा शूद्र वर्णांत समावेश होत असावा. आपस्तंब–धर्मसूत्रात 'उग्र'[१] आणि 'चांडाल'[२] यांचा उल्लेख येतो. नंतरच्या स्मृतींत वैश्याला शूद्र स्त्री पासून झालेल्या पुत्राला उग्रजातीय समजले जात असे. पण तो अर्थ या धर्मसूत्रकर्त्याला विवक्षित असेल असे वाटत नाही. 'उग्र कर्मे करणारा तो उग्र' असा दुसरा अर्थ हरदत्त टीकाकाराने दिला आहे,[३] तोच विवक्षित असावा.

चातुर्वर्ण्यात ब्राह्मणाला अग्य्र स्थान दिले होते. त्याने आपले आयुष्य वेदाध्ययनात, यज्ञानुष्ठानात व धर्मोपदेशात घालवावयाचे असे. धर्मसूत्रातील बहुतांश नियम त्याच्या आचरणाविषयी आहेत. तसे संयत जीवन न जगणाऱ्याला तो मान मिळत नसे. एवढेच नाही, तर तो पतित गणण्यात येई. त्याला व्यापार, सावकारी, वैद्यकी इत्यादि व्यवसाय करता येत नसत.[४] आपत्काली मात्र हे निर्बन्ध शिथिल केले जात. सामान्यतः ब्राह्मणाने पाहण्याकरिताही शस्त्र हातात घ्यावयाचे नसे.[५] पण समाजात बंडाळी माजून धार्मिक जीवन अशक्य झाल्यास क्षत्रियाप्रमाणे इतर द्विजातींनीही शस्त्रग्रहण करावे असे मनूने म्हटले आहे.[६] त्याला अनुसरून अनेक ब्राह्मणांनी वर्तन केल्याचे प्राचीन भारतीय इतिहासात नमूद आहे. शुंग, काण्व, सातवाहन, वाकाटक, कदम्ब इत्यादि प्राचीन भारतातील प्रथित राजवंश ब्राह्मण जातीचे होते.

---

१ आपस्तंब–धर्मसूत्र १.२.७.२०.

२ पूर्वोक्त, २.४.९.५.

३ वैश्याच्छूद्रायां जात उग्र उग्रकर्मा वा द्विजातिः। हरदत्त, आ. ध. सू. १.२.७.२०.

४ आ. ध. सू. १.६.१८.२१–२३.

५ परीक्षार्थोपि ब्राह्मण आयुधं नाददीत। आ. ध. सू. १.१०.२९.६.

६ शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते। द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते ।। मनु. ८.३४८.

क्षत्रिय वर्णाची कर्तव्ये, वेदांचे अध्ययन, यज्ञानुष्ठान, दान, शस्त्रग्रहण आणि प्रजारक्षण ही होत. आपस्तंबसूत्रकाली परकी टोळ्यांची आक्रमणे उत्त भारतातही झाली नव्हती. म्हणून 'आपस्तंब–धर्मसूत्रा'त त्यांच्यापैकी कोणाचेही उल्लेख आले नाहीत. पण ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकापासून यवन, शक, पह्लव कुषाण, हूण इत्यादि परकी आक्रमकांनी भारतावर स्वाऱ्या केल्या, राज्ये स्थापिली, आणि कालांतराने ते भारतीय समाजात बेमालूमपणे मिसळून गेले त्यांना चातुर्वर्ण्य–व्यवस्थेत कोणते स्थान मिळाले हा प्रश्न विवाद्य झाला आहे त्यांनी भारतीय नावे घेतली, येथील धर्मांचा स्वीकार केला आणि एतद्देशीयांशी विवाह–संबंधही केले हे प्राचीन कोरीव लेखांवरून स्पष्ट दिसते. पण त्यांचा कोणत्या जातीत समावेश झाला हा प्रश्न आहे. याविषयी 'मनुस्मृती'तील (१०, ४३-४४) खालील श्लोक उल्लेखनीय आहेत—

> **शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः ।**
> **वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥**
> **पौण्ड्रकाश्चौड्रद्रविडाः काम्बोजा यवनाः शकाः ।**
> **पारदाः पल्लवाश्चीनाः किरात दरदाः खशाः ॥**

यवनादि परकी लोक, ब्राह्मणांकडून संस्कार करवून न घेतल्यामुळे क्षत्रिय-जातीय असले तरी वृषल जातीचे (म्हणजे पतित) झाले असे मनु म्हणतो ब्राह्मणांच्या असांनिध्यामुळे म्हणजे वेदोक्त संस्कारांच्या अभावी यवन, शक पह्लव हे मूळचे क्षत्रिय असूनही वृषल झाले हे एकदा मान्य केले, म्हणजे ते संस्कार केल्यावर ते आपल्या मूळच्या क्षत्रियजातीत गणले जाऊ शकतात हे ओघानेच आले. आणि तसेच झाले असावे. कारण वर्णसंकर होऊ न देणाऱ्या ब्राह्मणजातीय गौतमीपुत्र सातकर्णीने शक क्षत्रप रुद्रदामन् याची कन्या आपल पुत्र वासिष्ठीपुत्र सातकर्णि याला करून घेतली होती हे मागे दाखविले आहे अंध्रातील अनेक श्रौत यज्ञ करणाऱ्या इक्ष्वाकुवंशी शांतमूलाने आपला पुत्र माढरीपुत्र वीरपुरुषदत्त याचा विवाह उज्जैनीच्या (शक) महाराजाची कन्या रुद्रभट्टारिका हिच्याशी करविला होता.[1] नंतरच्या काळी कलचुरि नृपति कर्ण याचा हूण राजकन्या आवल्लदेवी हिच्याशी झालेला विवाह सुप्रसिद्ध आहे.[2] तिचा पुत्र यशःकर्ण याला गादी मिळण्यास कोणतीही अडचण उद्भवली नव्हती. किंबहुना, हूण हे उच्च राजपूत क्षत्रिय मानले गेले. ज्या शक उषवदाताने ब्राह्मणांना हजारो कार्षापण, अनेक गोसहस्रदाने व षोडश ग्रामदाने दिली त्याचे पौरोहित्य त्या ब्राह्मणांनी केले नसेल हे संभवनीय वाटत नाही. या परकी

---

१ *H. C. I. P.*, II, p. 229.
२ *C. I. I.*, IV, p. 293.

राजांनी अश्वमेध, राजसूय इत्यादि श्रौत यज्ञ केल्याचा उल्लेख नाही खरा, पण इतर बाबतींत ते क्षत्रिय जातीत मिसळून गेले होते यात संशय नाही.

तिसरा वर्ण वैश्याचा. याची इतर द्विजांप्रमाणे अध्ययन, यजन व दान या कर्मांखेरीज कृषि (शेती), पशुपालन आणि वणिज्या (व्यापार उदीम) ही कर्तव्ये असत. सातवाहनकाली दक्षिणेत व्यापार मोठ्या भरभराटीत होता. अन्ध्रातील धान्यकटकासारख्या दूरच्या प्रदेशांतून तगर, प्रतिष्ठान इत्यादि मार्गाने कल्याण, शूर्पारक, भरुकच्छ, उज्जयिनी इत्यादि बंदरांत व नगरांत, तसेच परदेशांतही माल पाठविला जात असे. व्यापारी तांड्यांच्या मुख्यास सार्थवाह अशी संज्ञा होती. काही ब्राह्मणही सार्थवाह बनून श्रीमंत झाले होते. 'मृच्छकटिका'तील चारुदत्त हा असाच धनिक सार्थवाह होता. पुढे दान-धर्मात आपल्या धनाचा व्यय करून तो निष्कांचन झाला ही गोष्ट वेगळी.

चौथा वर्ण शूद्राचा. याचे प्रमुख कर्तव्य इतर वर्णांची सेवा हे असले तरी तो कारुकर्मात व विविध धंद्यांत निपुण असे. जे ज्ञान ब्राह्मण गुरूपासून मिळणार नाही ते स्त्रिया व इतर वर्णांपासून मिळवावे असे आपस्तंब सांगतो.[१]

पूर्वोक्त तीन आर्य वर्णांना उपनयनानंतर गुरुगृही राहून कमी अधिक काळ वेदाध्ययन करावे लागे. त्यामुळे त्यांच्यात परस्परांविषयी सामंजस्य उत्पन्न होण्यास मदत होत असे. त्या काळी त्यांचे भोजनादि व्यवहार एकत्र होत असत. ब्राह्मणही मांसभोजी असल्याने सर्वांचे अन्नपान एकाच प्रकारचे असे. स्वतःची कर्तव्ये पार पाडणाऱ्या, शूद्राखेरीज सर्व वर्णांच्या लोकांनी एकत्र भोजन करावे असे एक मत उल्लेखून आपस्तंब म्हणतो की शूद्र धर्माचरणी असेल तर त्यालाही भोजनात सामील करून घ्यावे.[२] वैश्वदेवाचा सैंपाक आर्यांच्या निर्देशानुसार शूद्रजातीयाने करावा असे आपस्तंबाने म्हटले आहे.[३]

विवाहाचा अनुलोम प्रकार प्रचलित होता. ब्राह्मणादि वर्णांनी स्वतःच्या वर्णाच्या तसेच खालच्या वर्णांच्या स्त्रीशी विवाह करण्यास अनुज्ञा असे.[४]

---

१ आ. ध. सू., २.११.२९.१५.

२ सर्ववर्णानां स्वधर्मे वर्तमानानां भोक्तव्यं शूद्रवर्जमित्येके। तस्यापि धर्मोपनतस्य। आ. ध. सू., १.६. १८.१३-१४.

३ आर्याः प्रयता वैश्वदेवेन्नसंस्कर्तारः स्युः। आर्याधिष्ठिता वा शूद्राः। आ. ध. सू., २.२. ३.१ व ४.

४ आ. ध. सू., २.६.१३.१.

प्रतिलोम विवाह मात्र निषिद्ध होते. पण प्रतिलोम विवाहाच्यामुळे विविध जाती उत्पन्न झाल्या ही 'मनुस्मृती'तील कल्पना 'आपस्तंब – धर्मसूत्रा'त आढळत नाही.

इतर स्मृतींतल्याप्रमाणे 'आपस्तंब – धर्मसूत्रा'त अनेक प्रकारच्या पुत्रांचा उल्लेख नाही. दत्तक पुत्राचा निषेध आहे ; कारण 'दानं क्रयधर्मश्चापत्यस्य न विद्यते।'[१] (अपत्याचे दान किंवा विक्रय होत नाही) असे आपस्तंब स्पष्ट-पणे सांगतो. पुढे मात्र हा नियम वदलण्यात आला. पुत्र नसेल तर नियोगाला आपस्तंबाची संमति आहे.[२]

इतर धर्मसूत्रांतल्याप्रमाणे 'आपस्तंब – धर्मसूत्रा'तही ब्राह्मणांच्या कर्तव्यांविषयी सविस्तर विवेचन आहे. गुरुगृही असताना विद्यार्थ्याने विनय-पूर्वक वागावे, गुरूने त्याला आपल्या पुत्राप्रमाणे प्रेमाने वागवून कांहीही राखून न ठेवता विद्या शिकवावी, त्याने काही अपराध केल्यास त्याला रागे भरून, उपवास करावयास व (थंड पाण्याने) स्नान करावयास लावून, किंवा त्याला आपल्या समोर येण्याची मनाई करून अपराधानुरूप शिक्षा करावी इत्यादि माहिती आपस्तंबाने दिली आहे.[३] विशेषतः वैश्वदेव व अतिथिसत्कार यांवर त्याने भर दिला आहे.[४] वैश्वदेवाच्या प्रसंगी कुत्रा व चांडाल यांपासून सर्वांना अन्नाचे भागीदार करावे असे त्याने म्हटले आहे.[५] धार्मिक वृत्तीचे सच्छील ब्राह्मण ही सर्व कर्तव्ये यथासांग करीत हे मल्हारा ताम्रपटातील मुंड-वंशी ब्राह्मणांच्या वर्णनावरून स्पष्ट दिसते.[६]

क्षत्रियांची कर्तव्येही आपस्तंबाने अशीच विस्तारपूर्वक सांगितली आहेत. राजाने आपले गुरु व अमात्य यांच्या पेक्षा जास्त ऐश्वर्याने राहू नये,[७] त्याच्या राज्यात क्षुधेने, रोगाने, थंडीने किंवा ऊष्माघाताने कोणीही मृत्यु पावू नये,[८] त्याच्या राज्यातील ग्रामांत किंबहुना अरण्यांतही तस्करांचे भय नसावे,[९] त्याने संदेह असल्यास कोणालाही दंड करू नये,[१०] शरण आलेल्या

१ आ. ध. सू., २.६.१३.१०.
२ सगोत्रस्थानीयां न परेभ्यः समाचक्षति। आ. ध. सू. २.१०.२७.२.
३ आ. ध. सू., १.२.६.२४-२९.
४ पूर्वोक्त, २.२.४.११-१४.
५ सर्वान् वैश्वदेवे भागिनः कुर्वीताश्वचाण्डालेभ्यः। पूर्वोक्त, २.४.९.५.
६ क्रमांक ६४ पाहा.
७ गुरूनमात्यांश्च नातिजीवेत्। आ. ध. सू. २.९.२५.१०.
८ न चास्य विषये क्षुधा रोगेण हिमातपाभ्यां वावसीदेदभावाद्बुद्धिपूर्वं वा कश्चित्। पूर्वोक्त, २.९.२५.११.
९ क्षेमकृद्राजा यस्य विषये ग्रामेरण्ये वा तस्करभयं न विद्यते। पूर्वोक्त, २.९.२५.१५.
१० न च सन्देहे दण्डं कुर्यात्। पूर्वोक्त, २.५.११.२.

शत्रूला ठार मारू नये इत्यादि सुसंस्कृत राज्यपद्धतीतील सर्व विशेषांचा 'आपस्तंब – धर्मसूत्रा'त उल्लेख आहे.

दक्षिणेत बौद्ध धर्माचा प्रसार झाल्यावर त्या धर्माचे अनेक अनुयायी सातवाहनांच्या राज्यात राहू लागले. त्यांत अनेक जातींच्या व धंद्यांच्या लोकांचा समावेश होता हे मागे दाखविले आहे. बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यावर त्यांनी आपली जात टाकली होती आणि बौद्ध नामक एक निराळाच समाज अस्तित्वात आला होता, असे मात्र दिसत नाही. याविषयी कुडा येथील लेण्यातील एक लेख फार महत्त्वाचा आहे. त्यात अयितिलु या ब्राह्मण उपासकाच्या भयिला या ब्राह्मण पत्नीने चैत्यगृह दान दिल्याचा उल्लेख आहे.[१] या दोन्ही पतिपत्नी बौद्धधर्मी होत्या. पतीला तर 'उपासक' म्हटले आहे त्यावरून हे स्पष्ट दिसते. पत्नीने चैत्यगृह खोदवून बौद्ध संघाला अर्पण केले त्यावरून तिची बौद्धधर्मनिष्ठा सुस्पष्ट आहे. असे असताही त्या दोघांना त्या लेखात 'ब्राह्मण' म्हटले आहे. किंबहुना, त्यांच्या आदेशावरूनच त्यांच्या ब्राह्मण जातीचा उल्लेख त्या लेखात केला असावा. तेव्हा बौद्ध धर्म स्वीकारल्यावरही त्यांनी आपल्या ब्राह्मण जातीचा त्याग केला नव्हता हे उघड आहे. बौद्ध धर्माचा आक्षेप जातीवर नसून यज्ञयागांतील हिंसेवर व वेदप्रामाण्यावर होता हे यावरून स्पष्ट दिसते. पुढील काळातही जैन व हिंदू धर्मीयांचे शरीरसंबंध होत असत हे आम्ही आपल्या शिलाहारराजविषयक ग्रंथात दाखविले आहे.[२]

हिंदुधर्मात वर्णाप्रमाणे आश्रमांनाही महत्त्व आहे. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी (किंवा मुनि) असे चार आश्रम वेदकालापासून प्रचलित होते. त्यांचे वर्णन 'आपस्तंब – धर्मसूत्रा'त आले आहे. संन्याश्याने स्वाध्याया-ध्ययनाचा त्याग करून, ग्रामात प्राणवृत्ति रक्षण करण्यापुरती भिक्षा मागून, इहपरलोकीच्या आस्था सोडून, लोकांनी टाकलेली वस्त्रे धारण करून किंवा दिगंबर वृत्तीने राहून आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करावा असे आपस्तंबाने म्हटले आहे. यामुळे सर्व दुःखांचा नाश होतो असे काहींचे मतही त्याने उल्लेखिले आहे. पण त्याला स्वतःला मात्र ते मान्य नव्हते.[३] कारण तसे असते तर ज्ञानी लोकांना दुःखे झालीच नसती असे तो म्हणतो. ते कसेही असले तरी सातवाहनकाळी असे मुनि किंवा ऋषि होते यात संशय नाही. जुन्नरच्या लेण्यातील एका लेखात 'ऋषि' मूलस्वामी याची भार्या नंदबालिका हिने स्वतःचा धर्मदाय म्हणून ते लेणे कोरविल्याचा उल्लेख आहे.[४] हा ऋषि

---

१ *I. C. T. W. I.*, p. 14. २ शिलाहार राजवंशाचा इतिहास, पृ. [५६].

३ बुद्धे क्षेमप्रापणम्। तच्छास्त्रैर्विप्रतिषिद्धम्। बुद्धे चेत्क्षेमप्रापणमिहैव न दुःखमुपलभेत। आ. ध. सू. २.९.२१.१८–१९.

४ *A. S. W. I.*, IV, p. 95.

हिंदू – धर्मी असावा. तो बौद्ध – धर्मी असता तर त्याला भिक्षु म्हटले असते. तो वैराग्यामुळे संसाराचा त्याग करून अरण्यात गेल्यावर त्याच्या पत्नीने हे धर्मकृत्य केलेले दिसते.

सातवाहनकालात संयुक्त कुटुंबपद्धति प्रचलित होती. तत्कालीन अनेक दान – लेखांत कुटुंबातील कर्त्या पुरुषाचा दाता म्हणून उल्लेख असला तरी त्या दानाचे पुण्य तो आपले भाऊ, बहिणी, पुत्र, कन्या इत्यादिकांना प्राप्त व्हावे असे आपल्या लेखात नमूद करतो. जुन्नर येथील एका लेखात एक उपासक आपले व आपल्या सख्ख्या बंधूंचे हे दान आहे असे निर्दिष्ट करतो. पित्याच्या निधनानंतर ते सर्व भाऊ एकत्र राहत होते याचे ते द्योतक आहे.[१] कान्हेरी येथील दुसऱ्या एका लेखात दात्याने आपल्या दानाचे पुण्य आपले मातापिता आणि अपत्ये यांना प्राप्त होवो अशी इच्छा प्रकट केली आहे.[२] त्या काळी त्याचे मातापिता वृद्ध झाल्यामुळे त्याने संसाराचा भार आपण स्वतः घेतला होता, असे दिसते.

पुण्यविभाजनात जसा पुत्रादिकांना वाटा देण्यात येई तसा दायातही (पैतृक संपत्तीतही) दिला जात असे काय, या प्रश्नाचा आता विचार करू. यासंबंधी आपस्तंबाने विविध मते उल्लेखिली आहेत. ज्येष्ठ पुत्राला ती सर्व संपत्ति मिळावी, पत्नीला तिचे अलंकार व तिच्या नातलगांकडून मिळालेले धन मिळावे असे एक मत होते ; पण आपस्तंबाला ते मान्य नव्हते. ज्येष्ठ पुत्राला मोठा हिस्सा व इतरांना बाकीच्या संपत्तीचा समान वाटा मिळावा अशा दुसऱ्या मताचाही आपस्तंबाने उल्लेख केला आहे.[३] त्याचे स्वतःचे मत असे दिसते की क्लीव, उन्मत्त व पतित यांखेरीज सर्व पुत्रांना सारखा वाटा मिळावा.[४] त्याने या संदर्भात पत्नीचा उल्लेख केला नाही. इतरत्र तो म्हणतो की पतिपत्नी पाणिग्रहणापासून एकच असल्यामुळे त्यांच्यात संपत्तीचा विभाग होणे योग्य नाही.[५] पति परदेशी गेला असल्यास त्याच्या संपत्तीतून नैमित्तिक दान करण्याचा पत्नीला अधिकार आहे.[६] पण त्याच्या निधनानंतर तिचा वाटा मागण्याचा मात्र तिला हक्क नाही !

स्त्रियांचा कौटुंबिक संपत्तीवरील हक्क भारतात फार उशीरा मान्य करण्यात आला. मृत व्यक्तीच्या दायादांमध्ये आपस्तंबाने पुत्र, सपिंड, आचार्य

१ *A. S. W. I.*, IV, p. 96.

२ क्रमांक २७, ओ. ५–८.

३ आ. ध. सू., २.६.१४.१.

४ पूर्वोक्त, २.६.१४.११.

५ जायापत्योर्न विभागो विद्यते। २.६.१४.१६.

६ न हि भर्तुर्विप्रवासे नैमित्तिके दाने स्तेयमुपदिशन्ति। २.६.१४.२०.

व शिष्य यांचा या क्रमाने उल्लेख करून नंतर कन्येचा हक्क मान्य केला आहे. पत्नीचा मात्र त्याने कोठेही उल्लेख केला नाही. याज्ञवल्क्य-स्मृतीत (२.१३५) प्रथमच पुत्रहीन मृत व्यक्तीच्या दायादांमध्ये पत्नीला अग्रक्रम देण्यात आला, पण ते क्रांतिकारक मत त्यानंतरही दीर्घकाळ मान्य झाले नव्हते. कालिदासाच्या काळातही (ख्रिस्तोत्तर ४००) ते सर्वसंमत झाले नव्हते, हे 'शाकुन्तला'च्या सहाव्या अंकातील धनमित्राच्या वृत्तांतावरून स्पष्ट आहे.[१] कन्येचा हक्क मात्र सपिण्डांच्या नंतर मान्य झाला होता.[२] कोणीच वारस नसेल तर मृत व्यक्तीची संपत्ति राजाला मिळावी असे आपस्तंबाने म्हटले आहे.

सातवाहनकालीन अनेक लेखांत भिक्षुणींनी मोठमोठी दाने दिलेली दिसतात. त्यानी बहुधा विधवा झाल्यावर बौद्ध धर्माची दीक्षा घेतली असावी. कौमार्यावस्थेत भिक्षुणी झाल्याचा फारसा पुरावा नाही. तथापि, त्या काळी कांही स्त्रिया धनवान् होत्या आणि त्यांनी आपल्या संपत्तीचा व्यय धर्मदायांत केला होता असे दिसते. ते धन त्यांना पित्याकडून वा पतीकडून मिळाले होते किंवा त्यांनी आपल्या स्त्रीधनातून तो व्यय केला होता याचा निर्देश नाही. उदाहरणार्थ, उत्तर कोकणातील कोल येथील एका लेखात एका उपासकाची कन्या आणि शिवदत्ताची पत्नी धर्मश्री हिने ते लेणे कोरल्याचा उल्लेख आहे,[३] पण तो खर्च तिने कसा केला याचा निर्देश नाही. काही दाने परिव्राजिकांनी (भिक्षुणींनी) दिली होती ती त्यांनी बहुधा त्यांकरिता वर्गणी जमवून दिली असावी. असे एक दान कुडा येथील क्र. ५ च्या लेखात उल्लेखिले आहे. ते भदन्त पातिमित आणि भदन्त आगिमित यांची भाची आणि परिव्राजिका नागनिका हिची कन्या परिव्राजिका पदुमनिका (पद्मिनिका) हिचे होते.[४] तिने त्यात एक लेणे व एक टांके खोदवून भिक्षुसंघाला अर्पण केल्याचा उल्लेख आहे. कांही दाने भिक्षुणींनी किंवा उपासिकांनी महाभोज आणि महारठि यांसारख्या आपल्या धनवान् आप्तांकडून धन मिळवून केलेली असावी. त्यांत त्या आप्तांचा निर्देश आहे.

क्वचित् स्त्रिया नोकरी करीत असलेल्याही आढळतात. क्र. १३ (ओ. ६) च्या लेखात लोटा या द्वारपालिकेने राजाज्ञा लिहून घेतल्याचा उल्लेख आहे. 'महासेनापतिनी' आणि 'महारठिनी' या पदव्या मात्र त्या त्या स्त्रियांना आपल्या पतींमुळे मिळाल्या होत्या यात संशय नाही.

---

१ धनमित्र व्यापारी निधन पावल्यावर दुष्यन्त त्याची कोणी स्त्री गर्भवती आहे काय याची चौकशी करण्यास सांगतो, असा 'शाकुन्तला'च्या सहाव्या अंकात प्रसंग आला आहे.

२ पुत्राभावे यः प्रत्यासन्नः सपिण्डः। . . . दुहिता वा। २.६.१४.२ व ४.

३ *A. S. W. I.*, IV, p. 89.

४ *Ibid.*, p. 85.

सातवाहन काळात सतीची चाल प्रचलित होती काय हे निश्चितपणे सांगणे कठीण आहे. तत्कालीन एकाही लेखात तिचा उल्लेख नाही. एवढेच नाही, तर 'आपस्तंब – धर्मसूत्रां 'तही तिचा निर्देश नाही. मनूनेही पतिनिधनानंतर विधवेने आमरण संयत वृत्तीने यमनियमांचे आचरण करीत पतिव्रतेचे जीवन जगावे असा आदेश दिला आहे. त्याप्रमाणेच नागनिका आणि गौतमी बलश्री या राण्या पति-निधनानंतर वागत होत्या हे क्र. ३ व क्र. १८ च्या लेखांत वर्णिले आहे. पण 'गाथा-सप्तशती 'च्या क्र. ४०७ व ६३३ या गाथांत सतीच्या प्रथेचा उल्लेख आढळतो.[१]

त्या काळी पडद्याची चाल अस्तित्वात नव्हती. अमरावती येथील काही शिल्पपट्टांत स्त्रियांना सार्वजनिक चैत्यगृहांत पूजा करताना, सभागृहांतील वादविवादांत भाग घेताना, गीतवाद्यादिकांनी आपल्या पतींचे व अभ्यागतांचे मनोरंजन करताना दाखविले आहे.[२] त्यांनी कोठेही पडद्याचा उपयोग केलेला दाखविला नाही.

सामान्यत: लोक प्रावरणार्थ दोन वस्त्रांचा व शिरोवस्त्राचा (फेटचाचा) उपयोग करीत असे दिसते. त्यांपैकी एक वस्त्र नेसलेले धोतर आणि दुसरे उत्तरीय असे. शिल्पपट्टांत उत्तरीय बहुधा कमरेला वेष्टून खाली त्याचे सोगे सोडलेले दाखविले असतात. फेटा मात्र बहुधा सर्वत्र आढळतो. गुरुगृहीही ब्रह्मचाऱ्याने दोनच वस्त्रे वापरावयाची असत. त्यांपैकी उत्तरीय जानव्याप्रमाणे डाव्या खांद्यावरून उजव्या काखेखाली वापरले जात असे. ब्रह्मचाऱ्याने फेटा वापरावयाचा नसे. त्या काळी शिवलेल्या वस्त्रांचा उपयोग केला जात नसे असे नाही. गुरुगृही विद्यासंपादन करून परत आलेल्या स्नातकाचे 'आपस्तंब – धर्मसूत्रा 'तील खालील वर्णन पाहा[३]—

'त्याने माला धारण करावी, मुखाला (चन्दन) लावावे, केसांना आणि श्मश्रूला तेल लावावे, डोळ्यांत अंजन घालावे, अंगाला (सुवासिक) तेल लावावे, फेटा व धोतर धारण करावे, पायघोळ अंगरखा घालावा, आणि चप्पल (किंवा) खडावा वापरावा.'

या उताऱ्यात कंचुकाचा (पायघोळ अंगरख्याचा) निर्देश आहे. राजांच्या अन्त:पुरातील मुख्य सेवक असा अंगरखा घालीत असे, म्हणून त्याला 'कंचुकी' असे नाव पडले होते.[४]

---

१ गाथासप्तशती (सं. स. आ. जोगळेकर), प्रस्तावना, पृ. २०० पाहा.

२ *M. S. G. H.*, I, p. 175.

३ माल्यालिप्तमुख उपलिप्तकेशश्मश्रुरक्तोभ्यक्तो वेष्टित्युपवेष्टिती काञ्चुक्युपानही पादुकी। आ. ध. सू. १.२.८.२.

४ 'रत्नावली'त एक वानर मोकाट सुटल्यामुळे एक खुजा मनुष्य कञ्चुकीच्या झग्यात शिरल्याचे वर्णन आहे.

शिखा हे हिंदुत्वाचे लक्षण मानले जाते. तिचाही उल्लेख आपस्तंबाने केला आहे.[१] फक्त श्रौत यज्ञांच्या वेळी तिचे वपन करावयाचे असे.[२]

स्त्रियाही एक प्रकारचे शिरोवस्त्र वापरत असत. कुडा येथील लेण्यात एका स्त्रीने उंच टोक असलेली टोपी घातलेली दिसते.[३] ती स्त्री कदाचित् शकवंशी असेल. इतर स्त्रियांचा उरोभाग शिल्पांत सामान्यतः अनावृत दाखविला जाई. कदाचित् त्यावर अत्यंत तलम कापडाची चोळी किंवा ब्लाउज दाखविण्याचा हेतु असावा. 'गाथासप्तशती'त चोळीचा उल्लेख आहे.[४]

शकवंशी क्षत्रपांचा पोषाख निराळ्या प्रकारचा असे. खाली पाटलोण आणि बूट, त्याच्यावर कोट, आणि त्यावर गुडघ्याच्या खालपर्यंत आलेला लांब ओव्हरकोट, तसेच कमरेत पट्टा, असा त्यांचा पोषाख असे.[५] यज्ञ सातकर्णि डोकीवर घट्ट बसणारी टोपी घाली.[६] त्यावर समोर शिरोरत्न लावलेले असे. वासिष्ठीपुत्र सातकर्णि तशी टोपी घालीत नसे, पण तोही समोर शिरोरत्न धारण करी.[७] नहपानाच्या डोक्यावरील चपेटी पगडी त्याच्या नाण्यांवर स्पष्ट दिसते.

स्त्रियांप्रमाणे पुरुषांनाही विविध प्रकारचे अलंकार घालण्याची हौस होती असे दिसते. वासिष्ठीपुत्र सातकर्णि आणि यज्ञश्री सातकर्णि यांच्या शिरो-रत्नांचा उल्लेख मागे आला आहे. इतर सातवाहन राजे मात्र ते घालत होते असे दिसत नाही. स्त्रिया पायांत पैंजण घालीत, ते मात्र पुरुष घालत नसत. इतर अनेक अलंकार समान असत. कानांत वाटोळे कर्णपूरक, बाहूंवर केयूर, हातात कंकण, आणि बोटांत अंगठ्या दोघेही घालत. स्त्रिया त्यांशिवाय कमरेत मोत्यांचा किंवा रत्नांचा कमरपट्टा घालत.

ब्राह्मणादि सर्व वर्ण मांसाशन करीत असत. आपस्तंबाने अनेक प्राण्यांचे मांस (ब्राह्मणांस) भक्ष्य म्हणून सांगितले आहे. त्यांत गाई-बैलांचा समावेश आहे.[८] बौद्ध अहिंसेचे पुरस्कर्ते. पण तेही मुद्दाम आपणांकरिता तयार केलेले नसल्यास मांसाची भिक्षा नाकारीत नसत. पुढे महायानाचा उदय झाल्यावर

---

१ अथापि ब्राह्मणम्। रिक्तो वा एषोनपिहितो यन्मुण्डस्तस्यैतदपिधानं यच्छिखेति। आ. ध. सू. १.३.१०.८.

२ सत्रेषु वचनाद्वपनं शिखायाः। १.३.१४.९.

३ *M. S. G. H.*, I, p. 176.

४ गाथासप्तशती, गाथा क्रमांक ३९५.

५ चष्टनाचा पुतळा पाहा. पट्टिका १६, आकृति २४.

६ त्याचे नाणे पाहा. पट्टिका २३, आकृति ४२.

७ त्याचे नाणे पाहा. पट्टिका २३, आकृति ४१.

८ धेन्वडुहोर्भक्ष्यम्। आ. ध. सू. १.५.१७.३०.

मांसाशन निषिद्ध ठरविण्यात आले. तोच प्रकार हिंदू धर्मातही झाला. त्या काळी मद्याचा बराच प्रचार असावा. रोमकडून मद्याने भरलेले रांजण भारतात येत असत ते बहुधा राजे–रजवाडे, सरदार वगैरेंकरिता असावे. त्यांचे अवशेष महाराष्ट्रात सापडले आहेत.[१] खालच्या दर्ज्याचे लोक गावठी दारू पीत असावे. ब्राह्मण, बौद्ध व जैन यांना सुरा वर्ज्य असे. सुरापान करणाऱ्याला शिक्षा म्हणून अत्यंत उष्ण अशी सुरा प्यावयास लावत, ज्यायोगे तो गुन्हेगार तत्काळ गतप्राण होई.[२] असेच एक प्रायश्चित्त चोराच्या बाबतीत आपस्तंबादि धर्मसूत्रांत सांगितले आहे. चोराने आपले केश मोकळे सोडून आणि हातात मुसळ घेऊन राजाकडे जावे. आणि आपल्या अपराधाची कबुली द्यावी. राजा त्या मुसळानेच त्याचा कपाळमोक्ष करी. मग तो त्या पापातून मुक्त होई.[३] इतर गुन्ह्यांबद्दलही अशीच प्रायश्चित्ते सांगितली आहेत.

त्या काली 'समाज' हे मनोरंजनाचे साधन असे. त्याचा उल्लेख अशोकाने आपल्या आदेशांत केला आहे. त्यात विविध प्रकारचे खेळ व देखावे यांचा अंतर्भाव होत असावा. हे समाज पाहण्यास गुरुगृही असताना ब्रह्मचाऱ्याने जाऊ नये असे आपस्तंबाने सांगितले आहे.[४] अशा लौकिक समाजांपासून लोकांना निवृत्त करण्याकरिता अशोकाने आपल्या साम्राज्यात धार्मिक 'समाजां'ची योजना केली होती. त्यांमध्ये अग्निस्कन्धादि देखावे दाखविले जात. याशिवाय बागेत विहार करणे वगैरे अन्य मनोरंजनाचे प्रकार होते त्यांचा उल्लेख 'मृच्छकटिका'त आला आहे.

कांही उत्सवही प्रचलित होते. इंद्रध्वज महोत्सव त्यांपैकी एक होता. हा उत्सव फार प्राचीन आहे. इंद्र ही देवता ऋग्वेदकाळी फार लोकप्रिय होती. इंद्राचे अनेक विजय ऋग्वेदात वर्णिले आहेत. तेव्हापासून हा उत्सव प्रचारात आला असावा. पुढे कृष्णाच्या काळी कृष्णाने त्याला आव्हान दिले. तेव्हा इंद्राने अतिवृष्टि करून गोपजनांना सळो की पळो केले. पण कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलून त्यांच्यावरचे संकट टाळले अशी कथा 'हरिवंशा'त आली आहे. हा उत्सव भाद्रपद शुक्ल अष्टमीस एक वृक्ष निवडून त्याचा सोट वाजत गाजत आणून नगरद्वारात किंवा राजवाड्यासमोर उभारला जात असे. पुढे शुक्ल द्वादशीस त्याला वस्त्रालंकारांनी सजवून त्याच्या समोर इंद्राची मूर्ति बसवीत. या प्रसंगी नृत्य, गीत, वाद्य इत्यादि करमणुकीचे प्रकार होत असत. अशा

---

१ *Pavnār Excavations*, p. 3.

२ सुरापोऽग्निस्पर्शां सुरां पिबेत्। आ. ध. सू., १.९.२५.३.

३ स्तेनः प्रकीर्णकेशोंसे मुसलमादाय राजानं गत्वा कर्माचक्षीत। तेनैनं हन्याद्वधे मोक्षः। पूर्वोक्त, १.९.२.५, ४.

४ सभाः समाजांश्चागन्ता। आ. ध. सू., १.१.३.१२.

इन्द्रध्वजोत्सवात संस्कृत नाटकाचा पहिला प्रयोग झाला अशी आख्यायिका आहे. हा उत्सव सातवाहनकाळी प्रचलित होता. 'मृच्छकटिका'त (१०·७) त्याचा उल्लेख आहे. त्यात म्हटले आहे की इंद्रध्वजाचे विसर्जन होत असता ते कोणी पाहू नये. सातवाहनकाळी इंद्राला बरेच महत्त्व होते. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखाच्या आरंभी त्याला नमन केले आहे. इंद्रध्वजासंबंधी पुढील गाथा 'सरस्वती-कंठाभरणा'त (५·३१४) आली आहे[1]—

**सच्चं चिअ कट्ठमओ सुरणाहो जेण हलिअधूआए ।**
**हत्थेहिं कमलदलकोमलेहिं छित्तो ण पल्लविओ ।।**

[खरोखरच हा (ध्वजरूपी) इंद्र काष्ठमय (लाकडाचा) झाला आहे. तसे नसते तर शेतकऱ्याच्या (सुंदर) मुलीच्या कमलासारख्या कोमल हस्तांनी त्याला स्पर्श केला असता तो पल्लवित झाला नसता काय?]

दुसरा तत्कालीन महत्त्वाचा उत्सव मदनोत्सव होय. तो चैत्र शुक्ल त्रयोदशीस होत असे. या तिथीला मदनत्रयोदशी म्हणत. त्या दिवशी नगराच्या बाहेरील उद्यानात मदनाच्या मूर्तीची पूजा होऊन मोठी यात्रा भरत असे. या उत्सवाची सर्व व्यवस्था त्या त्या नगरांतील स्त्रियांकडे असे, असे भवभूतीच्या 'मालतीमाधवा'वरून कळते. या उत्सवातच वसन्तसेना व चारुदत्त यांनी परस्परांस प्रथम पाहिले, असे 'मृच्छकटिका'त म्हटले आहे. याशिवाय फाल्गुनोत्सवाचा (किंवा होळीचा) उल्लेख गाथा क्र. ३६९ मध्ये आला आहे. त्याविषयी सर्वांस माहिती आहे.

याशिवाय द्यूत हाही एक करमणुकीचा प्रकार फार प्राचीन काळापासून चालत आला होता. आर्यांना द्यूताचे मोठे व्यसन होते. ऋग्वेदाच्या सातव्या मंडळातील पश्चात्तापदग्ध द्यूतकराचे सूक्त प्रसिद्ध आहे. आपस्तंबाने राजाच्या सभागृहात द्यूताकरिता टेबल ठेवून तेथे त्रैवर्णिक शुद्ध व सत्यशील आर्यांना अक्षांनी द्यूत खेळण्याची सोय करावी असे म्हटले आहे.[2] 'मृच्छकटिका'तील संवाहक द्यूतात हरून निर्विण्ण झाल्यामुळे बौद्ध धर्माची दीक्षा घेता झाला असे दाखविले आहे. त्या काळी हे व्यसन फार फैलावले असावे.

तत्कालीन समाजधुरीणांनी सर्व वर्णांच्या व आश्रमांच्या समोर आचरणाचा कोणता आदर्श ठेवला होता ते आपस्तंबाच्या १, ८, २३, ६ या सूत्रावरून कळते. त्यात म्हटले आहे की 'क्रोध, हर्ष, लोभ, मोह इत्यादि मनोविकारांचा त्याग करणे, सत्यवचन, आर्जव (सरळपणा), मार्दव, शम, दम, सर्व प्राण्यांशी

---

१ ही गाथा 'गाथा सप्तशती'त क्र. ४५८ ने आली आहे.

२ आ. ध. सू., २.९.२५.१२–१३.

सख्य, संतोष ही सर्व आश्रमांची लक्षणे होत. त्यांचे यथाविधि आचरण करणारी व्यक्ति परमात्म्यात विलीन होते [१]

आता आपण तत्कालीन राहणीची पाहणी करू. सातवाहनकाळी मोठ-मोठी नगरे अस्तित्वात येऊन त्यांत टोलेजंग राजवाडे, हवेल्या, वाडे बांधले गेले होते. त्यांचे अवशेषही आता अस्तित्वात नाहीत. पण तत्कालीन अमरावती-सारख्या बौद्ध केंद्रांतील स्तूपादिकांच्या अलंकरणार्थ कोरलेल्या शिल्पपट्टांवरून आपणांस त्यांची थोडीबहुत कल्पना करता येते. मोठ-मोठ्या नगरांच्या सभोवार जलाने भरलेले खंदक असत. त्यांच्या पलीकडे विटांनी बनविलेले प्राकार (तट), व त्यांच्या संरक्षणार्थ उभारलेले अर्ध वर्तुळ आकाराचे बुरुज निर्माण केले जात. त्यांवर युद्धोपयोगी सच्छिद्र भिंती बांधून संरक्षणाची व्यवस्था केली जात असे. नगरांत अनेक मजली इमारती असत. त्यांच्यावर अर्धवर्तुळाकार छपरे (vaulted roofs) बांधली जात. नगरातील इमारतीं-च्या बांधकामात लाकडाचा विशेष उपयोग केला जात असे. त्याचेच अनुकरण तत्कालीन लेण्यांच्या व तोरणांच्या निर्मितीत केले होते हे पुढे दाखविले आहे.

तत्कालीन श्रीमंत लोकांचे वाडे कसे असत व त्यांचे जीवन कसे समृद्ध असे याची कल्पना 'मृच्छकटिका'च्या चौथ्या अंकातील वसन्तसेनेच्या वाड्याच्या वर्णनावरून करता येईल. चारुदत्ताने वसन्तसेनेच्या चोरीस गेलेल्या दागिन्यांबद्दल देऊ केलेली रत्नमाला घेऊन विदूषक वसन्तसेनेच्या वाड्याजवळ येतो. तेथे तिची दासी त्याला निरनिराळ्या चौकांतून घेऊन जाते तेव्हा तो तेथील दृश्ये वर्णन करतो.

वसन्तसेनेच्या वाड्याचे आठ चौक होते. विदूषकाला प्रथम त्या वाड्याचा रत्नखचित आणि अनेक सुगन्धि पुष्पमालांनी व मंगलकलशांनी, तसेच पताकांनी सुशोभित केलेल्या तोरणाने युक्त असा दरवाजा दिसला. पुढे त्याने पहिल्या चौकात प्रवेश केला. तेथे त्याला विविध रत्नांनी व मुक्तामालांनी सुशोभित अश्या सोन्याच्या पायऱ्यांचे जिने, स्फटिकनिर्मित खिडक्या इत्यादींनी सजलेले विभाग दिसले. तेथे श्रोत्रिय ब्राह्मणासारखा पेंगत असलेला रखवालदारही आढळला.

पुढे दुसऱ्या चौकात गेल्यावर विदूषकाला वसन्तसेनेच्या प्रवहणाचे (गाडीचे) बैल, तसेच रेडे, मेंढे, घोडे, वानर, हत्ती असे अनेक प्रकारचे प्राणी आढळले. तो चौक जणू काय एक प्राणिसंग्रहालयच होता.

---

१ अक्रोधोहर्षोरोषोलोभोमोहोदम्भोद्रोहः सत्यवचनमनत्याशोपैशुनमनसूया संविभागस्त्याग आर्जवं मार्दवं शमो दमः सर्वभूतैरविरोधो योग आर्यमानृशंसं तुष्टिरिति सर्वाश्रमाणां समयपदानि तान्यनुतिष्ठन्विधिना सार्वगामी भवति। १.८.२३.६.

तिसऱ्या चौकात तो प्रवेश करतो, तो तेथे त्याला थोर कुलांतील लोकांकरिता मांडलेली आसने, अर्धे वाचून झाल्यावर उघडीच राहिलेली पोथी, रत्नखचित पिंजऱ्यात बाळगलेली मैना, विविध रंगांनी काढलेल्या चित्रांचे फलक घेऊन इकडून तिकडे हिंडणाऱ्या गणिका आणि वृद्ध विट दृष्टीस पडले.

चौथ्या चौकात मृदङ्गाचे शब्द, झांजेचा तालरव, बासरीचा मधुर ध्वनि आणि वीणेचा झंकार ऐकू आला. त्या ठिकाणी काही गणिका नर्तन तर काही नाट्य शिकत असलेल्या विदूषकाला दिसल्या.

पाचव्या चौकात पाकशाळा होती. तिथे आचारी विविध पक्वान्ने करण्यात गुंतले होते. ती पाहून तर विदूषकाला आपण स्वर्गातच आहो काय, असा भास झाला !

सहाव्या चौकात विविध प्रकारचे अलंकार बनवीत असलेले अनेक सुवर्णकार, रत्नकार, मोतीवाले तसेच चन्दन, कस्तुरी, केशर इत्यादि सुगन्धि द्रव्ये लेपनाकरिता तयार करीत असलेले गान्धिक, आणि सकर्पूर तांबूल सेवन करणाऱ्या गणिका व त्यांचे प्रियकर, तसेच मनसोक्त मदिरा प्राशन करणारेही प्रेमी जन दिसले.

सातव्या चौकात कबुतरे, पोपट, मैना, कोकिळा, कपिञ्जल, मोर, राजहंस, सारस इत्यादि पक्षी मुक्तपणे विहार करीत असताना दिसले.

आठव्या चौकात खाशांचे निवासस्थान होते. तेथे विदूषकाला वसन्तसेनेची आई व भाऊ आढळले.

वसन्तसेनेच्या वाड्याचे हे वर्णन अत्यंत संक्षेपाने दिले आहे.[१] तरी त्यावरून तत्कालीन धनिक लोकांच्या समृद्ध, सुसंस्कृत व सुखी जीवनाची थोडी बहुत कल्पना येईल. सातवाहनकाळी भारताचा परदेशाशी व्यापार वाढून तेथील सुवर्णाचा ओघ भारताकडे वाहू लागला होता याचे हे गमक आहे. तत्कालीन ग्रंथकार प्लिनी याने रोमचे नागरिक भारतातून आयात केलेल्या चैनीच्या वस्तू वापरतात याबद्दल त्यांचा निषेध केला आहे. त्याच्या अंदाजाप्रमाणे दरवर्षी रोमकडून भारतात पाच कोटी सेस्टरसेस (सुमारे पाच लाख पौंड) नाणी भारतात येत असावी. त्या काळच्या ऑगस्टस ते नेरो (ख्रि. पू. ३१ ते ख्रिस्तोत्तर ६८ पर्यंत) यांच्या काळातील शेकडो नाणी भारतात—विशेषतः दक्षिण भारतात—सापडली आहेत. त्यावरून प्लिनीचा अंदाज अतिशयोक्त नाही. या निर्यात व्यापारात सातवाहन-क्षत्रप काळातील जनसमृद्धीचे बीज सापडते.

---

१ 'मृच्छकटिका'तील हे वर्णन गुणाढ्याच्या 'बृहत्कथे'वरून घेतलेले दिसते. E. P. Matin's Budhasvāmin's *Bṛihatkathā-Ślokasaṅgraha*, pp. 25-26.

अशा समृद्ध जीवनाचे वर्णन साहित्यातच सापडावयाचे. त्याचे प्रत्यक्ष अवशेष मिळणे शक्य नाही. याच्या उलट मध्यम प्रकारच्या व खालच्या दर्ज्याच्या लोकांच्या राहणीचे मान उत्खननावरून अजमावता येते.

महाराष्ट्रात कोल्हापूर, नाशिक, जोर्वे इत्यादि, आणि विदर्भात पवनार, पौनी इत्यादि, ठिकाणी केलेल्या उत्खननांत सातवाहन-क्षत्रपकालीन अवशेष सापडले आहेत. त्यांत कोल्हापूर येथे पंचगंगा नदीजवळ ब्रह्मपुरी नामक उपनगरात मिळालेले अवशेष विशेष महत्त्वाचे आहेत. हा प्रदेश सातवाहनकालीन होता यात संशय नाही. येथे सापडलेल्या कुरवंशी सामंतांच्या नाण्यांविषयी इतरत्र विवेचन केले आहे. टॉलेमी (ख्रिस्तोत्तर १४०) बॅलिओकूरस राजाच्या हिप्पोकूर राजधानीचा उल्लेख करतो.[१] बॅलिओकूरस म्हणजे विळिवायकुर होय. याची नाणी ब्रह्मपुरी येथे सापडली आहेत. हिप्पोकूर आणि ब्रह्मपुरी (किंवा कोल्हापूर) या स्थलनामांत साम्य नाही खरे, पण त्यामुळे या स्थानाचे तत्कालीन नाव निराळे होते एवढेच म्हणता येईल. तेथील संस्कृति सातवाहन कालीन होती यात संशय नाही.

ब्रह्मपुरीतील सातवाहनकालीन घरे सुदृढ पायावर बांधली जात होती.[२] गोटे आणि पंचगंगेच्या काठच्या मातीचा चिखल यांचे एकावर एक थर घालून घरांचा पाया तयार केला जात असे. त्यावर भाजलेल्या विटांच्या भिंती उभारल्या जात. सातवाहन कालाच्या आरंभी त्यांचा आकार २१ इं. लांब, ११ इं. रुंद व ३ इं. जाड असे. पुढे तो १५ इं. × ७ इं. × २ इं. असा झाला. भिंती उभारताना विटांचे जोड एकावर एक येऊ नयेत याची काळजी घेतली जाई. सामान्यतः मध्यम-वर्गीयांची घरे चार खोल्यांची असत. त्यांचा आकार सामान्यतः १२ फू. × १५ फू. किंवा १२ फू. × १३ फू. असा असे. त्यांपैकी एका खोलीचा उपयोग सैंपाकाकरिता केला जाई. उत्खनन केलेल्या एका खोलीत हल्लीच्या प्रमाणे तीन दगड शेणामातीनें जोडून तयार केलेल्या दोन चुली होत्या. त्यांतील राख खोलीभर पसरू नये म्हणून त्यांच्या पुढे काही अंतरावर कट्टा घातला होता. खोलीच्या दुसऱ्या कोपऱ्यात जमिनीत बसविलेला पाण्याचा (वा धान्याचा) मोठा रांजण होता. सैंपाक घराची जमीन विटांनी बनविली होती. वरचे छप्पर सध्याच्या मंगलोरी कौलासारख्या पन्हाळ्यांच्या कौलांनी बनविले होते. ती कौलें लोखंडी खिळ्यांनी खालील वाशांवर पक्की बसविली होती हा लक्षणीय विशेष होय.

---

१ *C. A. I.*, p. 376.

२ *J. B. B. R. A. S.*, Vol. XXVII (No. 5), pp. 99 f.

नेहेमीच्या वापराकरिता घरातील भांडी मातीची केली असत. त्यांत ताटे, वाटया, आणि लोटे यांचा समावेश होता. काही विशेष प्रसंगी वापरण्याकरिता रोमन पात्रांचा उपयोग केला जात असे. त्यांपैकी कांही मद्यपानाकरिता वापरली जात असावी. त्या काळी रोमचे कडक मद्य श्रीमंत लोकांत विशेष प्रिय होते. त्या मद्याचे मोठ-मोठे रांजण (अँफोरा) पश्चिम महाराष्ट्रातील व विदर्भातील अनेक उत्खननांत सापडले आहेत. त्यांना खाली टोक असून ते लाकडी किंवा लोखंडी तिवईवर ठेवले असत. त्यांना उचलण्याकरिता दोन्ही बाजूस कान (handles) असत. ब्रह्मपुरी येथे तोटी असलेले उंच मानेचे एक मोठे भांडे व एक लहान मद्यपात्र ही सापडली आहेत. या स्थळाचा रोमशी व्यापारी संबंध होता हे तेथे सापडलेल्या रोमन व ग्रीक ब्राँझ धातूच्या मूर्तींवरून स्पष्ट दिसते. त्यांतील पोसीडनची मूर्ति विशेष उल्लेखनीय आहे.[१]

ब्रह्मपुरीतील उत्खननात आगीने काळे पडलेले तांदूळ, नाचणा व चणा ही अन्न धान्ये मिळाली आहेत. त्यांवरून तत्कालीन लोकांच्या खाद्याविषयी माहिती मिळते. पण ते लोक सर्वस्वी शाकाहारी नव्हते, कारण हल्लीप्रमाणे त्या काळीही हरणाचे मांस विशेष प्रिय होते असे दिसते. तत्कालीन एका घरात हरणाच्या पूर्ण शरीराचा सांपळाच मिळाला आहे. ते लोक सामान्यत: कापसाची वस्त्रे वापरीत असावे, कारण त्यांचे काही अवशेष तेथे मिळाले आहेत.

तत्कालीन लोकांना अलंकारांची मोठी हौस असावी. कारण तेथील उत्खननात विविध प्रकारचे मणि—आणि विशेष उल्लेखनीय म्हणून काचेचेही मणि—सापडले आहेत. काचेच्या दोन थरांमध्ये सोन्याचा पातळ पत्रा घालून एक प्रकारचा अलंकार करीत. त्याशिवाय मृत्तिका, शिंपले, अस्थि व हस्तिदंत यांचींही विविध प्रकारची भूषणे धारण केली जात. डोळ्यांत काजळ घालण्याकरिता हस्तिदंताच्या किंवा हाडांच्या शलाकांचा उपयोग केला जात असे.

भारतीयांना सातवाहन काळापूर्वीच लोखंडाचे ज्ञान प्राप्त झाले होते. म्हणून भाले वगैरे शस्त्रास्त्रे आणि चाकू, सुऱ्या वगैरे व्यवहारात उपयोगी पडणाऱ्या वस्तु लोखंडाच्याच केल्या जात. ख्रिस्ती शकाच्या आरंभापर्यंत दळण्याचे जाते प्रचारात आले नव्हते असे दिसते. कारण ते कोठल्याच तत्कालविषयक उत्खननात आढळले नाही. वाटण्याकरिता चार पायांच्या पाटयाचा व वरवंटयाचा उपयोग केला जात असे.

सांडपाणी ४ ते ४॥ फूट व्यासाच्या खोल कूपांत नळ जोडून नेले जाई. या कूपांच्या कडा मोठ्या रांजणांच्या तोंडासारख्या भाजक्या मातीच्या विटांनी

१ पट्टिका १८, आकृत्ति २७ पाहा. पोसीडन हा समुद्राचा देव, आणि झ्यूसचा धाकटा भाऊ आहे. त्याच्या हातात त्रिशूळ आणि जवळ डॉल्फिन (मोठा मासा) दाखविला असतो. याची देवळे समुद्रकाठच्या टेकडांवर असत.

किंवा भाजक्या मातीची गोल-कडी एकावर एक रचून बनविल्या जात. हे कूप घरापासून दूर अंतरावर असत.

या तऱ्हेची संस्कृति महाराष्ट्र-विदर्भातील अनेक उत्खननांत दृष्टीस पडली आहे. त्यावरून सातवाहनकालीन सामान्य माणसाचे जीवन कोणत्या प्रकाराचे होते याची कल्पना करता येते.

## प्रकरण पाचवे

# आर्थिक परिस्थिति

सातवाहनकाळी राज्याचे उत्पन्न जमिनीचा सारा, इतर कर, व्यापारी व इतर धंदेवाईक यांचेवरील कर, जकातीचे उत्पन्न, अपराध्यांना दंड, निपुत्रिकांची संपत्ति वगैरेंतून प्राप्त होत असे. राज्याच्या स्वतःच्या काही जमिनी असत. त्यांचेही उत्पन्न मिळत असे. क्र. ११ च्या लेखात गौतमीपुत्र सातकर्णीने म्हटले आहे की 'पश्चिम कखडी गावातील अजकालक नामक यक्षाच्या नावाने ज्ञात असलेले दोनशे निवर्तनांचे शेत पूर्वी ऋषभदत्ताच्या मालकीचे होते. (ते आता त्याच्यावरील विजयामुळे आमचे झाले आहे.) ते आम्ही त्रिरश्मि पर्वतातील भिक्षुसंघाला देत आहो.'[१] तेव्हा राज्यात अशी अनेक शेते राजाच्या मालकीची असत हे उघड आहे. इतर शेते मात्र हल्लीच्या रयतवारी पद्धतीप्रमाणे शेतकऱ्यांची होती. शासनकर्त्याला दान द्यावयाची असल्यास ती त्यांच्या मालकांकडून विकत घ्यावी लागत. क्र. ४३ च्या लेखावरून असे दिसते की ऋषभदत्ताला गोवर्धन नगराजवळचे शेत नाशिकच्या भिक्षुसंघाला द्यावयाचे होते. ते त्याला वाराहीपुत्र अश्विभूति नामक ब्राह्मणाकडून ४००० कार्षापण देऊन विकत घ्यावे लागले. शेतांची किंमत त्यांतील जमिनीच्या कसावर अवलंबून असे. म्हणून गौतमीपुत्राने पुढे कखडी गावातील कसल्या न जाणाऱ्या २०० निवर्तनांच्या शेताबद्दल आपल्या स्वतःच्या शेतातील फक्त १०० निवर्तन जमीन दिली होती. यावरून हे स्पष्ट दिसते.[२]

कांही दानांत संपूर्ण गावच दिल्याचा उल्लेख येतो. अशा दानांत त्या गावातील सर्व जमिनी त्यांच्या मालकाकडून काढून घेतल्या जात नसत, तर राजाला त्या गावातून मिळणारा सारा, असल्याच तर त्यांतील सरकारी जमिनी, व राजाचे इतर हक्क यांचे दान केले, असे समजण्यात येई. अशा खेड्यांतील लोकांनी शेतसारा दान दिलेल्या ब्राह्मणांस द्यावयाचा असे.

दान दिलेल्या गावांना काही विशिष्ट सवलती दिल्या जात. त्यांत राजसेवकांनी चोरांना व राजद्रोह्यांना पकडण्याशिवाय इतर कारणांस्तव[३] प्रवेश करण्यास मनाई असे. त्यात मिठाकरिता खोदण्यास सरकारलाही अधिकार नसे. इतर गावांत गुन्हेगारांना केलेला दंड राजाकडे जाई, पण दान दिलेल्या

---

१ क्रमांक ११, ओ. २-३.

२ क्रमांक १३, ओ. ३-५.

३ 'चोरराजापथ्यकारिदण्डवर्जम्' असा अपवाद नंतरच्या काही ताम्रपटांत आढळतो. कॉ. इ. इं., व्हॉ. ४, पृ. २७.

गावात तो ज्याला तो गाव दिला त्याला मिळे. कांही दानपत्रांत गुन्ह्यांची चौकशी करण्याचा हक्कही ग्रामावरोबर दिला असल्याचा उल्लेख आहे.[१]

सातवाहनकाळी महाराष्ट्रात कोणती पिके होत याचा कोरीव लेखात उल्लेख नाही. पण ती बहुधा हल्ली प्रमाणेच भात, ज्वारी, बाजरी, गहू, ऊस, चणे, कापूस, गळिताची धान्ये ही असावी. यांपैकी काहींचे उल्लेख तत्कालीन 'गाथासप्तशती'त[२] येतात. वेदविद्येचे महत्त्व आणि ती प्राप्त करून घेण्यास लागणारे परिश्रम ध्यानात घेऊन श्रोत्रिय (वेदवेत्त्या) ब्राह्मणांवर कोणताही कर लावला जात नसे.[३]

त्या काळी देशातील इतर प्रांतांशी तसेच परदेशांशीही व्यापार भरभराटीत होता, हे इतरत्र दाखविले आहे. पेरिप्लस ग्रंथात म्हटले आहे की पश्चिमेकडील देशांची जहाजे अरबी समुद्रातून सिंध प्रांतातील बंदरांत, तसेच भडोच वगैरे अन्य बंदरांत माल घेऊन जात. तेथून त्यांतील माल स्थलमार्गाने इतरत्र पाठविला जाई. महाराष्ट्रात कल्याण, शूर्पारक, चौल वगैरे बंदरे व्यापाराबद्दल प्रसिद्ध होती. स्थलमार्गांनी ती नाशिक, गोवर्धन, करहाट (कऱ्हाड), तगर (उस्मानावाद जिल्ह्यातील तेर), वैजयंती (उत्तर कानडा जिल्ह्यातील वंनवासी), पैठण वगैरे मोठमोठ्या नगरांशी व व्यापारी शहरांशी जोडली होती. पश्चिम किनाऱ्यावरील आणि घाटांतील अनेक ठिकाणी बौद्ध भिक्षूंकरिता लेणी कोरली आहेत. त्या मार्गांनीही व्यापार चालत असावा.

प्राचीन काळी व्यापार मुख्यत: श्रेणींद्वारा होत असे. कोरीव लेखांत पुढील श्रेणींचा उल्लेख येतो–धानिक (धान्याचे व्यापारी), गान्धिक (सुगन्धि पदार्थांचे व्यापारी), मालाकार, सुवर्णकार, सेलवढकि (पाथरवट), ओदयंत्रिक (जलयंत्र चालविणारे), तिलपिषक, कुलरिक (कुंभार), कोलिक (वस्त्रे विणणारे), वंसकार (बांबूचे पदार्थ बनविणारे बुरुड) इत्यादि. एका गावात एका धंद्याची एकच श्रेणी असे, असे नाही. उदाहरणार्थ क्र. ३८ च्या लेखावरून असे दिसते की गोवर्धन येथे विणकऱ्यांच्या दोन श्रेणी होत्या आणि बहुधा त्यांच्या स्थिरतेनुरूप, त्यांच्याकडे ठेवलेल्या अक्षयनीवीवरील व्याजाचे दर निरनिराळे होते. या श्रेणी केवळ आपल्या मालाची उत्पत्ति व व्यापार यांचेच काम पाहत नसत तर त्या पेढींचे (बँकांचे) ही कामही करीत. त्या रोख ठेव ठेवून घेऊन त्यावर मासिक किंवा वार्षिक व्याज देत. लोकांचा त्यांच्या स्थिरतेवर आणि प्रामाणिकपणावर विश्वास असे. ऋषभदत्त हा वस्तुत:

१ भाग २, क्र. ३५; पृ. ८५, टीप ३ पाहा.

२ गाथासप्तशती (सं. जोगळेकर), पृ. २१३ इ.

३ अकर: श्रोत्रिय: । आ. ध. सू., २.१०.२६.२०.

शासकच होता. पण त्यानेही नाशिकच्या भिक्षुसंघाला द्यावयाच्या आपल्या ठेवी सरकारी खजिन्यात (किंवा असल्यास सरकारी पेढ्यांत) न ठेवता गोवर्धन येथील दोन श्रेणींत ठेवल्या होत्या.

ग्रामांच्या किंवा अक्षयनीवींच्या देणग्या निगमसभेत प्रथम उद्घोषित करून नंतर स्थानिक रजिस्ट्रेशन (नोंदणी) ऑफीसमध्ये नोंदविल्या जात.[१] निगमसभा ही बहुधा स्थानिक लोकांच्या प्रतिनिधींची कमिटी असावी. तिची देखरेख या श्रेणींच्या व्यवहारांवर होत असली पाहिजे. म्हणून ही दाने व अक्षयनीवि दीर्घ काळ टिकतील, याविषयी दात्यांस खात्री वाटत असावी.

तत्कालीन व्याजाचा दर ९ ते १२ असा दरसाल दरशेकडा होता. ऋषभदत्ताने आपली २००० कार्षापणांची ठेव एका श्रेणीत दरसाल दरशेकडा १२ या दराने व दुसरी १००० कार्षापणांची ठेव दरसाल दरशेकडा ९ या दराने ठेवली होती. व्याजाचे निरनिराळे दर श्रेणींच्या पतीवर किंवा गरजांवर अवलंबून असावे.

उत्तर भारतात वैशाली येथील उत्खननात अनेक श्रेणींच्या मुद्रा सापडल्या आहेत. त्यांवरून त्यांच्याविषयी आपणांस बहुविध माहिती मिळाली आहे. महाराष्ट्रातील उत्खननांत मात्र अशा मुद्रा किंवा त्यांचे छाप मिळाले नाहीत. त्यामुळे या श्रेणींविषयी आपली माहिती अत्यल्प आहे.

कौटिल्याने 'श्रेणिबला'चा उल्लेख केला आहे.[२] श्रेणींना अनेक देशांशी व स्थलांशी व्यापार करावा लागत असल्यामुळे सुरक्षिततेकरिता त्यांना स्वत:चे रक्षक ठेवावे लागत. कारण त्यांना अरण्यादिकांतून आपला माल न्यावा लागे. या श्रेणिबलाचा उपयोग राजेलोक जरूरीच्या वेळी राज्याच्या रक्षणार्थ करीत असत. म्हणून राजेलोकांच्या बलांत (सैन्यांत) त्यांची गणना करण्यात येई.

सातवाहनकाळी विविध प्रकारची नाणी प्रचलित होती. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात यज्ञानुष्ठानप्रसंगी हजारो कार्षापण ब्राह्मणांना दान दिल्याचे उल्लेख आहेत. कार्षापण हे नाव तांब्याच्या तसेच चांदीच्या नाण्यांचेही द्योतक आहे. पण त्या लेखात उल्लेखिलेली कार्षापण नाणी तांब्याची (किंवा शिशाची) असावी. कौटिल्याच्या अर्थशास्त्रातही हजारो नाण्यांच्या पगारांचा उल्लेख आहे. भारतातील चांदीची कमतरता लक्षात घेता ते उल्लेखही तांब्याच्या नाण्यांचेच असावे.[३] सातकर्णि आणि नागनिका यांचे चांदीचे जोड नाणे अलीकडे सापडले आहे. त्यांनी तशी नाणी अश्वमेध प्रसंगी पाडली असावी. कोंडापूर

---

१ क्रमांक ११, ओ. ५.

२ कौटिल्य, ९.२.

३ Kane, *History of Dharmaśāstra*, III, pp. 120 f.

येथील उत्खननात टंकित (पंचमार्क्ड) नाण्यांचे अनेक ठसे सापडले आहेत. ती नाणी खासगी व्यापारी पाडीत असावे, असे कांही विद्वानांचे म्हणणे आहे.

नहपानाच्या काळच्या लेखांत ज्या कार्षापणांचा उल्लेख येतो ती नाणी चांदीची असावी. कारण नहपानाने तशी हजारो नाणी पाडली होती. जोगलतेंभी येथे त्याच्या १३,२५० हून अधिक नाण्यांचा संचय सापडलेला सुप्रसिद्ध आहे.

त्यावेळी सुवर्णाची नाणीही प्रचलित होती. नाशिक येथील एका लेखात ७०००० चांदीच्या कार्षापणांची किंमत २००० सुवर्ण नाणी अशी दिली आहे.[१] त्यावरून एका सुवर्णाबरोबर ३५ चांदीचे कार्षापण असे कोष्टक येते. सुवर्णाची नाणी कुशाण नृपतींनी भारतात प्रथम सुरू केली. नहपान हा बहुधा कुषाण सम्राट् कनिष्काचा महाराष्ट्र, गुजराथ, काठेवाड, माळवा इत्यादि प्रदेशांवर नेमलेला क्षत्रप होता. नाण्यांतील भेसळ वजा करून त्याच्या चांदीच्या नाण्यांचे वजन सुमारे ३० ग्रेन व कनिष्काच्या सोन्याच्या नाण्याचे वजन १२० ग्रेन घेतल्यास (३५ × ३० =) १०५० ग्रेन चांदीला (१ × १२० =) १२० ग्रेन सोने मिळे. अर्थात् त्या काळचे चांदी – सोन्यांच्या किंमतींचे प्रमाण ९ : १ असे येते हे डॉ. अळतेकरांनी दाखविले आहे.[२]

भारतात चांदी बाहेरून आणावी लागे, सोन्याचा प्रवाह मात्र रोमकडून भारतात चालू होता. यामुळे या कोष्टकात चांदीची किंमत जास्त दिसत आहे.

सातवाहनांनी शिशाची व पोटिन नामक मिश्र धातूचीही नाणी पाडली होती. शिशाची नाणी वाटोळी व मोठ्या आकाराची असत. पोटिनची नाणीही वाटोळी असत, पण त्यांचा आकार लहान असे. या नाण्यांचे सविस्तर विवेचन नंतरच्या एका प्रकरणात केले आहे.

क्र. ३८ च्या लेखात आलेल्या 'कुशणमूल' या शब्दाने कुषाण सम्राट् वीम कडफीसस् याने पाडलेले सोन्याचे नाणे विवक्षित आहे असे देवदत्तपंत भांडारकरांनी म्हटले आहे. पण तो शब्द तेथे लेखकाच्या प्रमादाने 'कुशलमूल' या शब्दाबद्दल कोरला गेला आहे हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[३]

तत्कालीन समृद्धीचे एक कारण भारताचा परदेशांशी – विशेषत रोमशी – व्यापार हे होय. त्यासंबंधी थोडीबहुत माहिती 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रीयन सी' (हिंदी महासागराचा मार्गदर्शक) या प्राचीन पुस्तकात येते 'एरिथ्रीयन सी' मध्ये तांबडा समुद्र आणि इराणी आखात यांचाही समावेश होतो. या ग्रंथाचा काल ख्रिस्तोत्तर ८० ते ८९ हा दिसतो.

---

१ क्रमांक ३८, ओ. ५.

२ *M. S. G. H.*, I, p. 181.

३ सं. मु., सर ८, पृ. २२५ इ. परिशिष्ट ६ पाहा.

'पेरिप्लस' ग्रंथामध्ये नम्बानुस,[१] थोरला सॅरेगानस आणि सँदरस या तीन पश्चिमेच्या राजांचा उल्लेख आला आहे. नम्बानुस म्हणजे नहपान असे कांही संशोधकांनी म्हटले आहे, पण ते संभवनीय नाही. 'पेरिप्लस'मध्ये सांगितले आहे की बॅरिगाझा (भडोच) आणि ॲरिआका (अपरान्त किंवा उत्तर कोंकण) ही नम्बानुसच्या राज्याची आणि भारताचीही (पश्चिम) सीमा आहे. यांची आतील सीमा सिथिया (शकस्थाना) जवळचा अबीरिया (आभीर) देश होय. नम्बानुस म्हणजे नहपान असे मानल्यास ही विधाने भडोच-जवळच्या प्रदेशास जुळतात. तेथील प्रदेश नहपानाच्या राज्यात मोडत होता यात संशय नाही. पण 'नम्बानुस'ने नहपान विवक्षित असणे शक्य नाही. कारण 'पेरिप्लस'चा काळ सुमारे ख्रिस्तोत्तर ८० मानल्यास त्याचा समकालीन नम्बानुस त्याच्या लेखांत उल्लेखिलेल्या शक संवत् ४२ ते ४६ (ख्रिस्तोत्तर १२० ते १२४) पर्यन्त राज्य करीत असणे संभवनीय नाही. नम्बानुस (किंवा मोम्बारुस) म्हणजे कोण हे सांगता येत नाही.

थोरला सॅरेगानस हा गौतमीपुत्र सातकर्णि असावा असे कोणी म्हणतात. त्याच्या काळी कल्लिएण (कल्याण) हे चांगले बंदर होते, पण नंतर सँदरसच्या काळी तेथून बॅरिगाझा (भडोच) येथे जाण्याकरिता परकी जहाजांना संरक्षकांची जरूरी पडे असे 'पेरिप्लस'मध्ये म्हटले आहे. हा सँदरस म्हणजे गौतमीपुत्र सातकर्णीचा पणजा सुंदर सातकर्णि असावा असे काहींचे म्हणणे आहे. हे समी-करण 'पेरिप्लस'च्या ख्रिस्तोत्तर ८० या काळाला जुळणारे आहे. सॅरेगानसचे पूर्वोक्त समीकरण मात्र त्या काळाशी जुळत नाही.

'पेरिप्लस'वरून असे समजते की त्याकाळी बॅरिगाझा (भडोच), कल्लिएन (कल्याण) आणि सुप्पारा (शूर्पारक—सोपारा) या बंदरांतून मोठा व्यापार चालत असे. ही बंदरे खुश्कीच्या मार्गाने पैठण, तगर (सध्याचे उस्माना-बाद जिल्ह्यातील तेर), उज्जैनी इत्यादि व्यापारी पेठांशी जोडली होती. त्या बंदरांतून इजिप्त, इटली, ग्रीस इत्यादि पश्चिमेकडील देशांशी मोठ्या भरभराटीने व्यापार चाले. भारतातून निर्यात होणाऱ्या मालात तिळाचे तेल, साखर, पशूंच्या कातडयांतून बनविलेली वस्त्रे, कापड, रेशमी वस्त्रे, मलमल, पिंपरी, वेलदोडे, दालचिनी, लवंगा, हिरे, माणके, मोती इत्यादिकांचा अंतर्भाव होता. आयातीच्या वस्तूंत रोमन मद्य, तांबे, कथील, शिसे, काच आणि औषधी मलमे ही असत.[२] हा व्यापार भारतास लाभदायक (favourable) होता. आणि म्हणून रोमन सुवर्ण नाण्यांचा ओघ भारताकडे वाहत होता

---

१ काही हे नाव 'मोम्बॅरस' असे वाचतात.

२ *J. O. I.*, XXVI, pp. 401 f.

याबद्दल तत्कालीन रोमन ग्रंथकार प्लिनी याने आपली व्यथा व्यक्त केली आहे.

भडोच येथे गहू, तांदूळ, तूप, तिळाचे तेल, आणि 'वेतातून बनविलेला मध' (साखर?) ही मुबलक प्रमाणात उत्पन्न होत असत. 'पेरिप्लस'च्या कर्त्याला उसाची माहिती नव्हती म्हणून त्याने त्याला 'मध उत्पन्न करणारा वेत' असे म्हटले आहे. भारतात कापसाची वस्त्रे विणण्याचा धंदा सिंधुसंस्कृतीच्या काळापासून प्रचलित आहे. कापसाचे कपडे घातलेल्या भारतीय योद्धयांचा उल्लेख हिरोडोटस या ग्रीक इतिहासकाराने केला आहे. मृगचर्म वस्त्र, कीटज वस्त्र (रेशीम), दुकूल (रेशमी वस्त्र) यांचा उल्लेख संस्कृत वाङ्मयांत अनेक ठिकाणी आढळतो. तसेच सोन्याचांदीच्या व मोत्यांच्या अलंकारांचे वर्णन अनेक ठिकाणी येते. ह्या सर्व निर्यातीच्या वस्तु होत. त्यांमुळे प्राप्त झालेली रोमन नाणी भारतात अनेक ठिकाणी मिळाली आहेत.

## प्रकरण सहावे

# साहित्य

सातवाहनकाली जनसामान्यांची तसेच राजदरबाराचीही भाषा प्राकृत झाली होती. ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकातच बौद्ध व जैन धर्मांचे संस्थापक गौतम बुद्ध आणि वर्धमान महावीर यांनी सामान्य जनतेत आपल्या धर्माचा प्रचार करण्याकरिता प्राकृत भाषांचा उपयोग केला होता. पुढे ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकात अशोकानेही अफगाणिस्तानापासून मैसूर पर्यंत पसरलेल्या आपल्या विशाल साम्राज्यातील प्रजाजनांस उद्देशून काढलेले आपले आदेश प्राकृत भाषेतच कळविले आहेत. धर्मसूत्रांतील नियम व्यवहारात पाळले जात असे मानले, आणि सर्व त्रैवर्णिकांना काही काळ गुरुगृही राहून वेदाध्ययन करावे लागे, असे गृहीत धरले तरी, त्यांचे संस्कृत भाषेचे ज्ञान अत्यल्प असे, असे अनेक प्रमाणांवरून अनुमान करता येते. 'आपस्तंब – धर्मसूत्रा'त असा एक नियम सांगितला आहे की, ब्रह्मचाऱ्याने आपले हात जोडून, ते पुढे करून आणि आपले नाव उच्चारून त्रैवर्णिकांना अभिवादन करावे. त्यांनी प्रत्यभिवादन करताना 'आयुष्मान्भव सौम्य शुभशर्म३न्' असा त्याच्या नावातील शेवटचा स्वर प्लुत करावा.[1] हा नियम मनूनेही दिला आहे. पण पुढे मनु म्हणतो —

**यो न वेत्त्यभिवादस्य विप्रः प्रत्यभिवादनम् ।**
**नाभिवाद्यः स विदुषा यथा शूद्रस्तथैव सः ।।**

(मनु, २.१२६.)

'ज्या ब्राह्मणाला असा प्लुत स्वर उच्चारता येत नसेल त्याला ब्रह्मचाऱ्याने नमस्कारच करू नये. तो शूद्रासारखा नमस्कार करण्यास अयोग्य मानावा.'

'मनुस्मृती'तील यवन, शक, पल्लव इत्यादि परकी टोळचांच्या निर्देशावरून तिचा काळ ख्रिस्तपूर्व २०० ते ख्रिस्तोत्तर २०० असा गणण्यात येतो. हाच सातवाहन काळ होय. या कालात कित्येक ब्राह्मण सुद्धा इतके संस्कृतानभिज्ञ झाले होते की त्यांना प्रत्यभिवादन विधिवत् करता येत नसे. यावरून त्या काळी संस्कृत भाषेचा कसा लोप झाला होता आणि सामान्य जनतेत प्राकृताचा किती प्रचार होता, हे दिसून येईल.

आरंभीच्या सातवाहन राजांनी अनेक श्रौत यज्ञ केले होते. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात तिचा पति सातकर्णि राजा याने व तिनेही अनेक श्रौत यज्ञ करून ब्राह्मणांना हजारो गाई व कार्षापण नाणी तसेच अनेक गाव, घोडे व

---

१ प्लावनं च नाम्नोभिवादनप्रत्यभिवादने च पूर्वेषां वर्णानाम् । आ. ध. सू. १.२.५.१७.

हत्ती दक्षिणा म्हणून दिल्याचा उल्लेख आहे. पण त्या श्रौत यज्ञांचे वर्णन असलेला लेख मात्र संस्कृत भाषेत नसून प्राकृत भाषेत आहे. किंबहुना, एकाही सातवाहन राजाचा एकही लेख संस्कृतात नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे. यापेक्षा परकी शक क्षत्रपांनी संस्कृत भाषेस बराच आश्रय दिला होता, असे दिसते. शक ऋषभ-दत्ताचे नाशिक येथील लेण्यातील लेख शुद्ध संस्कृतमध्ये नसले तरी त्यांत संस्कृत शब्दांचे प्राचुर्य आहे.[१] रुद्रदामन् या शक क्षत्रपाचा गिरनार येथील लेख तर समासप्रचुर आणि शब्दालंकारयुक्त सुन्दर संस्कृत भाषेत लिहिला आहे इतकेच नाही, तर त्याने स्वतःही गद्य व पद्य काव्ये रचली होती असाही त्यात निर्देश आढळतो.[२] याच्या उलट राजमाता गौतमी बलश्रीने आपला नातू पुळुमावि याला सांगून आपल्या दिवंगत सातकर्णि नामक थोर पुत्राचे जे वर्णन करविले होते ते अलंकारयुक्त असले तरी प्राकृतात आहे. किंबहुना, ते प्रथम संस्कृतात लिहून मागाहून त्याचे प्राकृतात रूपान्तर केलेले दिसते.[३] सर्व राजकीय शासने प्राकृतातच लिहिली पाहिजेत असा जणू सातवाहन राजांनी निश्चयच केला होता!

सातवाहनांच्या प्राकृत – प्रेमामुळे अनेक आख्यायिका प्राचीन कालापासून प्रचलित झाल्या होत्या. राजशेखराने म्हटले आहे की, कुन्तल देशात सातवाहन राजाने आपल्या अन्तःपुरात प्राकृत भाषाच वापरली पाहिजे असा नियम केला होता. भोजानेही 'सरस्वतीकण्ठाभरणा'त याचा निर्देश केला आहे. सातवाहन राजे प्राकृत कवींना कसा उदार आश्रय देत असत हे हाल या सातवाहनवंशी राजाच्या ग्रंथांवरून व तद्विषयक आख्यायिकांवरून स्पष्ट दिसते. हालाचा सुप्रसिद्ध ग्रंथ 'सत्तसई' किंवा 'गाथासप्तशती' हा माहाराष्ट्री प्राकृतात रचला आहे. त्याविषयी प्रथम चर्चा करू.

## १. हालाचे 'सत्तसई' व इतर ग्रंथ

या ग्रंथाच्या आरंभी पुढील गाथेत 'कविवत्सल' हाल राजाने एक कोटी गाथांमधून सातशे गाथा निवडून तो संग्रह केला असे म्हटले आहे –[४]

**सत्तसआइं कइवच्छलेण कोडीअ मज्झआरम्मि ।**
**हालेण विरइआइं सालंकाराणं गाहाणं ।।** (क्र. ३)

---

१ नाशिकच्या लेण्यातील उषवदाताचा लेख, क्रमांक ४३ पाहा.

२ क्रमांक ५१, ओ. १४.

३ पुढील विशेषणे पाहा—
'दिवसकरकरविबोधितकमलविमलसदिसवदनस' आणि 'वरवारणविकमचारुविकमस' क्रमांक १९, ओ. ३-४.

४ यानंतर 'गाथासप्तशती'तून उद्धृत केलेल्या गाथांचे क्रमांक स. आ. जोगळेकरांच्या 'हाल सातवाहनाची गाथासप्तशती' या ग्रंथास अनुसरून आहेत. निर्णयसागरने सन १९११ मध्ये प्रकाशित केलेल्या 'गाथासप्तशती'त ७०० पर्यंत तेच क्रमांक आढळतील.

याचे आरंभीचे नाव 'कोश' किंवा 'गाथाकोश' असे होते. ते काही टीकांच्या पुष्पिकांत आले आहे. उदाहरणार्थ, गंगाधराच्या टीकेतील खालील गाथा पाहा —

**एसो कइणामंकिअगाहापडिबद्धवड्ढिआआमो ।**
**सत्तसअओ समत्तो सालाहणविरइओ कोसो ।।**

(निर्णयसागर प्रत, पृ. २०७)

या गाथेवरून या गाथासंग्रहातील गाथांना त्या रचणाऱ्या कवींची नावे जोडली होती असे दिसते. तशी नावे अनेक टीकांत दिलेली आहेत. संस्कृत सुभाषितसंग्रहातल्याप्रमाणे त्यांत पुष्कळदा मेळ असत नाही, पण तेवढ्यावरून ती सर्व बनावट मानणे योग्य होणार नाही. या गाथेत प्रस्तुत गाथासंग्रहाला 'कोश' म्हटले आहे. कोश याचा मूळचा अर्थ 'मुक्तक श्लोकांचा (किंवा गाथांचा) समूह' असा होता. 'साहित्यदर्पणा'तील 'कोश' शब्दाची पुढील व्याख्या पाहा —[१]

**कोशः श्लोकसमूहस्तु स्यादन्योन्यानपेक्षकः ।**

हा गाथाकोश सालाहणाने रचला होता असे मागील गाथेत म्हटले आहे. 'सालाहण' हे 'सातवाहन' याचे प्राकृत रूप होय. हाल हा सातवाहन कुळातील राजा होता. म्हणून सप्तशतीला सालाहणविरइअ (सातवाहन-विरचित) म्हटले आहे. बाणाने आपल्या 'हर्षचरिता'च्या आरंभी या गाथा-संग्रहाची पुढीलप्रमाणे स्तुति केली आहे—

**अविनाशिनमग्राम्यमकरोत् सातवाहनः ।**
**विशुद्धजातिभिः कोशं रत्नैरिव सुभाषितैः ।।**

'शुद्ध जातीच्या रत्नांनी कधीही न संपणाऱ्या आणि ग्रामांत न दिसणाऱ्या निधीसारखा सातवाहनाने निर्दोष स्वभावोक्तींनी युक्त अशा सुभाषितांचा अमर आणि सुसंस्कृत असा (गाथांचा) संग्रह केला.'

या गाथासंग्रहाचा कर्ता हाल याची स्तुति अनेक उत्तरकालीन कवींनी केली आहे. 'कुवलयमाले'चा कर्ता उद्द्योतनसूरि हालाविषयी आणि त्याच्या 'गाथाकोशा'विषयी आपल्या 'कुवलयमाले'त पुढील प्रशंसोद्गार काढतो —[२]

**भणिइविलासवइत्तणचोक्किल्ले जो करेइ हलिए वि ।**
**कव्वेण किं पउत्थे हाले हालावियारे व्व ।।**

यात हाल आपल्या वाणीच्या विलासाने हालिकांना (शेतकऱ्यांना) सुद्धा जणू काय हालेने (मदिरेने) बेहोष झाल्याप्रमाणे नाचावयास लावतो, असे म्हटले आहे.[३]

---

१ साहित्यदर्पण, ६, ३२९.
२ कुवलयमाला (सं. अ. ना. उपाध्ये), पृ. ३.
३ पूर्वोक्त, पृ. ३.

**पणईहि कइयणेण य भमरेहि व जस्स जायपणईहि ।**
**कमलायरो व्व कोसो विलुप्पमाणो वि हु ण झीणो ।।**

'जसे मकरंदाने लुब्ध झालेल्या भ्रमरांनी कितीही लुबाडला तरी कमल-समूह क्षीण होत नाही तसा हालाचा हा कोश त्यावर आसक्त झालेल्या कविजनांनी कितीही लुटला तरी संपत नाही.'

नंतरच्या काळात 'कोश' याचा अर्थ 'शब्दसंग्रह' असा प्रचलित झाल्या-मुळे 'श्लोकसंग्रह' किंवा 'गाथासंग्रह' या अर्थी त्याचा प्रयोग होईनासा झाला.

पुराणांतील अंध्र (सातवाहन) राजांच्या वंशावळीत हालाचे नाव सतराव्या क्रमांकाने येते. त्याने फक्त पाच वर्षे राज्य केले असे पुराणे सांगतात, ते मात्र असंभवनीय वाटते. त्याने ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात राज्य केले असावे असे पुराणांतील वंशावळीवरून दिसते.

पण हा काळ अनेक विद्वानांना मान्य नाही. कीथच्या मते हाल राजा ख्रिस्तोत्तर २०० – ४५० ह्या काळात होऊन गेला असावा. वेबरने त्याचा काळ ख्रिस्तोत्तर तिसरे शतक – निदान सातव्या शतकापूर्वी – मानला आहे. देवदत्तपंत भांडारकरांनी क्र. ८९ च्या गाथेत कृष्ण व राधा यांचा उल्लेख, क्र. २६१ च्या गाथेत मंगळवारचा निर्देश, आणि क्र. ४६४ च्या गाथेतील विक्रमादित्याचा उल्लेख यांवरून 'गाथासप्तशती' ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकात रचली असावी असे प्रतिपादिले आहे. बाणाने आपल्या 'हर्षचरिता'च्या प्रास्ताविक श्लोकात सातवाहनाच्या ज्या कोशाचे वर्णन केले तो 'गाथा-सप्तशती' असणे शक्य नाही असेही त्यांनी म्हटले आहे.[१] पण ते चूक आहे, हे आम्ही मागे दाखविले आहे.

'सप्तशती'तील ज्या गाथांच्या प्रमाणांवरून देवदत्तपंत भांडारकरांनी तो ग्रंथ ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकाइतका अर्वाचीन मानला आहे त्या गाथा हालाच्या मूळ ग्रंथात होत्या याला प्रमाण नाही. 'सप्तशती'च्या अनेक आवृत्त्या झाल्या होत्या. प्रत्येक आवृत्तीत सातशेच गाथा असत ; पण पूर्वीच्या कांही गाथा गाळून आणि नंतरच्या तितक्याच गाथा त्यांच्या जागी घुसडून ही संख्या जमविली जात असे. 'गाथासप्तशती'च्या अशा सात आवृत्त्या झाल्या होत्या. त्या सर्वांत फक्त ४३० गाथा समान आहेत असे वेबरने दाखविले आहे. त्याच तेवढ्या मूळच्या 'गाथासप्तशती'त असाव्या. इतरांच्याविषयी खात्री नाही.

या गाथा अनेक कवींनी माहाराष्ट्री प्राकृतात रचल्या होत्या. आरंभी प्रत्येक गाथेशी तिच्या कर्त्याचे नाव संलग्न असे. हेच पूर्वोक्त शेवटल्या गाथेतही स्पष्टपणे सांगितले आहे. कांही गाथा कवींच्या तर काही कवयित्रींच्या आहेत

---

१ *R. G. Bhandarkar Volume*, p. 189.

पण हे सर्व कवि व या सर्व कवयित्री महाराष्ट्रातील होत्या. कारण या गाथांत विंध्य पर्वत, रेवा, तापी, आणि गोदावरी या नद्यांचा उल्लेख आहे. उत्तर भारतातील एकाही नदीपर्वतांचा निर्देश नाही.

या गाथासंग्रहात ज्यांच्या गाथा घेतल्या आहेत त्यांमध्ये हाल व त्याचा दरबारचा पालित्त (किंवा पादलिप्त) नामक कवि यांच्याप्रमाणे तत्कालीन इतर अनेक कवि, तसेच रेवा, माधवी, अनुलक्ष्मी, अन्ध्रलक्ष्मी यांसारख्या कवियित्रीही आहेत. त्यांपैकी कोणते कवि व कवयित्री हालकालीन आणि कोणते उत्तरकालीन हे समजण्यास आता साधन नाही; पण त्यांतील काही नावे उत्तरकालीन राजांची व कवींची दिसतात, त्यांवरून 'सप्तशती 'त अनेक उत्तरकालीन कवींच्या गाथा मधून मधून घुसडल्या जात होत्या हे स्पष्ट दिसते. ते राजे व कवि असे —[१]

(१) सातवाहनवंशी कर्ण (क्र. ५५ व ४५५); (२) वाकाटक प्रवरसेन (क्र. ४५, ६४, २०२, २०८ आणि २१६) (गंगाधर); तसेच क्र. १४६, १५३, १५८, २०३, २०९, ३४१, ५०६, ५६७ व ७२४ (भुवनपाल); (३) वाकाटक सर्वसेन, क्र. ५०२ व ५०३ (पीतांबर); क्र. २१७, २३४ (भुवनपाल); (४) मान (राष्ट्रकूट मानाङ्क), क्र. १०१ – १०४; (५) राष्ट्रकूट देवराज, क्र. १३८, २३९; (६) आढ्यराज (हालकालीन), क्र. ६६, १६९, २१९, २३५ (भुवनपाल); आणि (७) वाक्पतिराज (भवभूतिकालीन, ख्रिस्तोत्तर आठवे शतक), क्र. ९५ (गंगाधर), ६१६–६१८ (पीतांबर).

'गाथासप्तशती 'च्या भिन्न भिन्न आवृत्तींत अशा उत्तरकालीन कवींच्या गाथा घुसडल्या असल्यामुळे ज्या गाथेचा पुरावा विचारात घ्यावयाचा ती हालाच्या मूळ गाथासंग्रहात होती हे सिद्ध करणे जरूर आहे. पण ते सध्या अशक्य असल्यामुळे असल्या ढिसूळ पुराव्यावर भिस्त न ठेवणे बरे. उदाहरणार्थ, खालील गाथेत[२] आलेला विक्रमादित्याचा उल्लेख पाहा —

**संवाहणसुहरसतोसिएण देंतेण तुह करे लक्खम् ।**
**चलणेण विक्कमाइच्चचरिअं अणुसिक्खिअं तिस्सा ।।**

या गाथेचा संदर्भ पुढीलप्रमाणे दिसतो. एक स्त्री आपल्या प्रियकराला त्याच्या दुसऱ्या एका प्रेयसीला अनुलक्षून म्हणते —'तुझ्या संवाहनाने आनंदित झालेल्या तिच्या पायाने तुझ्या हातावर लाक्षारसाने आपली चिन्हे उमटविताना विक्रमादित्याच्या चरित्राचे अनुकरण केले आहे. (कारण, विक्रमादित्य राजा याचकांच्या हातावर लक्ष लक्ष नाणी ठेवीत असतो.).

१ *S. I.*, I, pp. 93 f.

२ गाथा, क्रमांक ४६४.

यातील विक्रमादित्य हा गुप्तवंशी द्वितीय चंद्रगुप्त असावा. कारण त्याच्या दातृत्वाविषयी अश्या आख्यायिका उत्तरकालीन कोरीव लेखांत आल्या आहेत.[१] ही गाथा अर्थात्च ख्रिस्तोत्तर ४०० नंतर 'गाथासप्तशती'त घुसडली असावी. तिच्या पुराव्यावरून मूळ 'गाथासप्तशती'चा काळ ठरविणे योग्य होणार नाही.

'गाथासप्तशती' हा जानपद गीतांचा संग्रह आहे. हालाच्या काली प्राकृत काव्यरचनेला मोठा बहर आला होता. राजापासून रंकापर्यंत ज्यांना म्हणून थोडीबहुत प्रतिभा व काव्यरचनाशक्ति होती त्या सर्वांनी गाथा रचल्या होत्या. अश्या कोटचवधि गाथांतून हालाने फक्त सातशे गाथा निवडून आपला 'कोश' रचला होता.

या गाथांचे निर्माते विदग्ध नागरिक नाहीत, तश्या यातील वर्ण्यविषय स्त्रियाही विलासिनी नाहीत. त्यांत महाराष्ट्रातील गावांत हरघडी दिसणारे साधे जीवन चित्रित केले आहे. त्यांत प्रणय आहे, विनोद आहे, निसर्ग-वर्णन आहे, स्त्री-पुरुषांच्या सुखदुःखांचे चित्रण आहे, भावनांचा हळुवारपणा आहे, आणि हे सर्व मोजक्या शब्दांत वर्णिले आहे. एखाद्या कसलेल्या चित्रकाराने आपल्या कुंचल्याच्या दोनचार फटकाऱ्यांनी आपणांपुढे सजीव चित्र उभे करावे तशी यांतील शब्दचित्रे आहेत. यांतील स्त्रियांच्या भावना पुरुषांनी व्यक्त केल्या नसून स्त्रियांनीच त्या शब्दांकित केल्या असाव्या असे वाटते. या प्राकृत काव्याच्या माधुर्याविषयी एक कवि काय म्हणतो ते पाहा —

**अमिअं पाउअकव्वं पढिउं सोउं अ जे ण जाणन्ति ।**
**कामस्स तत्ततन्तिं कुणन्ति ते कहं न लज्जन्ति ।।**

(१.२)

('अमृतासारखे प्राकृत काव्य कसे वाचावे व ऐकावे हे ज्यांना माहीत नाही तरीही जे कामशास्त्रातील तत्त्वांची चर्चा करतात त्यांना लाज कशी वाटत नाही ? ')

'गाथासप्तशती'तील काही गाथांत प्रेमिकांच्या संकेतस्थानांचा उल्लेख असला तरी सर्व गाथांत चौर्य रताचे वर्णन पाहण्याचा उपद्व्याप कांही टीका-

---

१ संजान ताम्रपटातील राष्ट्रकूट सम्राट् प्रथम अमोघवर्ष याच्या वर्णनपर पुढील श्लोक (ए. इं., व्हॉ. १८, पृ. २४८) पाहा—

हत्वा भ्रातरमेव राज्यमहरद्देवीं च दीनस्तथा
लक्षं कोटिमलेखयत्किल कलौ दाता स गुप्तान्वयः।
येनात्याजि तनुः स्वराज्यमसकृद् बाह्यार्थकैः का कथा
ह्रीस्तस्योन्नतराष्ट्रकूटतिलको दातेति कीर्त्यामपि ।।

कारांनी केला आहे तो अनाठायी वाटतो. काहींत विशुद्ध निसर्गवर्णन आहे. उदाहरणार्थ, खालील गाथा (क्र. ४) घ्या –

**उअ णिच्चलणिप्पन्दा भिसिणीपत्तम्मि रेहइ बलाआ।**
**णिम्मलमरगअभाअणपरिट्ठिआ संखसुत्तिव्व ।।**

[पाहा. कमलाच्या (निळ्या) पानांमध्ये ही (शुभ्र) बगळी कशी निश्चल, हालचाल न करता बसली आहे! ती निर्मळ पाचूच्या पात्रात ठेवलेल्या शंखशिंपल्याप्रमाणे दिसते आहे.]

यात त्या बगळीच्या हुबेहुब वर्णनाने सुंदर स्वभावोक्ति अलंकार झाला आहे. पण कालान्तराने संस्कृत काव्यशास्त्रामध्ये ध्वनिकाव्याला श्रेष्ठत्व प्राप्त झाल्यावर आलंकारिक अशा गाथांतूनही शृंगारिक अर्थ काढू लागले. मम्मटाने या गाथेतून पुढील व्यंग्यार्थ काढला आहे –[१]

'येथे बगळी निश्चल बसली असल्यामुळे हे स्थान निर्मनुष्य आहे. अतएव ते आपणांस प्रणय – क्रीडेकरिता योग्य असे संकेतस्थान आहे!' कांही गाथांत संकेतस्थान सुचविले आहे यात संशय नाही. उदाहरणार्थ, खालील गाथा पाहा –[२]

**किं रुअसि ओणअमुही धवलाअन्तेसु सालिछित्तेसु।**
**हरिआलमण्डिअमुही णडि ०व सणवाडिआ जाआ ।।**

(साळीचे शेत पिकले आहे. आता ते लौकरच कापले जाईल व आपले संकेतस्थान नष्ट होईल, म्हणून मान खाली घालून तू का रडतेस? ती पाहा हळदीचा रंग लावून सज्ज झालेल्या नटीप्रमाणे (त्या शेतापेक्षा उंच अशी) तागाची वाडी तयार झाली आहे. तेथे तुला आपल्या प्रियकराला भेटता येईल.)

अशी संकेतस्थाने केवळ कुलटांची चौर्यरताकरिता असत असे नाही. ती नवविवाहितांचीही असू शकतात. पण कांही गाथांत विवाहबाह्य संबंधही सूचित केलेला दिसतो. उदाहरणार्थ, ध्वनिकाव्याचे मूर्धाभिषिक्त उदाहरण म्हणून अनेक काव्यशास्त्रग्रंथांत उद्धृत केलेली पुढील गाथा (क्र. १७५) पाहा ––

**भम धम्मिअ वीसत्थो सो सुणओ अज्ज मारिओ तेण।**
**गोलातडविअडकुडंगवासिणा दरिअसीहेण ।।**

एक स्त्री आपल्या संकेतस्थानाजवळ कोणी धार्मिक येत असलेला पाहून त्याला भिववण्याकरिता म्हणते, 'अहो धार्मिक, आता कुत्र्याचा तुम्हांला येथे विटाळ होण्याचा संभव नाही. तुम्ही खुशाल इकडे तिकडे नि:शंकपणे हिंडा; कारण, आजच गोदातीरच्या दाट कुञ्जात राहणाऱ्या विक्राळ सिंहाने त्या कुत्र्याला ठार केले आहे'.

---

१ उल्लास २, श्लो. ८ (झळकीकर–प्रत, पृ. ३०).
२ गाथा, क्रमांक ९.

'गाथासप्तशती'तील पतिवियोग होणाऱ्या किंवा झालेल्या स्त्रियांची चित्रे अत्यंत हृदयस्पर्शी आहेत. दुसऱ्याच दिवशी सकाळी प्रवासास जाणार असलेल्या ग्रामिकाची स्त्री काय म्हणते पाहा —[१]

**कल्लं किल खरहिअओ पवसिइहि पिओत्ति सुण्णइ जणम्मि ।**
**तह वड्ढ भअवइ णिसे जह से कल्लं विअ ण होइ ।।**

(पहाट झाली की माझे निष्ठुर प्रियकर प्रवासाला जाणार, असे मी लोकांकडून ऐकते. भगवति रात्रि ! तू इतकी दीर्घ हो की, मुळी पहाटच होऊ नये ! )

एका स्त्रीचा पति 'मी अमुक दिवसांत येतो' असे तिला सांगून परगावी गेला ; तेव्हा —

**अज्जं गओत्ति अज्जं गओत्ति अज्जं गओत्ति गणरीए ।**
**पढमं व्विअ दिअहद्धे कुड्डो रेहाहिं चित्तलिओ ।।**[२]

(तिने आपल्या झोपडीच्या भिंतीवर 'आजचा दिवस गेला', 'आजचा दिवस गेला' अशा रेघा काढून त्या दिवसाच्या प्रथमार्धातच सगळी भिंत भरून टाकली! )

काही गाथांत निरागस विनोद आहे. पुढील गाथा पाहा —[३]

**पाअपडिअस्स पइणो पुट्ठिं पुत्ते समारुहन्तम्मि ।**
**दढमण्णुदुण्णिआए वि हासो घरिणीए णिक्कन्तो ।।**

('पत्नी रागावली म्हणून पतीने तिच्या पुढे साष्टांग नमस्कार घातला. तितक्यात त्याचा लहान मुलगा त्याच्या पाठीवर चढून बसला. तेव्हा पत्नी फार रागावली होती तरी तिला आपले हसे आवरले नाही.')

प्रसूतिवैराग्यविषयक खालील गाथाही लक्षणीय आहे —[४]

**हासाविओ जणो सामलीअ पढमं पसूअमाणाए ।**
**वल्लहवाएण अलं मम त्ति बहुसो भणन्तीए ।।**

(पहिलटकरीण श्यामला जेव्हा पुनः पुनः म्हणू लागली की 'त्या माझ्या वल्लभाचे नाव काढू नका', तेव्हा जवळच्या सर्व स्त्रिया हसू लागल्या.)

आपल्या अपत्याच्या दात येण्याच्या प्रसंगाचे कौतुक कसे केले जाते ते पाहा —[५]

**गेह्णह पलोअह पहसिअवअणा पइस्स अप्पेइ ।**
**जाआ सुअपढमुब्भिण्णदन्तजुअलंकिअं बोरम् ।।**

('हे घ्या, पाहा' असे म्हणून पत्नी हसत मुखाने आपल्या अर्भकाचे दोन दात ज्यावर उमटले आहेत असे एक बोर आपल्या पतीला देते.)

---

१ गाथा, क्रमांक ४६.
२ गाथा, क्रमांक २०८.
३ गाथा, क्रमांक ११.
४ गाथा, क्रमांक १२३.
५ गाथा, क्रमांक २००.

खालील गाथेतील ध्वनि लक्षणीय आहे—

**दिअरस्स असुद्धमणस्स कुलवहू णिअकुड्डलिहिआइं ।**
**दिअहं कहेइ रामाणुलग्गसोमित्तिचरिआइं ।।**

(क्र. ३५)

[आपल्या दीराची (आपल्याविषयी) अशुद्ध भावना आहे हे पाहून कुलवधु दिवसा आपल्या घराच्या भिंतीवर रामाबरोबर नेहमी असणाऱ्या लक्ष्मणाचे चित्र काढून त्याची भ्रातृसेवा व्यक्त करते.] 'लक्ष्मण जसा आपल्या भ्रातृप्रेमाने सीतेविषयी शुद्ध मनाने वागत असे तसे तुम्ही माझ्याशी वागावे' असे ती आपल्या दीराला सुचवीत आहे.

सासऱ्याने नवी रंगीत साडी दिल्यामुळे हरखून गेलेली शेतकऱ्याची सून कशी गर्वाने चालत होती, त्याचे वर्णन खालील गाथेत केले आहे.[१]

**अप्पत्तपत्तअं पाविऊण नवरंगअं हलिअसोण्हा ।**
**उअह तणुई ण माअइ रुन्दासु वि गामरच्छासु ।।**

(ती होती अंगाने किरकोळच. पण अकल्पितपणे मिळालेल्या नव्या रंगीत साडीच्या गर्वामुळे ती अशा दिमाखाने चालत होती की त्या गावातील रुंद रस्त्यात ती जणू मावत नव्हती ! )

अशी किती उदाहरणे द्यावी ? प्रत्येक गाथेत थोडक्या शब्दांत एक रम्य चित्र काढले आहे. हीच परंपरा संस्कृत ग्रंथकारांनी आपल्या सुभाषितांत पुढे चालविली.

हाल सातवाहन हा सामान्यतः 'गाथासप्तशती'चा संपादक आणि तीतील कांही गाथांचा कवि म्हणून प्रसिद्ध आहे. पण प्रा. एच्. सी. भायानी यांच्या अलीकडील संशोधनावरून त्याच्या आणखी काही ग्रंथांविषयी माहिती उपलब्ध झाली आहे.[२] ती पुढे दिली आहे—

हाल सातवाहनाने एक प्राकृतछंदविषयक ग्रंथ लिहिला होता. त्यात द्विपदीविषयी सविस्तर माहिती होती.[३]

शिवाय हाल हा प्राकृतकोशकारही होता. त्यात देशी शब्दांचे अर्थ दिले होते. हेमचंद्राने आपल्या 'देशीनाममाले'त हालाच्या कोशातून चार अवतरणे

---

१ गाथा, क्रमांक २४१.

२ *Raghavan Felicitation Volume* (*R. F. V.*), pp. 61 f.

३ विरहांकाच्या (सु. सन ८८०-९२०) 'वृत्तजातिसमुच्चय' ग्रंथात भुजगाधिप आणि वृद्धकवि यांच्या बरोबर सातवाहनाचाही 'द्विपदीचा विवरणकार' म्हणून निर्देश आहे. *R. F. V.*, pp. 62 f.

दिली आहेत. त्यांवरून तो कोश प्रमाण मानला जात होता, असे दिसते. त्यांपैकी एक अवतरण 'जंबुलं मद्यभाजनम्' असे आहे.[१] त्यावरून त्या कोशात देशी शब्दांचे अर्थ संस्कृतमध्ये दिले होते यात संशय नाही. तसेच तो कोश अनुष्टुभ् वृत्तात रचला होता हेही स्पष्ट आहे.

हाल सातवाहनाने प्राकृत गाथांखेरीज आणखीही एक प्राकृत ग्रंथ रचला होता हे अपभ्रंश कवि स्वयंभू याच्या 'स्वयंभूछन्दस्' या ग्रंथातील अवतरणांवरून समजते. त्यांपैकी पहिले उदाहरण उद्‌गीतिविषयक असून ते सालाहणाच्या नावावर दिले आहे.[२] दुसरे हालाच्या नावावर असून ते शार्दूलविक्रीडित[३] या वर्णवृत्तात आहे.

आणखीही एक ग्रंथ हालाच्या नावावर प्रसिद्ध आहे. तो धवल या गीतिकांचा होय. हेमचंद्र धवलाविषयी बरीच माहिती देऊन म्हणतो — 'धवलानि सातवाहनोक्तिषु द्रष्टव्यानि। दिङ्मात्रं तूदाहरिष्यते।' अपभ्रंश कवि स्वयंभू यानेही सातवाहनाने अनेक प्रकारची 'धवल' गीते रचली होती असे म्हटले आहे. ही गीते अपभ्रंश भाषेत नसून प्राकृतातच असावी. धवल म्हणजे ढवळा किंवा पांढरा बैल. तेव्हा ही गीते धवलान्योक्तिरूपाची असावी असा प्रा. भायानींचा तर्क आहे.[४]

हेमचन्द्राने 'देशीनाममाले'त हाल सातवाहनाची दुसरी नावे कुन्तल, पूस आणि चउरचिंध अशी दिली आहेत. हाल कुन्तल देशावर राज्य करीत होता म्हणून त्याला कुन्तल नाव पडले असावे. 'कामसूत्र'कार वात्स्यायन 'कुन्तल सातकर्णीने आपली महाराणी मलयवती हिचा कर्तरीने (कात्रीने) खून केला होता'[५] अशी आख्यायिका देतो. पण तीत किती तथ्य आहे माहीत नाही. हाल सातवाहनाच्या 'चउरचिन्ध' (चतुरचिन्ह किंवा चतुराङ्क) या नावाबद्दल प्रा. भायानी यांचा असा तर्क आहे की त्याने एखादे काव्य रचून त्याच्या

---

१ *R. F. V.*, p. 68.

२ उग्गीइ सालाहणस्स—
थणदोहडिए भरइ व बाला लाअण्णसलिलेहिं।
रमणालवालनिग्गअरोमावलिवल्लरि व्व सिंचेइ।।
*Ibid.*, p. 69, n. 18.

३ अहवा हालस्स—
कामं पुप्फधणुं सकुसुमसरं तुण्णं तिअच्छाहअं
सोउं जं जुवइजणो ण कुविओ तं अत्थि से कारण।
हेलासज्झजअं समत्तमिणमो पाअंतरालीकअं
केसाकेसिणिबंधणं चिअ जं एत्थम्ह को मल्लओ ।। स्वयंभूछंदस्, १–४७.२.

४ *Ibid.*, p. 69.

५ कर्तर्या कुन्तलः शातकर्णिः सातवाहनो महादेवीं मलयवतीं [जघान]। कामसूत्र, पृ. १३१.

विभागांच्या शेवटच्या श्लोकात चतुर (प्राकृत चउर) शब्द घातला असावा.[१] अनेक संस्कृत व प्राकृत कवींनी तसे केल्याचे ज्ञात आहे.

## २. हालाच्या दरबारचे कवि

हालाच्या दरबारी अनेक कवि होते. त्यांतील कित्येकांची नावे 'सप्तशती'च्या श्लोकांशी संबद्ध अशी टीकांत आढळतात. पण त्यांच्यापैकी फार थोड्यांविषयी आपणांस माहिती आहे. त्यांमध्ये पालित्त, पादलिप्त किंवा श्रीपालित हा एक होता. तो हालाच्या दरबारात मुख्य होता असे दिसते. अभिनन्दाने आपल्या 'रामचरिता'त म्हटले आहे—

**हालेनोत्तमपूजया कविवृषः श्रीपालितो लालितः ।**[२]

उद्द्योतनसूरीने 'पालित्त हा हालाच्या सभेत प्रमुख होता. त्याच्यामुळे विद्वद्गोष्ठींमध्ये हाल राजा हाराने शोभावा तसा शोभत असे' असे म्हटले आहे.[३]

**णिम्मलमणेण गुणगरुयएण परमत्थरयणसारेण ।**
**पालित्तएण हालो हारेण व सहइ गोट्ठीसु ।।**

हा पालित्त 'तरंगवती' कथेचा कर्ता म्हणून प्रसिद्ध आहे. पण ती आता उपलब्ध नाही. पालित्ताच्या अनेक गाथा 'सत्तसई'त घेतल्या आहेत.[४]

हाल सातवाहनाच्या सभेतील दुसरा प्रसिद्ध कवि पोट्टिस हा होय. राजशेखराच्या 'कर्पूरमंजरी'त त्याचा हरिवृद्ध, नन्दिवृद्ध आणि हाल या प्राकृत कवींबरोबर उल्लेख आला आहे.[५] कोऊहलाच्या 'लीलावई' या प्राकृत कथेत पोट्टिसाला हालाचा मंत्री म्हटले आहे. 'गाथासप्तशती'च्या टीकाकारांनी त्याचे नाव पाच गाथांशी संलग्न केले आहे.[६] प्रा. भायानी सांगतात की अहमदाबाद येथील एल्. डी. इन्स्टिटयूट ऑफ इंडोलॉजीच्या ग्रंथालयातील 'लीलावई'च्या हस्तलिखितात एके ठिकाणी समासामध्ये 'हालमन्त्री तु पोट्टिसः ।' असे लिहिले आहे. त्यावरूनही त्या कथेतील पोट्टिस – विषयक विधान समर्थित होते.

राजशेखराच्या 'कर्पूरमंजरी' प्राकृत नाटिकेच्या पहिल्या जवनिकेत विदूषक व विचक्षणा दासी यांच्या बाचाबाचीत राजा त्या दासीची प्रशंसा

---

१ *R. F. V.*, p. 77.

२ अभिनन्दकृत 'रामचरित,' २२, १०.१००.

३ कुवलयामाला, प्रथम भाग, पृ. ३.

४ उदाहरणार्थ, क्र. ३९३, ४१७, ४२५ इ.

५ राजशेखराच्या 'कर्पूरमञ्जरी'च्या पहिल्या जवनिकेत राजा विचक्षणा दासीला कवि म्हणतो, तेव्हा विदूषक रागावून विचारतो—ता उज्जुअं जेव किं ण भणीअदि अम्हाणं चेडिआ हरिउड्ढपोट्टिसहालप्पहुदीणं पि पुरदो सुकइत्ति ।

६ उदाहरणार्थ, गाथा, क्रमांक ८९.

करतो तेव्हा विदूषक उद्गारतो, 'तर मग तुम्ही ही चेटी हरिवृद्ध, नन्दिवृद्ध, हाल प्रभृतींपेक्षाही श्रेष्ठ आहे असे का म्हणत नाही ?' विदूषकाच्या या टोमण्यात हालाबरोबर त्याच्या सभेतील आणखी दोन प्राकृत कवींचा उल्लेख आहे. त्यांपैकी हरिवृद्ध हा थोर कवि होता. भोजाच्या 'सरस्वतीकण्ठाभरणा'त गूढार्थ या दोषगुणाचे विवरण करताना खालील गाथा दिली आहे —[१]

**अम्हारिसा हि कइणो कइणो हरिवुड्ढसालिपमुहा वि ।**
**मंडुक्कमक्कडा वि हु होंति हरी सप्पसीहा वि ।।**

(एक कवि म्हणतो, आमच्यासारख्यांनाही लोक कवि म्हणतात, आणि हरिवृद्ध, सालि इत्यादीही कवि होते. बेडूक, माकड, सर्प, सिंह हे सर्वच हरि होत !)

यातील सालि हा शालिवाहन होय. त्याच्यासारखा हरिवृद्ध हाही थोर कवि होता. विरहांकाने आपल्या 'वृत्तजातिसमुच्चय' नामक छंदोग्रंथात 'द्विपदीं'चा विवरणकार म्हणून भुजगाधिप, सातवाहन आणि वृद्ध कवि यांचा निर्देश केला आहे. हा वृद्ध कवि हरिवृद्धच असावा. हेमचन्द्रानेही आपल्या 'सिद्धहेमचन्द्र' व्याकरणात वृद्धकवीचा उल्लेख करणारा उतारा 'वृत्तजाति-समुच्चया'तून दिला आहे. हा वृद्धकवि हरिवृद्धच होय. त्याचे मूळ नाव क्र. २८८ च्या गाथेशी संलग्न आहे.

दुसरा कवि नन्दिवृद्ध हा 'गाथालक्षण' नामक प्राकृतछन्दोग्रंथाचा कर्ता म्हणून ज्ञात आहे. या ग्रंथाचे मूळ स्वरूप आता विकृत झाले आहे असे प्रा. ह. दा. वेलणकरांनी दाखविले आहे. तो नन्दियड्ढ नामक छंदःशास्त्रकर्त्याने रचला होता. हा नन्दियड्ढ 'कर्पूरमंजरी'त उल्लेखिलेला नन्दिवृद्ध नामक प्राकृत कवि असावा. त्याचे नाव क्र. ३९२ च्या गाथेशी संलग्न आहे.[२]

यांशिवाय आढचराज हा कविही हालाच्या सभेत होता. त्याच्या नावावर क्र. २३४ ची गाथा दिली आहे. बाणाने 'हर्षचरिता'च्या प्रास्ताविक श्लोकात आढचराजाच्या 'उत्साहां'ची मोठी प्रशंसा केली आहे. तो म्हणतो —

**आढचराजकृतोत्साहैर्हृदयस्थैः स्मृतैरपि ।**
**जिह्वान्तः कृष्यमाणेव न कवित्वे प्रवर्तते ।।**

(आढचराजाचे 'उत्साह' हृदयांत असताना किंबहुना त्यांचे स्मरण झाले असतानाही कवींची जिह्वा जणू आत ओढल्याप्रमाणे काव्य करण्यास प्रवृत्त होत नाही.)

भोजाने 'सरस्वतीकण्ठाभरणा'त म्हटले आहे की आढचराजाच्या काळी सर्वच प्राकृत बोलत असत.[३] सातवाहन राजाने आपल्या अन्तःपुरात

१ सरस्वतीकंठाभरण, परिच्छेद १, श्लोक १३३.

२ *R. F. V.*, pp. 64-65.

३ केऽभून्नाढयराजस्य राज्ये प्राकृतभाषिणः । सरस्वतीकण्ठाभरण, १, १५.

स्त्रियांनी प्राकृत भाषा बोलली पाहिजे असा नियम केला होता असे राजशेखर सांगतो.[१] आढचराज या नावावरूनही तो राजा असावा असे वाटते. म्हणून आढचराज हा हालच असावा असे एक मत आहे. पण बाणाने 'कोश'कार सातवाहन (हाल) आणि 'उत्साह'कार आढचराज यांची स्तुति भिन्नभिन्न श्लोकांत केली आहे. बाण कवि राजशेखर व भोज यांच्या पूर्वी काही शतके होऊन गेला. तेव्हा त्याचाच पुरावा ग्राह्य मानला पाहिजे, अर्थात् आढचराज हाल सातवाहनाहून भिन्न होता.

पण 'उत्साह' म्हणजे काय ? ते एका प्राकृत छंदाचे नाव होते. स्वयंभू आणि हेमचन्द्र या दोघांनीही त्याचे लक्षण दिले आहे. त्याचे सहा चतुर्मात्रात्मक विभाग असून त्यांतील तिसऱ्या आणि पाचव्या विभागात ⏑ – ⏑ किंवा ⏑, ⏑ ⏑ ⏑ अशी रचना असे. प्राकृतछंदःशास्त्रज्ञ सांगतात की 'उत्साह' छंद हा धवल, मंगल आणि फुल्लटक गीतांत योजिला जात असे. ही गीते बहुधा अपभ्रंश भाषेत असत. ह्या छंदांतील प्राकृत व अपभ्रंश काव्ये त्या काली प्रचलित होती. त्यांमध्ये आढचराजाचे उत्साह छंदातील काव्य सर्वोत्कृष्ट होते.[२]

'शृंगारप्रकाशा'वरून असे दिसते की आढचराजाच्या काव्याचा प्रत्येक विभाग 'धैर्या'ङ्कित असे. म्हणजे त्यात 'धैर्य' शब्द गुंफिला असे. संस्कृत तसेच प्राकृत काव्यांतही अशी पद्धत होती हे सर्वसेनाच्या 'हरिविजया'वरून तसेच प्रवरसेनाच्या 'सेतुबन्धा'वरून कळते.[३] आढचराजाने असे एक महाकाव्य – बहुधा प्राकृतात – लिहिले असावे. त्याच्या भिन्न भिन्न विभागांच्या शेवटच्या पद्यात 'धैर्य' शब्द गुंफला होता असे दिसते.

छप्पण्णय कवि – उद्द्योतनसूरीच्या 'कुवलयमाले'त खालील गाथा आली आहे —[४]

**पालित्तयसालाहणछप्पण्णयसीहणायसद्देहिं ।**
**संखुद्धमुद्धसारंगओ व्व कह ता पयं देमि ।।**

कवि म्हणतो, 'पालित्तक, सालाहण व छप्पण्णय या सिंहांच्या गर्जनेने गर्भगळित झालेल्या साध्या भोळ्या हरणाच्यासारखा मी कसे पाऊल टाकू (पदे जमवू) ?'

या गाथेत पालित्तक व सालाहण या कवींप्रमाणे छप्पण्णय नामक कवीचाही उल्लेख आहे. पुढे 'कुवलयमाले'त त्याच्याविषयी म्हटले आहे —[५]

**छप्पण्णयाण किंवा भण्णउ कइकुंजराण भुवणम्मि ।**
**अण्णो वि छेयभणिओ अज्ज वि उवमिज्जए जेहिं ।।**

---

१ काव्यमीमांसा, पृ. ५०.
२ *R. F. V.*, pp. 74 f.
३ सं. मु., सर १, पृ. १४८.
४ कुवलयमाला, पृ. ३.
५ पूर्वोक्त, पृ. ३.

(छप्पण्णय या कविकुंजरांविषयी काय सांगावे ? आज सुद्धा कोणा विदग्धाने काव्योक्ति रचली की तिची त्यांच्या उक्तीशी तुलना केली जाते.)

या गाथेत 'छप्पण्णयाण' असे अनेकवचन योजले आहे. त्यावरून 'छप्पण्णय' ही एक व्यक्ति नसून तो एक कविसमूह होता असे दिसते. बहुधा त्यालाच अनुलक्षून 'अवन्तिसुन्दरीकथे'त पुढील श्लोक आला आहे.[१]

**सेतुरूपेण तिष्ठन्तो लोके सद्वस्तुदर्शिनः ।**
**षट्पञ्चाशत्प्रमाणत्वं गता नः कविपुंगवाः ।।**

यात 'छप्पन्न कविश्रेष्ठांनी 'सेतु'नामक ग्रंथ रचला होता. त्यात त्यांनी जगताचे सत्य स्वरूप विशद केल्यामुळे ते प्रमाणभूत मानले जातात' असे म्हटले आहे.

'छप्पण्णय' आणि 'षट्पञ्चाशत्' हे शब्द समानार्थक असल्यामुळे त्यांनी विवक्षित असलेले कवि एकच असावेत असा साहजिकच समज होतो. तशात षट्पञ्चाशत्–कविविषयक हा श्लोक 'अवन्तिसुन्दरीकथे'त अति प्राचीन कवींच्या संदर्भात आला आहे. छप्पण्णय याचाही 'कुवलयमाले'तील उल्लेख सालाहण (हाल सातवाहन) व पालित्तक या अत्यंत प्राचीन प्राकृत कवींबरोबर आला असल्यामुळे दोन्ही नावांनी एकच कविसमूह विवक्षित असावा असा ग्रह होतो. पण अलीकडे खंबायत मध्ये 'छप्पण्णयगाहाओ' नामक प्राकृत गाथांच्या संग्रहात्मक ग्रंथाचे हस्तलिखित सापडले आहे.[२] त्यावरून या प्रश्नावर निराळाच प्रकाश पडला आहे. प्राकृत 'छप्पण्णय' म्हणजे संस्कृत 'षट्प्रज्ञ' किंवा 'सहृदय'. अशा कवींनी रचलेल्या आणि प्रसंगवशात् स्फुरलेल्या गाथांचा एक संग्रह 'छप्पण्णयगाहा' नावाने प्रचलित होता असे दिसते. तसे असल्यास 'अवन्तिसुन्दरीकथे'तील वरील श्लोक पुढील-प्रमाणे सुधारता येईल —

**सेतुरूपेण तिष्ठन्तो लोके सद्वस्तुदर्शिनः ।**
**षट्प्रज्ञाः सत्प्रमाणत्वं गता नः कविपुङ्गवाः ।।**

हे छप्पण्णय कवि हाल सातवाहनाचे समकालीन असावे. व्यावहारिक ज्ञानाच्या सूचना देणाऱ्या त्यांच्या गाथांचा संग्रह त्या काळी 'सेतु' नावाने प्रसिद्ध होता असे दिसते.

---

१ अवन्तिसुन्दरीकथा, प्रास्ताविक श्लोक पाहा.
२ *J. O. I.* Vol. XI, p. 385 f.

## ३. गुणाढ्याची 'बृहत्कथा'

सातवाहनकालीन आणखी एक विख्यात ग्रंथ 'बृहत्कथा' होय. त्याकडे आता वळू.

'रामायण', 'महाभारत' आणि 'बृहत्कथा' ही गन्थत्रयी अनेक संस्कृत व प्राकृत काव्यनाटकांची गंगोत्री आहे. किंबहुना, गोवर्धनाने म्हटल्याप्रमाणे एकच नदी तीन स्रोतांत विभक्त झाली आहे.[१] 'रामायण' आणि 'महाभारत' सुदैवाने आपणांस अद्यापि उपलब्ध आहेत, पण 'बृहत्कथा' मात्र स्मृतिशेष झाली आहे. ख्रिस्तोत्तर अकराव्या – बाराव्या शतकांपर्यंत ही स्थिति नव्हती. त्या कालमर्यादेपर्यंत 'बृहत्कथा' आणि तिचा कर्ता गुणाढ्य भारतातच नव्हे तर कांबोडियासारख्या बृहद्भारतीय देशांत सुविख्यात होते. दण्डीने (ख्रिस्तोत्तर सहावे शतक) आपल्या 'काव्यादर्शा'त (१.३८) 'भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथाम्।' असे तिचे वर्णन केले आहे. त्यात ती कथा भूतभाषेत (पिशाच–भाषेत) रचली होती असे स्पष्ट म्हटले आहे. सुबन्धूच्या 'वासवदत्ते'त[२] 'बृहत्कथालम्बैरिव शालभञ्जिकोपेतैः।' अश्या उपमेत तिचा निर्देश आला आहे.

बाणाने (ख्रिस्तोत्तर सातवे शतक) आपल्या 'हर्षचरिता'च्या एका प्रास्ताविक श्लोकात तिच्याविषयी म्हटले आहे—

**समुद्दीपितकन्दर्पा कृतगौरीप्रसादना।**
**हरलीलेव नो कस्य विस्मयाय बृहत्कथा।।**

यात तिच्या जन्माविषयी कथा सूचित केली आहे. तिचे विवरण पुढे करू. त्याने आपल्या 'कादम्बरी' कथेतही उज्जैनीच्या वर्णनात 'बृहत्कथाकुशलेन' असा तिचा उल्लेख केला आहे.

उद्द्योतनसूरि (ख्रिस्तोत्तर ७७८) आणि जिनसेन (नववे शतक) या जैन कवींनी अनुक्रमे 'कुवलयमाला'[३] आणि 'आदिपुराण' या आपल्या ग्रंथांत 'बृहत्कथे'ची स्तुति केली आहे. ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकातील धनञ्जयाने 'होतकरू कवीने 'रामायण', 'बृहत्कथा' इत्यादि ग्रंथांचा अभ्यास करून रसानुगुण कथानकाची गुंफण करावी' असे आपल्या 'दशरूपका'त

---

१ श्रीरामायणभारतबृहत्कथानां कवीन्नमस्कुर्मः। त्रिस्रोता इव सरसा सरस्वती स्फुरति-यैर्भिन्ना।। आर्यासप्तशती.

२ वासवदत्ता (वाणीविलासप्रेस प्रत), पृ. १२३-२४ 'शालभञ्जिका' पदावर श्लेष आहे. त्याचे अर्थ–(१) स्तंभादिकांवर कोरलेली पुतळी, आणि (२) 'बृहत्कथे'तील एक नायिका.

३ कुवलयमाला (सिंधी–जैन–ग्रंथमाला), पृ. ३.

(१, ६८) सांगितले आहे. त्या ग्रंथाचा टीकाकार धनिक याने 'दशरूपका-' (४, ३४) वरील टीकेत 'बृहत्कथे'तील मदनमञ्जूषा[१] कथेचा उल्लेख केला आहे. त्याच शतकातील वैदर्भ कवि त्रिविक्रमभट्ट याने खालील श्लोकात सुंदर श्लेषांचा उपयोग करून 'बाणकवीप्रमाणे गुणाढ्यानेही सर्व जनांचे मनोरंजन केले आहे' असे म्हटले आहे.

**शश्वद्बाणद्वितीयेन नमदाकारधारिणा।**
**धनुषेव गुणाढ्येन निःशेषो रञ्जितो जनः॥**

'यशस्तिलकचम्पू' (सन ९५०) या चम्पूकाव्याचा कर्ता सोमदेव यानेही 'बृहत्कथे'चा उल्लेख केला आहे.

गुणाढ्याची कीर्ति भारतापुरती सीमित राहिली नव्हती. कविकुलगुरु कालिदासाच्या कीर्तीप्रमाणे ती सागर ओलांडून बृहद्भारतातील काम्बोजादि देशांत पसरली होती. तेथील ख्रिस्तोत्तर नवव्या शतकातील राजा यशोवर्मा याच्या प्रशस्तीत खालील श्लोक आला आहे—[२]

**पारदः स्थिरकल्याणो गुणाढ्यः प्राकृतप्रियः।**
**अनीतिर्यो विशालाक्षश्शूरो न्यक्कृतभीमकः॥**

तेथील दुसऱ्या एका लेखातील असाच गुणाढ्याचा श्लेषमूलक उल्लेख पाहा—[३]

**गुणान्वितस्तिष्ठतु दूषितोऽपि स्थानार्पितो येन पुनर्गुणाढ्यः।**
**गदोऽप्ययं चारुविभूषणाय हरप्रयुक्तः किमुतामृतांशुः॥**

'बृहत्कथे'चा संस्कृत भाषेत अनुवाद गंगनृपति दुर्विनीत (सहावे शतक) याने केला होता असा कोरीव लेखांत उल्लेख आहे.[४] तिचे तमिळ भाषेतही रूपान्तर झाले होते.

पण असा हा लोकोत्तर 'बृहत्कथा' ग्रंथ आता अप्राप्य झाला आहे. त्याची फक्त रूपान्तरे आणि त्यावर आधारित असे काही ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांमध्ये त्याच्या मूळ रूपाविषयी एकवाक्यता नाही. त्याच्या कर्त्याविषयी, तो मूळचा कोणत्या प्रदेशातला, तो कोणा राजाच्या आश्रयास होता, त्याचा काळ कोणता, यांविषयी विद्वानांत विविध मते प्रचलित आहेत. तो ग्रंथ ज्या पैशाची भाषेत रचला होता तिचे निश्चित रूप कोणते, ती कोणत्या प्रदेशात प्रचलित होती, तिला ते नाव कां पडले इत्यादीविषयीही विविध मते व्यक्त झाली आहेत. या सर्व समस्यांचे चिकित्सक परीक्षण येथे करावयाचे आहे.

---

१ 'कथासरित्सागरा'दिकांत हिचे नाव 'मदनमञ्चुका' असे येते.

२ *A. R. A. S. I.*, 1912, pp. 35-69.

३ *J. A.*, (1885), pp. 397 f. and (1886), pp. 178 f.

४ *J. R. A. S.* 1913, pp. 389-390.

'बृहत्कथे'ची तीन संस्कृत रूपान्तरे[1] उपलब्ध आहेत. त्यांपैकी दोन — (१) सोमदेवाचा (सन १०६३–८१) 'कथासरित्सागर' आणि (२) क्षेमेन्द्राची (सन १०००) 'बृहत्कथामञ्जरी' ही काश्मीर प्रदेशातील आहेत. यांत बरेच साम्य असले तरी भिन्नताही कमी नाही. दोन्हींची तुलना केल्यावर ती रूपान्तरे एकाच मूळ प्राकृत ग्रंथावर आधारित आहेत असे दिसत असले तरी तो ग्रंथ मूळ 'बृहत्कथा' होता असे म्हणता येत नाही. तिसरे रूपान्तर काही वर्षांपूर्वी मिळालेला बुधस्वामीचा 'बृहत्कथा–श्लोक–संग्रह' (सुमारे ८ वे शतक) हा होय. हा नेपाळ देशातील असून खंडित आहे. याची श्लोक-संख्या ३६२२ आहे. संपूर्ण स्वरूपात तो २५००० श्लोकांचा असावा असे अनुमान करता येते. हे तिसरे रूपान्तर पूर्वोक्त दोन्ही काश्मीरी रूपान्तरांहून पुष्कळच निराळे आहे. त्यात इतर कथांची भेसळ कमी आहे. तेव्हा ते मूळ 'बृहत्कथे'ला जवळचे असावे असा विद्वानांचा तर्क आहे. याशिवाय 'बृहत्कथे'चे एक प्राकृत रूपान्तर जैनधर्मीयांनी 'वसुदेवहिंडी' या नावाने केले आहे. त्यात मूळ 'बृहत्कथे'तील नरवाहनदत्ताच्या सारख्या प्रणयकथा कृष्णाचा पिता वसुदेव याच्याविषयी वर्णिल्या आहेत.

## 'बृहत्कथे'चा कर्ता गुणाढ्य

मागे 'बृहत्कथे'चे जे विविध संदर्भ दाखविले त्यांवरून ती निदान ख्रिस्तोत्तर बाराव्या शतकापर्यंत पैशाची भाषेत उपलब्ध होती आणि तिचा कर्ता म्हणून गुणाढ्य हा सुविख्यात झाला होता, याविषयी संशय राहू नये. पण त्याच्या चरित्राविषयी मात्र एकवाक्यता नाही. 'बृहत्कथाश्लोकसंग्रहा'त त्याच्या विषयी कांहीही माहिती नाही. काश्मीरी रूपान्तरांतील आरंभीचा 'कथापीठलम्बक' त्यात आढळत नाही. त्यात फक्त एकाच ठिकाणी आनुषंगिक रीतीने गुणाढ्याचा उल्लेख आला आहे. चौदाव्या प्रकरणात विद्याधरांचा राजा वेगवान् आपला पुत्र मानसवेग हा राज्यकारभार कसा चालवीत आहे असे विचारतो, तेव्हा त्याचे दोन दूत त्याला सांगतात, "गुणाढ्यही त्याचे वर्णन करू शकणार नाही." याशिवाय इतरत्र कोठेही गुणाढ्याचा नामोल्लेख 'बृहत्कथाश्लोकसंग्रहा'त येत नाही. तेव्हा गुणाढ्याच्या चरित्रा-विषयी आपणांस पूर्वोक्त काश्मीरी रूपान्तरांवरच अवलंबून राहिलें पाहिजे.

---

१ याशिवाय एक चौथे संस्कृत रूपान्तर होते हे भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'वरून कळते. V. Raghavan, *Bhoja's Śṛiṅgāraprakāśa*, pp. 824 f.

'कथासरित्सागरा'च्या पहिल्या कथापीठलम्बकात गुणाढ्याची कथा आली आहे, पण ती गुणाढ्याच्या 'बृहत्कथे'तील नसून सातवाहन राजाने रचली होती असे शेवटी आलेल्या पुढील श्लोकांत (८.३५-३७) म्हटले आहे —

**अथ तां गुणाढ्यदत्तामादाय कथां बृहत्कथां नाम्ना।**
**नृपतिरगान्निजनगरं नरवाहनदत्तचरितमयीम् ।।**
**गुणदेवनन्दिदेवौ तत्र च तौ कथाकवेः शिष्यौ।**
**क्षितिकनकवस्त्रवाहनभवनधनैः संबिभेजे सः ।।**
**ताभ्यां सह च कथां तामाश्वास्य स सातवाहनस्तस्याः।**
**तद्भाषयावतारं वक्तुं चक्रे कथापीठम् ।।**

एकदा कैलास पर्वतावर शंकर आणि पार्वती गुजगोष्टी करीत बसले असता पार्वतीने शंकरांना म्हटले —

रम्यां काञ्चित्कथां ब्रूहि देवाद्य मम नूतनाम्। (देवा, आज एखादी अगदी नवीन आणि रमणीय अशी कथा सांगा.)

शंकरांनी ते मान्य करून ती कथा दुसऱ्या कोणी ऐकू नये म्हणून नन्दीला द्वाररक्षक नेमले, आणि सात विद्याधरांची कथा सांगण्यास आरंभ केला. तितक्यात पुष्पदन्त नामक गण हळूच आत शिरून ती रम्य कथा ऐकता झाला. नंतर त्याने ती आपल्या जया नामक पत्नीला सांगितली. पण स्त्रियांजवळ धन आणि रहस्य गुप्त कसे राहणार? जयाने ती कथा पार्वतीला सांगितली. तेव्हा पार्वतीचा क्रोध अनावर होऊन तिने पुष्पदन्ताला 'तू मर्त्य हो' असा शाप दिला. त्याचा मित्र माल्यवान् त्याच्याबद्दल रदबदली करू लागला, तेव्हा त्यालाही पार्वतीने तसाच शाप दिला. पण जयाने करुणा भाकल्यावर पार्वतीने त्या दोघांनाही उःशाप दिले. ती म्हणाली, 'पुष्पदन्ता, तू नन्दराजाचा मन्त्री वररुचि नामक होऊन नंतर विन्ध्य पर्वतावर सुप्रतीक नामक यक्षाला भेटशील. तो काणभूति नामक पिशाच झालेला असेल. त्याला तू ही कथा सांगशील, तेव्हा तू शापमुक्त होशील. माल्यवान् सुप्रतिष्ठित नामक नगरात गुणाढ्य नावाने जन्म पावेल. तोही जेव्हा काणभूतीकडून ही कथा ऐकेल तेव्हा शापमुक्त होऊन स्वर्गात येईल.' त्याप्रमाणे पुष्पदन्त कौशाम्बी नगरीत वररुचि ऊर्फ कात्यायन नावाने जन्म पावला, आणि माल्यवान् सुप्रतिष्ठित नगरीत गुणाढ्य नावाने अवतीर्ण झाला. त्याची कथा येणेप्रमाणे —

'प्रतिष्ठान देशामध्ये सुप्रतिष्ठित नामक नगर आहे. तेथे सोमशर्मा नामक ब्राह्मण राहत होता. त्याला वत्स आणि गुल्म असे दोन पुत्र आणि श्रुतार्था नामक कन्या होती. एकदा ती स्नानाला गेली असता नागराज वासुकीच्या

कीर्तिसेन नामक पुतण्यापासून तिला गर्भ राहिला. तिचा तो पुत्र पुढे गुणाढ्य नावाने विख्यात झाला.

गुणाढ्याने गुरूजवळ अध्ययन करून सर्व विद्या हस्तगत केल्या आणि तो स्वदेशी परत आला. नंतर तो आपल्या देशाचा सार्वभौम राजा सातवाहन याला भेटण्याकरिता त्याच्या प्रतिष्ठान नामक राजधानीस गेला.

तेथे वसन्त ऋतूत सातवाहन राजा आपल्या उद्यानातील विहिरीत राण्यांसह जलक्रीडा करीत असता त्यांच्या अंगावर पाणी फेकू लागला. तेव्हा त्याची ब्राह्मणजातीय पट्टराणी त्याला म्हणाली, ' मोदकैर्मां ताडय । ' या संस्कृत वाक्याचा अर्थ ' माझ्या अंगावर पाणी फेकू नका ' असा विवक्षित होता, पण संस्कृतच्या अज्ञानामुळे राजाला तो ' मला मोदक फेकून मारा ' असा वाटला, आणि त्याने आपल्या सेवकांकडून अनेक मोदक आणविले. तेव्हा ती राणी हसून त्याला म्हणाली —

**राजन्नवसरः कोऽयं मोदकानां जलान्तरे ।**
**उदकैः सिञ्च मा त्वं मामित्युक्तं हि मया तव ।।**
**सन्धिमात्रं न जानासि माशब्दोदकशब्दयोः ।**
**न च प्रकरणं वेत्सि मूर्खस्त्वं कथमीदृशः ।।**

(कथासरित्सागर, ७.११६–१७)

राणी म्हणाली, " महाराज, येथे पाण्यामध्ये मोदकांचा काय उपयोग ? ' माझ्यावर पाणी शिंपडू नका ' असे मी आपणांस म्हटले होते. ' मा ' शब्द आणि ' उदक ' शब्द यांचा संधिही तुम्हांला माहीत नाही. तसेच तुम्ही प्रसंगही लक्षात घेतला नाही. इतके तुम्ही अज्ञानी कसे ? "

राजाला ते ऐकून लाज वाटली. त्याने आपल्या सभेतील गुणाढ्य आणि शर्ववर्मा या दोन संस्कृत पंडितांना बोलाविले. आणि ' संस्कृत शिकण्यास किती काळ लागेल ?' असे त्यांस विचारले. तेव्हा गुणाढ्य म्हणाला, ' महाराज, सर्व विद्यांचे मुख असे जे व्याकरण त्यात पारंगत होण्यास बारा वर्षे लागतात. पण मी आपणांस ते सहा वर्षांत शिकवू शकेन.' तेव्हा शर्ववर्मा म्हणाला, ' मी ते आपणांस सहा महिन्यांत शिकवीन.' त्यावर गुणाढ्याने पैज मारली की ' जर तुम्ही महाराजांना सहा महिन्यांत संस्कृत शिकवू शकला, तर सध्या प्रचलित असलेल्या संस्कृत, प्राकृत व देशी भाषा यांपैकी कोणत्याही भाषेत मी ग्रंथरचना करणार नाही. ' त्यावर शर्ववर्म्यानेही प्रतिज्ञा केली की, ' मी जर महाराजांना सहा महिन्यांत संस्कृत शिकवू शकलो नाही, तर मी तुमच्या (गुणाढ्याच्या) पादुका बारा वर्षांपर्यंत आपल्या शिरावर धारण करीन. ' शर्ववर्म्याने अशी प्रतिज्ञा केली खरी, पण ती पूर्ण कशी करावयाची याचा त्याला पेच पडला. तेव्हा त्याने तपश्चर्येने कार्त्तिकेयाला प्रसन्न केले, आणि त्याच्या

प्रसादाने ' कातन्त्र ' किंवा ' कालाप ' नामक सोप्या बाळबोध संस्कृत व्याकरणाची प्राप्ति करून घेतली. नंतर त्याने त्याच्या साहाय्याने सातवाहन राजाला संस्कृत भाषेत ठरलेल्या अवधीत पारंगत केले.[१]

याप्रमाणे प्रतिज्ञा हरल्यावर गुणाढ्याने विन्ध्यवासिनी देवीला प्रसन्न करण्याकरिता प्रयाण केले. तिच्या आदेशाने तो विन्ध्यारण्यात गेला. तेथे त्याला अनेक पिशाच आढळले. ते आपसांत बोलत होते. त्यावरून त्याने त्यांची पिशाच – भाषा अवगत करून घेतली. पुढे त्याची काणभूति यक्षाशी गाठ पडली. काणभूतीने त्याला विद्याधरांविषयी सप्तकथामयी अशी लांबलचक गोष्ट सांगितली, ती त्याने सात वर्षांत पिशाच – भाषेत रचली. ती विद्याधरांनी हस्तगत करू नये म्हणून त्याने स्वतःच्या रक्ताने वृक्षपर्णांवर लिहून काढली. त्याच्या शिष्यांनी ती कथा सातवाहन राजाकडे नेली ; पण ती पिशाच भाषेत लिहिलेली पाहून त्याने तिचा धिक्कार केला. तेव्हा निराश झालेल्या गुणाढ्याने त्या कथेचे एक एक पान वाचून ते अग्नीत फेकण्यास आरंभ केला. ती कथा ऐकण्यास पशुपक्षी गोळा होत असत. ते ती ऐकण्यात इतके तल्लीन होत की ते आपले खाणे पिणे विसरत आणि कृश होत. त्यामुळे सातवाहन राजाच्या मुदपाक-खान्यात चवदार मांसाचा तुटवडा पडू लागला. तेव्हा राजा स्वतः गुणाढ्य होता तेथे गेला. तेथे त्याने ते दृश्य पाहिले. गुणाढ्याकडून त्याचा वृत्तांत ऐकल्यावर तो त्याकडे त्या कथेची याचना करू लागला. तेव्हा गुणाढ्य म्हणाला, ' महाराज, मी सहा लाख श्लोक संख्या जाळून टाकली आता फक्त एक लक्ष श्लोकांची कथा राहिली आहे. ती माझे शिष्य आपणांस वाचून दाखवितील.' असे म्हणून तो शापमुक्त होऊन स्वर्गाला गेला. राजाने गुणाढ्याच्या शिष्यांकडून ती कथा वाचवून घेऊन त्या कथेचे प्रास्ताविक कथापीठ रचले.

गुणाढ्याची ही कथा ' बृहत्कथे 'च्या ' कथासरित्सागर ' आणि ' बृहत्कथामंजरी ' या दोन्ही काश्मीरी संस्कृत रूपान्तरांत आली आहे, पण तिचे तिसरे संस्कृत रूपान्तर बुधस्वामीचा ' बृहत्कथाश्लोकसंग्रह ' यात मात्र ती आढळत नाही. याशिवाय ' नेपालमाहात्म्या 'तही गुणाढ्याची कथा निराळ्या रूपाने आली आहे.[२] त्या माहात्म्याच्या पुष्पिकेवरून ते ' स्कन्दपुराणा 'च्या हिमवत्खंडाचा तिसावा अध्याय आहे असे कळते. या माहात्म्यात म्हटले आहे की गुणाढ्य हा मथुरेतील विष्णुदत्ताचा पुत्र होता. पित्याच्या निधनानंतर

---

१ शर्ववर्म्याचे कातन्त्र व्याकरण पाणिनीच्या ' अष्टाध्यायी ' पेक्षा पुष्कळच सोपे आणि बाळबोध आहे. ते सध्या काश्मीर व बंगाल मध्ये प्रचलित आहे.

२ ' नेपालमाहात्म्या 'तील (२७-३०) हा भाग लाकोटच्या *Essay on Guṇāḍhya and the Bṛihatkathā* या इंग्रजी ग्रंथाच्या (मिथिक सोसायटी, बंगलोर, १९२३) परिशिष्टात दिला आहे.

तो उज्जैनी येथील मदन नामक राजाच्या दरबारी आला. तेथे शर्ववर्म्याच्या शिफारशीवरून त्याचा राजसभेत प्रवेश झाला. पुढे जलक्रीडेत राजाचे संस्कृतच्या अज्ञानामुळे झालेले हसे, त्याला संस्कृत शिकविण्याच्या कालाविषयी त्या दोन विद्वानांत लागलेली पैज, कार्त्तिकेयाच्या प्रसादाने शर्ववर्म्याला कातन्त्र व्याकरणाची प्राप्ति इत्यादि वृत्तांत 'बृहत्कथे'च्या काश्मीरी रूपान्तरांतल्या प्रमाणेच आहे. पुढे म्हटले आहे की पैज हरल्यामुळे गुणाढ्य अरण्यात जाऊन रडू लागला. एकदा पुलस्त्य ऋषि त्याच्या आश्रमात आले त्यांनी त्याचा वृत्तान्त ऐकून त्याला 'शिवलिंगाची स्थापना करून पिशाच – भाषेत नऊ लाख गाथा रच ; म्हणजे तुला मोक्षप्राप्ति होईल' असा उपदेश केला. पुढे गुणाढ्य गाथा रचून त्या लोकांना वाचून दाखवू लागला, तेव्हा तेथे पशुपक्षी जमू लागले आणि राजाच्या मुदपाकखान्यात चवदार मांसाची चणचण भासू लागली. नंतर राजा स्वत: त्या आश्रमात आला. त्याला गुणाढ्य म्हणाला, 'राजा, पिशाच – भाषेत रचलेल्या नऊ लाख गाथांचे तू संस्कृतात भाषांतर करवून घे. मी आता नेपाळला चाललो.'

'बृहत्कथे'च्या उत्पत्तीविषयी वरील दोन वृत्तांत काळजीपूर्वक वाचल्यावर 'नेपाळ – माहात्म्या'तील वृत्तांत मागाहून कोणा शिवभक्ताने रचला असावा याची खात्री पटल्याशिवाय राहत नाही. आपल्या काळी प्रचलित असलेल्या कथा घेऊन आणि त्यांत थोडे – बहुत फरक करून त्या पुराणांत घुसडण्याचा प्रकार अनेक पौराणिकांनी केलेला दिसतो, तसाच हा आहे.

काश्मीरी रूपान्तरांतील ऐतिहासिक परिस्थिति सुसंभाव्य आहे. दक्षिणेत सातवाहनांच्या राज्यात प्राकृत भाषेला महत्त्व आले होते यात संशय नाही. त्या काळी अनेक कवींनी प्राकृत भाषेत ग्रंथरचना केली होती. याविषयी माहिती इतरत्र दिली आहे. तेव्हा त्या काळी गुणाढ्यासारख्या कवीने प्राकृतात 'बृहत्कथा' नामक कथा रचली असल्यास नवल नाही. 'नेपाळमाहात्म्या'तील उज्जैनीचा मदन राजा मात्र इतिहासाला सर्वस्वी अज्ञात आहे.

पण मग काश्मीरी संस्कृत रूपान्तरांत आलेला गुणाढ्यवृत्तान्त 'बृहत्कथाश्लोक – संग्रहा'त का आढळत नाही? असा प्रश्न उपस्थित होतो. सोमदेव 'कथासरित्सागरा'त छातीठोकपणे सांगतो की—

**यथा मूलं तथैवैषा न मनागप्यतिक्रमः।**
**ग्रंथविस्तरसंक्षेपमात्रं भाषा च भिद्यते ।।**

(मूळ 'बृहत्कथे'त जे आहे तेच मी आपल्या 'कथासरित्सागरा'त सांगितले आहे. त्यात कोठे विस्तार तर कोठे संक्षेप केलेला आढळेल. तसेच मूळ ग्रंथाची भाषा पैशाची आहे, तर माझ्या ग्रंथाची संस्कृत आहे. एवढेच फरक आढळतील.)

फ्रेंच विद्वान् लाकोट याने ‘कथासरित्सागर’, ‘बृहत्कथामंजरी’ व ‘बृहत्कथाश्लोकसंग्रह’ यांचा सूक्ष्म अभ्यास केला होता. त्याचे असे मत आहे की ‘कथासरित्सागरा’तील फक्त एक दशांश भाग मूळ ‘बृहत्कथे’तील असावा बाकीचा मागाहून त्यात घुसडलेला दिसतो. ‘कथासरित्सागर’ व ‘बृहत्कथा-मंजरी’ यांतील साम्य लक्षात घेता ते दोन्ही ग्रंथ एकाच पैशाची भाषेतील ‘बृहत्कथे’ची रूपान्तरे आहेत असे दिसते; पण त्या काळची ‘बृहत्कथा’ गुणाढ्याच्या मूळ ‘बृहत्कथे’हून पुष्कळच भिन्न होती.

मग असा प्रश्न उपस्थित होतो की, कथापीठलंबकातील गुणाढ्याची कथा मूळ ‘बृहत्कथे’त होती की नव्हती ? या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण आहे. ती कथा ‘बृहत्कथाश्लोकसंग्रहा’त आढळत नाही हे मागे सांगितले आहे. शिवाय, त्या लंबकातील कथेत कित्येक कालविपर्यासात्मक दोष सकृद्दर्शनीच आढळतात. उदाहरणार्थ, पुष्पदन्त हा नंद राजाचा मंत्री वररुचि – कात्यायन झाला; तो सातवाहन राजाच्या दरबारच्या गुणाढ्याचा समकालीन होता, असे कथापीठलंबकात म्हटले आहे. यात कालविपर्यासाचा दोष आहे. कारण, सातवाहन राजवंशाचा उदय नंदराजांच्या नाशानंतर कित्येक दशकांनी झालेल्या मौर्यवंशी अशोकाच्याही मृत्यूनंतर झाला, हे इतिहासज्ञांस माहीत आहे. तेव्हा वररुचि – कात्यायन आणि गुणाढ्य हे समकालीन असणे शक्य नाही हे उघड आहे. गुणाढ्याच्या कथेत अनेक अद्भुत गोष्टी आहेत. त्यांवर विश्वास ठेवणे कठीण आहे. तथापि ‘बृहत्कथे’च्या उत्पत्तिविषयक मूळ चौकट त्या कथेच्या काश्मीरी रूपान्तरांतल्याहून सर्वस्वी भिन्न नव्हती इतके मात्र म्हणण्यास आवश्यक तो पुरावा उपलब्ध आहे.

या बाबतीत दण्डी आणि बाण या सर्वांत प्राचीन ग्रंथकारांनी ‘बृहत्कथे-’ विषयी जी विधाने केली आहेत ती अत्यंत महत्त्वाची आहेत. बाणाने ‘हर्षचरिता’च्या प्रास्ताविक श्लोकात ‘बृहत्कथे’चे पुढील वर्णन केले आहे —

**समुद्दीपितकन्दर्पा कृतगौरीप्रसादना ।**
**हरलीलेव नो कस्य विस्मयाय बृहत्कथा ।।**

या श्लोकात ‘बृहत्कथे’चे भगवान् शंकराच्या लीलेशी श्लिष्ट विशेषणांच्या योगाने साम्य दाखवून “अशा ‘बृहत्कथे’मुळे कोणास आश्चर्य वाटणार नाही ?” असा प्रश्न केला आहे. अपेक्षित उत्तर ‘सर्वांसच आश्चर्य वाटेल’ असे आहे.

‘जसे भगवान् शंकरांनी मदनाला प्रथम भस्म केले, पण पुढे त्यांनीच पार्वतीची मनधरणी केली हे जसे आश्चर्यकारक, तसेच ज्या ‘बृहत्कथे’तील विविध प्रणयविषयक कथांनी कामविकार उद्दीपित होतो तिच्या योगेच शंकरांनी पार्वतीची मनधरणी हेही आश्चर्यकारक होय,’ असा या श्लोकाचा मथितार्थ

आहे. हा श्लोक 'बृहत्कथे'च्या मूळ रूपाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यावरून असे दिसते की बाणाच्या काळी (ख्रिस्तोत्तर सातव्या शतकाच्या पूर्वार्धात) काश्मीरी रूपान्तरांत सांगितलेला 'बृहत्कथे'च्या उत्पत्तीविषयी वृत्तांत प्रचलित होता. कारण ती कथा प्रथम स्वर्गात भगवान् शंकरांनी पार्वती देवीच्या मनोरंजनाकरिता सांगितली होती हे मागे दाखविले आहे. अशा प्रकारे स्वर्गात घडलेल्या एखाद्या शापादि प्रसंगाच्या वर्णनाने आपल्या कथेची सुरवात करण्याची पद्धत बाणाच्या 'हर्षचरिता'त[१] आणि सोड्ढलाच्या 'उदयसुन्दरी-कथे'त[२] दिसून येते. तेव्हा प्राचीन 'बृहत्कथे'चा आरंभ स्वर्गातील शंकर-पार्वतींच्या संभाषणाने झाला असणे सुतराम् संभवनीय आहे. अर्थातच त्यात पुष्पदन्त व माल्यवान् या गणांचा शापवृत्तान्तही आला असावा.

आता दण्डीच्या 'काव्यादर्शा'तील पुढील 'बृहत्कथा'विषयक विधान घ्या —

**कथा हि सर्वभाषाभिः संस्कृतेन च बध्यते।**
**भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथाम्।।**

या श्लोकात म्हटले आहे की 'बृहत्कथे'त अनेक अद्भुत गोष्टी वर्णिल्या असून ती संस्कृतात नव्हे, पण भूत–भाषेत (पिशाच–भाषेत) लिहिली आहे. मागे दाखविल्याप्रमाणे 'बृहत्कथे'चा कर्ता गुणाढ्य सातवाहन राजांच्या काळी होऊन गेला. सातवाहनांचा प्राकृत भाषेस मोठा आश्रय होता. त्यांनी अनेक श्रौत याग केले; पण त्यांचे वर्णन त्यांनी संस्कृत भाषेत न करता प्राकृत भाषेत केले. त्यांचा एकही कोरीव लेख संस्कृत भाषेत नाही. त्यामुळे अशी परंपरागत समजूत आहे की त्यांनी आपल्या अन्तःपुरात स्त्रियांनी प्राकृत भाषेतच बोलले पाहिजे अशी आज्ञा काढली होती. या परंपरागत कथेचा उल्लेख राजशेखर[३] (ख्रिस्तोत्तर दहावे शतक) आणि भोज[४] (ख्रिस्तोत्तर अकरावे शतक) यांनी आपापल्या ग्रंथांत केला आहे. तेव्हा त्यांच्या काळी

---

१ 'हर्षचरिता'च्या पहिल्या उच्छ्वासात स्वर्गातील ब्रह्मलोकात दुर्वास ऋषीच्या साम–गानातील चुकांना सरस्वती हसली, तेव्हा त्या ऋषीने तिला मर्त्य लोकात जाण्याचा शाप दिला. तिच्यापासून झालेल्या सारस्वत कुलात बाणाचा जन्म झाला होता. त्या निमित्ताने ही कथा आली आहे.

२ 'उदयसुन्दरीकथे'त तिलक (बाण कवि) आणि तालक या दिव्य ऋषींना स्वर्गात शाप पावल्यामुळे मृत्यु लोकातील सरस्वतीच्या देवालयात स्तंभांच्या रूपाने अवतीर्ण व्हावे लागले. पुढे त्यांनी सोड्ढलाची कथा ऐकल्यावर त्यांची शापमुक्ति झाली, असा कथाभाग आला आहे.

३ काव्यमीमांसा, पृ. ५०.

४ केऽभूवन्नाढ्यराजस्य काले प्राकृतभाषिणः। 'सरस्वतीकण्ठाभरण', २.१५. टीकाकार 'आढ्यराजः शालिवाहनः।' असे म्हणतो.

'बृहत्कथे'च्या आरंभी वर्णिलेला सातवाहनविषयक प्रसंग घडला असणे अगदी संभवनीय आहे.

सातवाहनांच्या दरबारी पादलिप्त, पोट्टिस, नन्दिवृद्ध, हरिवृद्ध, आढचराज वगैरे अनेक कवि होऊन गेले हे मागे दाखविले आहे. त्यांनी आपल्या काव्य-रचना तत्कालीन माहाराष्ट्री प्राकृतात केल्या होत्या. पण दण्डीच्या पूर्वोक्त श्लोकावरून असे दिसते की त्यांचा समकालीन गुणाढच याने मात्र आपली 'बृहत्कथा' संस्कृतात किंवा माहाराष्ट्री प्राकृतात न रचता ती पैशाची भाषेत रचली होती. दुसऱ्या कोणाही तत्कालीन कवीने पैशाची भाषेत आपली रचना केल्याचे माहीत नाही. गुणाढचाने जे हे केले ते अर्थातच सुखासुखी केले नसावे. त्याच्या मुळाशी पूर्वोक्त पैजेसारखे कारण असणे हेही सुतराम् संभवनीय आहे.

गुणाढचाचा प्रतिस्पर्धी शर्ववर्मा याचे 'कातन्त्र – व्याकरण' अद्यापि सुदैवाने उपलब्ध आहे. पाणिनीय व्याकरणातील दुर्बोध अनुबन्धादि गाळून ते नवशिक्यांकरिता सुबोध केले आहे. त्याच्या निर्मितीचे कारण कथापीठ-लम्बकात वर्णिलेल्या पैजेसारखे असणे अशक्य नाही.

तेव्हा काश्मीरी रूपान्तरांत वर्णिलेल्या 'बृहत्कथे'च्या उत्पत्तिविषयक सर्व प्रमुख गोष्टी – स्वर्गातील शंकर – पार्वतींचे संभाषण, गुणाढच व शर्ववर्मन् यांच्या पैजा, शर्ववर्म्याच्या व्याकरणाचे बाळबोधी स्वरूप आणि गुणाढचाने आपली कथा माहाराष्ट्रीत न रचता पैशाचीसारख्या सामान्यतः अप्रचलित भाषेत रचणे या – मूळ बृहत्कथेत वर्णिल्या होत्या असे मानण्यास भरपूर पुरावा उपलब्ध आहे. 'बृहत्कथाश्लोकसंग्रहा'त त्या न येण्याचे कारण गुणा-ढचाने त्या स्वतः वर्णिल्या नसून तो प्रास्ताविक भाग सातवाहन राजाने जोडला होता, हे असावे. याचा अर्थ मात्र असा नाही की सध्याच्या कथापीठलंबकातील सर्वच विधाने – उदाहरणार्थ, गुणाढच हा एका ब्राह्मणकन्येला नागकुमारापासून झाला होता यासारखी – यथातथ्य आहेत. संस्कृत वाङमयातील अनेक कथांत दन्तकथेने इतिहासाची पायमल्ली केलेली आढळते. भुशातून धान्याचे कण वेचावे तसा दन्तकथांतून इतिहास वेचावा लागतो.

## गुणाढचाचे स्थल व काल

आता आपण गुणाढचाविषयी काय माहिती मिळते ते पाहू. 'बृहत्कथा-मञ्जरी'त (१, १, ७१) तो प्रतिष्ठान नगरात जन्मला होता असें म्हटले आहे —

**प्रतिष्ठानपुरे जातो माल्यवान् दक्षिणापथे ।**
**गुणाढ्य इति यो लोके विश्रुतो गुणगौरवात् ।।**

पण 'कथासरित्सागरा'त (१, १, ६५) सुप्रतिष्ठित नामक श्रेष्ठ नगरात त्याचा जन्म झाला होता असे विधान आहे —

**अन्यच्च माल्यवानपि नगरवरे सुप्रतिष्ठिताख्ये सः ।**
**जातो गुणाढ्यनामा देवि तयोरेष वृत्तान्तः ।।**

या दोन परस्परविरोधी विधानांचा समन्वय असा करावयाचा की प्रतिष्ठान प्रदेशातील सुप्रतिष्ठित नामक नगरात गुणाढ्याचा जन्म झाला. अशोकाच्या लेखात ज्या 'पेतेनिकां'चा उल्लेख येतो ते या प्रदेशातील असावे. पुढे सातवाहनकाली प्रतिष्ठान हे सातवाहनांच्या राजधानीचे शहर झाले. 'कथासरित्सागरा'त म्हटले आहे की विद्याभ्यास संपल्यावर गुणाढ्य सातवाहन राजाला भेटण्याकरिता त्याच्या राजधानीला (प्रतिष्ठानला, सध्याच्या पैठणला) गेला. त्यावरून त्याचे जन्मस्थान प्रतिष्ठानाहून निराळे होते, हे स्पष्ट दिसते.

काही विद्वानांनी 'नेपालमाहात्म्या'तील कथेवर विसंबून गुणाढ्य हा उत्तर भारतातील कौशाम्बी येथे झाला असावा असे म्हटले आहे. ते विद्वान् गंगा, यमुना व सरस्वती यांच्या संगमाजवळचे प्रतिष्ठान हे गुणाढ्याचे जन्मस्थान मानतात. पण ते चूक आहे. 'बृहत्कथामञ्जरी'त उल्लेखिलेले प्रतिष्ठान हे 'दक्षिणापथा'त होते. प्रयागाजवळचे प्रतिष्ठान दक्षिणापथात (नर्मदेच्या दक्षिणेस) नाही.

पूर्वोक्त 'सुप्रतिष्ठित' नगराचे 'सुप्रतिष्ठ' असेही रूप आढळते. ('बृहत्कथामञ्जरी'तील सुरतमञ्जरीलम्बक पाहा.) प्राचीन काळी ते 'सुप्रतिष्ठ' या आहाराचे (महाविभागाचे) मुख्य ठिकाण होते. या आहाराचा उल्लेख आतापर्यंत वाकाटकांच्या तीन दानपत्रांत[१] आढळला आहे. त्यांत त्या आहारातील दान दिलेल्या गावांच्या चतु:सीमा दिल्या आहेत. त्यांवरून प्राचीन सुप्रतिष्ठ आहारात विदर्भातील वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तहसिलीतील, तसेच जवळच्या चांदा आणि यवतमाळ जिल्ह्यांच्या अनुक्रमे वरोडा व यवतमाळ तहसिलीतील काही भाग समाविष्ट होता असे दिसते. या भागातील पोथरा हे गाव 'सुप्रतिष्ठ' या प्राचीन नगरनामाशी जुळणारे दिसते. तेच कदाचित् गुणाढ्याचे जन्मस्थान असेल. सुप्रतिष्ठ नगराच्या चतु:सीमा कोठेही दिल्या नसल्याने याविषयी निश्चित विधान करणे शक्य नाही.

गुणाढ्याचा काळही निश्चित करणे कठीण आहे. दन्तकथेनुसार तो एका सातवाहन राजाच्या सभेत होता. पण सातवाहन हे एका राजवंशाचे नाव होते. ते त्या वंशाला त्याच्या सातवाहन नामक मूळ पुरुषावरून प्राप्त झाले

---

१ याची चर्चा आमच्या 'संशोधन मुक्तावलि: सर १', पृ. १२४ इ. वर केली आहे.

होते. त्या मूळ पुरुषाची नाणी महाराष्ट्रात सापडली आहेत, पण तो मूळ पुरुष
फार प्राचीन काळी (ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीस) होऊन गेला
होता. इतक्या प्राचीन काळी गुणाढ्य झाला असणे शक्य नाही. सातवाहन
राजाच्या सर्व वंशजांना 'सातवाहन' म्हणत असत. म्हणून त्यांतून अमकाच
राजा गुणाढ्याचा समकालीन होता असे म्हणणे शक्य नाही. ब्यूह्लरच्या मते
गुणाढ्य ख्रिस्तोत्तर दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकात झाला असावा. लाकोटच्या
मते तो तिसऱ्या शतकाच्या मध्यातील असावा. पण हे सर्व विनबुडाचे तर्क
आहेत. त्यांना कोणतेही प्रमाण या विद्वानांनी दिले नाही.

सामान्यत: आपण पाहतो की देशात एखादी अशी राजवट येते की
त्या काळी विद्वत्तेला आणि काव्योत्पत्तीला मोठा वहर येतो. सातवाहन काळात
असा वहर हाल राजाच्या राजवटीत आला होता. त्याच्या दरबारच्या अनेक
कवींचा उल्लेख मागे आला आहे. पुराणांत त्याच्या राजवटीला फक्त पाच वर्षे
दिली आहेत, पण ते असंभवनीय आहे. ती दीर्घकाळ चालली असावी. पण
गुणाढ्य त्याच्या काळी झाला असेल, असे वाटत नाही. हालासारखा राजा
'मोदकैर्मां ताडय' या वाक्यातील संधि न जाणण्याइतका अडाणी असेल
असे दिसत नाही ; कारण त्याने स्वत: केवळ काव्येच नव्हे तर वृत्तरचनादि-
विषयक ग्रंथही रचले होते. त्यांतील एकात तर प्राकृत शब्दांना संस्कृत प्रतिशब्द
दिले आहेत. तेव्हा तो संस्कृतज्ञ होता यात संशय नाही.

पुराणांतील वंशावळीप्रमाणे हाल हा सातवाहन वंशातील सतरावा
राजा होय. त्यानंतरच्या पाच राजांच्या वावतीत त्यांची नावे व कारकीर्दींची
वर्षे इतकीच माहिती पुराणांवरून कळते. नंतर तेविसावा राजा गौतमीपुत्र
सातकर्णि याच्या काळापासून तिसावा राजा शेवटचा पुळुमावि याच्या काळापर्यंत
सातवाहनांचा अत्यंत ऊर्जित काळ होता. त्यांच्या काळी काश्मीरी रूपान्तरांत
वर्णिल्यासारखी वर्तणूक गुणाढ्याला मिळाली असणे शक्य दिसत नाही.

गुणाढ्य हालानंतर लौकरच झाला असावा. उद्द्योतनसूरीच्या 'कुवलय-
माले'सारख्या प्राचीन प्राकृत ग्रंथांत त्याचे नाव हाल, पादलिप्त, षट्प्रज्ञ
यांच्या वरोबरीने येते. तेव्हा तो त्यांच्यानंतर लौकरच होऊन गेला असावा.
हालादिकांचा कालही निश्चित पुराव्याच्या अभावी ठरविता येत नाही. तथापि
सामान्यत: ते राजे ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाच्या आरंभी होऊन गेले असावे.
गुणाढ्य हालानंतर एकदोन पिढ्यांत झाला असावा.

'बृहत्कथे'मध्ये उदयन आणि वासवदत्ता यांचा पुत्र नरवाहनदत्त
याची कथा मुख्य आहे. तो एक दोन नव्हे, तर सव्वीस स्त्रियांशी विवाह करतो
आणि शेवटी विद्याधरांचा चक्रवर्ती होतो. त्याची मुख्य राणी मदनमञ्चुका ही
कलिंगसेना नामक वेश्येची कन्या होती. 'मृच्छकटिका'त गणिका वसन्तसेनेला

जसा त्या नाटकाच्या शेवटी घरंदाज स्त्रीचा दर्जा मिळतो तसेंच मदनमञ्चुकेला नरवाहनदत्ताच्या राणीचे पद मिळते. कदाचित् 'बृहत्कथे'वरूनच शूद्रकाला 'मृच्छकटिका'तील काही घटना सुचल्या असाव्या. त्या नाटकाचा काल कुषाण राजवटीतील आहे हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.[१] त्यावरूनही 'बृहत्कथे'चा पूर्वोक्त काल समर्थित होतो. तसेच भासानेही आपल्या 'स्वप्न-वासवदत्ता'तील संविधानक 'बृहत्कथे'तून घेतले असावे, हे काही विद्वानांनी दाखविले आहे.[२] भास कालिदासाच्या पूर्वी (ख्रिस्तोत्तर ४०० च्या पूर्वी) झाला होता यात संशय नाही. त्याच्याही पूर्वोक्त नाटकास 'बृहत्कथे'चा आधार असल्यास गुणाढ्याचा मागे अनुमानिलेला काल सुतराम् संभाव्य ठरेल.

'बृहत्कथे'तील मुख्य कथा कौशाम्बीच्या राजपुत्राच्या (नरवाहन-दत्ताच्या) चरित्राविषयी असल्याने तीत उत्तर भारतातील अनेक स्थळांचे उल्लेख येणे साहजिक आहे. पण त्यावरून गुणाढ्य हा उत्तर भारतातील ग्रंथकार होता असे अनुमान काही विद्वान् काढतात ते मात्र तर्कदुष्ट आहे.

## 'बृहत्कथे'ची भाषा

आता आपण 'बृहत्कथे'च्या भाषेकडे वळू. दोन्ही काश्मीरी रूपान्तरांत तिला 'पैशाची' म्हटले आहे. दण्डीनेही तिला 'भूतभाषा' असे नाव दिले आहे. पैशाची किंवा भूतभाषा ही विन्ध्य पर्वताच्या परिसरात प्रचलित आहे असे राजशेखर सांगतो —

**आवन्त्याः पारियात्राः सह दशपुरजैर्भूतभाषां भजन्ते ।**

(काव्यमीमांसा, पृ. ५१.)

[अवन्ती किंवा उज्जैनी, पारियात्र (अबूचा पाहाड) आणि दशपुर (मन्दसोर) येथील लोक भूतभाषा बोलतात.]

या प्राकृत भाषेची मुख्य लक्षणे हेमचंद्राच्या 'प्राकृत – व्याकरणा'त पुढील प्रमाणे दिली आहेत[३]—

(१) या भाषेत माहाराष्ट्रीतल्या प्रमाणे दोन स्वरांमधील व्यंजनांचा लोप होत नाही.

(२) 'द' चा 'त', 'ण' चा 'न', 'ल' चा 'ळ' आणि 'श' व 'ष' चा 'स' होतो. उदाहरणार्थ, मतन (मदन); गुनेन (गुणेन); कुळं (कुलं); ससी (शशी); विसमो (विषमो).

---

१ संशोधनमुक्तावलिः सर ८, पृ. २८, इ. पुढे, पृष्ठ १९२ इ. पाहा.

२ पण भासाने त्यांत बरेच फरक केले आहेत. A. D. Pusalkar, *Bhāsa: A Study*, pp. 286 f.

३ हेमचन्द्र, प्राकृतव्याकरण (सं. प. ल. वैद्य), पृ. १४१–१४४.

(३) 'ज्ञ', 'न्य' आणि 'ण्य' यांचे 'ञ्ञ' होते; रञ्ञा (राज्ञा); कञ्ञका (कन्यका); पुञ्ञ (पुण्य). राज्ञा याचे विकल्पाने राचिञा असे रूप होते.

(४) टवर्गाच्या ठिकाणी तवर्ग विकल्पाने होतो. कुतुंबकं किंवा कुटुंबकं (कुटुंबकं).

(५) 'हृदय' मधील यचा प होतो. हितपके (हृदये).

(६) 'त्वा' प्रत्ययाचे 'तून', आणि 'ष्ट्वा' चे 'द्धून' किंवा 'त्थून' होते. गन्तून (गत्वा); नद्धून (नष्ट्वा); तत्थून (तंष्ट्वा).

(७) कर्मणि प्रयोगाची रूपे 'इय्य' प्रत्ययान्त होतात. दिय्यते (दीयते).

(८) भविष्यकाळाची रूपे 'एय्य' प्रत्ययान्त होतात. हुवेय्य (भविष्यति).

(९) अकारान्त शब्दांची पञ्चम्यन्त रूपे आतो— किंवा आतु—प्रत्ययान्त होतात. तुमातो, तुमातु (त्वत्तः); ममातो, ममातु (मत्तः).

याशिवाय इतरही काही किरकोळ फरक आहेत. त्यांची चर्चा करण्याची येथे आवश्यकता नाही.

पैशाची भाषेची 'चूलिका–पैशाची' नामक उपभाषा आहे. तीत (१) वर्गातील तृतीय आणि चतुर्थ अक्षरांबद्दल प्रथम आणि द्वितीय अक्षरे होतात. जसे नकर (नगर); मख (मघ); आणि (२) 'र'चा 'ल' विकल्पेकरून होतो.

हेमचन्द्राने आपल्या व्याकरणात चूलिका-पैशाचीची पुढील उदाहरणे दिली आहेत[१]—

चूलिका पैशाची —

(१) **पनमथ पनयपकुप्पितगोलीचलनग्गलग्गपतिबिम्बं ।**
**तससु नखतप्पनेसुं एकातसतनुथलं लुद्दं ।।**
**[प्रणमत प्रणयप्रकुपितगौरीचरणाग्रलग्नप्रतिबिम्बम् ।**
**दशसु नखदर्पणेषु एकादशतनुधरं रुद्रम् ।।]**

(२) **नच्चन्तस्स य लीलापातुक्खेवेन कम्पिता वसुथा ।**
**उच्छल्लन्ति समुद्दा सइला निपतन्ति तं हलं नमथ ।।**
**[नृत्यतश्च लीलापादोत्क्षेपेण कम्पिता वसुधा ।**
**उच्छलन्ति समुद्राः शैला निपतन्ति तं हरं नमत ।।]**

---

१ ही उदाहरणे 'बृहत्कथे'च्या आरंभी असावी असा एक तर्क आहे. 'बृहत्कथा' पैशाची गद्यांत असली तरी तीत आरंभी शिवनमनपर एक दोन गाथा असणे असंभवनीय नाही. पण ही उदाहरणे चूलिका पैशाचीत आहेत. गुणाढ्याने चूलिका पैशाचीचा उपयोग केल्याचा निर्देश नाही. कदाचित् चूलिका-पैशाचीची उदाहरणे देण्याकरिता हेमचन्द्राने पैशाची भाषेतील मूळ गाथांत परिवर्तन केले असेल.

ही भाषा विन्ध्य पर्वताच्या परिसरात प्रचलित होती हे पारम्परिक मत सिद्ध करणारा पुरावा मागे दिला आहे. गुणाढ्य हा दक्षिणापथात सातवाहनांच्या दरबारी होता हे मत पुढे त्याने विन्ध्य पर्वताच्या परिसरात जाऊन 'बृहत्कथा' रचली या वृत्तान्ताशी सुसंगत आहे. पण पैशाची भाषेच्या प्रदेशाविषयी विद्वानांनी भिन्न भिन्न मते प्रदर्शित केली आहेत. विख्यात भारतीय-भाषा-सर्वेक्षक ग्रीयरसन यांच्या मते पैशाची प्राकृत भारताच्या वायव्यदिशेतील प्रदेशांत—काफिरीस्थान, स्वात नदीचे खोरे, चित्रळ आणि गिलगित यांमध्ये—प्रचलित होती. तेथील लोक नरभक्षक असल्यामुळे 'पिशाच' नावाने ओळखले जात. 'द' व इतर मृदु व्यंजनांचे 'त' व इतर कठोर व्यंजनांत रूपान्तर या भागांतील भाषेत आढळते, ते पैशाची भाषेचे वैशिष्टय आहे असे त्यांचे मत होते. पण मग पैशाचीचे पालिभाषेशी साम्य आहे हे कसे? यावर ग्रीयरसनचे उत्तर हे की पैशाची भाषा वायव्य प्रांतातील तक्षशिला प्रदेशात बोलभाषा असावी. पालि हे तिचे ग्रांथिक भाषेत झालेले रूप असावे. या मताला काडीचाही आधार नाही. म्हणून ते डॉ. कीथसारख्या अन्य विद्वानांनी स्वीकारले नाही. कीथने दाखविले आहे की पैशाचीत फक्त एकच ऊष्म व्यंजन 'स' हे आहे पण वायव्य प्रांतातल्या अशोकाच्या लेखांत दुसरीही ऊष्म व्यञ्जने आढळतात. तेव्हा तेथील भाषा पैशाची असणे शक्य नाही. यावर लाकोटने अशी तोड सुचविली आहे की, 'बृहत्कथे'ची भाषा द्राविडी लोकांनी उच्चारलेल्या आर्य भाषेसारखी दिसते. म्हणून कदाचित् गुणाढ्याने द्राविडी लोक आर्य भाषा बोलताना उच्चारणात जे फरक करतात तसे फरक करून वायव्य प्रांतातील भाषा 'बृहत्कथे'त योजिली असावी. पण गुणाढ्याला वायव्य प्रांतातील भाषा घेण्याचे प्रयोजनच काय? तो सातवाहन कालात होऊन गेला आणि 'बृहत्कथा' रचण्याच्या वेळी तो विन्ध्य प्रदेशात होता हे आपण मागे पाहिले आहे. तेव्हा तेथील भाषाच त्याने योजिली असावी हेच मत सयुक्तिक दिसते.[१] हेच मत स्टेन कोनो[२] आणि कीथ[३] यांनी स्वीकारले आहे. पैशाचीचे माळवी भाषेशी साम्य आहे.[४] काही बाबतीत (उदाहरणार्थ, 'ल'च्या ऐवजी 'ळ'च्या उच्चारणात) द्राविडी भाषेचा परिणाम दिसून येतो. पैशाची भाषेचे पालि भाषेशी साम्य आहे. पालिभाषेत समग्र प्राचीन बौद्ध वाङ्मय लिहिले असले तरी ती मगधात प्रचलित नसून मध्यभारतात प्रचलित होती हे काही

---

१ भरताने 'नाटचशास्त्रा'त (१७·४०) उल्लेखिलेली अवन्तिजा (आवन्तिका) प्राकृत ही पैशाची भाषा असावी.

२ *Z. D. M. G.* (1910,) p. 118.

३ *History of Sanskrit Literature*, p. 269.

४ *A. B. O. R. I.*, XXI, p. 26.

विद्वानांनी दाखविले आहे. अशोकाचा पुत्र महेन्द्र याने ती लंकेला नेली असावी.[१] तारानाथही सांगतो की स्थविरवादी बौद्ध आपले धर्मग्रंथ पिशाचिका भाषेत पढतात.[२] ही पिशाचिका म्हणजे पालिभाषा होय.

पैशाची भाषेतील वाङ्मय अत्यल्प आहे. गुणाढ्याची 'बृहत्कथा' हाच काय तो नाव घेण्यासारखा त्या भाषेतील ग्रंथ ज्ञात आहे, पण दुर्दैवाने तो आता उपलब्ध नाही. अनेक व्याकरणकारांनी पैशाची भाषेचे व्याकरण दिले आहे, पण त्यांनीही त्या भाषेतील उतारे दिले नाहीत. हेमचन्द्र आणि भोज हेच काय ते या विधानाला अपवाद आहेत. हेमचंद्राच्या व्याकरणातून दोन गाथा मागे दिल्या आहेत. त्याने दिलेले इतर उतारे गद्यातील लहान लहान वाक्ये आहेत. भोजाने आपल्या 'शृंगार–प्रकाशा'त पैशाची भाषेतील एक बराच मोठा गद्य उतारा उद्धृत केला आहे.[३] दण्डीने सांगितले आहे की 'बृहत्कथा' गद्यात लिहिली होती. तेव्हा हे उतारे कदाचित् 'बृहत्कथे'तील असावेत असा तर्क आहे. 'कुमारपालचरित' या दुसऱ्या ग्रंथात हेमचन्द्राने पैशाचीच्या सहा आणि चूलिका–पैशाचीच्या दोन गाथा दिल्या आहेत. काही जैन तीर्थकरांच्या स्तुतिपर स्तोत्रे आणि एक–दोन संस्कृत ग्रंथांतील किरकोळ पात्रांची भाषणे पैशाचीत आली आहेत.[४] पण ती नगण्य आहेत.

संस्कृत ग्रंथकारांना अतिशयोक्तीची अत्यंत आवड असते. मम्मटाने ध्वनिकाव्याचे १०४५५ प्रकार सांगितले आहेत! प्राकृत व्याकरणकारही याला अपवाद नाहीत. मार्कंडेय या प्राकृत व्याकरणकाराने पैशाची भाषा बोलणाऱ्या देशांची पुढील लांबलचक यादी दिली आहे––

**काञ्चीदेशीयपाण्डचे च पाञ्चालं गौडमागधम् ।**
**व्राचडं दाक्षिणात्यं च शौरसेनं च केकयम् ।**
**शाबरं द्राविडं चैवं एकादश पिशाचजाः ।।**

हे खरे असते तर पैशाची भाषेतील ग्रंथांचे इतके दुर्भिक्ष झाले नसते !

## ४. शर्ववर्म्याचे कातन्त्र व्याकरण

सातवाहन राजाला सुलभतेने संस्कृत शिकविण्याकरिता त्याच्या सभेतील शर्ववर्मा पंडिताने कातन्त्र नामक सुबोध व्याकरण रचल्याची परंपरागत कथा

---

१ हे मत कून (Kuhn) याने मांडले आहे. See Gune, *Introduction to Comparative Philology* (1st ed.) p. 177. हेच मत फ्रांके यानेही प्रतिपादिले आहे. *Loc. cit.*

२ *Z. D. M. G.*, 1910, p. 104.

३ V. Raghavan, *Bhoja's Śṛṅgāra-prakāśa*, p. 535.

४ *A. B. O. R. I.*, XXI, pp. 27 f.

मागे दिली आहे. तीत बरेच तथ्य असावे. शुंग कालापर्यंत पाणिनीय व्याकरणाचा भारतात अव्याहत प्रचार चालू होता. पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'तील सूत्रांचा चिकित्सक अभ्यास करून त्यांत लाघवाच्या व निर्दोषत्वाच्या दृष्टीने सुधारणा करण्यात विद्वान् वैयाकरण गुंतले होते. त्यांनी रचलेल्या सूत्रांना 'वार्त्तिक' अशी संज्ञा आहे. शुंग नृपति पुष्यमित्र याच्या काळी पतंजलीने पाणिनीय सूत्रे व त्यांवरील कात्यायनादींची वार्त्तिके यांच्या चिकित्सक परीक्षणार्थ आपला 'महाभाष्य' हा ग्रंथ रचला. तो पाणिनीय व्याकरणावरचा मूर्धन्य ग्रंथ मानला जातो.

पण पाणिनीय व्याकरण हे वैदिक आणि अभिजात (classical) अशा दोन्ही प्रकारांच्या संस्कृत भाषेचे व्याकरण असून ते त्यांत प्रावीण्य मिळवू इच्छिणाऱ्या अभ्यासकांकरिता उपयुक्त आहे. संस्कृतचा सामान्य परिचय करून घेऊ इच्छिणाऱ्या लोकांकरिता नाही. त्यांच्याकरिता एखाद्या सुबोध व्याकरणाची जरूरी होती. तिच्याकडे सातवाहन राजाच्या जलक्रीडेतील पूर्वोक्त प्रसंगाने लक्ष वेधले गेल्यावर शर्ववर्म्याने आपले सुबोध व्याकरण रचले असणे सुतराम् संभवनीय आहे. अशा प्रकारच्या संस्कृत व्याकरणांत ते कालक्रमाने पहिले आहे.

शर्ववर्म्याच्या व्याकरणाची 'कातन्त्र', 'कौमार' आणि 'कालाप' अशी विविध नावे प्रचलित आहेत. ते लहानसे व्याकरण असल्यामुळे त्याला पहिले नाव ('कातन्त्र', छोटे शास्त्र) पडले असावे. शर्ववर्म्याला हे व्याकरण कुमाराच्या (कार्त्तिकेयाच्या) प्रसादाने प्राप्त झाले असल्यामुळे त्याला 'कौमार' असे नाव प्राप्त झाले असावे. त्याचे 'कालाप' हे नाव कुमाराच्या मयूरवाहनाच्या कलापावरून (पिसाऱ्यावरून) पडले असावे.

शर्ववर्म्याच्या सध्याच्या व्याकरणात एकूण १३८३ सूत्रे आहेत.[१] पण त्यातील काही प्रकरणे, उदाहरणार्थ, कृत्, निपात, स्त्रीप्रत्यय व उणादि मागाहून जोडलेली दिसतात. कृत्प्रकरणाच्या आरंभी 'सिद्धि' हा मंगलवाचक शब्द पुनः योजिला आहे,[२] त्यावरूनही ते प्रकरण मागाहून जोडले गेले हे सूचित होते. ते प्रकरण शाकटायनाने किंवा वररूचीने रचले अशी परंपरागत समजूत आहे.[३] निपात, स्त्रीप्रत्यय आणि उणादि प्रकरणांवर कातन्त्र व्याकरणाचा सर्वांत प्राचीन टीकाकार दुर्गसिंह याची टीका नाही, हेही लक्षणीय आहे. ही नंतरची प्रकरणे वजा केल्यास कातन्त्र व्याकरणसूत्रांची संख्या सुमारे १०००

---

१ ही संख्या 'भावसेन – त्रैविद्यदेव – विरचित – रूपमालासहित कातन्त्र – व्याकरण' (प्र. हीराचंद्र नेमिचंद्र, विक्रम संवत् १९५२)वरून घेतली आहे.

२ 'सिद्ध' शब्द कातन्त्र व्याकरणाच्या पहिल्या सूत्रात (सिद्धो वर्णसमाम्नायः।) आला आहे.

३ Belvalkar, *Systems of Sanskrit Grammar*, p. 84.

भरते. पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'च्या ४००० सूत्रांच्या मानाने ही संख्या पुष्कळच कमी आहे. शिवाय ही सूत्रे नवशिक्या विद्यार्थ्यांनासुद्धा सहज समजतील अश्या सुबोध पद्धतीने रचली असल्यामुळे त्यांच्या साहाय्याने सातवाहन राजाला सहा महिन्यांत संस्कृतचे सामान्य ज्ञान प्राप्त करून देण्यात शर्ववर्म्याला यश मिळाले असले तर नवल नाही.

आपले व्याकरण सुबोध आणि सुटसुटीत करण्याकरिता शर्ववर्म्याने अनेक उपाय योजिले आहेत. त्याने वैदिक संस्कृत पूर्णपणे वगळले आहे. पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'त योजिलेल्या प्रत्याहारांकरिता माहेश्वर सूत्रांची आवश्यकता होती. त्यांत संस्कृत भाषेतील वर्णांची अनुक्रमी बदलली होती. शर्ववर्म्याने प्रातिशाख्यांना अनुसरून वर्णांचा स्वाभाविक क्रम ठेवला आहे. प्रत्याहार दुर्बोध होत असल्यामुळे त्याने त्यांचा उपयोग केला नाही. त्याने योजिलेल्या संज्ञा सार्थ असल्यामुळे सहज समजण्यासारख्या आहेत. उदाहरणार्थ, वर्तमाना (पाणिनीचा लट्), ह्यस्तनी (लङ्), परोक्षा (लिट्), श्वस्तनी (लुट्) या संज्ञा पाहा. त्याने स्वतःच्या थोड्या नवीन संज्ञा बनविल्या आहेत, त्याही सुबोध आहेत. उदाहरणार्थ, लिङ्ग (प्रातिपदिक), अग्नि (ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त पुल्लिंगी शब्द), धुट् (अन्तःस्थ व अनुनासिके यांखेरीज व्यञ्जन) इत्यादि. त्याने पाणिनीच्या सुबोध सूत्रांत फरक केला नाही. ती तशीच घेतली आहेत. उदाहरणार्थ, 'ऋते च तृतीयासमासे।' (१·३५), व्याङ् परिभ्यो रमः।(२·२५४)इत्यादि. पण जेथे पाणिनीचे सूत्र संक्षिप्त असल्यामुळे दुर्बोध होते तेथे ते सविस्तर करून सुबोध केले आहे. उदाहरणार्थ, पाणिनीच्या 'इको यणचि।' (अष्टाध्यायी ६. १·७७) या सूत्राची शर्ववर्म्याच्या 'इवर्णो यमसवर्णे न च परो लोप्यः।' या सूत्राशी तुलना करा. पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'त प्रकरणवार सूत्रे दिली नसल्याने भट्टोजी दीक्षितादिकांना तिजवरील आपल्या व्याकरणग्रंथांत त्यांचा क्रम अनेक ठिकाणी बदलावा लागला. सहस्राधिक वर्षांपूर्वी शर्ववर्म्याने ही अडचण लक्षात घेऊन अध्ययनाध्यापनाच्या सोयीच्या दृष्टीने सर्व सूत्रे प्रकरणशः दिली आहेत. सारांश, त्याने अभ्यासकांना आपले व्याकरण सुबोध करण्याकरिता शक्य ते सर्व उपाय योजिले आहेत.

कालान्तराने कातन्त्र व्याकरणात कमी होते ते भाग, उदाहरणार्थ, तद्धित, स्त्रीप्रत्यय, कृत् वगैरे, त्याला जोडण्यात येऊन ते पूर्ण करण्यात आले. त्याच्यावर अनेक टीकाही रचण्यात आल्या. त्यांमध्ये दुर्गसिंहाची टीका (ख्रिस्तोत्तर आठवे शतक) ही सर्वांत प्राचीन आहे.

कातन्त्र व्याकरणाचा प्रचार सध्या बंगाल व काश्मीर प्रदेशांत मोठ्या प्रमाणावर चालू आहे, पण त्याच्या मूळ उत्पत्तिक्षेत्रात–महाराष्ट्रात–ते लोकप्रिय नाही. कांही जैन पाठशालांत त्याचे अध्ययन होत असावे. आमच्या जवळ

त्याची आवृत्ति भावसेन नामक जैनमुनीच्या 'रूपमाला' नामक टीकेसहित छापली आहे.[१]

सध्या कातन्त्र व्याकरणाचा महाराष्ट्रात विशेष प्रचार नसला तरी यादव कालापर्यंत तरी ते बरेच प्रचलित होते हे यादव नृपति रामचंद्र याच्या शक संवत् १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटातील पुढील श्लेषमूलक मनोरंजक रूपकावरून स्पष्ट होईल[२] —

**श्रीरामः शर्ववर्म्मा पदघटनलघूपायदृग्दुर्गवृत्ति-**
**व्याख्याताशेषसूत्रो विकरणविलसद्धातुनिष्पादितार्थः ।**
**वर्णानां व्युत्क्रमेण व्यवहरणमपाकृत्य संदर्शितार्थो**
**जेता दिव्याकृतीनां शिशुरपि तदिह स्पृश्यते नापशब्दैः ।।**

[हा श्री रामचन्द्र नृपति (खरोखर) (कातन्त्रसूत्रकार) शर्ववर्माच होय ; कारण ज्याप्रमाणे शर्ववर्म्याने आपल्या व्याकरणात पदसिद्धीचा सोपा मार्ग हुडकून काढला तसा या राजाने आपले राजपद प्राप्त करून घेण्याचा सोपा उपाय अवलंबिला ; जशी दुर्गसिंहाने शर्ववर्म्याच्या सर्व सूत्रांवर टीका लिहिली आहे. त्याप्रमाणे या राजाने देवगिरि दुर्ग काबीज करून आपली सर्व राजनीति प्रकट केली आहे ; ज्याप्रमाणे शर्ववर्म्याने विकरणयुक्त[३] धातूंच्या प्रयोगाने इष्टार्थ व्यक्त केला आहे त्याप्रमाणे या राजाने विविध उपायांनी युक्त अशा आपल्या वैयक्तिक सामर्थ्याने इष्टार्थ प्राप्त करून घेतला आहे ; ज्याप्रमाणे शर्ववर्म्याने वर्णांचा स्वाभाविक क्रम न बदलता आपल्या व्याकरणाने अर्थव्यक्ति केली आहे तसेच या राजाने चातुर्वर्ण्याचा भंग न करता राज्यकारभार चालविला आहे ; आणि ज्याप्रमाणे शर्ववर्म्याच्या व्याकरणामुळे लहान मुले सुद्धा अशुद्ध शब्दांचा उपयोग करीत नसल्यामुळे त्याने पाणिनीसारख्या आदि व्याकरणकारांच्या ग्रंथांना[४] मागे टाकले आहे त्याप्रमाणे हा राजा लहान असला तरी (प्राचीन काळच्या रघुकुलोत्पन्न रामचंद्रासारख्या) दिव्य राजपुरुषांपेक्षा श्रेष्ठ असून त्याला कोणाच्याही निंदेचा स्पर्श होत नाही.[५]]

मागे चर्चिलेले दोन्ही मुख्य ग्रंथ – 'सत्तसई' आणि 'बृहत्कथा' हे – प्राकृतात आहेत. त्या काळी संस्कृतमध्ये रचना मुळीच होत नव्हती काय ? असा प्रश्न उपस्थित होतो. अलीकडे सापडलेल्या मल्हारा ताम्रपटावरून

---

१ या आवृत्तीत शर्ववर्म्याला 'जैनाचार्य' म्हटले आहे.

२ *Ep. Ind.*, Vol. XXV, p. 211.

३ विकरण म्हणजे सार्वधातुक प्रत्ययापूर्वी धातूला जोडण्याचे गणचिन्ह.

४ चौथ्या चरणातील शर्ववर्मपक्षातील पदच्छेद 'जेता आदिव्याकृतीनां' असा घ्यावयाचा.

५ रघुकुलोत्पन्न दिव्य पुरुष रामचंद्र याला सीतास्वीकारामुळे जननिन्दा सहन करावी लागली होती.

सातवाहनांच्या राज्यात श्रोत्रिय आणि विद्वान् अशा धार्मिक ब्राह्मणांचा पूर्णपणे अभाव नव्हता ; तेही आपल्या धर्माचे विधिवत् आचरण करून धर्मोपदेश व ग्रंथरचना करीत असावे हे स्पष्ट दिसते. पण त्यांचे तत्कालीन ग्रंथ अद्यापि सापडले नाहीत. भविष्यकाळाच्या उदरात काय असेल हे कोणी सांगावे ?

तथापि, निदान क्षत्रपांच्या राज्यात संस्कृत विद्या प्रफुल्लित होत होती यात संशय नाही. सामान्यतः क्षत्रपांनी संस्कृत विद्येस बरेच प्रोत्साहन दिले होते असे दिसते. त्यांचा हिंदु धर्माला मोठा आश्रय होता हे ऋषभदत्ताच्या नाशिक लेण्यातील लेखांवरून स्पष्ट दिसते. महाक्षत्रप रुद्रदामन् याने तर प्रसाद, माधुर्य इत्यादि गुणांनी युक्त गद्य पद्य काव्ये स्वतः रचली होती असा त्याच्या जुनागड येथील लेखात निर्देश आहे. त्याच्या व त्याच्या वंशजांच्या काळात संस्कृत विद्येला ऊर्जितावस्था प्राप्त झाली असावी. पण दुर्दैवाने त्यांच्या आश्रयाखालील विद्वानांचे ग्रंथ आता अप्राप्य झाले आहेत. केवळ एक ग्रंथ शूद्रकाचे 'मृच्छकटिक नाटक', सध्या उपलब्ध आहे. त्याचा आता विचार करु

## ५. शूद्रकाचे 'मृच्छकटिक'

संस्कृत नाटयवाङ्‌मयात 'मृच्छकटिक' हे नाटक अद्वितीय आहे सामान्यतः संस्कृत नाटके 'महाभारत' व 'रामायण' या आर्ष महाकाव्यांतील प्रसंगांवर आधारित असतात. काही ऐतिहासिक राजपुरुषांच्या अन्तःपुरातील प्रेमकलहावर उभारली आहेत. उदाहरणार्थ, कालिदासाचे 'मालविकाग्निमित्र आणि हर्षाची 'प्रियदर्शिका' व 'रत्नावलि' पाहा. भवभूतीच्या 'मालती माधवा'सारखी अत्यल्प नाटकांची संविधानके समाजजीवनातून घेतल आहेत खरी, पण त्यांतील पात्रेही समाजाच्या उच्च थरातीलच आहेत 'मृच्छकटिक' नाटक मात्र असे आहे की त्यांतील कथानक गणिका, संवाहक द्यूतकर, विट, चेट इत्यादि समाजाच्या खालच्या थरातील लोकांच्या जीवनाश संबद्ध आहे. त्यातच त्याचे अद्वितीयत्व आहे.

### 'मृच्छकटिक' आणि 'चारुदत्त' यांचा परस्परसंबंध

या नाटकाविषयी अनेक समस्या अद्यापि अनिर्णीत आहेत. 'मृच्छ कटिका'चे 'चारुदत्त' नामक दुसऱ्या एका संस्कृत नाटकाशी संविधानक, पात्रे भाषा इत्यादिकांत अत्यंत साम्य आहे. म्हणून 'चारुदत्त' ही 'मृच्छकटिका'-

१ काही पात्रांची नावे मात्र बदलली आहेत. उदाहरणार्थ, 'मृच्छकटिका'त चारुदत्ताच घरी चोरी करणाऱ्याचे नाव 'शर्विलक' आहे, तर 'चारुदत्ता'त ते 'सज्जलक' आ तसेच नटीला उपवास करण्याचा सल्ला देणारा 'मृच्छकटिका'त 'जूर्णवृद्ध' आहे, 'चारुदत्ता'त तो 'चूर्णगोष्ठ' आहे.

संक्षिप्त आवृत्ति, की 'मृच्छकटिक' हे 'चारुदत्ता'चे अनेक प्रसंग व पात्रे घालून वाढविलेले रूपान्तर, याविषयी विद्वानांमध्ये दीर्घकाल वाद माजून राहिला आहे. दोन्ही नाटके काळजीपूर्वक वाचणाऱ्या सहृदय वाचकास याविषयी संदेह राहू नये. याची थोडी चर्चा आम्ही यापूर्वी 'संशोधन–मुक्तावलि : सर २, पृ. ७ व ९-१०' यांवर केली आहे. तथापि आणखीही एक–दोन उदाहरणे येथे देऊ.

'मृच्छकटिक' व 'चारुदत्त' या दोन्ही नाटकांच्या प्रस्तावनेत सूत्रधार आपल्या घरात पक्वान्नांचा सुगंध दरवळत असलेला पाहतो. त्याने विचारल्या-वरून नटी त्याला त्या दिवशी आपल्या उपवासाचे पारणे असल्याचे सांगते. तेव्हा तो त्या उपवासाचे प्रयोजन विचारतो. त्यावर ती म्हणते, 'योग्य पति मिळावा म्हणून हा उपवास.' तेव्हा तो विचारतो, 'तो पति दुसऱ्या जन्मातला काय?' त्यावर ती 'होय' म्हणते. नंतर 'मृच्छकटिका'त पुढील प्रश्नोत्तरे होतात ––

सूत्रधार (रागावून) ––पाहा, पाहा, सद्गृहस्थहो! माझ्या अन्नाचा व्यय करून ही दुसऱ्या जन्मातील भर्ता हुडकीत आहे!

नटी ––आर्या! शांत व्हा. शांत व्हा. तुम्हीच माझे पुढील जन्मी पति व्हावे, म्हणून हा उपवास.

हा मनोरम प्रसंग 'चारुदत्ता'त गाळला आहे. त्या नाटकात नटीने सूत्रधाराच्या प्रश्नास 'पुढील जन्मीच्या पतिप्राप्तीकरिता हा उपवास' असे उत्तर दिल्यावर सूत्रधार काही अधिक न बोलता 'सव्वं दाव चिट्ठदु' (हे सर्व राहू द्या) एवढेच गुळमुळीत उद्गार काढतो. हे अगदी अस्वाभाविक वाटते. सहृदय वाचकास येथे काही भाग गळल्यासारखा वाटतो. याउलट 'मृच्छकटिका'तील मागे उद्धृत केलेली सूत्रधार व नटी यांची भाषणे अगदी स्वाभाविक वाटतात. तसाच प्रत्यय 'चारुदत्त' नाटकातील पुढील भाषणात येतो ––

सूत्रधार ––तुला हा उपवास करण्यास कोणी सांगितले?

नटी ––या आपल्या पूज्य चूर्णगोष्ठांनी.

सूत्रधार ––चांगले केलेस, चूर्णगोष्ठा, चांगले केलेस!

या भाषणांपेक्षा 'मृच्छकटिका'तील सूत्रधाराचे या प्रसंगीचे उद्गार किती तरी प्रसंगोचित आहेत. तो म्हणतो, 'अरे लुच्चा, जूर्णवृद्धा! नववधूच्या केशकलापाप्रमाणे सुगन्धित होणाऱ्या तुला क्रुद्ध पालक राजाने कंठस्नान घातलेले मी केव्हा पाहीन असे मला झाले आहे!'

आम्ही इतरत्र[१] दाखविल्याप्रमाणे हे सूत्रधाराचे उद्गार वाच्यार्थाने घ्यावयाचे नाहीत. पण ते अगदी प्रसंगानुरूप वाटतात. शिवाय, त्यावरून पालक

---

१ संशोधनमुक्तावलि, सर २, पृ. २५-२८.

राजाचा क्रूर स्वभाव सूचित होतो. म्हणून 'मृच्छकटिका'च्या कर्त्याने ते येथे मुद्दाम घातले आहेत. 'चारुदत्त'कर्त्याने ते गाळण्याचे कारण त्याला पालक राजाचे क्रूरत्व आणि त्यामुळे शेवटी झालेली राज्यक्रान्ति यांचा उल्लेख करावयाचा नव्हता. त्याने 'मृच्छकटिका'तील शेवटचे पाच ते दहा हे अंक गाळले आहेत.

दुसरा उल्लेख जातिकुसुमवासित प्रावारकाचा (जाईच्या फुलांनी सुगन्धित केलेल्या शेल्याचा). 'मृच्छकटिका'च्या कर्त्याने त्याचा मोठ्या कौशल्याने उपयोग केला आहे. त्या नाटकाच्या पहिल्या अंकात चारुदत्ताचा प्रिय मित्र गान्धिक (सुगन्धि द्रव्यांचा निर्माता) जूर्णवृद्ध याने तो चारुदत्ताला मैत्रेयाबरोबर भेट म्हणून पाठविला आहे, असे सांगितले आहे. तो शेला पाहिल्यावर चारुदत्ताच्या मनात आपल्या दारिद्र्याविषयी विचार उत्पन्न झाले, असे 'मृच्छकटिका'च्या पहिल्या अंकात दाखवले आहे. जूर्णवृद्धाने बहुधा तो शेला, चारुदत्ताची सुगन्धित वस्त्रांची आवड जाणून, जाईच्या फुलांनी सुगन्धित करून व त्यावर चारुदत्ताचे नाव घालून पाठविला होता. तो घेताना इतरांवर सदैव देणग्या व पारितोषिके यांचा मुक्तहस्ताने वर्षाव करणाऱ्या चारुदत्ताच्या मनात सहजच आपल्या दारिद्र्याची जाणीव उत्पन्न झाली. ती त्याच्या आरंभीच्या उद्गारांत व्यक्त झाली आहे. 'चारुदत्त' नाटकात या शेल्याचा उल्लेख नाही. पुढे या सुगन्धित शेल्याचा उपयोग 'मृच्छकटिका'च्या कर्त्याने मोठ्या कौशल्याने केला आहे. शकार, विट, चेट इत्यादिकांच्या तावडीतून निसटून वसन्तसेना चारुदत्ताच्या वाड्याचे पक्षद्वार उघडे पाहून हळूच आत शिरते. तिला आपली दासी रदनिका समजून चारुदत्त आपला झोपलेला मुलगा रोहसेन याच्या अंगावर थंडीच्या निवारणार्थ घालण्याकरिता तो शेला तिच्याकडे फेकतो. त्याच्या सुवासावरून तिला चारुदत्ताच्या 'अनुदासीन' यौवनाची कल्पना येते. पुढे दुसऱ्या अंकात वसंतसेनेच्या पिसाळलेल्या हत्तीला काबूत आणणाऱ्या कर्णपूरकाच्या धाडसाने प्रसन्न झालेला चारुदत्त, मौल्यवान् अलंकारांच्या अभावी, तो शेला त्याच्याकडे फेकतो. कर्णपूरकाने तो वसंतसेनेला दाखविल्यावर 'हा शेला जाईच्या फुलांनी सुगन्धित केला आहे काय' असे ती विचारते व नंतर त्याचे नाव त्यावर वाचल्यावर तो शेला फेकणारा गृहस्थ चारुदत्तच होय असे तिला कळते आणि ती त्याच्याकडे अधिकच आकृष्ट होते. हे सर्व प्रसंग परस्परसंबद्ध असून 'मृच्छकटिका'च्या कर्त्याने ते सहेतुक घातले आहेत. 'चारुदत्ता'च्या कर्त्याने मात्र ते सर्व गाळले आहेत. यावरूनही ते नाटक 'मृच्छकटिका'ची रंगभूमीवर प्रयोगार्थ केलेली संक्षिप्त आवृत्ति आहे, हे स्पष्ट दिसते. ज्या केरळ देशात 'चारुदत्त' नाटकाचे हस्तलिखित सापडले तेथे अशा

संक्षिप्त केलेल्या नाटकांचे प्रयोग करण्याची प्रथा अद्यापि प्रचलित आहे.[१]

### डॉ. झाला यांचे प्रमाण

डॉ. जी. सी. झाला यांनी 'चारुदत्त' नाटकाच्या चौथ्या अंकातील एका शब्दप्रयोगावरून या प्रश्नावर महत्त्वाचा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे.[२] ते नाटक फक्त चार अंकी आहे. 'मृच्छकटिका'तील पुढील ५ ते १० हे सहा अंक त्यात गाळले आहेत. 'चारुदत्त' नाटकात चारुदत्ताच्या घरी चोरी करून दागिने आणणाऱ्या सज्जलकाला वसन्तसेना ते अलंकार चारुदत्ताला परत करण्यास सांगते, इतकेच नाही तर त्याची प्रेयसी मदनिकाही त्याला अर्पण करते. ती दोघे प्रवहणात बसून निघून जातात. ते पाहून वसन्तसेनेची दासी म्हणते, 'पिअं मे, अमुदंकणाडअं संवुत्तं'. डॉ. झाला म्हणतात, "यातील 'अमुदंकणाडअं' या पदावर श्लेष आहे. त्याचा एक अर्थ 'हे अमृतासारखे गोड नाटक झाले'[३] असा होतो व तो त्या प्रसंगाला अनुलक्षून आहे. पण त्या पदाचा श्लेषामुळे दुसराही अर्थ नाटककाराला येथे सूचित करावयाचा आहे. तो असा—'मृद् (मृत्तिकेचा शकट) ज्याच्या अंकांमध्ये (निर्दिष्ट) नाही ते (हे) नाटक येथे समाप्त होत आहे.' 'मृच्छकटिका'त वसन्तसेनेने आपले अलंकार मृच्छकटात (मातीच्या गाडीच्या खेळण्यात) घालून ते चारुदत्ताचा पुत्र रोहसेन याला दिल्याचा उल्लेख आहे; पण तो प्रसंग 'चारुदत्त' नाटकात नाही. म्हणून 'चारुदत्त' नाटकाला 'अमृदंक नाटक' म्हटले आहे. त्या मृच्छकटावरूनच शूद्रकाच्या नाटकाला 'मृच्छकटिक' हे नाव दिले आहे. तेव्हा त्यावरून 'चारुदत्त' नाटक रचणाऱ्या नाटककाराने ते 'मृच्छकटिका'ची संक्षिप्त आवृत्ति आहे असे श्लेषप्रयोगाने येथे सूचित केले आहे." डॉ. झाला यांचे हे स्पष्टीकरण स्वीकारल्यास या प्रश्नाविषयी संदेह राहू नये.

### त्या प्रमाणाचे परीक्षण

पण डॉ. झालांचे हे स्पष्टीकरण अविवाद्य नाही. 'चारुदत्त' नाटकातील 'अमुदंकणाडअं संवुत्तं' ही प्राचीन काली प्रचलित असलेली एक म्हण होती. तिचे संस्कृत रूप 'अमृदङ्गो नाटकाङ्कः संवृत्तः।' हे अलीकडे प्राप्त झालेल्या 'चतुर्भाणी' ग्रंथात एका ठिकाणी आले आहे.[४] त्याचा अर्थ 'मृदङ्गवादना-

---

१ ही संक्षिप्त आवृत्ति असल्यामुळे इतर नाटकांतल्याप्रमाणे तिच्या शेवटी भरतवाक्य नाही.

२ *J. B. B. R. A. S.* (New Series), XXVII, pp. 272 f.

३ टी. गणपति शास्त्री, प्रा. देवधर वगैरेंनी यांचे संस्कृतीकरण 'अमृताङ्कनाटकं संवृत्तम्' असे केले आहे. वास्तविक ते 'अमृदङ्गनाटकं संवृत्तम्' असे पाहिजे हे पुढे दाखविले आहे.

४ चतुर्भाणी (सं. मोतीचन्द्र व वासुदेवशरण अग्रवाल), पृ. ३०.

शिवाय नाटकाच्या या अंकाला आरंभ झाला ' असा आहे. प्राचीन काळी मृदंगवादनाने नाटकाला आरंभ होत असे. ' मालविकाग्निमित्रा 'च्या पहिल्या अंकाच्या शेवटी पडद्यातून मृदङ्गध्वनि ऐकू आल्यावर नाटचस्पर्धेला आता आरंभ होणार असे पात्रांना समजल्याचे दाखविले आहे. तेव्हा ' अमृदङ्गो नाटकाङ्कः संवृत्तः । ' याचा अर्थ ' ही घटना, मृदंगवादनाशिवाय नाटकाचा अंक सुरू व्हावा तशी, एकाएकी घडून आली आहे ' असा दिसतो. या म्हणीचा उपयोग ' चारुदत्त ' नाटकात केला आहे, ' मृच्छकटिका 'त नाही. ' चारुदत्ता 'तील प्रसंग मागे सांगितला आहे. सज्जलक मदनिकेसह निघून गेल्यावर वसन्तसेना आपल्या चेटीला म्हणते ' अग, मी आज जागेपणी स्वप्न पाहिले, बघ. ' त्यावर चेटी म्हणते, ' पिअं मे । अमुदंकणाडअं संवुत्तं । ' (मला मोठा आनंद झाला आहे. मृदंगवादनाशिवाय नाटक सुरू झाले ! ) तिचा म्हणण्याचा असा आशय दिसतो की, ' ही आजची घटना अगदी अकल्पित रीतीने घडन आली. '

ही म्हण ' चतुर्भाणी 'च्या कालात प्रचलित होती असे दिसते.[१] ती अद्यापि इतरत्र आढळली नाही. ती एका भाणांत आल्याचे मागे दाखविले आहे. तो ' पद्मप्राभृतक ' नामक भाण शूद्रकाच्या नावावर प्रचलित होता. तो ' मृच्छकटिका 'नंतर काही शतके गेल्यावर रचला असावा, हे पुढे दाखविले आहे. ' चारुदत्त ' नाटकाच्या कर्त्याने ' मृच्छकटिका 'चा संक्षेप करताना त्याचा उपयोग केलेला दिसतो.

तेव्हा ' मृच्छकटिक ' हेच खरे मूळ नाटक, यात संशय नाही. पण त्याचा कर्ता कोण, आणि तो केव्हा होऊन गेला, हे प्रश्न अद्यापि अनुत्तरित आहेत. त्याची थोडी चर्चा येथे करू.

## ' मृच्छकटिका 'तील शूद्रकाविषयी माहिती

सामान्यतः संस्कृत नाटककार आपला नामनिर्देश नाटकांच्या प्रस्तावनेत करतात तसा ' मृच्छकटिका 'च्या प्रस्तावनेत शूद्रकाचा उल्लेख त्या नाटकाचा कर्ता म्हणून आला आहे, एवढेच नाही तर त्याच्याविषयी बरीच माहिती दिली आहे. तो वेदवेत्ता ब्राह्मण होता. अश्वमेध यज्ञ केल्यावर आपल्या पुत्राला गादीवर बसवून आणि शंभर वर्षे अधिक दहा दिवस आयुष्य उपभोगून तो अग्नि-प्रवेश करता झाला. प्रस्तावनेतील या आख्यायिकेवर विश्वास ठेवणे कठीण आहे. ही प्रस्तावना नाटककर्त्यानंतर काही काळ गेल्यावर कोणी तरी रचून नाटकाला जोडलेली दिसते.

---

१ यासारखीच दुसरी म्हण ' पादताडितक ' भाणात आली आहे. पूर्वोक्त, पृ. ३०, टिप्पणी २२ (२).

नाटककाराचे नाव मात्र शूद्रक असणे शक्य आहे. 'काव्यालंकारसूत्रवृत्ति-' कार वामन (सुमारे ख्रिस्तोत्तर ८००) श्लेषगुणाची व्याख्या केल्यावर असे सांगतो की 'शूद्रकादिरचितेषु प्रबन्धेषु अस्य भूयान्प्रपञ्चो दृश्यते ।' (३-२-४) (शूद्रकादिकांच्या ग्रंथांत या श्लेषगुणाची विपुल उदाहरणे आढळतात). त्याने 'मृच्छकटिका'तून दोन उतारे दिले आहेत. ते असे —(१) अंक २ मधील 'द्यूतं हि नाम पुरुषस्यासिंहासनं राज्यम् ।' (का. सू. वृ., ४-३-२८) आणि (२) अंक १ मधील 'यासां बलिर्भवति मद्गृहदेहलीनां' इत्यादि संपूर्ण श्लोक (का. सू. वृ., ५-१-३). यांपैकी पहिला उतारा 'चारुदत्त' नाटकात आढळत नाही. त्यात तो सबंध प्रवेशच गाळला आहे, हे लक्षणीय आहे. तेव्हा वामनाला शूद्रक हा 'मृच्छकटिका'चा कर्ता म्हणून माहीत असला पाहिजे.

## शूद्रकाचा काल

हा शूद्रक राजा केव्हा होऊन गेला, याविषयी निश्चित पुरावा उपलब्ध नाही. किंबहुना, शूद्रक या नावाचे अनेक राजे होऊन गेले असावे. 'मृच्छकटिका-' वरून त्याच्या कर्त्याला उज्जैनीची चांगली माहिती होती असे दिसते, तेव्हा तो राजा तेथील असावा असा काहींचा तर्क आहे. याच्या उलट बाणभट्ट आपल्या 'कादंबरी' ग्रंथात विदिशेच्या शूद्रक राजाचा उल्लेख करतो.[१] पुराणांत प्राचीन राजांच्या वंशावळी दिल्या आहेत. पण त्यांत शूद्रकाचे नाव आढळत नाही.

अलीकडे दण्डीची 'अवन्तिसुन्दरी-कथा' हे अपूर्ण व त्रुटित गद्य काव्य आणि त्याचे संक्षिप्त रूप 'अवन्तिसुन्दरीकथासार' हे दोन ग्रंथ प्राप्त झाले आहेत. 'अवन्तिसुन्दरीकथे'त शूद्रकाविषयी पुढील श्लोक आला आहे[२] —

**शुद्रकेणासकृज्जित्वा स्वच्छया खड्गधारया ।**
**जगद्भूयोभ्यवष्टब्धं वाचा स्वचरितार्थया ।।**

यात म्हटले आहे की शूद्रकाने आपल्या तरवारीने अनेकवार जग जिंकले, एवढेच नाही तर त्याने स्वतःच्या चरित्राविषयी ग्रंथ रचून पुनः जगाला आधार दिला.

ह्या श्लोकाचा अर्थ स्पष्ट नाही, तथापि त्यात असे सूचित केलेले दिसते की शूद्रकाच्या एका ग्रंथात त्याच्या जीवनातील गोष्टी वर्णिल्या आहेत. अशा गोष्टी 'अवन्तिसुन्दरीकथासार' या एकाच ग्रंथात आढळतात.

---

१ 'कादम्बरी' च्या आरंभीचे त्याचे वर्णन पाहा.

२ अवन्तिसुन्दरीकथा (दक्षिण भारती ग्रंथमाला, १९२४), पृ. १-२.

'अवन्तिसुन्दरीकथा' हा ग्रंथ अपूर्ण आणि अत्यंत त्रुटित अवस्थेत सापडला आहे. पण त्यातील कथांचा सारांश 'अवन्तिसुन्दरीकथासारा'त दिला आहे. त्यातील शूद्रकाची कथा पुढीलप्रमाणे आहे.[१]

"शूद्रक हा पूर्वजन्मी शौनक नामक ब्राह्मण होता. मृत्यूनंतर तो अश्मक देशात जन्म पावला. तेव्हा त्याचे नाव इंद्राग्निगुप्त असे होते. त्याला लोक शूद्रक असेही म्हणत. त्याला एकदा कोणा ब्राह्मणाचा शाप झाला की अनेक आपत्तींनंतर तुला राज्यलक्ष्मी प्राप्त होईल. तो स्वाति नामक राजपुत्राच्या संगतीत वाढला. पुढे त्यांचे खेळता खेळता काही कारणाने वैर उत्पन्न झाले. एकदा शूद्रकाने एक विशाल शिला उचलली. ते पाहून बौद्ध भिक्षू संघिलक याने त्याला एकट्याला घेऊन एका विवरात प्रवेश केला. तेथे 'रसोद्धरण' करताना (पाऱ्याची निर्मिति करताना) तो भिक्षु त्याला ठार मारण्याचा प्रयत्न करीत होता. पण शूद्रकाने त्यालाच कंठस्नान घातले, आणि तो त्या विवरातून बाहेर आला. पुढे विन्ध्य पर्वताच्या गुहेत त्याने एका स्त्रीला आपल्या विश्वलक नामक स्नेह्याला खात असताना पाहिले. त्याने पकडल्याबरोबर ती स्त्री शापमुक्त होऊन स्वर्गाला गेली . . . त्याने विनयवती नामक राजकन्येचे अपहरण केले. त्याने आपल्या मित्रांच्या व प्रिय स्त्रियांच्या सहवासात चार समुद्रांनी वेष्टिलेल्या पृथ्वीचे एकछत्री राज्य शंभर वर्षे उपभोगिले."

'अवन्तिसुन्दरीकथासारा'चे संपादक एम्. रामकृष्ण कवि यांनी वरील वृत्तांत ऐतिहासिकदृष्टया खरा मानून शूद्रक हा अन्ध्र (सातवाहन) नृपति स्वाति याचा समकालीन असावा असे अनुमान केले आहे. त्यांनी स्वातीच्या निधनाचा काळ ख्रिस्तपूर्व ५६ असा ठरवून शूद्रक त्यानंतर राजा झाला असावा, अर्थात् तो विक्रमसंवत्संस्थापक विक्रमादित्य[२] होय असे प्रतिपादिले आहे.

मत अत्यंत कच्च्या पायावर आधारित आहे. 'अवन्तिसुन्दरीकथासारा-'तील कथा 'कथासरित्सागरा'तील कथांसारखी केवळ काल्पनिक आहे, हे तिचा जो अत्यल्प सारांश मागे दिला आहे त्यावरून कोणालाही पटेल. दुसरे असे की, त्याचा समकालीन स्वाति हा अंध्र (सातवाहन) वंशी होता याला काही प्रमाण नाही. वादाकरिता ते समीकरण गृहीत धरले तरी स्वाति या नावाचे एक दोन नव्हेत, तर पाच अंध्र (सातवाहन) नृपति होऊन गेले असे पुराणांतील त्यांच्या वंशावलीवरून दिसते.[३] त्यातील कोणता राजा शूद्रकाचा

१ अवन्तिसुन्दरीकथासार, पृ. ४१ इ.

२ 'वेतालपंचविंशती'तही त्याला विक्रमादित्य म्हटले आहे. कथासरित्सागर (निर्णयसागर आवृत्ति, १८१५), पृ. ४६६.

३ *D. K. A.*, p. 36.

समकालीन होता, हे ठरविण्यास साधन नाही. शूद्रकाचे विक्रमादित्य हे नाव अगदी नंतरच्या 'वेतालपंचविंशती'त आले आहे. तेव्हा या तथाकथित शूद्रक-वृत्तांतावर मुळीच विश्वास ठेवता येत नाही.

'अवन्तिसुन्दरीकथासारा'तील कथा काल्पनिक असल्या तरी मूळ 'अवन्तिसुन्दरी – कथा' या त्रुटित गद्य ग्रंथाच्या प्रास्ताविक श्लोकांतील प्राचीन कवींची वर्णने व कालानुक्रम यथार्थ आहेत हे आम्ही त्यातील प्राकृत 'हरि-विजय'कर्त्या सर्वसेनाच्या व 'सेतु'कर्त्या छप्पन्न कवींच्या निर्देशांवरून सिद्ध केले आहे.[१] त्यातील शूद्रकाचा निर्देश खरा मानण्याकडे आमच्या मनाचा कल होतो. त्यात शूद्रकाला 'मृच्छकटिका'चा कर्ता म्हटले नाही खरे, पण दुसरा कोणी तन्नामक प्राचीन ग्रंथकार माहीत नाही.

'अवन्तिसुन्दरीकथे'च्या प्रास्ताविक श्लोकांतील प्राचीन ग्रंथकारांचा क्रम पुढीलप्रमाणे आहे—(१) शूद्रक; (२) भास; (३) सर्वसेन; (४) छप्पन्न कवि; (५) कालिदास. या ग्रंथकारांचे ज्ञात ग्रंथ पाहिले असता हा अनुक्रम खरा दिसतो. कालिदास गुप्तनृपति द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्य याच्या काळी (सुमारे ख्रिस्तोत्तर ४००), सर्वसेन ख्रिस्तोत्तर ३३० – ३५५ या काळात, आणि भास कालिदासापूर्वी (सुमारे ख्रिस्तोत्तर ३०० मध्ये) होऊन गेले हे आता प्रबळ प्रमाणांवरून सिद्ध झाले आहे. तेव्हा 'अवन्तिसुन्दरीकथे'च्या प्रास्ताविक श्लोकात भासाच्या पूर्वी वर्णिलेला शूद्रक सुमारे ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकात होऊन गेला असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही. हेच मत दुसऱ्या एका प्रमाणाने समर्थित करता येते. कालिदासाने 'मालविकाग्नि-मित्रा'च्या प्रस्तावनेत भासाप्रमाणे सौमिल्ल कवीचाही आपणापूर्वी होऊन गेलेला नाटककार म्हणून निर्देश केला आहे. या सौमिल्ल कवीचे नाटक आता उपलब्ध नाही, पण एका सुभाषितात त्याने रामिलकवीच्या साहाय्याने शूद्रक-चरित वर्णिले होते असे म्हटले आहे. ते सुभाषित असे—

**तौ शूद्रककथाकारौ वन्द्यौ रामिलसोमिलौ ।**
**काव्यं ययोर्द्वयोरासीदर्धनारीनरोपमम् ।।**

यात रामिल आणि सोमिल यांनी मिळून रचलेले 'शूद्रकचरित' भगवान् शंकराच्या अर्धनारीनटेश्वर रूपाप्रमाणे अजोड दिसते असे म्हटले आहे. सोमिल (किंवा सौमिल्ल) हा कालिदासकाली पुरातन नाटककार गणला जात होता. तेव्हा त्याने वर्णिलेला शूद्रक ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकानंतर झाला असणे शक्य नाही.

---

१ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल, पृ. १२५ इ.

शूद्रकाच्या कालाविषयी विद्वानांत तीव्र मतभेद आहेत. कीथ तर त्याचा काल ठरविणे शक्य नाही असे म्हणतो.[१] स्टेन कोनो तो आभीर नृपति शिवदत्त (ख्रिस्तोत्तर २५०) असावा असे मानतो. आभीर हे शूद्र गणण्यात येत असत. शूद्रक हा आपल्या नावाप्रमाणे शूद्रजातीय असावा. म्हणून तो सातवाहनानंतर महाराष्ट्रात उदयास आलेला आभीर शिवदत्त असावा असे त्याचे अनुमान आहे.[२] पण ते कोणीही मान्य केले नाही. सुशीलकुमार दे हे शूद्रकाचा निश्चित काल देत नाहीत. फक्त 'मृच्छकटिक' फार नंतरचे नाटक नाही एवढेच म्हणतात.[३] विंटरनिट्झ,[४] ऑलिव्हर,[५] र. दा. करमरकर[६] वगैरेंनी 'मृच्छकटिक' ही 'चारुदत्ता'ची वाढविलेली आवृत्ति आहे हा पक्ष स्वीकारून त्या नाटकाच्या कर्त्याला ख्रिस्तोत्तर पाचव्या किंवा सहाव्या शतकात घातले आहे. पण ते चूक आहे. 'मृच्छकटिक' इतके उत्तर-कालीन खास नाही. त्याचा काल ठरविण्यास त्यात वर्णिलेली धार्मिक परिस्थिति आणि काही महत्त्वाचे स्थलोल्लेख उपयोगी पडतात हे पुढे दाखविले आहे.

## शूद्रकाच्या कालाविषयीं प्रमाणे – तत्कालीन धार्मिक परिस्थिति

आम्ही 'संशोधनमुक्तावलि : सर २' पृ. १४–१९ वर सिद्ध केले आहे की 'मृच्छकटिका'त वर्णिलेली राज्यक्रान्ति उज्जैनीच्या प्रद्योत ऊर्फ चण्डमहासेन या राजाच्या पालक नामक पुत्राच्या कारकीर्दीच्या अखेरीस घडली होती. पालक हा अत्यंत क्रूर व जुलमी राजा असल्यामुळे सामान्य लोकांनी उठाव करून त्याला ठार मारले, आणि आर्यक नावाच्या गोपालदारकाला (गवळ्याच्या मुलाला) गादीवर बसविले, असे त्या क्रान्तीचे खरे रूप होते. प्रद्योत हा गौतम-बुद्धाचा समकालीन होता. त्याचा पुत्र पालक याचा मगधनृपति अजातशत्रु याने पराभव केला होता. अजातशत्रूचा काल ख्रिस्तपूर्व ४९३ – ४६२ असा आहे. तेव्हा 'मृच्छकटिका'तील धार्मिक परिस्थिति ख्रिस्तपूर्व पाचव्या शतकाच्या मध्याची आहे असे मानले पाहिजे. ती त्या नाटकात कशी वर्णिली आहे ते आता आपण पाहू.

---

१ A. B. Keith, *Sanskrit Drama*, p. 131.

२ Sten Konow, *Das Indische Drama*, pp. 56 f.

३ S. K. De, *History of Sanskrit Literature*, p. 242.

४ *History of Indian Literature* (English Translation), Fasciculus 1 p. 25.

५ *The Little Clay Cart*, p. 26.

६ त्यांची 'मृच्छकटिका'ची आवृत्ति पाहा. मॅक्डोनेलनेही हेच मत प्रतिपादिले आहे *A History of Sanskrit Literature*, p. 361.

उज्जैनीत त्या काली बौद्ध धर्माचा बराच प्रसार झाला होता. संसार-तापाने किंवा अन्य कारणांनी त्रस्त झालेले लोक मन:शांतीकरिता बौद्ध धर्माचा स्वीकार करीत असत. 'मृच्छकटिका'च्या दुसऱ्या अंकात संवाहक दहा सुवर्ण नाणी द्यूतात हरतो. द्यूतकर त्याला त्याकरिता छळतात. तेव्हा तो वसंतसेनेकडे जातो. तो पूर्वी चारुदत्ताची सेवा करीत होता हे कळताच ती त्याच्या मोचनार्थ आपले सुवर्णकंकण देते. संवाहक मुक्त होतो खरा, पण द्यूतकरांच्या छळाने त्रासून तो शाक्य श्रमणक (बौद्ध भिक्षु) होण्याचा निश्चय करतो, असे कथानक दुसऱ्या अंकात आले आहे. पुढे आठव्या अंकात शकार वसन्तसेनेचा गळा दाबून तिला मूर्छित करतो, आणि ती मेली असे समजून तिच्यावर शुष्क पर्णे पसरून निघून जातो. त्यानंतर भिक्षु झालेला संवाहक तेथे येऊन स्नान करतो व आपले चीवर त्या पर्णांच्या ढिगाऱ्यावर वाळत घालतो तोंच त्यातून वसंतसेनेची हालचाल व्यक्त होते. ती सावध झाल्यावर तो तिला म्हणतो, 'या जवळच्या विहारात माझी धर्मभगिनी आहे. तेथे आपण विश्रांति घेऊन मग घरी जावे.'

आठव्या अंकातील या प्रवेशावरून उज्जैनीत त्या काली निदान एक तरी बौद्ध विहार होता हे स्पष्ट आहे. शेवटच्या – दहाव्या – अंकात सर्व संकटे टळल्यावर शर्विलक चारुदत्ताला विचारतो, "या भिक्षूचे काय करावयाचे ?" तेव्हा चारुदत्त म्हणतो, "पृथिव्यां सर्वविहारेषु कुलपतिरयं क्रियताम् ।" [याला पृथ्वीवरील (अर्थात् या राज्यातील) सर्व विहारांचा कुलपति (अध्यक्ष) करावे.] या प्रसंगावरून त्या काळी त्या प्रदेशात अनेक बौद्ध विहार अस्तित्वात होते, असे दिसते.

पुष्कळदा थोर कवि सुद्धा अनवधानाने कालविपर्यासाचा (anachronism चा) दोष करीत असतात आणि स्वकालीन परिस्थितीलाच योग्य असे वर्णन करताना दिसतात. शूद्रक याला अपवाद नाही. त्याच्या 'मृच्छ-कटिका'तील एक उदाहरण देतो. पहिल्या अंकात वसन्तसेनेचा पाठलाग करताना शकार तिला उद्देशून म्हणतो —[१]

**अन्धकारे पलायमाना माल्यगन्धेन सूचिता ।**
**केशवृन्दे परामृष्टा चाणक्येनेव द्रौपदी ।।**

या श्लोकातील चाणक्याच्या उल्लेखात कालविपर्यासाचा दोष झाला आहे. त्या नाटकात पालक राजाच्या कारकीर्दीतील सुमारे ख्रिस्तपूर्व ४५० ची राजकीय परिस्थिति वर्णिली असली पाहिजे हे आम्ही मागे दाखविले आहे. पण त्या काळी चाणक्य झाला नव्हता. कारण त्यानंतर सुमारे सव्वाशे वर्षांनी

---

१ मृच्छकटिक, अंक १, श्लोक ३९.

(ख्रिस्तपूर्व ३२४ च्या सुमारास) त्याने नन्द राजाचा उच्छेद करून चन्द्रगुप्त मौर्याला पाटलिपुत्र येथे गादीवर बसविले. तेव्हा पूर्वोक्त श्लोकातील चाणक्याचा उल्लेख कालविपर्यासदोषयुक्त आहे यात संशय नाही.

शूद्रकाने जसा अनवधानाने हा कालविपर्यास केला आहे तसाच त्या नाटकातील धार्मिक परिस्थितीच्या वर्णनातही तो झाला आहे. ती परिस्थिति पालक राजाच्या काळची म्हणून वर्णिली असली तरी ती तशी असणे शक्य नाही. गौतम बुद्धाच्या निधनानंतर दोन – अडीचशे वर्षांनीही मध्यभारतात बौद्ध धर्माचा फारसा प्रसार झाला नव्हता. पुढे अशोकाने बौद्ध धर्म स्वीकारल्यावर धर्ममहामात्र आणि धर्मप्रसारक नेमून उत्तर भारतात तसेच दक्षिण भारतातही बौद्ध धर्माचा दूरवर प्रसार करविला, हे आता माहीत झाले आहे. तेव्हा 'मृच्छकटिका'त वर्णिलेली उज्जैनीतील धार्मिक परिस्थिति पालककालीन नसून त्यानंतर तीन – चार शतकांनंतरची आहे. ती ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकाशकी नंतरची असणे शक्य नाही. कारण त्या काली बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊ लागला होता. त्यापूर्वीच्या गुप्तकालातही हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन होऊन बौद्ध धर्माला उतरती कळा येऊ लागली होती. तेव्हा 'मृच्छकटिका'तील धार्मिक परिस्थिति गुप्तपूर्वकालीन दिसते. शूद्रकाने ती पालककालीन म्हणून वर्णिली असली तरी वस्तुतः ती त्याच्या स्वतःच्या काळची – अर्थात् ख्रिस्तोत्तर दुसऱ्या – तिसऱ्या शतकातील – असावी.

## शूद्रककालीन राजकीय परिस्थिति

शूद्रकाने 'मृच्छकटिका'त स्वकालीन धार्मिक परिस्थिति वर्णिली आहे तसेच त्यात स्वकालीन राजकीय परिस्थितीचे निदर्शक असे काही उल्लेख घातले आहेत. त्यांच्याकडे आता वळू.

दहाव्या अंकात उज्जैनीत राज्यक्रांति झाल्यावर आर्यक चारुदत्ताला शर्विलकामार्फत निरोप पाठवतो की "राज्यप्राप्तीनंतर लागलीच तुमचा मित्र आर्यक तुम्हाला वेणातीरावरील कुशावतीचे राज्य अर्पण करीत आहे. ते स्वीकारून मित्राची ही पहिली विनंती मान्य करावी." या घटनेचा अन्वयार्थ अद्यापि कोणी लावला नाही. तिचे थोडे विवेचन करू.

उज्जैनीचा राजा वेणातीरच्या कुशावतीचे राज्य आपल्या मित्राला देतो, याचा अर्थ त्या राजाचा अंमल त्या काळी आकरावन्ती (सध्याच्या मालव) देशावर होता तसाच वेणातटावरील प्रदेशावरही होता हे उघड आहे. पण ही परिस्थिति, 'मृच्छकटिका'त तसे म्हटले असले तरी, पालक राजाच्या काळी नव्हती. ती परिस्थिति शूद्रककालीन असावी. ती समजण्याकरिता वेणातटी असलेल्या कुशावतीचा शोध प्रथम केला पाहिजे.

## वेणातटावरील कुशावतीचे स्थान

'वाल्मीकि – रामायणा 'त सांगितले आहे की स्वर्गारोहणापूर्वी रामाने आपल्या व आपल्या बंधूंच्या मुलांना निरनिराळ्या प्रदेशांतील राज्ये वाटून दिली. त्यांत कुश आणि लव यांच्या राज्यांविषयी पुढील विधान आले आहे — [१]

**कोशलेषु कुशं वीरमुत्तरेषु तथा लवम् ।**
**अभिषिच्य महात्मानावुभावेव कुशीलवौ ।।**

रामाने कुशाला दक्षिण कोशल आणि लवाला उत्तर कोशल हे प्रदेश दिले. त्यांतील उत्तर कोशल म्हणजे अयोध्या ज्याची राजधानी होती तो प्रदेश. तेथे रामाने श्रावस्ती नगरी वसवून ती लवाला दिली. दक्षिण कोसलाला आता छत्तीसगड म्हणतात. त्यात रायपूर, बिलासपूर, संबलपूर हे जिल्हे व त्या नजीकचा प्रदेश अंतर्भूत होत असे. रामाची माता कौसल्या ही या दक्षिण कोसल देशाची राजकन्या होती. 'रामायणा 'त दक्षिण भारतातील देशांचा उल्लेख नाही, रावणाची लंका उत्तर भारतात जबलपूर जवळ होती, वगैरे प्रतिपादन करणाऱ्यांचे मत कसे चूक आहे, हे 'रामायणा 'तील प्रस्तुत विधान स्पष्टपणे दाखविते.

रामाने कुशाला दक्षिण कोसलचे राज्य दिल्यावर त्याच्या नावे कुशावती नगरी स्थापून ती त्याच्या राज्याची राजधानी केली. ही कुशावती 'विन्ध्यरोधसि' म्हणजे विन्ध्य पर्वताच्या जवळच्या प्रदेशात असल्याचा तेथे उल्लेख आहे.[२]

कालिदासाच्या 'रघुवंशा 'तील सोळाव्या सर्गात असे वर्णिले आहे की कुश कुशावती राजधानीत असताना एका रात्री अयोध्येची नगरदेवता त्याच्या पुढे उपस्थित होऊन रामाच्या निर्याणानंतर त्या नगरीची काय शोचनीय अवस्था झाली याचे हृदयद्रावक वर्णन करती झाली. नंतर तिने अयोध्या नगरीला पूर्वीची समृद्धि प्राप्त व्हावी म्हणून कुशाला तिकडे येण्याचा आग्रह केला. तदनुसार कुशाने कुशावतीहून अयोध्येकडे प्रयाण केले. त्याचे वर्णन 'रघुवंशा 'च्या सोळाव्या सर्गात आले आहे. त्यात विन्ध्य पर्वत आणि रेवा (नर्मदा) नदी यांचा उल्लेख आहे. त्यावरून कुशावती नगरी नर्मदेच्या दक्षिणेस होती यात संशय नाही.

---

१ वाल्मीकि-रामायण (चिकित्सक आवृत्ति), उत्तरकाण्ड, ९७, १.

२ कुशस्य नगरी रम्या विन्ध्यपर्वतरोधसि ।
कुशावतीति नाम्ना सा कृता रामेण धीमता ।। पूर्वोक्त, उत्तरकाण्ड, ९९, ४.

'मृच्छकटिका'तील वेणातटावरील 'कुशावती'चा निर्देश त्या नगरीचे स्थान निश्चित करण्यास उपयोगी आहे.[१] वेणा (किंवा बेणा) म्हणजे सध्याच्या भंडारा जिल्ह्यातून वाहणारी वैनगंगा होय. ती फार प्राचीन काळापासून अत्यंत पवित्र गणण्यात आली आहे. तिच्या काठच्या प्रदेशाला 'बेणाकट' किंवा 'बेणाकार्परभोग' अशी नावे होती. त्यांचा उल्लेख सातवाहनांच्या[२] व वाकाटकांच्या[३] कोरीव लेखांत येतो. प्राचीन कुशावती नगरी याच नदीच्या काठी असली पाहिजे.

पण अशी एखादी त्या प्रदेशातील नगरी माहीत आहे काय ? भंडारा जिल्ह्यातील पौनी गावाला हे वर्णन जुळते. ती वेणेच्या (वैनगंगेच्या) तीरी आहे. मौर्य-शुंग कालापासूनचे स्तूप व कोरीव लेख तिच्या परिसरात सापडले आहेत,[४] ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकातील खारवेलाने सातकर्णि राजाच्या प्रदेशावर स्वारी करून ज्या कण्हबेण्णा नदीपर्यंत धडक मारली ती वैनगंगाच होय. तेथे ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकातील भारवंशी भगदत्त राजाने पादुकापट्ट स्थापिल्याचा उल्लेख आहे.[५] त्यावरून ती त्याची राजधानी होती असे दिसते. या प्रदेशाच्या 'बेणाकट' या नावाचा उल्लेख पश्चिम महाराष्ट्रातील दूरच्या नाशिक जिल्ह्यात ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकातील कोरीव लेखांत अनेकवार आला आहे.[६] त्यावरून हे स्थान ख्रिस्तोत्तर दुसऱ्या-तिसऱ्या शतकात प्रख्यात होते यात संशय नाही. हीच 'मृच्छकटिक' नाटकात उल्लेखिलेली वेणातटावरील कुशावती नगरी असावी. वेणेच्या तटावरील दुसरी इतकी प्राचीन नगरी माहीत नाही.

'मृच्छकटिका'तील उल्लेखावरून त्या नाटकाच्या काळी उज्जैनीच्या साम्राज्यात या वेणातटावरील प्रदेशाचा अंतर्भाव होत होता असे दिसते. ही परिस्थिति फक्त कुषाणकाळी – ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकात–विद्यमान होती. कुषाण सम्राट् कनिष्क व त्याचे उत्तराधिकारी यांनी उत्तर भारतातील पंजाब,

---

१ या कुशावतीचा पत्ता 'मृच्छकटिका'च्या संपादकांना अद्यापि लागला नाही. ऑलिव्हरनी म्हटले आहे की, ज्या वेणानदीतीरी ती होती ती गंगेला मिळणारी नदी असून उज्जैनी व कुशावती जवळून वाहते. *Little Clay Cart*, p. 205, n. 65. करमरकरांनी तर त्याच्यावर ताण केली आहे. ते म्हणतात, 'वेणा ही नर्मदेला मिळणारी नदी दिसते. कुशावती बुंदेलखंडामधील रामनगर होय असे मानले जाते'. त्यांची आवृत्ति, टीपा, पृ. ४९८ पाहा.

२ नाशिकच्या लेण्यातील गौतमीपुत्र सातकर्णीचा लेख पाहा. क्र. ११.

३ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल, पृ. २६३.

४ नागपूर विद्यापीठाने पौनी येथे केलेल्या उत्खननाचा अहवाल पाहा.

५ ए. इ., व्हॉ. २४, पृ. ११ इ.

६ आमचा 'बेणाकट : विदर्भातील विख्यात बौद्ध केन्द्र' हा लेख पाहा. सं. मु. सर ८, पृ. २०१ इ.

उत्तर प्रदेश, बिहार, गुजराथ, कच्छ, काठेवाड, माळवा इत्यादि प्रदेशांप्रमाणे दक्षिणेतील कोंकण, उत्तर महाराष्ट्र व विदर्भ हे देशही जिंकून तेथे आपले क्षत्रप (प्रांताधिपति) नेमले होते. गुजराथ – काठेवाडांत चष्टन, आणि पश्चिम महाराष्ट्र व कोंकण यांत भूमक व नहपान, या त्यांच्या क्षत्रपांची नावे त्या त्या प्रदेशांतील कोरीव लेख व नाणी यांवरून माहीत झाली आहेत. विदर्भातही रुपिअम्म हा त्यांचा क्षत्रप राज्य करीत होता हे काही वर्षांपूर्वी पौनी येथेच सापडलेल्या एका स्मारकस्तंभावरील कोरीव लेखावरून आम्ही इतरत्र दाखविले आहे.[१] हे वेणातटाचे क्षत्रप उज्जैनीच्या कुषाण सम्राटांच्या वर्चस्वाखाली राज्य करीत असले तर नवल नाही.

ही परिस्थिति नंतर लौकरच पालटली. ख्रिस्तोत्तर १२३ च्या सुमारास प्रतिष्ठान (पैठण) चा सातवाहन राजा गौतमीपुत्र सातकर्णि याने विदर्भावर आक्रमण करून बेणाकटाच्या क्षत्रपांचा पराभव केला आणि तो प्रदेश आपल्या राज्यास जोडला. नंतर त्याने पश्चिमेकडे चाल करून नाशिक व पुणे हे जिल्हे जिंकले आणि तेथील क्षत्रप नहपान याचा समूळ उच्छेद केला. त्यानंतर कोरविलेल्या नाशिक येथील लेखात त्याने आपला उल्लेख 'बेणाकटकस्वामी' असा हेतुपूर्वक केला होता हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.

पुढे गौतमीपुत्राने उत्तरेत चाल करून सौराष्ट्र, आकरावन्ती (माळवा) वगैरे देश जिंकले हे त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या नाशिक येथील लेखावरून कळते ; पण हे विस्तृत साम्राज्य दीर्घ काल टिकले नाही. त्याच्या निधनानंतर लौकरच चष्टनाच्या वंशजांनी नर्मदेच्या उत्तरेचे प्रदेश परत जिंकून घेतले ; पण त्यांना दक्षिणेतील विदर्भ मात्र पुनः कधीही जिंकता आला नाही.

'मृच्छकटिक' नाटकात उज्जैनीच्या राजाचा अंमल वेणाकाठच्या कुशावती नगरीवर चालत होता असे दाखविले आहे. ही राजकीय परिस्थिति फक्त कुषाण काळाच्या आरंभी – ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादात – विद्यमान होती. ती त्यापूर्वी किंवा त्यानंतरही कधीही नव्हती.[२] 'मृच्छकटिका'-च्या कर्त्याने स्वकालीन धार्मिक परिस्थितीप्रमाणे राजकीय परिस्थितीही वर्णिली असे मानल्यास त्या नाटकाचा काल ख्रिस्तोत्तर द्वितीय शतकाचा प्रथम पाद असा निश्चित करता येतो.

१ क्र. ६२.

२ शक क्षत्रप रुद्रदामन् याच्या सन १५० च्या गिरनार लेखात त्याने आकरावन्ती (माळवा) परत जिंकून घेतल्याचा उल्लेख आहे. क्र. ५१. पण विदर्भाचा किंवा कोसलाचा नाही.

## शूद्रककृत 'पद्मप्राभृतक'

अलीकडे शूद्रकाच्या नावावर मोडणारा 'पद्मप्राभृतक' नामक भाण (एकपात्री एकांकी टीकात्मक नाटक) उपलब्ध झाला आहे, त्याचा काल 'मृच्छकटिका'च्या कालाशी कितपत जुळतो हेही आपण पाहिले पाहिजे. 'पद्मप्राभृतका'च्या फक्त पुष्पिकेत (Colophon मध्ये) शूद्रकाचे नाव त्याचा कर्ता म्हणून निर्दिष्ट केले आहे. तथापि मल्हणपुत्र वल्लभदेव कृत 'विदग्धजनवल्लभ' नामक श्लोकसंग्रहात त्यातील एक श्लोक शूद्रकाच्या नावावर दिला असल्यामुळे शूद्रकाला त्या भाणाचा कर्ता मानला पाहिजे.[१] पण हा ग्रंथ धार्मिक व सामाजिक परिस्थिति, रचनाशैली, भाषा इत्यादिकांच्या भिन्नतेमुळे 'मृच्छकटिका' नंतर निदान दोन तीन शतकांनी रचला गेला असे दिसते. त्यातील संविधानक असे —

कर्णीपुत्र मूलदेव हा आपल्या शश नामक विटाला देवसेना नावाच्या वेश्याकन्येकडे तिची मनःप्रवृत्ति जाणून घेण्याकरिता पाठवतो. तो विट तिला भेटून तिने दिलेले पद्म (कमळ) प्राभृतक (उपायन) म्हणून घेऊन परत येतो. म्हणून त्या भाणाला 'पद्मप्राभृतक' असे नाव दिले आहे. या भाणाची भाषा प्रौढ, समासप्रचुर व अलंकारांनी सजलेली आहे. बिट उज्जैनीच्या रस्त्यांनी जात असता कवि, वैयाकरण, बौद्ध भिक्षू व भिक्षुणी, इत्यादिकांना हटकतो आणि त्यांचे ढोंग, अनैतिकता वगैरेंवर कोरडे ओढतो. क्वचित् एखाद्या सुन्दर स्त्रीचे किंवा प्रियकर – विरहामुळे झुरणाऱ्या युवतीचे वर्णन करतो. या भाणात अनेक तत्कालीन म्हणी आल्या आहेत. त्यांपैकी 'अमृदंगो नाटकाङ्कः संवृत्तः ।' या म्हणीचा उल्लेख मागे आला आहे.

## 'पद्मप्राभृतका'चा काल

या भाणातील पात्रांचा उल्लेख बाणाच्या 'कादंबरी'त आला आहे[२] तेव्हा तो ख्रिस्तोत्तर ६०० च्या पूर्वीचा आहे यात संशय नाही. 'चतुर्भाणी'चे संपादक श्री. मोतीचंद्र व डॉ. वासुदेवशरण अग्रवाल यांनी तो गुप्तकालीन असावा असे म्हटले आहे. तो 'मृच्छकटिका'च्या कर्त्याचा असणे शक्य नाही; कारण, 'मृच्छकटिका'ची भाषा साधी व सहजसुन्दर, धार्मिक वातावरण विशुद्ध आणि सामाजिक परिस्थिति पुष्कळच चांगली आहे. तेव्हा त्याचा कर्ता 'पद्मप्राभृतका'-च्या कर्त्याहून भिन्न आणि बराच पूर्वकालीन असावा, याविषयी दोन्ही ग्रंथ लक्षपूर्वक वाचल्यावर कोणाच्याही मनात संदेह राहणार नाही.

---

१ चतुर्भाणी, पृ. २, टिप्पणी २.

२ पूर्वोक्त, भूमिका, पृ. १५.

## ६. नागार्जुनाचे व आर्यदेवाचे ग्रंथ

सातवाहन काल साहित्यातल्या प्रमाणे तत्त्वज्ञानातीलही ग्रंथनिर्मितीमुळे विख्यात झाला आहे. चीनी यात्रेकरू ह्यूएन्त्संग याने म्हटले आहे की अश्वघोष, नागार्जुन, आर्यदेव आणि कुमारलात या चार सूर्यांनी सर्व जग दैदीप्यमान केले आहे. नागार्जुनाच्या तत्त्वज्ञानावरून आणि त्याने निर्मिलेल्या ग्रंथसंपत्तीवरून ह्यूएन्त्संगच्या विधानात यत्किंचित्‌ही अतिशयोक्ति नाही हे आढळून येईल.

नागार्जुनाच्या कालाविषयी भिन्न भिन्न मते व्यक्त झाली आहेत. कल्हणाने 'राजतरंगिणी'त (१.१७३) म्हटले आहे की हुष्क, जुष्क आणि कनिष्क यांच्या काळी बोधिसत्त्व नागार्जुन हा काश्मीरात एकच 'भूमीश्वर' होऊन गेला. पण कल्हण हा फार नंतरचा ग्रंथकार आहे. त्याच्या विधानावर विश्वास ठेवता येत नाही. तारानाथ सांगतो की नागार्जुन कनिष्काच्या काळी होऊन गेला; पण हा काळ फार अगोदरचा वाटतो. बाणाने 'हर्षचरिता'च्या शेवटच्या उच्छ्‌वासात नागार्जुनाने त्रिसमुद्राधिपति सातवाहन राजाला विषापासून रक्षण करणारी मोत्यांची एकावली दिली असे वर्णन केले आहे, पण त्या सातवाहन राजाचे नाव दिले नाही. नागार्जुनाचा 'सुहृल्लेख' (मित्राला पत्र) या नावाचा ग्रंथ चीनी भाषांतरात सध्या उपलब्ध आहे. तो त्याने सातवाहन राजाला उद्देशून रचला होता अशी चीनी लोकांची परंपरागत समजूत आहे. पण त्या राजाचे नाव त्यातही येत नाही. काही आधुनिक संशोधक यज्ञश्रीला[१], तर काही विजय सातकर्णीला[२] नागार्जुनाचा समकालीन मानतात. हे दुसरे मत जास्त संभवनीय वाटते. कारण विजय सातकर्णीने स्थापिलेल्या विजयपुरीत त्याचे वास्तव्य असल्यामुळे त्या स्थलाला नागार्जुनकोंड असे नाव पडले असावे. ते अद्याप प्रचलित आहे.[३] त्याने नागार्जुनाकरिता एक पाच मजली विशाल संघाराम बांधला होता असे ह्यूएन्त्संग सांगतो. तसे असल्यास नागार्जुनाचा काळ सु. ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाचा आरंभ असा मानता येईल.

नागार्जुनाच्या चरित्राविषयी अनेक दन्तकथा प्रचलित आहेत. कुमारजीवाने सु. सन ४०५ मध्ये चीनी भाषेत नागार्जुनाचे चरित्र लिहिले होते

१ *H. I. L.*, I. (Eng. Tr.), p. 348. २ *Ibid.* I, p. 348, n. 1.

३ फाहियान सांगतो की श्रीपर्वतावर नागार्जुनाकरिता राजाने पाच मजली संघाराम बांधला होता. तो राजा विजय सातकर्णीच असावा. कारण त्यानेच विजयपुरी (सध्याचे नागार्जुनकोंड) स्थापन करून तेथे आपली राजधानी केली होती. *On Yuan Chwang's Travels in India*, Vol. II, p. 201.

त्यात तो विदर्भात ब्राह्मण जातीत जन्मला होता असे म्हटले आहे.[१] या मताला विदर्भात प्रचलित असलेल्या दंतकथेचा पाठिंबा आहे. असे म्हणतात की एका ज्योतिष्याने नागार्जुनाला बालपणी सातव्या वर्षी मृत्यु येईल असे भविष्य वर्तविले होते. ती दुःखद घटना आपल्या डोळ्यांसमोर होऊ नये म्हणून त्याच्या मातापित्यांनी त्याला एका सेवकाच्या स्वाधीन करून नागपूरजवळच्या रामटेकास पाठविले. ते दोघे रामटेक येथे रामगिरीच्या समोरच्या टेकडीवरील एका लहान गुहेत राहू लागले. तिला अद्यापि 'नागार्जुन गुहा' असे नाव आहे. तेथे त्याला बोधिसत्त्व अवलोकितेश्वराचे दर्शन होऊन त्याचा अपमृत्यु टळला. अवलोकितेश्वराने त्याला नालन्दा विहारास जाण्यास सांगितले. कालान्तराने तो तेथील आचार्य झाला.

कुमारजीवाच्या पूर्वोक्त 'नागार्जुन–चरित्रा'त दुसरीच दन्तकथा सांगितली आहे. नागार्जुन हा जादुगिरीत निष्णात होता. तिच्या योगे तो अदृश्य होऊ शकत असे. एकदा मगधामध्ये आपल्या तीन मित्रांसह त्याने तेथील राजाच्या अंतःपुरात प्रवेश केला आणि तेथे धुमाकूळ घालण्यास सुरवात केली. पण ते सर्व पकडले गेले. त्याच्या तिघा मित्रांना देहान्ताची शिक्षा देण्यात आली. पण नागार्जुनाने भिक्षु होण्याचे मान्य केल्यावर त्याची सुटका झाली. पुढे नागार्जुनाने केवळ ९० दिवसांत तीन्ही बौद्ध पिटकांचे अध्ययन केले ; पण त्याचे समाधान झाले नाही. पुढे त्याला हिमालयातील एका वृद्ध भिक्षूकडून 'महायान–सूत्र' हा ग्रंथ मिळाला. त्याने ३०० वर्षे बौद्ध धर्माचा प्रसार केला असे कुमारजीव सांगतो. निधनसमयी त्याचे वय ६०० वर्षांचे होते अशी तिबेटी लोकांत समजूत आहे. या दन्तकथांवर–त्या दीड हजार वर्षांइतक्या प्राचीन असल्या तरी–विश्वास ठेवणे कठीण आहे.

नागार्जुन माध्यमिक बौद्ध पंथाचा संस्थापक नसला तरी प्रमुख प्रचारक होता. त्याच्या पूर्वी महायान – सूत्रे अस्तित्वात होती असे कुमारजीवाने त्याच्या ग्रंथांचे चीनी भाषांत अनुवाद केले आहेत त्यांवरून दिसते. त्याचा स्वतःचा ग्रंथ 'माध्यमिककारिका' हा आहे. त्यात ४०० कारिकांत माध्यमिक तत्त्वज्ञानाचे विवरण केले आहे. या ग्रंथावर त्याची स्वतःची 'अकुतोभया' नामक संस्कृत टीका होती ती आता तिबेटी भाषेत मात्र उपलब्ध आहे. त्या कारिकांवर चन्द्रकीर्तीची 'प्रसन्नपदा' नामक टीका संस्कृतात उपलब्ध आहे.

नागार्जुनाच्या तत्त्वज्ञानाला 'माध्यमिक' असे नाव आहे. कारण त्यात कोणतीही वस्तु स्वभावतः सत् किंवा असत् आहे असे न मानता सापेक्षत्वाने तशी मानली जाते. याला 'शून्यवाद' असेही नाव आहे. याचा अर्थ सर्व शून्य

---

१ *H. I. L.* I. (Eng. Tr.), p. 344.

(असत्) आहे असा नसून[१] ते कार्यकारणभावाने अस्तित्वात आले आहे, त्याला स्वतंत्र अस्तित्व नाही, ते 'स्वभावशून्य' आहे, असा आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने, परतत्त्वाच्या दृष्टिकोनातून, ते असत् आहे. यावरूनच 'परमार्थ-सत्य' आणि 'व्यवहारसत्य' अशी दोन सत्ये मानली जातात. हीच पुढे अद्वैत वेदान्तात मानली आहेत आणि त्यावर मायावाद उभारला आहे. म्हणून शंकराचार्यांचे आजे गुरु गौडपाद यांनी आपल्या 'मांडुक्योपनिषत्कारिकां'च्या 'अलातशान्ति प्रकरणा'च्या आरंभी पुढील कारिकेत बुद्धाला नमन केले आहे —

**ज्ञानेनाकाशकल्पेन धर्मान्यो गगनोपमान् ।**
**ज्ञेयाभिन्नेन संबुद्धस्तं वन्दे द्विपदां वरम् ।।** (४.१)

ज्या ठिकाणी त्यांचा बौद्ध मताशी विरोध होता तेथे त्यांनी 'नैतद्बुद्धेन भाषितम्' असे स्पष्ट म्हटले आहे. बौद्धांच्या शून्यवादाचा असा अर्थ केल्यास त्याचे मूळ उपनिषदांत आढळेल, आणि त्याची परिणति शंकराचार्यांच्या मायावादात झालेली दिसेल. म्हणूनच शंकराचार्यांवर प्रच्छन्नबौद्धत्वाचा आळ घेतला जातो.

याशिवाय नागार्जुनाचे आणखीही काही ग्रंथ उपलब्ध आहेत. 'युक्तिषष्टिका' आणि 'शून्यतासप्तति' यांत वरील सिद्धान्ताचेच विवरण आहे. 'प्रतीत्यसमुत्पादहृदय' यात कार्यकारणभावाधारित उत्पत्तीचे (Causality-dependent organisation) खरे स्वरूप विशद केले आहे.[२] 'महायानविंशक', 'विग्रहव्यावर्तनी' असे नागार्जुनाचे इतरही कांही ग्रंथ आहेत, पण त्यांशिवाय कित्येक इतर ग्रंथ त्याच्या नावावर प्रचलित असले तरी ते त्याचे नसावे.[३]

नागार्जुनाचा शिष्य आर्यदेव हाही सातवाहन–काळात झाला होता. त्याच्याही चरित्राचा अनुवाद कुमारजीवाने सन ४०५ मध्ये चीनी भाषेत केला होता. त्याचा मुख्य ग्रंथ 'चतुःशतक' हा नागार्जुनाच्या 'माध्यमिक–कारिकां' प्रमाणे ४०० कारिकांचा होता. हाही माध्यमिक पंथाचा प्रमाणभूत ग्रंथ मानला जात होता. त्यावर चंद्रकीर्तीची टीका होती. त्यांतील कांही उतारे म. म. हरप्रसाद शास्त्रींनी प्रसिद्ध केले होते. त्यांतील सातवे प्रकरण

१ शंकराचार्यांनी शून्य याचा तसा अर्थ घेऊन ब्रह्मसूत्रांवरील (२.२.३२) भाष्यात शून्यवादाला 'सर्वथा अनादरणीय' म्हटले आहे.

२ डॉ. व्ही. व्ही. गोखले यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीने १९७८ मध्ये प्रकाशित केलेल्या प्राचार्य वामन शिवराम आपटे स्मारक ग्रंथात (पृ. ६२ इ.) नागार्जुनाच्या पाच संस्कृत प्रतीत्यसमुत्पादहृदयकारिका संपादिल्या आहेत.

३ *H. I. L.* I, p. 348.

डॉ. विधुशेखर भट्टाचार्य यांनी आणि शेवटची नऊ प्रकरणे डॉ. प. ल. वैद्य यांनी त्यांच्या तिबेटी भाषेतील अनुवादावरून मूळच्या संस्कृत रूपात परिवर्तित केली आहेत.[१]

आर्यदेवाने 'चतु:शतका'त नागार्जुनाच्या तत्त्वज्ञानावर इतर बौद्ध तत्त्वज्ञान्यांनी व वैशेषिक दार्शनिकांनी घेतलेल्या आक्षेपांचे खंडन केले आहे.

नागार्जुन नावाचे अनेक लेखक, तत्त्वज्ञ, आयुर्वेदविशारद व किमयाकार प्राचीन काळी होऊन गेले. विंटर्निट्झने अशा चार नागार्जुनांचा उल्लेख केला आहे. 'कथासरित्सागरा'त चिरायु नगरीत चिरायु नामक राजाचा मन्त्री रसायनी नागार्जुनाची कथा दिली आहे.[२] तश्या दन्तकथा ह्यूएन्त्संगच्या काळीही प्रचलित होत्या. दुसऱ्या एका नागार्जुनाने सुश्रुताच्या वैद्यकग्रंथाची नवी आवृत्ति तयार केली होती असे समजते.[३]

---

१ *H. I. L.*, I, (Eng. Tr.), p. 350, n. 4.

२ 'कथासरित्सागर (निर्णयसागर प्रत), पृ. १८८. Watters, *On Yuan Chwang's Travels*, II, p. 201.

३ *H. I. L.*, III (Eng. Tr.), p. 633.

प्रकरण सातवे

# स्थापत्य, शिल्प आणि चित्रकला

## स्थापत्य

बौद्ध धर्माच्या प्रसाराबरोबर भारतात एका विशिष्ट स्थापत्याचा आरंभ झाला. गौतम बुद्ध व त्याच्या पूर्वीचे तसेच ज्ञानी बुद्ध व त्याचे शिष्य, यांच्या शरीराचे अवशेष, त्यांनी वापरलेल्या भिक्षापात्रासारख्या वस्तु यांवर स्तूप रचण्यात येऊ लागले. त्यांना धातुगर्भ (दागोब) म्हणत. बौद्ध भिक्षूंच्या प्रार्थनेकरिता चैत्यगृहे बांधण्यात येऊ लागली. बौद्ध भिक्षु वर्षातील आठ महिने (हिवाळा व उन्हाळा या ऋतूंत) धर्म–प्रचाराकरिता हिंडत असत. पण पावसाळ्यात त्यांना निवाऱ्याची जरूरी भासे. त्यांच्याकरिता विहार निर्माण होऊ लागले. बौद्ध धर्माच्या पुढे अनेक शाखा झाल्या, ठिकठिकाणचे विहार भिन्न भिन्न शाखीय भिक्षूंच्या स्वाधीन असत, तथापि त्यांत आश्रयार्थ कोणाही भिक्षूला मज्जाव नसे. दान देताना हे विहार चारी दिशांच्या भिक्षूंकरिता दिले आहेत हे मुद्दाम नमूद केले असे.

आरंभीची चैत्यगृहे व विहार लाकडाचे बनविले जात. ते आता अस्तित्वात नाहीत. तथापि त्यांची काही वैशिष्टचे पर्वतांत कोरलेल्या चैत्यविहारांत दृष्टीस पडतात. लाकडांनी बनविलेल्या चैत्यादिकांचे खांब किंचित् आत झुकलेले असतात. कोरविलेल्या चैत्यविहारांत तसे खांब असण्याची जरूरी नसे. तरी आरंभीच्या लेण्यांत ते तसे कोरले असत. त्यांच्या आत झुकण्याच्या कमी-अधिक प्रमाणावरून त्या लेण्यांच्या निर्मितीच्या कालाचे अनुमान करता येते.

गिरि-पर्वतांत लेणी कोरण्याचा आरंभ अशोकाच्या काळातच झाला होता. अशोक व त्याचा नातू दशरथ यांनी गयेजवळ बराबर येथील टेकडीत आजीविक संन्याशांकरिता लेणी कोरविली होती. त्यांच्या नंतरची पश्चिम महाराष्ट्रातील लेणी विस्तार, सौंदर्य, इत्यादिकांत त्यांच्याहून वैशिष्टचपूर्ण आहेत. ती महाराष्ट्राच्या अनेक जिल्ह्यांत सह्याद्रिपर्वतात कोरली आहेत. त्या पर्वताचा मध्यभाग तशी लेणी कोरण्यास अनुकूल असल्यामुळे ती पुणे जिल्ह्यात भाजा, कुलाबा जिल्ह्यात कोंडाणे, खानदेश जिल्ह्यात पितळखोरे, औरंगाबाद जिल्ह्यात अजंटा, नाशिक जिल्ह्यात नाशिक, पुणे जिल्ह्यात जुन्नर व कार्ले, साष्टी जिल्ह्यात कान्हेरी वगैरे ठिकाणी कोरली आहेत. त्या सर्वांत भाजा येथील लेणी प्राचीन गणण्यात येतात. त्यांमध्ये एक चैत्य प्रकाराचे आणि दुसरी कित्येक विहार प्रकाराची आहेत. भाजा येथील चैत्य लेण्यात दोन्ही बाजूंस स्तंभांची रांग असून तिने त्या त्या बाजूस साडेतीन

फूट रुंदीचे एक एक मत्तवारणक (aisle) झाले आहे. मागील बाजूचा भाग अर्धवर्तुळाकार आहे. हे खांब साधे, अष्टकोनी, अकरा फूट उंचीचे आहेत. ते वरचे अर्धवर्तुळाकार छप्पर सावरून धरतात. त्यांवर आरंभी अर्धवर्तुळाकार लाकडांच्या कमानी असत. चैत्यगृह आरंभी लाकडाचे बनविलेले असे तेव्हा त्या कमानींवर छप्पर आधारले होते. शैल चैत्यगृहात त्यांची आवश्यकता नव्हती, तरी त्या कमानी – लाकडांच्या वा कोरलेल्या – चैत्यगृहांत दीर्घकाल दाखविल्या जात असत. चैत्यगृहाच्या मागील भिंतीजवळ प्रदक्षिणापथाला जागा सोडून वाटोळा स्तूप कोरला जाई. त्यावर हर्मिका व एकावर एक तीन छत्रे असत. स्तूपासमोर मध्यभागी दरवाजा असे. त्यावर आत प्रकाश पडावा म्हणून अर्धवर्तुळाकृति मोठे वातायन (खिडकी) असे. त्याच्या आकारावरून त्याला घोडयाच्या नालाची खिडकी (horse-shoe window) म्हणण्याचा प्रघात पडला आहे. वास्तविक त्याचा आकार अश्वत्थ वृक्षाच्या पानासारखा आहे. गौतम बुद्धाला गयेमध्ये ज्या (बोधि) वृक्षाखाली ज्ञानप्राप्ति झाली तो अश्वत्थ होता. म्हणून चैत्यगृहातील हे वातायन अश्वत्थ वृक्षाच्या पर्णासारखे करण्याची प्रथा पडली होती.

या चैत्यगृहाला लागूनच भाजा येथे एक लहानसा विहार आहे. विहाराला मंडप असेही म्हणत. हा मंडप लहान असल्याने याला मध्ये खांब नाहीत. तसेच यात भिक्षूंकरिता फक्त पाचच खोल्या आणि त्याही मागील भिंतीत कोरल्या आहेत. पुढे मोठमोठे विहार कोरले जाऊ लागले तेव्हा त्यांत अशा खोल्या तीन्ही बाजूंस कोरल्या जात. या चैत्यगृहाला व विहाराला शोभा आणण्याकरिता बाहेरच्या बाजूने अश्वत्थपर्णांच्या व कठडयांच्या आकृति कोरल्या आहेत.

भाजे येथील ही लेणी पश्चिम महाराष्ट्रातील अत्यंत प्राचीन लेण्यांत गणण्यात येतात. त्यांचा काळ ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाचा आरंभ हा असावा.

यानंतर पश्चिम महाराष्ट्रात अनेक लेणी कोरण्यात आली. त्या सर्वांचे वर्णन येथे करणे अशक्य आहे. पण त्यांपैकी तीन-चार लेण्यांविषयी संक्षेपाने तरी माहिती देणे आवश्यक आहे.

नाशिक येथे कोरीव लेख असलेले सर्वात प्राचीन लेणे क्र. ९ चे होय. ते सातवाहन नृपति कृष्ण याच्या कारकीर्दीत त्याच्या महामात्राने कोरविले होते. हा कृष्ण बलाढ्य सातवाहन नृपति सिमुक याचा भाऊ आणि उत्तराधिकारी होता.

यानंतरचे क्र. १८ चे लेणे विशेष लक्षणीय आहे. ते सर्व लेण्यांच्या मध्यभागी असून चैत्य प्रकारचे आहे.[१] नाशिक येथील लेण्यांत केवळ हेच एक चैत्य आहे. इतर सर्व लेणी विहार प्रकारची आहेत.

---

१ *C. T. I.*, pp. 272 f. Plate facing p. 273 and wood-cut Plate **XXV.** पट्टिका ८, आकृति १२ पाहा.

इतर चैत्यांतल्याप्रमाणे यातही दोन स्तंभांच्या रांगांनी मध्य भाग (nave) बाजूच्या मत्तवारणांपासून (aisles पासून) विभक्त केला आहे. मागील भिंतीच्या पुढे प्रदक्षिणापथ सोडून दागोब (धातुगर्भ) आहे. या लेण्याचा अन्तर्भाग ३८ फूट १० इंच लांब, २५ फूट ४ इंच रुंद आणि २३ फूट ३ इंच उंच आहे. दागोबाचा खालचा सिलिंडरसारखा भाग ५ फूट ६ इंच व्यासाचा असून ६ फूट ३ इंच उंच आहे. त्यावर स्तूपाचा घुमट आणि वर हर्मिका आहे. दोन्ही बाजूच्या पाच-पाच अष्टकोनी स्तंभांना खाली कलशाकार बैठक आहे, पण दागोबाच्या भोवतालच्या स्तंभांना तशी बैठक नाही. दागोबासमोर विशाल अश्वत्थपत्राकार वातायन असून त्याच्या दोन्ही बाजूंस व वरील भागास तशाच लहान लहान वातायनांनी व कठड्याच्या आकृतींनी शोभा आणली आहे.

लेण्याच्या दरवाजावरही तसेच अश्वत्थपत्राकार वातायन आहे. त्याच्या आतील कमानींना त्रिरत्न चिन्ह, वाघ, हत्ती, सिंह यांच्या आकृतींनी शोभा आणली आहे. त्याच्या दोन बाजूंचे खांब नागादिकांच्या आकृतींनी शोभिवंत केले होते. पण त्यातील उजवीकडचा खांब आता नष्ट झाला आहे. डावीकडच्या खांबापलीकडे एक यक्ष (द्वारपाल ? ) उभा असून त्याने उजव्या हातात कमळाचा दंड आणि डाव्या हातात आपल्या कमरपट्टयाचा शेवट धरला आहे. त्याने डोक्याला घट्ट पागोटे बांधले असून त्यावर मध्यभागी एक तुरा दिसतो.

या लेण्यात दोन लेख आहेत. पहिला लेख (क्र. १०) उजवीकडच्या पाचव्या व सहाव्या खांबांवर दोन दोन ओळींत कोरला असून त्यात हे लेणे महाहकुसिरीची नात भटपालिका हिने पूर्ण केल्याचा उल्लेख आहे. दुसरा लेख दरवाजावरील वातायनाच्या आतील पट्टीवर कोरला असून त्यात 'नाशिक-करांचे धंभिक गावाचे दान' असे म्हटले आहे.

या दोन लेखांचा परस्पर संबंध काय, आणि ते लेणे कोणी व केव्हा कोरविले हे प्रश्न अत्यंत विवादास्पद झाले आहेत. नाशिकच्या लेण्यांमध्ये हेच एक चैत्य लेणे असल्यामुळे ते बऱ्याच प्राचीन काळी कोरले असावे. भिक्षूंना राहण्यास जशी विहाराची तशी प्रार्थनेकरिता चैत्यगृहाची आवश्यकता असते. नाशिक येथे पहिला विहार कृष्ण राजाच्या काळी कोरला होता. त्यानंतर चैत्यगृहाची जरूरी भासली तेव्हा राजघराण्याशी संबद्ध अशा भटपालिकेने हे चैत्य लेणे कोरवून दिलेले दिसते. ती महाहकुश्रीची नात होती. हा हकुश्री नाणेघाटातल्या एका प्रतिमालेखातील कुमार हकुसिरी दिसतो. तो कालान्तराने गादीवर आला असावा. कारण 'रञो सिरि सतस' असा लेख असणारी नाणी बहुधा त्याची असावी. भटपालिकेच्या लेखात त्याच्या मागे 'रञो' सारखी पदवी नाही खरी, पण त्याचे कारण हे लेणे त्याच्या काळी कोरले नसून नंतर

काही कालावधीने पूर्ण झाले होते. तथापि त्याचा राजकुलातील जन्म 'महा' ह्या उपपदाने सुचविला आहे.

हे लेणे खोदले गेले तरी त्याचा दरवाजा, त्यावरचे अश्वत्थपत्राकृति वातायन आणि त्याच्या कमानीतील प्राण्यांच्या आकृत्या या कोरल्या गेल्या नव्हत्या. म्हणून नाशिक जिल्ह्यातील लोकांनी पुढे होऊन ती कामे पूर्ण केली आणि वातायनातील पट्टीवर आपले धंभिक गावाचे दान नोंदून ठेवले.

वरील उपपत्ति मान्य केल्यास या लेण्याचा दरवाजा, त्यातील प्राण्यांच्या आकृति, खांबांवरील खोदकाम व यक्षाची आकृति ही बरीच नंतरची दिसत असल्यामुळे भटपालिकेचा आजा हकुश्री आणि सातवाहनांचा मूळ पुरुष हे ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकापूर्वीचे असणे शक्य नाही हे मार्शलचे विधान[१] लटके पडते.

यानंतर बऱ्याच काळाने महाराष्ट्रात शक क्षत्रपांची सत्ता प्रस्थापित होऊन काही लेणी कोरली गेली. त्यांमध्ये ऋषभदत्ताचे लेणे (क्र. १०) हे मुख्य आहे. महाक्षत्रप नहपानाचा जामात आणि दीनीकाचा पुत्र ऋषभदत्त याने ते कोरविले होते. त्यात त्याचे स्वतःचे तीन लेख (क्र. ३८, ४० व ४३) आहेत. यांशिवाय व्हरांड्यातील दोन्ही बाजूची एक एक खोली त्याची पत्नी दक्षमित्रा हिने दान दिल्याचा तेथील लेखांत उल्लेख आहे.

हे लेणे विहार प्रकाराचे आहे.[२] त्याची रुंदी ४३ फूट आणि लांबी ४५ फूट असून त्याला तीन दरवाजे आहेत. मंडपाच्या दोन्ही बाजूंस पाच पाच आणि मागील बाजूस सहा खोल्या कोरल्या आहेत. त्या सर्वांत भिक्षूंना निजण्याकरिता एक एक बाक आहे. मागील बाजूस एक कमी उठावाचा स्तूप कोरला होता. तो आता नष्ट झाला असून त्याच्या जागी भैरवाची आकृति नंतरच्या काळात कोरली आहे. तथापि स्तूपाची पूर्वीची जागा त्यावरील अवशिष्ट शीर्षभागावरून जाणता येते. व्हरांड्याच्या बाहेरही दोन्ही बाजूंस एक एक भैरवाकृति नंतरच्या काळात कोरली आहे.

या लेण्यासमोरच्या व्हरांड्यातील स्तंभ बहुकोनी असून त्यांची बैठक व शीर्ष कलशाकार आहेत. शीर्षभागी विरुद्ध दिशांकडे तोंड करून बसलेल्या जनावरांच्या व मनुष्यांच्या आकृति कोरून त्यांना शोभिवंत केले आहे. नहपानाच्या काळचे हे लेणे ख्रिस्तोत्तर द्वितीय शतकाच्या प्रथम पादातील आहे.

यानंतर लौकरच गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानाचा उच्छेद करून आपली सत्ता उत्तर महाराष्ट्रात प्रस्थापित केली तेव्हा त्याने नाशिकच्या

---

१ *C. H. I.*, I, p. 637.

२ *C. T. I.* Plate XIX (2). पट्टिका ९, आकृति १३ पाहा.

भिक्षुसंघाला आपल्या मातेच्या (गौतमी बलश्रीच्या) नावे एक लेणे (क्र. ३) कोरविण्याची व्यवस्था केली. ते पुढे त्याचा पुत्र पुळुमावि याच्या कारकीर्दीच्या १९ व्या वर्षी पुरे झाले. त्याचे 'देवीलेणे' (राणीचे लेणे) हे नाव पुळुमावीच्या त्यातील लेखात उल्लेखिले आहे.

हे देवीलेणेही विहार प्रकाराचे आहे. ऋषभदत्ताच्या लेण्याप्रमाणे हेही विशाल आकाराचे आहे.[१] याची रुंदी ४१ फूट आणि लांबी ४६ फूट असून यात एकूण वीस खोल्या भिक्षूंकरिता कोरल्या आहेत. त्यांतील उजवीकडे सात, मागील भिंतीत सहा, डावीकडे पाच आणि व्हरांड्याच्या दोन्ही बाजूस एक एक अश्या त्या कोरल्या आहेत. मध्यभागाच्या दरवाज्याच्या दोन्ही बाजूंच्या खांबांवर सहा सहा शिल्पपट्ट असून त्यांत तत्कालीन ऐतिहासिक घटना सूचित केल्या आहेत.[२] (परिशिष्ट ४ पाहा.) याच्या व्हरांड्यात दोन्ही बाजूंस भिंतीला लागलेला व उत्कृष्ट कोरीव काम केलेला एक एक अर्ध स्तंभ आणि मध्ये सहा अष्टकोनी पूर्ण स्तंभ आहेत. त्यांच्या शीर्षभागी प्रत्येकी चार प्राणी – वृषभ, हत्ती, घोडे वगैरे – विरुद्ध दिशांस तोंड करून वसलेले दाखविले आहेत. त्यांवर शीर्षपट्टी (architrave) आहे. त्याला हत्ती, घोडे वगैरे प्राण्यांच्या आणि कमळाच्या आकृतींनी शोभिवंत केले आहे. हे खांब व्हरांड्यातील कोरीव वाकांवर उभे असलेले दाखविले असल्यामुळे त्याची कलशाकृति बैठक दिसत नाही. एकंदरीत या देवीलेण्यातील कोरीव काम ऋषभदत्ताच्या लेण्यातील कामापेक्षा निकृष्ट प्रतीचे आहे असे तज्ज्ञांचे मत आहे.

पश्चिम महाराष्ट्रातील सर्वोत्कृष्ट लेणे म्हणून कार्ल्याच्या चैत्यगृहाची ख्याति आहे, त्याकडे आता वळू.

पुणे जिल्ह्यातील कार्ले गावाजवळील टेकडीवरचे हे चैत्य भारतातील सर्व कोरीव चैत्यगृहांत भव्य तसेच सुंदरही आहे.[३] हे १२४ फूट ३ इंच लांब, ४५$\frac{१}{२}$ फूट रुंद आणि ४६ फूट उंच आहे. त्याचा पुढला दर्शनी भाग दोन मजली आहे. वरच्या मजल्यात प्रकाशाकरिता मोठे अश्वत्थपत्राकृति वातायन असून खालच्या भागात तीन दरवाजे आहेत. त्यांपैकी बाजूच्या दोन दरवाज्यांतून चैत्यगृहाच्या दोन मत्तवारणकांत आणि मधल्यातून मध्य भागात प्रवेश मिळतो. दरवाज्यांमधील दर्शनी भागास स्त्रीपुरुषांच्या (बहुधा दात्यांच्या) आकृतींनी अलंकृत केले आहे. मध्यभागाला मत्तवारणकांपासून विभक्त करणारे एकूण ३७ स्तंभ आहेत. त्यांपैकी दोन बाजूंस पंधरा पंधरा असून ते उत्कृष्ट कोरीव

१ *C. T. I.* plate XIX (a). पट्टिका ९, आकृति १४ पाहा.

२ *Ibid.*, plate XX. पट्टिका १०, आकृति १५ पाहा.

३ *Ibid.*, Fig. 47, facing p. 236. पट्टिका ११, आकृति १७ पाहा.

कामाने शोभिवंत झाले आहेत. बाकीचे सात मागील अर्धवर्तुळाकार भागास चैत्यगृहाच्या मध्यभागापासून विभक्त करतात. ते साधे, कोरीव कामरहित आहेत. सर्व स्तंभ सरळ उभे आहेत. पूर्वीची आत झुकणारे स्तंभ दाखविण्याची पद्धत आता लोप पावली आहे.

कोरीव काम केलेले स्तंभ चौकोनी बैठकीवर कलशाकार अधोभागातून अष्टकोनी होऊन शीर्षभागी उपड्या कलशांनी अलंकृत झाले आहेत. प्रत्येक स्तंभाला शीर्षभागी कोरलेल्या दोन दोन सालंकृत हत्ती, घोडे वगैरेंच्या वर बसलेल्या स्त्रीपुरुषांसहित आकृतींनी शोभिवंत केले आहे.[१] खांबांवर लाकडाच्या कमानी – आता त्यांची छप्पर सावरण्याकरिता आवश्यकता नसताही– उभारल्या आहेत. त्या पूर्वीच्या काष्ठनिर्मित चैत्यगृहांच्या द्योतक आहेत. आतील स्तूप उंच लंबगोलासारखा (सिलिंडरसारखा) असून त्यावर दोन कठड्यांच्या पंक्ति कोरल्या आहेत. पूर्वी अशा स्तूपावर एकावर एक अशी तीन छत्रे असत तसे एक लाकडी छत्र अद्यापि या स्तूपावर विद्यमान आहे.

चैत्यगृहासमोर अर्धमंडप आहे. त्याची लांबी ५२ फूट आणि रुंदी १५ फूट आहे. त्याच्या समोर आडोशाकरिता भिंत कोरली आहे. पुढे अशोकस्तंभासारखे दोन सिंहशीर्षकाचे स्तंभ होते. त्यांतील एकच आता अवशिष्ट आहे. त्यांवर बौद्ध धर्मचक्र आहे.

या चैत्यगृहाचा भव्य आकार व त्याच्या स्तंभांवरील उत्कृष्ट कोरीव काम यांनी प्रेक्षकांचे मन विशेष आकृष्ट होते. त्याच्या निर्मितीविषयी त्यात खालील लेख कोरला आहे[२] —

**वेजयंतितो सेठिना भुतपालेना सेलघरं परिनिठपितं जबुदिपम्हि उतम** [।*]
[वैजयंतीच्या भूतपाल नामक श्रेष्ठीने[३] हे अखिल जंबुद्वीपात (भारतात) उत्कृष्ट असे शैलगृह पूर्ण केले.]

हे चैत्यगृह पाहिल्यावर 'ते भारतात सर्वोत्कृष्ट आहे' या प्रस्तुत लेखातील विधानात यत्किंचित्‌ही अतिशयोक्ति नाही याविषयी प्रेक्षकांची खात्री पटते.

या चैत्यगृहाच्या काळाविषयी भिन्न भिन्न मते व्यक्त झाली आहेत. कोणी ते ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातील,[४] तर कोणी ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादातील[५] असे म्हणतात. या संबंधात पूर्वोक्त लेखातील विधान 'ते वैजयन्तीच्या एका श्रेष्ठीने (व्यापाऱ्याने) कोरविले' हे अत्यं

---

१ *C. T. I.*, Fig. 46, facing p. 232. पट्टिका ११, आकृति १८ पाहा.

२ Lüders' List, No. 1087.

३ या दात्याची व त्याच्या कुटुंबातील व्यक्तींच्या प्रतिमा पट्टिका २०, आकृति १६ मध्ये पाहा.

४ *Com. Hist. Ind.*, II, p. 144. ५ *H. C. I. P.*, I, p. 502.

महत्त्वाचे आहे. उत्तर कानडा प्रांतातील वैजयन्ती (वनवासी) येथील एक धनिक व्यापारी उत्तर महाराष्ट्रातील कार्लेसारख्या ठिकाणी असे सर्वोत्कृष्ट चैत्य लेणे निर्माण करतो यावरून या दोन प्रदेशांतील दळणवळणावर महत्त्वाचा प्रकाश पडतो. असे दळणवळण वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळी प्रथम उत्पन्न झालेले दिसते. गौतमीपुत्र सातकर्णीच्या कालापर्यंत कुन्तल देश सातवाहनांच्या अमलाखाली आला नव्हता हे वाटेगाव येथील नाणक संचयावरून स्पष्ट आहे. त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि याने तो प्रदेश प्रथम जिंकला आणि वैजयन्ती (वनवासी) च्या राजकन्येशी विवाह केला हे क्र. २२ च्या लेखावरून सिद्ध होते. तेव्हापासून महाराष्ट्र आणि कुन्तल या दोन देशांचे परस्पर संबंध निर्माण झाले आणि कालान्तराने वृद्धिंगत होत गेले, असे अनुमान करता येते. या काळी वनवासीच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याने उत्तर महाराष्ट्रातील हे सर्वोत्कृष्ट लेणे निर्माण केले असावे. म्हणून त्याचा काळ ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाचा मध्य हाच समर्थित होतो.

आतापर्यंत वर्णिलेले स्तूप, चैत्यगृहे व विहार हे पर्वतांत कोरलेले होते. याशिवाय ते दगडा-विटांनी बांधलेलेही (structural) असत. पण तसे आता बहुधा आढळत नाहीत. तथापि, अलीकडे भंडारा जिल्ह्यातील पौनी या गावी नागपूर विद्यापीठाने व केंद्रीय पुरातत्त्व खात्याने केलेल्या उत्खननात दोन स्तूपांचे अवशेष आढळले आहेत. पौनी हे गाव वैनगंगेच्या तीरी असून फार प्राचीन आहे. प्राचीन काळची कुशावती नगरी हीच असावी असे 'रामायण' व 'रघुवंश' यांतील वर्णनावरून अनुमान करता येते.[१] या ठिकाणी आणि त्याच्या आसमंतात मौर्य कालापासूनचे कोरीव लेख सापडले आहेत. सातवाहन काली हा प्रदेश क्षत्रपांच्या अमलाखाली काही काळ होता असे येथे सापडलेल्या रुपिअम्म नामक महाक्षत्रपकुमाराच्या छायास्तम्भावरून स्पष्ट दिसते.[२] येथील क्षत्रपांना प्रथम जिंकून मगच गौतमीपुत्र सातकर्णीने पश्चिम महाराष्ट्रावर स्वारी केली आणि नहपानावर नाशिकजवळ नेत्रदीपक विजय मिळविला होता. त्या प्रसंगी नाशिकच्या भिक्षुसंघाला दिलेल्या दानपत्रात त्याने स्वतःचा उल्लेख 'बेनाकटकस्वामी' (बेणाकटाचा – वैनगंगातीरावरील प्रदेशाचा – अधिपति) असा हेतुपूर्वक केलेला दिसतो.[३] या बेणाकटाचे मुख्य स्थान पौनी हे होते. तेथील बौद्ध केन्द्रातील भिक्षु नाशिक, कान्हेरी सारख्या पश्चिम महाराष्ट्र व कोकण यांतील दूरदूरच्या प्रदेशांत जाऊन धर्मोपदेश करीत असत. ते भदायनीय

---

१ प्रकरण ६ (साहित्य), पृ. १९५ इ. पाहा.

२ लेख क्र. ६२.

३ सं. मु. सर ८, पृ. २०३ इ. व प्रकरण ६ पाहा.

नामक स्थविरवादी बौद्ध शाखेचे होते असे नाशिक व कान्हेरी येथील कोरीव लेखांवरुन कळते.

पौनी येथील सध्याची जगन्नाथ टेकडी आहे त्या ठिकाणी मौर्य-शुंग काळात एक भव्य स्तूप उभारला होता. त्याचा मौर्यकाळातील आरंभीचा आकार १२५ फूट व्यासाचा होता. त्याला कालान्तराने विटांची दोन कवचे जोडली गेली. पहिल्या कवचाच्या वेळी त्याला सभोवती प्रदक्षिणापथ जोडण्यात आला आणि सभोवार लाकडी खांबांचा कठडा उभारण्यात आला असे दिसते. कालान्तराने हे दोन्ही खराब झाल्यावर या स्तूपाला दुसरे विटांचे जाड कवच घालून त्याचा आकार १३५ फूट व्यासापर्यंत वाढविण्यात आला. नवीन प्रदक्षिणापथही जोडण्यात आला. त्या वेळी घातलेला लाकडी कठडा सडून गेल्यावर दगडी स्तंभांच्या कठड्यात त्याचे रूपान्तर करण्यात आले. हे स्तंभ सुमारे शंभर असावे. त्यांच्या बाहेर प्रदक्षिणापथ आणि त्याच्या पलीकडे दुसरा दगडी कठडा होता. त्याचे स्तंभ अष्टकोनी असून, त्यांच्या तीन बाजूंवर बौद्ध धर्माची चैत्य, बोधिवृक्ष, भद्रासन यांसारखी चिन्हे आणि क्वचित् मुचलिंदाच्या सारख्या कथांतील सूचक आकृति कोरल्या होत्या. या स्तंभांवर, त्यांच्या सूचीवर आणि वरवंडीवर दान देणाऱ्या व्यक्तींची नावे कोरली होती. स्तूपाच्या चारी दिशांस तीन तीन स्तंभ उभारून प्रदक्षिणापथाचा मार्ग दाखविला होता. अशा स्तूपांसमोर एकसंधि दगडाचा एक उंच स्तंभ असतो. तशा स्तंभाचा तुकडा या स्तूपाजवळ सापडला आहे. त्यावर अशोकस्तंभावरीलप्रमाणे संलग्न सिंहादिकांच्या आकृति व धर्मचक्र उभारले असावे. पण ते भाग आता नष्ट झाले आहेत. तसेच या स्तूपावर हर्मिका व तिच्यावर एकावर एक तीन दगडी छत्ते असावी. सध्या फक्त एका छत्राचे तुकडे आढळले आहेत.[१]

दगडी कठड्याच्या स्तंभादिकांवर हैरण्यक (सोनार), गृहपति, प्रव्रजित (भिक्षु), उपासक व उपासिका, अंतेवासी वगैरेंनी दान (किंवा प्रसाद) दिल्याचे उल्लेख आहेत. ह्या सर्व व्यक्ति सामान्य दर्जाच्या आहेत. एकाही लेखात राजे किंवा त्यांचे अधिकारी यांचा उल्लेख नाही हे आश्चर्यकारक आहे. यावरून हा स्तूप सामान्य दर्जाच्या व्यक्तींच्या देणग्यांतून निर्मिला होता असे अनुमान केले जाते ; पण ते सर्वस्वी खरे वाटत नाही. पौनी हे त्या काळचे विदर्भातील राजधानीचे नगर होते. तेथे प्रथम सातकर्णीचे नाणे सापडले आहे.[२] खारवेलाच्या हाथीगुंफा लेखावरूनही तेथे त्या राजाचा अंमल होता असे दिसते.[३]

---

१ *Pauni Excavations*, pp. 25 f.

२ पुढे, प्रकरण ७, पृ. [२२८] पाहा.

३ मागे, पृ. [१८] इ. पाहा.

नंतर तेथे ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात भारनृपति भगदत्ताने एक पादुकापट्ट स्थापिला होता हे एका शिलालेखावरून कळते. तेथे रुपिअम्म या महाक्षत्रपाच्या छायास्तंभाचा लेखही सापडला आहे. अश्या राजधानीच्या नगरातील स्तूपाला राजाश्रय नसेल हे संभवत नाही. राजदानांचे उल्लेख न मिळण्याचे कारण या स्तूपाशी संलग्न असे विहार आता नष्ट झाले आहेत हे असावे. बहुधा बौद्ध विहारांत अश्या तऱ्हेचे शासन लेख कोरले जात, असे नाशिक, कार्ले, कान्हेरी वगैरे ठिकाणच्या कोरीव लेखांवरून अनुमान करता येते. या स्तूपाजवळचे विहार आता नष्ट होऊन त्यांच्या जागी शेते कसली जात आहेत, हे तसे कोरीव लेख न सापडण्याचे कारण असावे.

याशिवाय या स्तूपापासून सुमारे एका मैलावर चांडकापूर येथील उत्खननात दुसऱ्या एका भिन्न पद्धतीने बांधलेल्या स्तूपाचे अवशेष मिळाले आहेत. तसेच पूर्वोक्त स्तूपाच्या जवळच हरदोलालाची टेकडी आहे तीतही एखादा स्तूप अदृश्य असेल असे वाटते.

जगन्नाथ टेकडीतील स्तूपाच्या अवशेषांत सापडलेल्या लेखांच्या अक्षरवटिकेवरून त्या स्तूपाचा व त्याशी संलग्न कठडे, स्तंभ इत्यादिकांचा काळ ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर तिसरे शतक असा दिसतो. नंतरच्या वाकाटककाळात वैदिक व पौराणिक धर्माचे पुनरुत्थान झाल्यावर या बौद्ध केन्द्राला उतरती कळा लागली असावी.

## शिल्प

महाराष्ट्रातील सातवाहनकालीन लेणी हीनयान या बौद्ध पंथाची असल्यामुळे त्यात कोठेही भगवान् बुद्धाची मूर्ति आढळत नाही. पादुका, भद्रासन, स्तूप, बोधिवृक्ष इत्यादिकांनी त्याचे अस्तित्व सूचित केलं असते. त्यामुळे तत्कालीन शिल्पे फारशी दिसत नाहीत. त्या काळी यक्षसंप्रदाय प्रचलित होता. म्हणून यक्ष-यक्षिणींच्या मूर्ति स्तूपांच्या कठड्यांवर कोरल्या जात. अश्या अनेक मूर्ति भारहूत येथील शुंगकालीन स्तूपाशी संलग्न असलेल्या सापडल्या आहेत. त्यांची नावेही त्यांच्या मूर्तीजवळ कोरली आहेत. पौनी येथील स्तूपाजवळ तश्या मूर्ति फारश्या सापडल्या नाहीत. एका यक्षमूर्तीचा खालचा अर्धभाग मिळाला आहे.[१] त्यावरून तिचे कोरीव काम उत्कृष्ट प्रकारचे असावे असे वाटते. दुसरी एक मूर्ति खरमुख यक्षाची मिळाली आहे.[२] तो संमुख उभा

१ *Pauni Excavations*, Plate XXV (2).

२ *Ibid.*, Plate XXV (1).

असून त्याचा उजवा पाय गुडघ्याजवळ वाकला आहे. त्याने डाव्या हाताचा पंजा छातीवर ठेवला आहे. उजवा हात अभय मुद्रेत वर केला आहे. त्याने नेसलेले धोतर तलम प्रकारचे असून त्यावर मेखला घातली आहे. त्याचे यज्ञोपवीत व कंकणादि इतर अलंकारही स्पष्ट दिसतात.

भारहूत स्तूपाच्या कठड्यावर जातक ग्रंथातील अनेक कथा उत्कीर्ण केल्या असून त्यांजवळ त्यांची नावेही कोरली आहेत. पौनी येथे फक्त एकच तशी कथा — मुचलिंद नागाची — फणायुक्त नागाची आकृति कोरून सूचित केली आहे.[१] जवळच 'मुचरिंदो नागो' असा लेख कोरला आहे. नागाच्या दोन बाजूंस एक एक पुरुष उभा असून त्याने आपले हात छातीवर एकावर एक पालथे धरले आहेत. ही तत्कालीन नमस्कार करण्याची पद्धत होती. दोघांनीही अधोभागी धोतर नेसले आहे. त्यावर उत्तरीयाचा कमरबंध असून त्याचे सोगे पुढे सोडले आहेत. दोघांनीही कंकणे व कर्णाभरणे घातली असून डोकीवर मोठाले केशगुच्छ धारण केले आहेत. या व्यक्तींचे कोरीव काम सामान्य प्रतीचे आहे.

पौनी येथील मूर्तींवरून सातवाहन कालच्या शिल्पकौशल्याची कल्पना करता येणार नाही. त्याकरिता आपणांस पुणे जिल्ह्यातील भाजे येथील लेण्या-कडे पुन: वळले पाहिजे. तेथील क्र. २० च्या विहार लेण्यात कांही उत्कृष्ट शिल्पे आहेत. हा विहार उत्तराभिमुख असून १६ फूट, ६ इंच × १७ फूट, ६ इंच या आकाराचा आहे. या विहारातील एका योद्धयाचे शिल्प विशेष लक्षणीय आहे.[२] त्यातील कोरीव कामाची विपुलता पाहिल्यावर हे शिल्प भाजक्या मातीच्या (terra-cotta च्या) मूर्तींच्या अनुकरणाने कोरले असावे असा तर्क आहे.

हा योद्धा संमुख उभा असून त्याने उजव्या हातात जमिनीवर टेकलेले प्रत्यंचासहित मोठे धनुष्य धरले आहे, आणि डावा हात कमरबंधात खोवलेल्या कटयारीवर ठेवला आहे. त्याच्या डाव्या खांद्यामागे बाणांचा भाता दिसत आहे. तत्कालीन पद्धतीप्रमाणे त्याचे केश डोकीवर दोन गुच्छांत बांधलेले दिसतात. त्याने कर्णाभरणे, केयूर, वलये, रत्नहार इत्यादि अलंकार धारण केले आहेत. त्याने अधोवस्त्र नेसले असून त्यावर बांधलेल्या कमरबंधाचे सोगे पुढे सोडले आहेत. हे शिल्प तत्कालीन व्यक्तिशिल्पांत प्रमुख गणले जावे इतक्या योग्यतेचे आहे.

या शिवाय त्या विहारात दोन मोठाले शिल्पपट्ट आहेत. त्यांच्या विषयाविषयी तीव्र मतभेद आहेत. या विहाराच्या व्हरांड्यात डावीकडे एक राजपुरु

---

१ *Pauni Excavations*, Pl. XXII.

२ पट्टिका १३, आकृति २१ पाहा.

दोन स्त्रियांसहित चार घोडे जोडलेल्या रथातून भरधाव दौडत असलेला दिसतो.[१] त्या स्त्रियांपैकी एकीच्या हातात छत्र तर दुसरीच्या हातात चामर आहे. हा रथ खाली उपडया पडलेल्या विशाल देहाच्या वस्त्ररहित राक्षसींच्या अंगावरून धावत असलेला दिसतो. त्याच्याबरोबर काही अश्वारूढ स्त्रिया दौडत असलेल्या दिसतात. त्यांपैकी एकीच्या पायात रिकीब दिसते. रिकीबीचे हे अत्यंत प्राचीन दृश्य आहे. दुसऱ्या जवळच्या शिल्पपट्टात एक राजपुरुष एका भल्या मोठ्या हत्तीवर बसून जात असलेला दिसतो. त्याच्या मागे त्याचा सेवक हातात ध्वज धरून बसला आहे. हत्तीने एक वृक्ष उपटून आपल्या सोंडेत धरला आहे.[२] हाही शिल्पपट्ट मुख्य व्यक्तीच्या व वाहनांच्या भव्य आकारामुळे उठून दिसतो.

या दोन्ही शिल्पपट्टांचा निश्चित विषय सांगणे कठीण आहे. कुमार-स्वामींनी पहिल्याचा अर्थ सूर्यदेव आपल्या दोन पत्नींसह अंधकाररूपी राक्षसींचा संहार करीत आकाशातून आक्रमण करीत आहे असा केला आहे.[३] सूर्याच्या रथाचे घोडे सात असतात अशी सामान्यत: कल्पना आहे, पण प्राचीन काळच्या शिल्पांत ते चारच दाखविले जात.[४] तेव्हा त्या बाबतीत आक्षेप घेता येत नाही. दुसरा शिल्पपट्ट ऐरावतारूढ इंद्राचा असावा असे कुमारस्वामींचे मत होते. पण असे शिल्पपट्ट या बौद्ध लेण्यात कोरण्यात हेतु कोणता हे त्यांनी सांगितले नाही. नागनिकेच्या नाणेघाटातील लेखांत सूर्याला व इंद्राला नमन आहे खरे, पण त्यांचा या बौद्ध लेण्यात संबंध कसा येतो हे समजत नाही. श्री. ग्यानी यांनी या शिल्पपट्टांवर एक विस्तृत लेख लिहून त्यांचा मांधाता राजाच्या कथेशी संबंध जुळविला आहे.[५] वासुदेवशरण अग्रवाल यांनीही तेच मत व्यक्त केले आहे.[६] 'महाभारत'[७] बौद्ध जातके आणि बौद्ध संस्कृत ग्रंथ 'दिव्यावदान' यांत उत्तर कुरु देशाचे वर्णन अत्यंत समृद्ध, सुखी, कलाभिज्ञ, व विलासी जनांचे निवासस्थान म्हणून आले आहे.[८] मान्धाता राजाने पृथ्वीवरील

---

१ पट्टिका १४, आकृति २२ पाहा.

२ पट्टिका १५, आकृति २३ पाहा.

३ Coomarswamy, *History of Indian and Indonasian Art*, p. 25.

४ *Ibid.*, Plate XVII, Fig. 61.

५ *Bulletin of the Prince of Wales Museum*, I, pp. 15 f.

६ *Indian Art*, pp. 191-192.

७ महाभारत (चित्रशाला प्रेस), भीष्मपर्व, अध्याय ७, श्लोक १–११.

८ दिव्यावदान (सं. प. ल. वैद्य), पृ. १३६ इ. सध्याच्या 'दिव्यावदाना' चा काळ सन २०० ते ३५० असा असला तरी मांधात्याची कथा फार पूर्वीपासून बौद्ध तसेच हिंदू समाजात प्रचलित होती. म्हणून तिच्यातील प्रसंगांची शिल्पे भाजा येथील लेखात कोरली असणे असंभवनीय नाही.

विदेहादि देश जिंकल्यावर मेरुपर्वतावरील सुसमृद्ध असा उत्तर कुरु देश जिंकण्याचा निश्चय केला. तो हत्तीवर बसून उत्तर कुरु देशाच्या राजधानीत प्रवेश करीत असलेला पहिल्या आकृतीत दाखविला आहे. त्या शिल्पपट्टाला पृष्ठभूमि म्हणून उत्तर कुरु प्रदेशातील निवासी जनांचे समृद्ध, विलासी व सुखी जीवन कोरले आहे. त्या देशात लोकांना कल्पवृक्षापासून इच्छा करताच (सहचित्तोत्पादात्) सर्व उपभोग्य वस्तु प्राप्त होतात हे त्या पृष्ठभूमीत दाखविले आहे.[१] त्यांना सदैव तारुण्य असते. तेथे प्रणयी युगुले कल्पवृक्षाकडून विविध अलंकार, खाद्य-पेये, उत्कृष्ट वस्त्रे वगैरे भोग्य वस्तु प्राप्त करून सुखी व विलासी जीवन जगत असतात हे विविध शिल्पांनी दर्शविले आहे. दुसऱ्या शिल्पपट्टात मान्धाता देवासुरांच्या युद्धात देवांच्या बाजूने भाग घेण्याकरिता रथाने आकाशातून जाताना दाखविला आहे. तो रथ विशालदेही राक्षसांच्या अंगावरून जाताना दिसत आहे.[२] त्यांच्यावर जय मिळवून मान्धाता सुधर्मा नामक देवसभेत प्रवेश करता झाला असे 'दिव्यावदाना'त म्हटले आहे.

मान्धात्याची कथा बौद्ध धर्मीयांत सुप्रसिद्ध होती. तिच्यातील विविध प्रसंगांचे शिल्पपट्ट स्तूपांच्या कठड्यांना लावले असत. स्वर्गात गेल्यावर मान्धा‍त्याला इन्द्राने आपल्या अर्धासनावर बसवून त्याचा सत्कार केल्याचे अमरावती येथील स्तूपाच्या कठड्यावरील एका शिल्पपट्टात दाखविले आहे.[३] त्या कथेत मान्धात्याचा अतिलोभाने कसा अधःपात झाला हे सांगितले आहे. इन्द्राने केलेल्या संमानाने संतुष्ट न होता मान्धाता त्याला पदच्युत करून आपण स्वत देव व मनुष्य या दोघांचाही अधिपति होण्याची महत्त्वाकांक्षा धरता झाल आणि अतिलोभामुळे स्वर्गातून खाली पडून निधन पावला.

अमरावती येथील स्तूपाच्या कठड्यावर मान्धातृकथेतील एका प्रसंगाचे जसे दृश्य आहे तशी भाजा येथील लेण्यात दुसऱ्या दोन प्रसंगांचीही दृश्ये आहेत असे मानणेच योग्य होईल.

---

१ यादृशमाकाङ्क्षति देवो वा देवकन्या वा सहचित्तोपादाद् हस्ते प्रादुर्भवति।... चतुर्विधा आभरणवृक्षाः। चतुर्विधा वाद्यभाण्डवृक्षा वेणुवल्लरीसुघोषकाः।... चतुर्विधापि सुधा।...मधुमाधवकादम्बरीपरिपानम्। गृहाः कूटागारा हर्म्य प्रासादा :...। *Ibid*, p. 137.

२ राज्ञो मूर्धातस्य, सर्वेषामप्यसुराणां वैहायसमभ्युद्गम्योपरि स्थितः। पश्चात्ते सुर कथयन्ति—क एषोऽस्माकमुपरि विहायसमभ्युद्गतः। पश्चात्ते संलक्षयन्ति।... जिता भग्नाः पराजिताः परापृष्ठीकृता आसुरीं पुरीं प्रविष्टाः। *Ibid*, p. 13 मूर्धात हे मांधात्याचे दुसरे नाव होते.

३ *Amarāvatī Sculptures in the Madras Government Museum* p. 293.

सातवाहन-क्षत्रप काली राजव्यक्तींच्या पूर्णाकृति प्रतिमा उभारण्याची पद्धति प्रचलित होती. नाणेघाटात बलाढ्य आद्य सातवाहन नृपति सिमुक, त्याचा पुत्र सातकर्णि व राणी नागनिका, त्यांचा व्याही त्रनकयिर, आणि पुत्र भायिल, वेदिश्री, सातवाहन आणि हकुश्री यांच्या प्रतिमा उभारून त्यांच्या शीर्षभागी त्यांची नावे लिहिली होती.[१] पण त्या प्रतिमा आता नष्ट झाल्या आहेत. पश्चिमी क्षत्रपांचा मूळ पुरुष चष्टन याची माट या खेडेगावाजवळ सापडलेली प्रतिमा मथुरा म्युझियममध्ये आहे. तिचा शीर्षभाग आता नष्ट झाला आहे.[२] तथापि, अवशिष्ट भागावरून त्याचा शक पद्धतीप्रमाणे पायघोळ ओव्हरकोट, त्यावर घातलेला रुंद कमरबंध, त्याखाली दिसणारी त्याची पाटलोण ही स्पष्ट दिसतात. त्यावरील लेखावरून ती प्रतिमा चष्टन क्षत्रपाची होय असे कळते.[३]

## अमरावती येथील स्तूप

अंध्र देशात भगवान् शंकराची पाच पवित्र स्थाने भीमाराम, कुमाराराम, द्राक्षाराम, क्षीराराम आणि अमराराम या नावांनी सुप्रसिद्ध आहेत. त्यांपैकी शेवटचे गुंटूर जिल्ह्यात कृष्णा नदीच्या दक्षिण काठी अमरावती या नावाने प्रसिद्ध आहे. प्राचीन काळी ते बौद्ध धर्माचे महत्त्वाचे केन्द्र होते. तेथे एक भव्य आणि सुंदर स्तूप होता. त्याला 'महाचैत्य' असे सार्थ नाव होते. ख्रिस्तोत्तर नवव्या-दहाव्या शतकांपर्यंत त्याची ख्याति होती. पण नंतर बौद्ध धर्माच्या भारतातील ऱ्हासामुळे तेथील स्तूप, विहार इत्यादिकांची पडझड होऊन त्यांचे एका मोठ्या टेकडीत रूपान्तर झाले आणि तिला 'दीपदिन्ने' (दिव्यांची टेकडी) असे नाव पडले. अंध्रातील चिंतपल्लीचा जमीनदार राजा वसु रेड्डी नायडू याचे ब्रिटिश सरकारशी बिनसल्यामुळे त्याने अमरावती येथे आपले निवासस्थान करण्याचे ठरविले. त्याने सभोवतालच्या प्रदेशातून लोकांना अमरावती येथे राहण्यास बोलाविले, आणि त्यांना उदार आर्थिक साहाय्य देऊ केले. घरबांधणीकरिता लोकांनी दीपदिन्ने टेकडी खोदून तेथील विटा नेण्यास आरंभ केला. खोदाईत काही उत्तम शिल्पकाम केलेल्या संगमरवरी शिला सापडल्या. त्यांपैकी काही अमरेश्वर देवालयाच्या आणि जवळच्या शिवगंगा तलावाच्या पायऱ्या बनविण्याकरिता उपयोगात आणल्या गेल्या. काहींवरच्या मनुष्याकृति खरडून काढून तेथील मशीदीत वापरण्यात आल्या.[४]

---

१ लेख क्र. ४ पाहा.

२ पट्टिका १६, आकृति २४ पाहा.

३ त्यावरील लेख 'मष्टन' किंवा 'षष्टन' असा वाचला आहे; पण त्याचे खरे वाचन 'चष्टन'च असावे.

४ *A. S. M. G. M.*, pp. 1 f.

सन १७९७ मध्ये ट्रिगॉनॉमेट्रिकल सर्व्हेच्या कर्नल मॅकेंझीने अमरावतीला भेट दिली, तेव्हा या शिल्पपट्टांचे महत्त्व त्याच्या ध्यानात आले. नंतर कांही शिला बंगाल एशियाटिक सोसायटीला, काही इंग्लंडातील इंडिया ऑफीसला अश्या देण्यात आल्या. नंतर तेथे उत्खननेही करण्यात आली. त्यांत सापडलेल्या शेकडो संगमरवरी शिला आता मद्रास येथील संग्रहालयात यावच्छक्य स्तूप, कठडा वगैरेंच्या रूपाने जुळवून ठेवल्या आहेत. तेथे त्या अभ्यासकांना उपलब्ध होतात. अमरावती येथे मात्र, भारहूत प्रमाणे, स्तूपादिकांची निशाणीही राहिली नाही.

अमरावतीपासून अर्ध्या मैलावर धनकटक (धान्यकटक) (सध्याचे धरणीकोट) येथे त्या प्रदेशाची राजधानी होती. सातवाहन राजे मूळचे अंध्र प्रदेशातील होते, धनकटक येथे त्यांची राजधानी होती, असे कांही विद्वानांनी प्रतिपादिले आहे, पण त्याला काही आधार नाही हे आम्ही इतरत्र सिद्ध केले आहे.[१]

अमरावती येथे अलीकडे अशोकाच्या स्तंभाचा लहानसा तुकडा सापडला आहे. तेव्हा भारतातील इतर ठिकाणांतल्या प्रमाणे अमरावती येथेही अशोकाने स्तूप बांधला होता असे दिसते.[२] सातवाहन कालात गौतमीपुत्र सातकर्णीची सत्ता अंध्र प्रदेशावर प्रथम पसरली असे दिसते. नाशिकच्या लेण्यातील क्र. १८ च्या लेखात त्याच्या घोडयांनी तीन्ही समुद्रांचे पाणी प्याल्याचे वर्णन आहे. तसेच त्याला महेन्द्र पर्वताचा स्वामी म्हटले आहे. गौतमीपुत्राची नाणी अंध्र प्रदेशातील कोंडापूर, पेडावंकूर इत्यादि ठिकाणी सापडली आहेत.[३] त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या काळापासून सातवाहनांचे कोरीव लेखही अंध्रात सापडू लागतात. त्याच्या काळच्या अमरावती स्तूपाच्या कठडयावरील लेखात कहुलर आणि इसिल या दोन दात्यांनी तेथे धर्मचक्र कोरविल्याचा उल्लेख आहे.[४] पुळुमावीचा बंधु वासिष्ठीपुत्र सातकर्णि याचीही नाणी अंध्रात सापडली आहेत. या दोन्ही राजांच्या तसेच त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांच्या प्रतिमा-युक्त चांदीच्या नाण्यांवरील लेख प्राकृतात कोरले आहेत त्यांत काही तत्कालीन तेलुगु शब्द आढळतात. त्यांवरून त्यांच्या राज्यांतील तेलुगु प्रदेशाचा प्रभाव जाणवतो.[५] यानंतरच्या गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णीच्या काळचा लेख अमरावती जवळच समुद्रतीरी चिन येथे मिळाला आहे.[६] त्याने अंध्र प्रदेशातील आपल्या

१ मागील प्रकरण १, राजकीय इतिहास, पृ. [८] इ. पाहा.

२ ए. इं., ३५, पृ. ४० इ.

३ नाण्यांवरील प्रकरण, पृ. [२३०] पाहा.

४ क्र. २१, ओ. २.

५ नाण्यांवरील प्रकरण, पृ. [२३२] पाहा.

६ क्र. २९.

समुद्रकाठच्या प्रदेशावरील स्वामित्वाची द्योतक अशी 'दोन शिडांच्या जहाजा'ची प्रतिमा असलेली शिशाची नाणी पाडली होती.[१]

यज्ञश्रीचा उत्तराधिकारी माठरीपुत्र शकसेन याच्या काळानंतर सातवाहन राज्याची विभागणी होऊन अंध्रातील सातवाहन राजे स्वतंत्रपणे वागू लागले. विजय सातकर्णि याने आपल्या नावे विजयपुरी नगरी वसवून तेथे आपली राजधानी केली.[२] या राजाच्या काळी नागार्जुन हा विख्यात बौद्ध तत्त्वज्ञ होऊन गेला. राजाने त्याच्या करिता उत्तुंग बौद्ध विहार विजयपुरी (सध्याचे नागार्जुनकोंड) येथे बांधला होता. त्याचे वर्णन चीनी प्रवासी ह्यूएन त्संग याने केले आहे.[३] त्याच्या सांगण्यावरून विजय सातकर्णीने अमरावती येथील स्तूपाला कोरीव शिल्पपट्ट लावले असावे. तिबेटी बौद्ध ग्रंथकार तारानाथ हा नागार्जुनाने अमरावती येथील स्तूपाचा कठडा बनविला असे सांगतो ; पण त्यात काही चूक दिसते. क्र. २१ च्या लेखावरून पुळुमावीच्या काळी तो कठडा घालण्यात आला खरा, पण त्या वेळी नागार्जुन झाला नव्हता. तो पुढे विजय सातकर्णीच्या काळी झाला हे मागे दाखविले आहे. पुळुमावीने हा कठडा बनविण्यात पुढाकार घेतला होता असे दिसत नाही. त्याची राजधानी प्रतिष्ठान येथे होती असे टॉलेमी सांगतो. विजय सातकर्णि हा मात्र अमरावतीजवळ विजयपुरी नामक राजधानीतून राज्य करीत होता यात संशय नाही. त्याच्या राजधानीला 'नागार्जुनकोंड' असे नाव पडले आहे, ते नागार्जुन आपल्या उतार वयात तेथे राहत असल्यामुळेच पडले असावे. तसे असल्यास विजय सातकर्णीने त्याच्या सांगण्यावरून अमरावती येथील स्तूप दुरुस्त करण्यात किंवा त्याला शिल्पपट्टांनी अलंकृत करण्यात पुढाकार घेतला असणे शक्य आहे. नागार्जुनापूर्वी अमरावती येथे स्तूप होता, हे सुप्रसिद्ध असल्यामुळे नागार्जुनाने त्याचा कठडा बनविला असावा असे तारानाथाने कल्पिलेले दिसते.

अशोककालीन स्तूप वराच लहान असावा. त्याच्या जवळचा स्तंभ क्वार्ट्‌त्साइट दगडाचा होता. त्याचा एक तुकडा सापडला आहे. स्तूपाला ग्रॅनाइट दगडाचा कठडा होता. त्याच्या अवशिष्ट तुकड्यांवरील लेखांच्या अक्षरवटिकेवरून तो कठडा ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकातील (अर्थात् अशोककालीन) दिसतो. काही काळाने त्या कठड्याच्या जागी लाइमस्टोन दगडाचा कठडा घालण्यात आला असे तेथील अवशेषांवरून दिसते.

---

१ नाण्यांवरील प्रकरण, पृ. [२३३–३४] पाहा.

२ क्र. ३२.

३ *On Yuan Chwang's Travels in India*, Vol. II, pp. 200 f. हे वर्णन दक्षिण कोसलच्या राजधानीचे म्हणून दिले असले तरी वस्तुतः ते विजयपुरीचे (नागार्जुनकोंडचे) असावे.

सातवाहनकालात (ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकात) स्तूप व कठडा यात मोठे परिवर्तन करण्यात आले. त्यानंतरचे त्यांचे स्वरूप त्या स्तूपाला लावलेल्या शिल्पपट्टांत प्रतिबिंबित झाले आहे.

स्तूपासभोवारचा कठडा सुमारे तेरा फूट उंच होता. त्याचे खांब २ फूट १० इंच रुंद आणि ९ फूट उंच असून त्यांना वर्तुळाकार २ फूट ९ इंच व्यासाच्या तीन सूची (cross-bars) आणि २ फूट ८ इंच उंचीचे उष्णीष (coping stone) लावले होते. एकंदर खांब १३६, सूची ३४८ आणि उष्णीष ८०० फूट लांब असावे असा अंदाज आहे.[१] या सर्वांवर सुंदर कोरीव काम केले होते. उष्णीषाच्या बाहेरच्या बाजूवर तरुण स्त्री-पुरुषांनी आपल्या खांद्यावरून नेलेला मोठा थोरला पुष्पहार होता ; आणि त्यामध्ये बोधिवृक्ष, धर्मचक्र आणि स्तूप यांच्या आकृति कोरल्या होत्या. कठड्याच्या खांबांवर पूर्ण आणि अर्ध कमळे कोरून त्यांना शोभिवंत केले होते. स्तूपाला जाण्याच्या मार्गावरील खांबांवर दोन-दोन सिंह कोरले होते. त्यांपैकी एक समोरील सिंहाकडे आणि दुसरा विरुद्ध दिशेस तोंड करून बसलेला दाखविला होता. मात्र सांची येथील स्तूपाला लावलेल्या सारखे तोरण उभारले नव्हते. स्तूपाचा खालचा आधार (base) १६२ फूट ७ इंच व्यासाचा असून सहा फूट उंच होता. त्याला कोरीव शिल्पपट्ट लावले होते. त्यांची संख्या सुमारे शंभर असावी. या भागाला 'आयक' नामक तीन फूट लांबी-रुंदीचे प्लॅटफॉर्म चारी बाजूंस जोडले होते. त्यांवर अष्ट-कोनी दहा ते चौदा फूट उंचीचे पाच-पाच स्तंभ उभारले होते. हे आयक आणि त्यांवरचे खांब हे या स्तूपाचे वैशिष्ट्य होते. या भागावरील घुमट १३८ फूट व्यासाचा होता. त्याची उंची १४ फूट होती. या घुमटाला विविध प्राणी आणि त्रिशूल यांच्या दोन पंक्तींनी शोभिवंत केले होते. घुमटावर चौकोनी हर्मिका तीत एक अष्टकोनी खांब व त्यावर तीन छत्रे होती.

अमरावती येथील स्तूप, भारहूत येथील स्तूपाप्रमाणे, आता पूर्णपणे नष्ट झाला आहे. त्यावर कोरलेल्या स्तूपाच्या आकृतींवरून[२] आणि तेथे केलेल्या उत्खननात सापडलेल्या अवशेषांवरून वरील वर्णन केले आहे. तेथील स्तूपाचे अनेक अवशेष मद्रास येथील शासकीय संग्रहालयात व इतरत्र नेले आहेत.

सातवाहनानंतर सत्तेवर आलेल्या इक्ष्वाकुवंशी राजांनी अमरावतीच्या स्तूपात थोडे फार बदल केले असावे.

कलाविशारदांच्या मते अमरावती येथील शिल्पे चार भिन्न कालखंडांतील आहेत.[३] त्यांतील ख्रिस्तपूर्व २०० ते १०० या कालखंडातील शिल्पपट्ट फा

---

१ *Amarāvatī* by N. S. Ramaswami, pp. 34 f.

२ पट्टिका १२, आकृति १९ पाहा. ३ *A. S. M. G. M.*, pp. 27 f.

थोडे आहेत. त्यांत अर्धस्तंभ, स्तंभशीर्षांवर विविध प्राणी, भगवान् बुद्धाच्या अस्तित्वाची सूचक बोधिवृक्ष, पादुका इत्यादि चिन्हे आणि त्यांचे पूजक यांच्या आकृति आढळतात. आरंभी भगवान् बुद्धाची मूर्ति कोरण्याचा प्रघात नव्हता. पश्चिम महाराष्ट्रातील सातवाहनकालीन लेण्यांत कोठेही बुद्धाची मूर्ति आढळत नाही, तशीच ती या आरंभीच्या शिल्पपट्टांत दिसत नाही. या आरंभीच्या शिल्पपट्टांतील मूर्ति कमी उठावदार आहेत. त्यांची वस्त्रे व अलंकार बऱ्या रीतीने कोरले आहेत, पण त्यांच्या मूर्ति बोजड वाटतात.

दुसरा कालखंड ख्रिस्तपूर्व १०० पासून ख्रिस्तोत्तर १०० पर्यंतचा. या कालातील शिल्पे पूर्वीपेक्षा जास्त सुबक आणि स्वाभाविक स्वरूपाची दिसतात. या कालात अंध्रात बौद्ध धर्माच्या महासंघिक शाखेचा विस्तार झाला. या शाखेच्या चैत्यक, लोकोत्तरवादी, पूर्वशैलिक, अपरशैलिक इत्यादि उपशाखा अमरावती येथे उत्पन्न झाल्या. या शाखा सुधारणावादी होत्या. त्यांचा प्रभाव शिल्पांवर पडू लागला. या काळात गौतम बुद्धाचे अस्तित्व बोधिवृक्ष, धर्मचक्र इत्यादि चिन्हांप्रमाणे त्याच्या मूर्तीनेही सूचित केले आहे. विशेषत: जेथे तो उपदेश करीत आहे तेथे त्याची मूर्ति कोरली आहे. या शिल्पपट्टांत त्याच्या आयुष्यातील महाभिनिष्क्रमणासारख्या काही घटना उत्कीर्ण केल्या आहेत. हे शिल्पपट्ट स्तूपाला लावले होते.

तिसरा कालखंड सुमारे ख्रिस्तोत्तर १५० च्या सुमाराचा. या काळी वासिष्ठीपुत्र पुळुमावीची सत्ता अंध्रावर पसरली होती. त्या राजाच्या कारकीर्दीचा उल्लेख कठड्यावर कोरलेल्या लेखात आला आहे. त्या काळी पूर्वोक्त कठडा उभारला गेला. त्याच्या उभ्या खांबांवर, सूचींवर आणि त्यांवरच्या उष्णीषांवर सुंदर शिल्पकाम केले आहे. स्तंभांच्या बाहेरच्या बाजूंवर मध्यभागी मोठे कमळ आणि खाली व वर अर्ध कमळे कोरली असून मधील भागांत बुद्धचरित्रातील विविध प्रसंग दाखविले आहेत. कठड्याच्या आतील बाजूवरील स्तंभ, सूची इत्यादिकांवर जातकांतील विविध कथा कोरल्या आहेत. हा कठडा आणि स्तूप यांमधील मार्गाने प्रदक्षिणा घालताना भाविकांना बुद्धाच्या जीवनातील विविध प्रसंगांचे ज्ञान व्हावे आणि जातकांतील गोष्टींची दृश्ये पाहून त्यांना बौद्ध धर्मातील तत्त्वांचा अनायासे उपदेश व्हावा हा यामागील हेतु होता. अश्या तऱ्हेची सुंदर शिल्पे असणारा कठडा दुसऱ्या कोणाही भारतीय स्तूपाला असलेला माहीत नाही.

चौथा कालखंड ख्रिस्तोत्तर २०० ते २५० या कालाचा. या कालात या पूर्ण स्तूपाची आकृति कोरलेले शिल्पपट्ट स्तूपाभोवती बसविलेले दिसतात. त्यांपैकी कित्येक पहिल्या कालखंडातील जुने

शिल्पपट्ट काढून त्यांच्या मागील भागावर स्तूपादिकांच्या आकृति कोरून पुनः स्तूपासभोवार बसविले होते.[१] त्यांतील मानवी आकृति पूर्वीपेक्षा जास्त उंच व सडपातळ दिसतात. हे शिल्पपट्ट कदाचित् नागार्जुनाच्या सांगण्यावरून तत्कालीन विजय सातकर्णीनें बसविले असावे. अमरावतीच्या शिल्पपट्टांतील कोरीव कामाची अनेकांनी मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. त्यांचा विषय धार्मिक असला तरी त्यांत तत्कालीन जीवनाचे सर्वांगीण स्वरूप प्रतिबिंबित झाले आहे. तत्कालीन शिल्पींनी गरीब माणसाची झोपडी, राजाचा प्रासाद आणि भिक्षूचे दुमजली विहार सारख्याच कौशल्याने कोरले आहेत. त्यांनी स्वकालीन समाजाचे सूक्ष्म निरीक्षण केले होते. त्यामुळे त्यांनी विविध पेशांचे लोक कोणती वस्त्रे धारण करतात, त्यांना कोणत्या प्रकारांचे अलंकार आवडतात, ते कश्या प्रकारचे फर्निचर वापरतात, कश्या तऱ्हेच्या घरांत राहतात, युद्धात कोणत्या शस्त्रांचा उपयोग करतात—सारांश कश्या प्रकारचे जीवन जगतात—याचे मार्मिकपणे अवलोकन करून ते आपल्या शिल्पांत दाखविले आहे.

कुमारस्वामींनी 'अमरावती येथील शिल्पकला ही भारतीय कलेचे अत्यंत विलासी आणि अत्यंत सुकुमार असे पुष्प आहे,' असे म्हटले आहे.[२] पण या विलासीपणात असभ्य असे काही नाही. कलाकार जीवनावरील प्रेम आणि त्यातील आनंद लुटण्याचा प्रयत्न करीत आहे असे दिसते. बॅक्कोफरने म्हटले आहे :—

"आध्यात्मिकतेच्या रूक्ष क्षेत्रात जाणीवपूर्वक प्रवेश करण्यापूर्वी भारतीय कला जणू काय या जगातील आनंदाचा बेहोशपणे आस्वाद घेत त्याची रजा घेत आहे असा यांतील कलाकारांच्या हरएक पार्थिव वस्तूवरील निस्सीम प्रेमावरून भास होतो."[३]

अमरावती येथील शिल्पकार एखादा प्रसंग घेऊन त्याचे किती कौशल्याने चित्रण करतो हे एका सूचीवरील नलगिरि हत्तीच्या दमन-विषयक पुढील शिल्पपट्टावरून स्पष्ट होईल.[४]

या शिल्पपट्टात दोन प्रसंग कोरले आहेत. डावीकडे बुद्धाचा मत्सर करणारा देवदत्त याने चिथावल्यावरून मदोन्मत्त नलगिरि हत्ती राजगृहाच्या रस्त्यात धुमाकूळ घालताना दिसतो. तो कित्येकांना पाया-

१ *Amarāvatī*, p. 32.

२ *Coomarswamy*, p. 71.

३ *Amarāvatī*, p. 41.

४ पट्टिका १२, आकृति २० पाहा.

खाली तुडवीत आहे तर कांहीना सोंडेत धरून भिरकावीत आहे. ते भयानक दृश्य पाहून लोक गर्भगळीत होऊन एकमेकाना साहाय्यार्थ-मिठया मारीत आहेत. जवळच्या घरांत सुरक्षित ठिकाणी असलेले लोकही चिन्ताक्रान्त दिसत आहेत. याच पट्टात उजवीकडच्या बाजूस भगवान् बुद्ध शांतपणे उभा असलेला दिसतो. त्याला पाहताच तो पिसाळलेला हत्ती अत्यंत नम्र होऊन त्याला नमन करताना दाखविला आहे. अमरावतीच्या शिल्पकारांनी बुद्धचरित्रातील आणि जातक कथांतील प्रसंग इतके हुबेहुब कोरले आहेत की त्यांना भारहूत येथील स्तूपाच्या कठड्यावर घातली आहेत तशी त्या त्या प्रसंगांची नावे कोरण्याची जरूरी पडली नसावी.

अमरावती येथील कलेवर रोमन शिल्पकलेचा प्रभाव पडला आहे असे कांही पाश्चात्य विद्वानांचे मत आहे. या संबंधात त्यांनी पुढील साम्यांचा निर्देश केला आहे—[१]

(१) काही स्त्रियांचा पेहराव रोमन पुरन्ध्रींच्या प्रमाणे आहे.

(२) एका ठिकाणी एक मुलगा एका शृंगाने पेय पीत असलेला दाखविला आहे.

(३) कठड्यावर पक्षधारी सिंहांच्या आकृति आढळतात.

(४) कठड्याच्या वरवंडीवर (coping stone वर) एक भली मोठी पुष्पमाला यक्ष किंवा तरुण स्त्री-पुरुष वाहून नेताना दिसतात.

(५) रोमन चिलखत घातलेल्या योद्धयाची आकृति एके ठिकाणी कोरली आहे.

हे कलाविशेष रोमन प्रकारचे आहेत खरे. त्या काळी पाँडिचरी-जवळ अरिकमेडू येथे रोमन लोकांची फॅक्टरी होती, असे तेथे सापडलेल्या नाण्यांवरून दिसते. रोमन मद्याचे अँफोरा कुंभ दक्षिण भारतात पवनार, कोल्हापूर वगैरे ठिकाणींही सापडले आहेत. त्या काळी भारताचा रोमशी जलमार्गाने मोठा व्यापार चालत असे हे इतरत्र दाखविले आहे. या संपर्कातून रोमन कलेचे काही किरकोळ विशेष भारतीय कलाकारांनी उचलले असल्यास नवल नाही. पण हे विशेष फार महत्त्वाचे नाहीत. अमरावती येथील कलेचा गाभा विशुद्ध भारतीय आहे. तो पश्चिम महाराष्ट्रातील बौद्ध लेणी आणि मध्य भारतातील भारहूत व सांची येथील स्तूप यांतून उत्क्रान्त झाला आहे.[२]

---

१ *Amarāvatī*, p. 37 f.

२ *Loc. cit.*

## चित्रकला

### अजंटयातील हीनयानाची लेणी

अजंटा हे गाव इंध्याद्रि पर्वताच्या एका घाटाच्या तोंडाशी वसले आहे. त्याच्या वायव्येस ४ मैलांवर चित्रकलेबद्दल सुप्रसिद्ध अशी ही लेणी एका दरीत २५० फूट उंच अशा टेकडीच्या अर्धवर्तुळाकार दर्शनी भागावर पूर्व-पश्चिम दिशांनी कोरली आहेत. पश्चिमेच्या बाजूस या टेकडीवरून एक जलप्रवाह सात कुंडांत धबधब्याच्या रूपाने कोसळत खाली वाहणाऱ्या ओढयास मिळतो. त्याने या निसर्गरमणीय स्थानाचे सौंदर्य वाढविले आहे.

या टेकडीत अपूर्णावस्थेत असलेली धरून एकूण तीस लेणी कोरली आहेत. त्यांपैकी पाच (क्र. ९, १०, १९, २६ आणि २९) चैत्यगृहे असून बाकीची पंचवीस विहार लेणी आहेत. त्यांचे पुन: हीनयानी आणि महायानी असे दोन विभाग होतात. हीनयान पंथाच्या सहा लेण्यांत क्र. ९ व १० ची लेणी चैत्य प्रकाराची आणि चार (क्र. ८, १२, १३ आणि १५) ही विहार प्रकाराची आहेत. ही सहा सातवाहन कालातील आहेत. बाकीची वाकाटक व त्यानंतरच्या कालातील आहेत. आपणांस यातील कांही सातवाहनकालीन लेण्यांतील कलेची चर्चा करावयाची आहे.

ही लेणी एका निर्जन प्रदेशात असल्याने मध्यंतरी कित्येक शतके अज्ञात होती. सन १८१९ मध्ये मद्रास सैन्यातील काही अधिकारी फिरत फिरत तेथे गेले तेव्हा त्यांना ती आढळली. नंतर अनेकांनी त्या स्थळाला भेट देऊन तेथील लेण्यांतील अप्रतिम कलेचा जगाला परिचय करून दिला आहे.

ही सर्व लेणी बौद्ध धर्माची आहेत. वेरूळसारख्या इतर ठिकाणी हिंदु व जैन धर्मांची लेणी बौद्ध लेण्यांजवळ आढळतात तसा प्रकार येथे नाही.

मागे उल्लेखिलेल्या हीनयानाच्या सहा लेण्यांत क्र. ९ व १० ची चैत्य लेणी सर्वांत प्राचीन आहेत. याचे प्रमाण म्हणजे त्यांतील लेखांची अक्षरवटिका आणि त्यात चितारलेल्या स्त्रीपुरुषांची वेषभूषा. क्र. १० च्या चैत्य लेण्यातील वातायनाच्या डावीकडे पुढील लेख कोरला आहे —[१]

१ वासिठिपुतस कट —
२ हादिनो घरमुख
३ दानं [।*]

या लेखात वासिष्ठीपुत्र कटहादि याने त्या लेण्याचा दर्शनी भाग आपल्या खर्चाने कोरवून तेथील भिक्षुसंघाला अर्पण केल्याचा उल्लेख आहे.

---

१ *A. S. W. I.*, IV, p. 116.

वर्जेसला हा वासिष्ठीपुत्र सातवाहन कुलातील विख्यात नृपति वासिष्ठीपुत्र पुळुमावि असावा असे वाटले आणि त्याने हे लेणे ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकाचे मानले.[१] पण हे मत चुकीचे आहे. हा वासिष्ठीपुत्र राजा असता तर त्याच्या नावामागे ‘रञो’ सारखा शब्द आला असता. प्राचीन काळी मातेवरून मुलाचे नाव ठेवण्याची पद्धत उत्तर व दक्षिण भारतात सर्वत्र प्रचलित होती. त्यामुळे कोरीव लेखांवरून अनेक वासिष्ठीपुत्र ज्ञात झाले आहेत. अजंटा येथील हीनयानी लेण्यांत एकाही राजाचा उल्लेख नाही. ती सर्व लेणी व्यापाऱ्यांनी वा सामान्य जनांनी कोरविली व रंगविली होती. या लेखाची अक्षरवटिका अशोकाच्या लेखांतील अक्षरवटिकेहून फार नंतरची दिसत नाही.[२] तसेच या लेण्यात रंगविलेल्या चित्रांतील स्त्रीपुरुषांची वेशभूषा सांची वगैरे ठिकाणांतील पुरातन शिल्पांतील वेषभूषेहून भिन्न नाही.[३] म्हणून या क्र. ९ व १० च्या लेण्यांचा काल ख्रिस्तपूर्व दुसरे शतक असा दिसतो.

क्र. ९ व १० ची चैत्यगृहे अजंटा येथील सर्व लेण्यांत प्राचीन होत हे मागे सांगितले. त्यांतही क्र. ९ चे लेणे अगोदरचे आहे. कारण ते त्या टेकडीत जरा खाली खोदले असून क्र. १० च्या चैत्यापेक्षा लहान आहे. क्र. १० चे विशाल चैत्य अगोदर कोरले असते तर क्र. ९ चे चैत्य नंतर अवघड ठिकाणी कोरले गेले असते असे वाटत नाही.

क्र. १० चे चैत्य हे या आरंभीच्या सर्व लेण्यांत विशाल आहे. ते ४१ फूट १ इंच लांव असून ९$\frac{३}{४}$ फूट रूंद आणि ३६ फूट उंच आहे. त्याच्या दोन्ही बाजूंच्या मत्तवारणां (aisle) पासून मधला भाग ३९ अष्टकोनी स्तंभांनी विभक्त झाला आहे. त्याच्या वरच्या कमानी, कार्ल्याच्या लेण्यांतल्या प्रमाणे लाकडाच्या होत्या. त्या आता नष्ट झाल्या आहेत. मत्तवारणांवरच्या कमानी मात्र दगडाच्या आहेत. समोरचा दागोब (स्तूप) शिल्परहित असून त्याचा आधार (base) १५$\frac{३}{४}$ फूट व्यासाचा आहे. वर हर्मिका आणि तिच्यावर चौकोनी तीन (किंचित् एकापुढे एक आलेल्या) शिला लावल्या आहेत.[४]

या दोन्ही चैत्यगृहांत सर्वत्र चित्रे रंगविली होती. पण त्यांतील फारच थोडी आणि तीही लहान लहान तुकड्यांत आता अवशिष्ट आहेत. त्यांना ‘Fresco Paintings’ असे म्हणतात. लेण्याचे व त्यांतील स्तंभादिकांचे पृष्ठभाग खडबडीत ठेवून त्यावर भाताच्या कोंड्याची राख मिसळलेल्या

१ *C. T. I.*, p. 295. Also, *A. S. W. I.*, IV, p. 45.

२ *A. S. W. I.*, IV, Plate LVI (No. 1) पाहा.

३ *C. T. I.*, Plate XXIX. पाहा. या लेण्यातील स्तंभावरील बुद्धमूर्ति मात्र नंतरच्या आहेत.

४ *C. T. I.*, p. 292.

उत्तम कमावलेल्या मातीचा गिलावा देत असत, आणि त्यावर आधी पांढरा रंग देऊन नंतर चित्रे काढली जात.[१] अजंटा येथील बहुतेक लेण्यांत चित्रकाम केले होते, पण त्यातील नऊदशांश काम आता नष्ट झाले आहे. नंतरच्या वाकाटक आणि त्यापुढील काळच्या क्र. १६, १७ व १ च्या लेण्यांत अद्यापि बरीचशी चित्रे शाबूत आहे. अजंटाच्या चित्रकलेची माहिती देतांना या लेण्यांतील चित्रांचा उदाहरणांदाखल उपयोग केला जातो, पण ती सातवाहन काळानंतरची असल्यामुळे त्यांचा येथे निर्देश करणे अप्रस्तुत होईल. क्र. १० च्या लेण्यांतील अवशिष्ट चित्रांच्या प्रतिकृति कोठेही आढळत नाहीत.[२]

क्र. १० च्या लेण्याच्या उजव्या भिंतीवर एक जातककथा चित्रित केली होती. तिची रंगित प्रती आम्हांस उपलब्ध झाली नाही. पण तिची साधी प्रतिकृति बर्जेसने प्रसिद्ध केली आहे.[३] तिचा फोटो येथे दिला आहे.[४] त्यावरून तत्कालीन चित्रकलेची काहीशी कल्पना करता येईल.

हे चित्र षड्दन्तजातकातील (जातक क्र. ५१४) कथेचे आहे. ती कथा अशी —[५]

षड्दन्त (सहा दातांच्या) हत्तीने आपल्या हत्तीणीला एकदा अतिशय रूष्ट केले. तेव्हा तिने पुढील जन्मात त्याचा सूड घेण्याचा निश्चय केला. त्या जन्मी ती एका राजाची राणी झाली. तिने त्याच्याजवळ 'षड्दन्त हत्तीचे दात कापून आणवा' असा हट्ट धरला. राजाने एका शिकाऱ्याला ते काम सांगितले. राणीने त्या हत्तीचा पत्ता सांगितला. त्या शिकाऱ्याने एका तापसाचा वेष धारण केला आणि एक खड्डा खणून तो त्यात हत्तीची वाट पाहत बसला. षड्दन्त जवळ आल्यावर त्याने त्याला बाण मारून घायाळ केले. तेव्हा त्याला मरणप्राय वेदना होऊ लागल्या. हत्तीने त्याला आपणांस घायाळ करण्याचे कारण विचारले आणि ते समजल्यावर त्याने आपण होऊन अत्यंत वेदना सोसून त्याला आपले दात काढून दिले. शिकाऱ्याने आणलेले दात पाहताच राणीला आपल्या दुष्कृत्याचा पश्चात्ताप झाला. पूर्वजन्मी त्या हत्तीने आपणांवर केलेल्या प्रेमाची आठवण होऊन ती भग्नहृदय झाली आणि गतप्राण होऊन पडली.

---

१ अजंटा, पृ. २६. श्री. बाळासाहेब पंत प्रतिनिधी यांच्या मते ही चित्रे फ्रेस्को पद्धतीची नसून सॅको पद्धतीची आहेत. पूर्वोक्त, पृ. २७.

२ यजदानी व बाळासाहेब पंत प्रतिनिधि या दोघांच्याही अजंटचातील चित्रांवरील ग्रंथांत अजंटा, क्र. १० च्या लेण्यातील एकाही चित्राची प्रतिकृति दिली नाही.

३ *A. S. W. I.* IV, Plate XVI.

४ पट्टिका १७, आकृति २५.

५ पालिजातक क्र. ५१४ पाहा. या जातकाच्या कथेची चित्रे अजंटाच्या इतर लेण्यांतही आढळतात. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ', पृ. १५६ पाहा.

या कथेतील विविध प्रसंग चित्रकाराने मोठ्या कौशल्याने रेखाटले आहेत.[१] डावीकडच्या जवळ जवळ अर्ध्या भागात षड्दन्त हत्ती आपल्या सोबत्यांसह हिमालयावर आनंदाने विहार करताना दाखविला आहे. नंतरच्या दृश्यात शिकाऱ्याकडून तो घायाळ होणे व त्याने आपण होऊन आपले दात उपटून देणे या घटना दाखविल्या आहेत. पुढील दृश्यात तो शिकारी एकेका पारड्यात तीन तीन हस्तिदंत ठेवून ती पखाल खांद्यावरून आणतो, राजा ती वार्ता राणीला कळवतो तेव्हा ती खिन्न होते, पुढे ते हस्तिदंत तिच्यापुढे आणताच ती भग्नहृदय होऊन निश्चेष्ट पडते आणि निधन पावते असे प्रसंग अत्यंत कौशल्याने रेखाटले आहेत.

या लाकडी ठोकळ्यावरील प्रतिकृतीत (Woodcut मध्ये) मूळ चित्रातील सौंदर्य रंगांच्या अभावी उतरले असणे शक्य नाही. तथापि, त्यावरूनही सातवाहनकालीन कलाकारांच्या कृतीतील सृष्टिसादृश्य, वाह्यरेषा – रेखाटनातील कौशल्य आणि भावसूचकता यांचा प्रत्यय येईल. जवळ जवळ दोन हजार वर्षांपूर्वी भारतीय कलाकारांनी चित्रकलेत किती प्रगति केली होती हे पाहिल्यावर कोणाचेही मन आश्चर्यचकित झाल्याशिवाय राहणार नाही.

१ पट्टिका १७, आकृति २५.

प्रकरण आठवे

# सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांची नाणी

सातवाहनांच्या उदयापूर्वी उत्तर भारतातल्याप्रमाणे दक्षिणेतही टंकित (Punch-marked) नाणी प्रचलित होती. दक्षिणेत सातवाहनांनी प्रथम राजनामांकित नाणी पाडण्यास आरंभ केला. ती तांबे, शिसे व पोटिन क्वचित् चांदी, या धातूंची असत. त्यांना कार्षापण असे नाव असे. 'मनुस्मृती 'त (८, १३६) एक कर्ष (१६ मासे) वजनाच्या तांब्याच्या नाण्याची 'कार्षापण ही संज्ञा उल्लेखिली आहे. नागनिकेच्या नाणेघाटातील लेखात विविध श्रौत यज्ञांत हजारो कार्षापणांची दाने दिल्याचा निर्देश आहे. ते कार्षापण तांब्याचे किंवा शिशाचे असावे.[१]

## सातवाहन राजांची नाणी

सातवाहन वंशाचा मूळ पुरुष सातवाहन या राजाने प्रथम आपल्या नावाची नाणी पाडली. त्याची तांब्याची नाणी औरंगावाद, हैदरावाद वगैरे ठिकाणी सापडली आहेत. काही शिशाची नाणी नेवासे, कोंडापूर वगैरे ठिकाणी उत्खननांतही मिळाली आहेत. त्यांपैकी दोन नाणी येथे दिली आहेत ––

(१) सातवाहन राजाची नाणी ––

(अ) तांब्याचे नाणे[२] –– प्राप्तिस्थान –– हैदरावाद; आकार –– चौकोनी; प्रत्येक वाजू ·८ इंच; वजन –– ११० ग्रेन.

पुढील वाजू––उजवीकडे सोंड खाली करून उभा राहिलेला हत्ती; त्याच्या पुढे दोन वर्तुळांना उभ्या रेषेने छेदणारे (छकाराचे) चिन्ह; पाठीवर आडव्या रेषेने छेदलेला तिकोनी ध्वज; डाव्या कोनातून आरंभ झालेला लेख–– रञो सिरि-सादवाह[नस*]

मागील वाजू –– एकात एक अशा दोन बिंदुयुक्त वर्तुळांनी बनविलेले उज्जैनी चिन्ह ; कांही वर्तुळांसमोर पुढील वाजूवरीलप्रमाणे छकारद्वयाचे चिन्ह, तर काहीसमोर स्वस्तिक.

(आ) शिशाचे नाणे[३]–– प्राप्तिस्थान –– कोंडापूर येथील उत्खनन; आकार –– ओव्हल प्रकारचा; वजन –– ९८·९ ग्रेन.

---

१ कार्षापण चांदीचेही असत. यासंबंधी विवेचन डॉ. काणे यांनी केले आहे. *H. D.*, III, pp. 123 f.

२ *S. I.*, III, 1 f. पट्टिका १९, आकृति २८. नाण्यांवरील लेखांत बहुधा स्व दाखविले नसतात. ते घालून येथे व यापुढे ते लेख दिले आहेत.

३ *Ibid.*, III, pp. 5 f. पट्टिका १९, आकृति २९.

पुढील बाजू — उजवीकडे, खाली सोंड करून उभा राहिलेला हत्ती. त्याच्या पाठीमागे खालील डाव्या कोनातून 'सिरि-सादवाह–' लेख.
मागील बाजू — एकात एक दोन वर्तुळांचे उज्जैनी चिन्ह. त्यांच्या मध्ये बिंदु.

(इ) शिशाचे नाणे[१] — प्राप्तिस्थान — नेवासे येथील उत्खनन; आकार — वाटोळा.

पुढील बाजू — उजवीकडे उभा राहिलेला वृषभ; त्याच्या पाठीवर तीन टेकड्यांचा पर्वत. सभोवार लेख —'रञो सिरि सातवाहनस'.
मागील बाजू — डावीकडे एक चिन्ह; उजवीकडे कठड्यात वृक्ष; डावीकडे दोन चिन्हे; खाली दोन टेकड्या व नदी.

ही नाणी कोणत्या सातवाहनाची ह्यावर विद्वानांत तीव्र मतभेद आहेत. 'सातवाहन घराण्याचा मूळ पुरुष अशोकानंतर लौकरच उदयास आला असल्यास ही नाणी त्याची असू शकत नाहीत ; कारण त्या काळी (ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीस) अशी राजनामांकित नाणी प्रचारात नव्हती. तेव्हा ती नाणेघाटात ज्याचा पुतळा होता त्या कुमार सातवाहनाची असावी' असे कांहींचे म्हणणे आहे. पण तो कुमार सातवाहन अल्पवयी असताना निधन पावला असावा ; तो गादीवर आला नव्हता हे इतरत्र दाखविले आहे ; दुसरा कोणी सातवाहन राजा ज्ञात नाही. तेव्हा ही नाणी सातवाहनवंशकर्त्याचीच असावी.[२]

(२) प्रथम सातकर्णीची नाणी —

(अ) शिशाचे नाणे[३]— प्राप्तिस्थान — हैदराबाद; आकार — वाटोळा (व्यास ·९ इंच); वजन — २८२ ग्रेन.

पुढील बाजू — उजवीकडे तोंड करून उभा राहिलेला वृषभ. वरील भागी सभोवार लेख — 'रञो सिरि सातकणिस'.
मागील बाजू — मध्यभागी कठड्याने वेष्टिलेला पाच पर्णांचा वृक्ष; उजवीकडे त्रिरत्न चिन्ह आणि डावीकडे तिकोनी ध्वज; वृक्षावर दोन्ही बाजूस एक एक वर्तुळ; खाली उजव्या बाजूस स्वस्तिक आणि डाव्या बाजूस त्रिरत्न चिन्ह; खाली दोन टेकड्या.

---

१ Sankalia, *From History to Pre-history at Nevāsā*, p. 172. पट्टिका १९, आकृति ३०.

२ भारतातील प्राचीन नगरांच्या (उदाहरणार्थ, तगर याच्या) नावाने पाडलेली नाणी याच काळातील मानली जातात. *J. N. S. I.*, XXXVIII, pp. 36 f.

३ *S. I.*, III, pp. 10 f. पट्टिका १९, आकृति ३१.

सातकर्णीच्या नाण्यांत हे बरेच प्राचीन दिसते. ते प्रथम सातकर्णीचे असावे.

(आ) पोटीनचे नाणे[१] — प्राप्तिस्थान — पौनी येथील उत्खनन; आकार — चौकोनी; ·८ इंच × ·७ इंच; वजन — १३८ ग्रेन.

पुढील बाजू — उजवीकडे वर सोंड केलेला हत्ती. वर बिंदुसहित उज्जैनी चिन्ह; आडव्या सरळ रेषेत लेख —' रञो सिरि-सातकंणि–'.

मागील बाजू — उजवीकडे शेपूट वर केलेला वृषभ; वर अष्टारचक्र आणि तिकोनी ध्वज.

दोन बाजूंवर भिन्न भिन्न पशु असलेले हे नाणे असामान्य आहे. लेखाच्या अक्षरवटिकेवरून ते बरेच प्राचीन, म्हणून प्रथम सातकर्णीचे असावे. या सातकर्णीचे एक नाणे पौनी येथे जमिनीवरही सापडले आहे. या नाण्यांवरून या सातकर्णीचा अंमल विदर्भावर होता, व हाथीगुंफा लेखातील उल्लेख त्याचाच होय हे स्पष्ट दिसते.

(इ) ब्रॉन्झचे नाणे[२] — प्राप्तिस्थान — जबलपूरजवळचे तेवर (प्राचीन त्रिपुरी); आकार — चौकोनी; ·८ इंच; वजन — ८० ग्रेन.

पुढील बाजू — मध्यभागी उज्जैन चिन्ह; त्यावर चंद्राकृति; त्याच्या उजव्या बाजूस कठड्यात तिकोनी ध्वज; डाव्या बाजूस हत्ती. खाली मासे असलेली नदी. सर्वांच्या वर आडव्या रेषेत [रञो] सिरि-सातकणिस.

मागील बाजू — रिकामी.

अक्षरवटिकेवरून हे नाणे प्रथम सातकर्णीचे दिसते. ते त्रिपुरी येथील उद्ध्वस्त भागात सापडले, हे महत्त्वाचे आहे. प्रथम सातकर्णीने सांचीपर्यंत प्रदेश जिंकून कांही काळ आपल्या ताब्यात ठेवला होता. त्या काळचे हे नाणे असावे.

(ई) सातकर्णि आणि नागनिका यांचे चांदीचे जोड नाणे[३] — प्राप्तिस्थान — जुन्नर; आकार — गोल; व्यास — ·७५ इंच; वजन — १०८ ग्रॅम.

पुढील बाजू — लेख दोन ओळींत — (१) ' रञो सिरि-सात[क] '– (२) 'नागनिकाय'. डाव्या बाजूस घोड्याची अपूर्ण आकृति.

मागील बाजू — आत स्वस्तिक असलेले एकेरी वर्तुळ. दोन वर्तुळांमध्ये बिंदु. डावीकडे भाल्याची आकृति.

---

१ *J. N. S. I.*, XXXV, pp. 106 f. पट्टिका १९, आकृति ३२.

२ *Ibid.*, XXI, pp. 110 f.

३ *J. N. S. I.* XXXVI, pp. 6 f. पट्टिका २०, आकृति ३३, (ही प्लॅस्टिकची वाढीव प्रतिकृति आहे.)

सातवाहनांच्या सर्व चांदीच्या नाण्यांत हे प्राचीन आहे. यावरील घोड्याच्या आकृतीवरून ते अश्वमेध प्रसंगी पाडले होते असे दिसते. यातील नागनिकेच्या उल्लेखावरून ती प्रथम सातकर्णीची पत्नी होती आणि राज्यकारभारात तिचे वर्चस्व होते हे व्यक्त होते.

(३) शक्तीचे तांब्याचे नाणे —[१] प्राप्तिस्थान — बेसनगर (प्राचीन विदिशे) जवळ बेतवा नदीच्या पात्रात मिळाले. आकार – वाटोळे; व्यास — २·२० सें. मी.; वजन — १०० ग्रेन.

पुढील बाजू — स्त्री प्लॅटफॉर्मवर संमुख उभी. तिच्या डाव्या बाजूस उज्जैन चिन्ह; सभोवार लेख —' रञो सिरि-सतिस '.

मागील बाजू — दोन पर्वतांमध्ये सोंड उंच केलेला हत्ती; वर कठड्यात वृक्ष.

रॅप्सन्‌ने असले ' माळवा घडणी 'चे शिशाचे नाणे पश्चिम भारतातील म्हणून दिले आहे. त्याच्या काळी सातवाहनाची नाणी सापडली नव्हती. म्हणून त्याने ' सातस ' असे वाचून हे नाणे सातकर्णीचे असे मानले. पण असा नावाचा संक्षेप इतरत्र आढळत नाही. ही नाणी नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात उल्लेखिलेल्या ' सतिसिरि 'ची असावी. जैन ग्रंथांत त्याचे नाव शक्तिकुमार असे येते. नाणेघाटातील एक प्रतिमा ' कुमार हकुसिरि 'ची होती तो हकुसिरि हा शक्तिश्रीच असावा. त्याचे दुसरे तांब्याचे चौकोनी नाणे उज्जैनी येथे सापडले आहे.

(४) आपीलकाचे तांब्याचे नाणे —[२] प्राप्तिस्थान — छत्तीसगडाच्या बिलासपूर जिल्ह्यातील बालपूर येथे महानदीच्या काठी. आकार — वाटोळा; व्यास — १ इंच; वजन — ६५ ग्रेन.

पुढील बाजू — उजवीकडे सोंड खाली केलेला हत्ती; पुढे अंकुश; सभोवार लेख ' रञो सिवसिरिसापीलकस .'

मागील बाजू — रिकामी.

हा आपीलक राजा पुराणांतील वंशावळीत बराच अगोदर उल्लेखिलेला आहे. याने शिवश्री हे उपपद धारण केले आहे. सातवाहन राजे हे उपपद विकल्पाने आपल्या नावामागे लावत असत. याच्या काळी छत्तीसगडसारख्या पूर्वेकडील भागापर्यंत सातवाहनांची सत्ता पसरली होती असे या नाण्याच्या प्राप्तीवरून अनुमान काढता येते.

---

१ *Seminar*, p. 27; पट्टिका २०, आकृति ३४.
२ *Num. Suppl.* XLVII, p. 93 f. पट्टिका २०, आकृति ३५.

(५) गौतमीपुत्र सातकर्णीची नाणी — याची हत्ती, सिंह, अश्व, स्वस्तिक पर्वत वगैरे विविध प्रकारची नाणी दक्षिणेतील अनेक प्रदेशांत सापडली आहेत.[१] तऱ्हाळा येथे सापडलेली पोटीन धातूची नाणी पुढील प्रकारची आहेत —

(अ) गौतमीपुत्राचे पोटिनचे नाणे[२] — प्राप्तिस्थान — तऱ्हाळा (विदर्भ) आकार — वाटोळा; व्यास — ·८ इंच; वजन — ६०·५ ग्रेन.

पुढील बाजू — सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख —
[रि]सातकणिस.

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह.

तऱ्हाळा संचयात याची सर्वात जास्त ५७३ नाणी होती. यांवर त्याचे मातृनामदर्शक विशेषण आढळत नाही ; पण कोंडापूर येथील उत्खननात सापडलेल्या त्याच्या नाण्यांवर ते आढळते. तसेच अंध्रातील पेडाबंकूर येथील नाण्यांवर[३] ते दिसते म्हणून याने अंध्र देश जिंकला होता यात संशय नाही याची अश्व, पर्वत आणि स्वस्तिक चिन्हांकित नाणी अंध्रात सापडली आहेत.

(आ) गौतमीपुत्राचे मुखवटचासहित चांदीचे नाणे[४] — प्राप्तिस्थान — बालपूर (छत्तीसगड). आकार — वाटोळा; व्यास — ·६ इंच; वजन — २७·९ ग्रेन.

पुढील बाजू — राजाचा मुखवटा उजवीकडे; केस कुरळे. समोर लेख —
गोत[मि] —.

मागील बाजू — डावीकडे उज्जैनी चिन्ह ; उजवीकडे सहा टेकडयांचा पर्वत, त्यावर चंद्र, जवळच अस्पष्ट (सूर्याचे?) चिन्ह — दोन्हीमध्ये [अ]रहणष असा लेख. 'अरहण' हा द्राविडी भाषेतील शब्द 'राजा' या अर्थी.

सातवाहनांची चांदीची नाणी अत्यल्प आहेत त्यांपैकी हे एक आहे.

(इ) गौतमीपुत्र सातकर्णीने शिक्का मारलेले चांदीचे नाणे[५] — गौतमीपुत्राने नहपानावर विजय मिळविल्यावर त्याची नाणी परत मागवून त्यांवर आपला शिक्का मारून ती पुनः प्रसारित केली होती. त्यांचा मोठा साठा जोगलतेंभी (नाशिक जिल्हा) येथे सापडला होता.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), pp. 3, 17. *Seminar*, pp. 82 f.

२ *J. N. S. I.*, III, p. 38, पट्टिका २१, आकृति १ ते ७, ११ व १२.

३ Rama Rao, *Sātavāhana Coins in the Andhra Pradesh Governmen[t] Museum*, pp. 34-37.

४ *J. N. S. I.*, XXI, pp. 106 f. पट्टिका २२, आकृति ३६.

५ *J. B. B. R. A. S.*, XXII, pp. 223—243 ; *B. M. C.* (*Andhras*), p. 6[8]

या शिक्क्याच्या बाजू खालीलप्रमाणे —

पुढील बाजू — तीन किंवा सहा टेकड्यांचे – चंद्रासहित किंवा चंद्ररहित – चिन्ह. लेख — 'रञो गोतमिपुतस सिरि-सातकणिस'.

मागील बाजू — चंद्र वर असलेले किंवा त्याविरहित बिंदुसहित वा तद्विरहित उज्जैनी चिन्ह.

(६) वासिष्ठीपुत्र पुळुमावीची नाणी — याची पोटीनची नाणी विदर्भात आणि शिशाची नाणी पश्चिम महाराष्ट्रात तसेच अंध्रातही सापडली आहेत. कांही चांदीचीही अंध्रात सापडली आहेत.

(अ) पुळुमावीचे पोटीनचे नाणे[१]— प्राप्तिस्थान — तऱ्हाळा (विदर्भ). आकार — वाटोळा; व्यास — ·८ इंच; वजन — ४३ ग्रेन.

पुढील बाजू — वर सोंड केलेला हत्ती उजवीकडे. लेख — रणा सिरिपुळुमा [विस*].

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह.

काही नाण्यांवर लेख 'रणा सिवसिरिपुळुमाविस' असा आढळतो. तीही नाणी याचीच होत. सातवाहन राजे 'शिवश्री' हे उपपद विकल्पाने आपल्या नावामागे लावीत असत.

(आ) वासिष्ठीपुत्र पुळुमावीचे शिशाचे नाणे[२] — प्राप्तिस्थान — वाटेगाव (सांगली जिल्हा). आकार — वाटोळा; व्यास — १·२ सें. मी. ; वजन — ८·६० ग्रॅम.

पुढील बाजू — वर सोंड केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख — रञो वासिठिपुतस सिवसिरिपुळुमाविस.

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह.

(इ) वासिष्ठीपुत्र पुळुमावीचे मुखवटचाचे चांदीचे नाणे[३]— प्राप्तिस्थान — हैदराबाद. आकार — वाटोळा; व्यास — ०·७ इंच; वजन — ३० ग्रेन.

पुढील बाजू — उजवीकडे वळलेला राजाचा चेहरा; डोकीवर कुरळे केस किंवा अशा केशांचा टोप; कानात आभरण; डोकीवर समोर राजत्वसूचक मोठा हिरा – सभोवार ब्राह्मी लिपीत — रञो वासिठिपुतस सिरिपुळुमाविस.

---

१ *J. N. S. I.*, III, pp. 39-40. पट्टिका २१, आकृति ८-१४.

२ *L. H. S. I.*, p. 170. पट्टिका २२, आकृति ३७.

३ *J. N. S. I.*, XXXVIII, pp. 12 f. पट्टिका २२, आकृति ३८.

मागील बाजू — मध्यभागी उज्जैनी चिन्ह व पाच टेकड्यांचा पर्वत
खाली नदी. सभोवार द्राविडी भाषेत लेख — अरहणष
वाहिट्टिमाकणष तिरुपुळुमाविष. (हे नाणे राजा वासिष्ठीपुत्र
पुळुमावीचे).

(७) वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णीची नाणी — याची नाणी पश्चिम
महाराष्ट्रात व विदर्भात सापडली आहेत. अंध्रात मात्र ती सापडली
नाहीत.

(अ) स्कन्द सातकर्णीचे पोटिनचे नाणे[१] — (तऱ्हाळा संचय)
आकार — वाटोळा; व्यास — ·६५ इंच; वजन — ६५ ग्रेन.

पुढील बाजू — सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख —
[रणा] सिरि-खद-सातकणिस.

मागील बाजू — उज्जैन चिन्ह.

(आ) वासिष्ठीपुत्र स्कन्दसातकर्णीचे शिशाचे नाणे (वाटेगांव संचय).[२]
आकार — वाटोळा; व्यास — १·१ सें. मी.; वजन — ४·३८० ग्रॅम.

पुढील बाजू — वर सोंड केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख —
रञो वासिठिपुतस सिरि – खद [सातकणिस*].

या राजाच्या मातृनामनिदर्शक विशेषणावरून तो पुळुमावि व सातकर्णि
यांचा सख्खा भाऊ होता असे कळते.

(इ) वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णीचे चांदीचे मुखवटयाचे नाणे[३] —
प्राप्तिस्थान — नाशिक. आकार — वाटोळे; व्यास — ६·५ मि. मी.;
वजन — २८·५ ग्रेन.

पुढील बाजू — उजवीकडे वळलेला राजाचा चेहरा; डोक्यावर कुरळे
केस; कपाळावर पट्टी – मध्यभागी मोठा हिरा; कर्णभूषणे –
लेख — [रञो] · · · · सिरिखदसातकणिस.

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह; सहा टेकड्यांचा पर्वत; वर सूर्य ;
खाली नदी; लेख — · · ·सातकणि[स].

मागील बाजूवरचा लेख तेलुगू भाषेत दिसत नाही. याची नाणी अंध्रात
सापडली नाहीत. आतापर्यंत त्याचे हे एकच चांदीचे नाणे सापडले
आहे.

---

१ *S. I.*, III, pp. 41 f. पट्टिका २१, आकृति १५–१६.

२ *L. H. S. I.*, pp. 171. पट्टिका २३, आकृति ३९.

३ विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७७, पृ. ११५. पट्टिका २३, आकृति ४०.

(८) वासिष्ठीपुत्र सातकर्णीची नाणी —— याची शिशाची नाणी अंध्रात मिळाली आहेत. याच्या मातृनामाचा सदैव उल्लेख केला नसल्यामुळे इतरत्र मिळालेल्या सातकर्णीच्या नाण्यांपैकी काही कदाचित् याची असतील.

(अ) वासिष्ठीपुत्र सातकर्णीचे शिशाचे नाणे[१] —— प्राप्तिस्थान —— अंध्रातील कृष्णा आणि गोदावरी जिल्हे. आकार —— वाटोळा; व्यास —— ·८ इं.; वजन —— ९१ ग्रेन.

पुढील बाजू —— तीन टेकड्यांचा पर्वत; खाली नदी. सभोवार—[रञो वासि]ठिपुतस सिव[सिरि] [सातकणिस*].

मागील बाजू —— दोन दोन वर्तुळांमध्ये बिंदु असलेले उज्जैन चिन्ह.

(आ) वासिष्ठीपुत्र सातकर्णीचे चांदीचे मुखवटयाचे नाणे[२]—— प्राप्तिस्थान —— अज्ञात. आकार —— वाटोळा; व्यास —— ·७ इं.; वजन —— २८ ग्रेन.

पुढील बाजू —— राजाचा चेहरा उजवीकडे; डोकीवर कुरळे केस; समोर हिरा; कानात आभरण—सभोवार लेख —— रञो वासिठिपुतस सिरिसातकणिस.

मागील बाजू —— डावीकडे उज्जैनी चिन्ह; वर चंद्र; उजवीकडे सहा टेकड्यांचा पर्वत—दोन्ही मध्ये चंद्र व सूर्य; खाली नदी. लेख —— अरहणष वाहिट्टिमाकणष तिरुहातकणिष. (हे नाणे राजा वासिष्ठीपुत्र श्रीसातकर्णीचे.)

(९) यज्ञ सातकर्णीची नाणी —— याची हत्ती, पर्वत, अश्व, सिंह, नौका वगैरे विविध चिन्हांची नाणी पश्चिम महाराष्ट्र, अंध्र, विदर्भ, गुजराथ वगैरे प्रदेशांत सापडली आहे. याची नाणी पोटिन, शिसे, तांबे व चांदी या विविध धातूंची आहेत.

(अ) यज्ञ सातकर्णीचे पोटिनचे नाणे.[३] —— प्राप्तिस्थान —— तऱ्हाळा (विदर्भ). आकार —— वाटोळा; व्यास —— ·७ इं.; वजन —— ४३ ग्रेन.

पुढील बाजू —— वर सोंड केलेला हत्ती उजवीकडे; सभोवार लेख —— रञो सिरि—यञ[सातकणिस*].

मागील बाजू —— उज्जैनी चिन्ह.

(आ) यज्ञ सातकर्णीचे शिशाचे नाणे[४] —— प्राप्तिस्थान —— गुंटूर (अन्ध्र). आकार —— वाटोळा; व्यास —— ·८ इं.; वजन —— १२१ ग्रेन.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 29.
२ *J. N. S. I.*, XXI, pp. 9 f. पट्टिका २३, आकृति ४१.
३ *S. I.*, III, pp. 42. पट्टिका २१, आकृति १७ ते २१.
४ *Ibid.*, III, pp. 17 f. पट्टिका २४, आकृति ४३.

पुढील बाजू — दोन शिडांचे जहाज; खाली समुद्रद्योतक मासे व शंख. सभोवार लेख — र[णो] सामिस सिरि – यञ – सातकणिस.

(इ) यज्ञ सातकर्णीचे चांदीचे नाणे[१] — प्राप्तिस्थान — सौराष्ट्र. राजाचा मुखवटा उजवीकडे; डोकीवर शिरस्त्राण; पुढे राजत्वदर्शक हिरा; कानात लोंबणारे कर्णाभरण. सभोवार लेख — रञो गौतमिपुतस सिरियञ – सातकणिस.

मागील बाजू — डावीकडे उज्जैनी चिन्ह; उजवीकडे सहा टेकड्यांचा पर्वत; दोन्हीवर चंद्र, मध्ये सूर्य; खाली नदी. सभोवार लेख — [अरह]णष गोतमिपुतष हिरु – यञ – हातकणिष.

(१०) [माठरीपुत्र] शक सातकर्णीची नाणी —

(अ) पोटीनचे नाणे[२] — प्राप्तिस्थान — तऱ्हाळा. आकार — वाटोळा; व्यास — ·७ इं.; वजन — ३४ ग्रेन.

पुढील बाजू — सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. सभोवती लेख — . . . . सकसा[तकणिस*].

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह.

माढरीपुत्र शकसेनाचा लेख कान्हेरी लेण्यात सापडला आहे. त्याचीच ही नाणी असावी.

(आ) माठरीपुत्र [शकसेनाचे] तांब्याचे नाणे[३] — प्राप्तिस्थान — पेडा-बंकूर (अंध्र). आकार — वाटोळा; व्यास — ·५० इंच; वजन — २३·५ ग्रेन.

पुढील बाजू — खाली सोंड केलेला हत्ती, उजवीकडे तोंड केलेला. सभोवार लेख — [रञो]माठरि–.

मागील बाजू — उज्जैनी चिन्ह.

अंध्रातील या नाण्यांचा आकार अगदी लहान आहे. डॉ. रामरावांचे वाचन येथे दिले आहे. त्यांनी यावर राजाचे फक्त मातृनाम 'माठरि' असे वाचले आहे, ते 'माढरि' असावे.

(११) विजय सातकर्णीची नाणी —

(अ) पोटीनचे नाणे[४] — प्राप्तिस्थान — तऱ्हाळा (विदर्भ). आकार — वाटोळा; व्यास — ·६८ इंच; वजन — ३१ ग्रेन.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 45. पट्टिका २३, आकृति ४२.

२ *S. I.*, III, p. 44, पट्टिका २१, आकृति २९.

३ Rama Rao, *Sātavāhana Coins in the Andhra Pradesh Government Museum*, No. 311.

४ *S. I.*, III, p. 42 f. पट्टिका २१, आकृति २२.

पुढील बाजू —— सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख ——
......[ज]य सातकणि[स*].

मागील बाजू —— उज्जैनी चिन्ह.

याचे एक नाणे चांदा संचयात होते. याचा शिलालेख अंध्रात सापडला आहे. याने विजयपुरी (नागार्जुनकोंड) स्थापून तेथे राजधानी केली होती. याचे लेख किंवा नाणी पश्चिम महाराष्ट्रात सापडली नाहीत.

(आ) विजय सातकर्णीचे पोटीनचे नाणे[१] —— प्राप्तिस्थान —— हैदराबाद (अंध्र). पोटीनचे; आकार —— वाटोळा; व्यास —— ·८ इंच; वजन —— ·९२ ग्रेन.

पुढील बाजू —— तीन टेकडयांचा पर्वत; खाली नदी; सभोवार लेख ——
विजयसातकणिस.

मागील बाजू —— बिंदुसहित उज्जैनी चिन्ह. वर चंद्र; सभोवार अस्पष्ट
[सातकणिस].

(१२) वासिष्ठीपुत्र चंद्रस्वातीचे शिशाचे नाणे[२] —— प्राप्तिस्थान —— कृष्णा व गोदावरी जिल्हे.

पुढील बाजू —— तीन टेकडयांचा पर्वत; खाली नदी. सभोवार लेख ——
'रञो वासिठिपुतस सिरिचदसातिस'.

मागील बाजू —— मध्ये बिंदु असलेल्या दोन दोन वर्तुळांचे उज्जैनी चिन्ह.

(१३) तृतीय पुळुमावीचे पोटीनचे नाणे[३] —— (तऱ्हाळे संचय). आकार —— वाटोळा; व्यास —— ·६५ इं.; वजन —— ४०·५ ग्रेन.

पुढील बाजू —— सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. सभोवार लेख ——
पुळहाम[वि*].

हा सातवाहन कुळातील शेवटचा राजा. याचे नाव पूर्वीच्या तन्नामक राजांच्या नावाहून किंचित् भिन्न आहे. याचा शिलालेख बेल्लारी जिल्ह्यातील अडोणी येथे मिळाला आहे.

याशिवाय कुंभ सातकर्णि आणि कर्ण सातकर्णि यांची पोटिनची पूर्वोक्त प्रकाराची नाणी तऱ्हाळे संचयात होती.[४] त्यांची नाणी इतरत्र सापडली नाहीत.

---

१ *J. N. S. I.*, XXI, p. 68. २ *B. M. C. (Andhras)*, pp. 30-31.

३ *S. I.*, III, p. 45. पट्टिका २१, आकृति ३१.

४ *J. N. S. I.*, III, pp. 43-44. पट्टिका २१, आकृति अनुक्रमे २४–२५ आणि २६–२८ पाहा.

याशिवाय हैदराबादेत सेबक राजाचे तांब्याचे वृषभांकित नाणे सापडले आहे.[१] तो राजा बराच प्राचीन दिसतो. त्याच्या प्रकाशशिव सेबक नामक[२] वंशजाचे अश्वांकित शिशाचे नाणे तेथेच मिळाले आहे. हे राजे सातवाहन काळात दक्षिणेत राज्य करीत होते यात संशय नाही, पण ते स्वतंत्र होते की मांडलिक होते हे कळण्यास मार्ग नाही. काही मांडलिकही स्वतःच्या नावे नाणी पाडीत असत. तशा काही नाण्यांचे आता वर्णन करू.

## मांडलिकांची नाणी

### कुर राजांची शिशाची नाणी (कोल्हापूर येथील)

कोल्हापूरचे उपनगर ब्रम्हपुरी येथे जवळच्या पंचगंगा नदीचा पूल बांधण्याच्या वेळी, सन १८८४ मध्ये, कांही शिशाच्या व तांब्याच्या नाण्यांचा संचय सापडला होता. त्यांतील काही नंतरच्या त्याच राजांच्या उत्तराधिकाऱ्यांनी पुनः टंकित केलेली आढळली होती. त्यावरून या राजांचा पुढील कालक्रम निश्चित करण्यात आला —

(१) वासिष्ठीपुत्र विळिवायकुर
(२) माठरीपुत्र शिवलकुर
(३) गौतमीपुत्र विळिवायकुर.

ही नाणी डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांनी तपासली होती. रॅप्सनने त्यांचा अंतर्भाव ब्रिटिश म्यूझियममधील नाण्यांच्या कॅटलॉग मध्ये केला होता. या राजांचा सातवाहन राजांशी कसा संबंध होता याविषयी विद्वानांनी भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत. रॅप्सनने पूर्वोक्त तिसऱ्या राजाचे गौतमीपुत्र हे उपपद पाहून तो गौतमीपुत्र सातकर्णि असावा असे प्रतिपादिले होते. पण या मताशी इतर दोन राजनामे जुळत नाहीत. वास्तविक हे राजे सातवाहन-वंशी नसून कुरवंशी होते. ते स्वतंत्र नव्हते तर सामन्त दर्जाचे होते हे पुढे माठरीपुत्र शिवलकुराच्या नाण्यांवरील 'महारठि' या पदवीवरून दाखविले आहे. या संदर्भात लक्षणीय गोष्ट ही की टॉलेमी हा ग्रीक प्रवासी (सन १४०) सांगतो की आपल्या काळी बैठन (पैठण) येथे सिरो पोलेमाइओस आणि हिप्पोकूर येथे बॅलिआकूरस राज्य करीत होते. पहिला उल्लेख पैठण येथील पुळुमावीचा आहे. हिप्पोकूर याने कोणते स्थळ विवक्षित होते ते सांगता

१ *S. I.*, III, pp. 19 f.
२ *Ibid.*, III, pp. 52 f.

येत नाही, पण बॅलिआकूरस हे विळिवायकूर होय यात संशय नाही. तेव्हा वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळी विळिवायकुर हा कुरवंशी राजा कोल्हापूर येथे राज्य करीत होता असे दिसते. पुढे पुळुमावीने कुन्तल देश जिंकल्यावर त्याचे राज्य खालसा केले असावे. तो कुरवंशी राजा त्या घराण्यातला शेवटचा गौतमीपुत्र विळिवायकुर असावा असे अनुमान करता येते.

(१४) वासिष्ठीपुत्र विळिवायकुराचे शिशाचे नाणे[१]— प्राप्तिस्थान — कोल्हापूर; आकार— वाटोळा; व्यास — १·२ इं.; वजन — २४२·२ ग्रेन.

पुढील बाजू — चार टेकड्यांचा पर्वत; वर चन्द्र; डावीकडे कठड्यात वृक्ष; वर स्वस्तिक.

मागील बाजू — वर टोक असलेला बाण लावलेले धनुष्य. सभोवार लेख— 'रञो वासिठिपुतस विळिवायकुरस'.

(१५) माठरीपुत्र शिवलकुराचे शिशाचे नाणे[२] — आकार व व्यास वरील प्रमाणे; वजन — १९० ग्रेन.

मागील बाजूवरील लेख — 'रञो माढरिपुतस सिवलकुरस'.

(आ) प्रा. कुंदनगार यांनी प्रकाशित केलेले नाणे[३] — प्राप्तिस्थान — कोल्हापूर; लेख — 'महारठिस माढरिपुतस सिवलकुरस'.

यातील 'महारठिस' हे उपपद लक्षणीय आहे.

(इ) गौतमीपुत्र विळिवायकुराचे शिशाचे नाणे[४] — प्राप्तिस्थान — कोल्हापूर; आकार — वाटोळा; व्यास — १·१५ इंच; वजन — १६४·६ ग्रेन.

पुढील व मागील बाजूवर आकृत्या वरीलप्रमाणे; लेख — 'रञो गोतमिपुतस विळिवायकुरस'.

हा विळिवायकुर पैठणच्या वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा समकालीन दिसतो.

## महिषवंशी सामन्तांची नाणी

(१६) शकवंशी मानराजाची नाणी — पूर्वीच्या हैदराबाद संस्थानात कोंडापूर येथील उत्खननात मान राजाची शिशाची व तांब्याची नाणी सापडली होती. त्यांपैकी एक येथे घेतले आहे —

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 5.

२ *Ibid.*, p. 7. पट्टिका २४, आकृति ४४.

३ पट्टिका २४, आकृति ४५.

४ *B. M. C.* (*Andhras*), p. 13.

(अ) भरद्वाजपुत्र शकवंशी महासेनापति मान याचे शिशाचे नाणे[१]— प्राप्तिस्थान — कोंडापूर येथील उत्खनन; आकार — वाटोळा; व्यास — ·९ इंच; वजन — १३५ ग्रेन.

पुढील बाजू— मध्यभागी मोठ्या आकाराचे स्वस्तिक; सभोवार लेख —
महासेनापतिस भरदजपुतस सगमानचुटुकुलस.

मागील बाजू — वज्र व खाली टोक केलेला बाण.

मागील चिन्हांवरून हा मान राजा नहपानाचा वंशज दिसतो, कारण क्षहरात क्षत्रपांच्या सर्व नाण्यांवर — वज्र व खाली टोक केलेला बाण ही चिन्हे आढळतात. तो आपणांस शक म्हणवतो. त्याचे ‘चुटुकुल’ हे उपपद त्याचा ‘चुटुकुलानंद’ राजांशी कालक्रमसंबंध दाखवते.

नहपानाच्या उच्छेदानंतर त्याचा वंशज मान निसटून दक्षिणेत (कुन्तल देशात) आला आणि त्याने लौकरच आपला जम बसविलेला दिसतो. त्याने या नाण्यांवर आपली ‘महासेनापति’ पदवी उल्लेखिली आहे. त्यावरून त्याने स्वकालीन सातवाहनाचे (पुळुमावीचे) स्वामित्व कबूल केले असावे.

(आ) शकवंशी महिषनृपति मान राजाची दोन तांब्याची नाणी[२] (हैदराबाद येथील).

ही नाणी श्री. हुरमुज कौस यांनी हैदराबादेत मिळविली होती.

(आ–१)[३] आकार—चौकोनी; १ इं. × ·९ इं.; वजन—१३० ग्रेन.

पुढील बाजू — सोंड वर केलेला हत्ती उजवीकडे. लेख — ‘[रंञो स*]
ग–मानमहसस.’

मागील बाजू — बिंदुसहित दोन-दोन वर्तुळांचे उज्जैनी चिन्ह. त्याच्या
वर्तुळांबाहेर स्वस्तिक चिन्ह.

(आ–२)[४] हे नाणे पूर्वीसारखेच पण लहान आकाराचे व जास्त वजनाचे आहे. याच्या चौकोनाच्या बाजू ·९५ इं. × ·७५ इं.; वजन — १८० ग्रेन.

यावरील लेख ‘रंञो सगमान[म]–’. दोन्ही नाण्यांवरील लेख जुळविल्यावर या प्रकारच्या नाण्यांवरील पूर्ण लेख — ‘रंञो सगमानमहसस’ असा होतो. त्याचा अर्थ ‘हे नाणे राजा शक मान महिषाचे’ असा होतो. या मानाने कालान्तराने ‘महासेनापति’ पदवी टाकून ‘राज’ पदवी धारण केली होती. तो ज्या माहिषक देशावर राज्य करीत होता तो कोंडापूरजवळचा प्रदेश

१ *S. I.*, III, pp. 65 f. पट्टिका २५, आकृति ४६.
२ *Ibid.*, III, pp. 56 f.
३ *Ibid.*, III. pp. 56 f. पट्टिका २५, आकृति ४७.
४ *Ibid.*, III, pp. 56 f. पट्टिका २५, आकृति ४८.

होता हे आता गुंटुपल्ली येथे आढळलेल्या सद राजाच्या स्तंभ लेखांवरून निश्चित झाले आहे. तो बराच बलाढ्य असावा, कारण, त्याचे नाव पुराणांतील वंशावळीत पुढील प्रमाणे येते —

**शकमानोऽभवद्राजा महिषाणां महीपतिः ।।**

[महिष देशाचा राजा शकवंशी मान होऊन गेला.]

(१७) यश महिषाचे शिशाचे नाणे[१] (मस्की येथील) — प्राप्तिस्थान — हे नाणे रायचूर जिल्ह्याच्या लिंगसूर तालुक्यात सापडले होते.

आकार — वाटोळा; व्यास — १·३५ इं.; वजन — २१० ग्रेन.

पुढील बाजू — अश्व उजवीकडे; वर स्वस्तिक चिन्ह व कठड्यात वृक्ष. सभोवार खंडित लेख — [सिरि] . . . यसस महस[स* ].

मागील बाजू — दहा टेकड्यांचा पर्वत; वर चन्द्र व दोन्हीकडे ब्राह्मी अक्षर 'ग'. ही सर्व डबल रेषेच्या चौकोनात.

हा राजा मान महिषाचा वंशज दिसतो.

(१८) शिवल महिषाचे शिशाचे नाणे[२]— प्राप्तिस्थान — हैदराबाद. हे नाणे श्री. हुरमुज कौस यांच्या संग्रहातील आहे.

शिशाचे; आकार — वाटोळा; व्यास — ·८५ इंच; वजन — १५४ ग्रेन.

पुढील बाजू— मध्ये अर्धचंद्राकृति. सभोवार लेख— सिवलस मह[सस*].

मागील बाजू— बिंदुसहित सहा टेकड्यांचा पर्वत; वर अर्धचंद्र. सभोवार डबल रेषेचा चौकोन.

(१९) चुटुकुलानंदाचे शिशाचे नाणे[३]— प्राप्तिस्थान — कारवार.

हे नाणे उत्तर कारवार जिल्ह्यातील चुटुकुलानंद नामक राजाचे आहे. शकमान राजाने 'चुटुकुल' उपपद धारण केले होते. तेव्हा हा राजा आरंभी त्याचा सामंत असावा.

शिशाचे; आकार — वाटोळा; व्यास — १·१५ इं.; वजन — २१०·४ ग्रेन.

पुढील बाजू — सात टेकड्यांचा पर्वत. सभोवार मोठी कमान. लेख — [र]ञो चुटुकुलानंदस.

---

१ *S. I.*, III, pp. 72 f.

२ *Ibid.*, III, pp. 74 f.

३ *B. M. C.* (*Andhras*), p. 59.

मागील वाजू — मध्यभागी कठड्यात वृक्ष; डावीकडे स्वस्तिकावर नंदीपद; उजवीकडे तिकोनी ध्वजावर डवल 'य' अक्षराचे चिन्ह.

अशीच मुळानंदाची नाणी याच जिल्ह्यात सापडली आहेत.

## क्षहरात क्षत्रपांची नाणी

(२०) भूमकाचे तांब्याचे नाणे (गुजराथ, काठेवाड व माळव यांतील). तांब्याचे; आकार — वाटोळा; व्यास — ·८ इंच; वजन — ६९·८ ग्रेन.

पुढील वाजू — वर टोक केलेला वाण व वज्र; दोन्हीमध्ये बिंदु. सभोवार खरोष्ठी लिपीत लेख — छहरातस छत्रपस भूमकस.

मागील वाजू — पंजा उभारलेला सिंह व धर्मचक्र; खाली स्तंभ. सभोवार ब्राह्मी लिपीतील लेख — 'क्षहरा[तस क्षत्र]पस भूमकस'.

याने नहपानाप्रमाणे 'राजन्' पदवी धारण केलेली दिसत नाही.

(२१) नहपानाचे चांदीचे नाणे[२] — (गुजराथ, काठेवाड व माळव येथील); आकार — वाटोळा; व्यास — ·६५ इंच; वजन — ३१·९ ग्रेन

पुढील बाजू — राजाचा मुखवटा उजवीकडे. सभोवार खरोष्ठी लेख — 'रञो छहरातस नहपानस'.

मागील वाजू — खाली टोक केलेला वाण व वज्र; दोन्ही मध्ये बिंदु सभोवार ब्राह्मी लिपीत लेख — राज्ञो क्षहरातस नहपानस.

नाशिक जिल्ह्यातील जोगलतेंभी येथे याच्या १३,२५० चांदीच्या नाण्यांचा मोठा संचय सापडला होता. त्यातील दोन-तृतीयांशापेक्षा जास्त नाण्यांवर गौतमीपुत्र सातकर्णीने आपले छाप मारले होते. नाण्यांवरचे मुखवटे भिन्न भिन्न प्रकारचे आहेत. ते एकाच व्यक्तीचे नाहीत. तथापि त्यावरून ती नाणी नहपानाच्या वंशजांनी पाडली होती असे अनुमान काढणे चुकीचे ठरेल.

नहपानाने काही तांब्याची नाणीही पाडली होती.[३] त्यांच्या पुढील वाजूवर वज्र व खाली टोक केलेला वाण आणि ब्राह्मी लिपीत लेख आणि मागील बाजूवर कुंपणात वृक्ष – चिन्ह असते.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 63.

२ *Ibid.*, p. 65; पट्टिका २६, आकृति ४९.

३ *Ibid.*, p. 67.

## कार्दमक क्षत्रपांची नाणी

(२२) चष्टनाचे चांदीचे नाणे[१] — आकार — वाटोळा; व्यास — ·६ इंच; वजन — २८·५ ग्रेन.

पुढील बाजू — राजाचा मुखवटा; ग्रीक लिपीत लेख.

मागील बाजू — चन्द्र आणि सूर्य. ब्राह्मी लिपीतील लेख — राज्ञो क्षत्रपस य्सामोतिकपुत्रस . . . ।

काही चांदीच्या नाण्यांवर त्याची महाक्षत्रप पदवी उल्लेखिली आहे. काहींवर चष्टनस हे राजनाम खरोष्ठीतही आढळते. चष्टनाचे एक तांब्याचे नाणेही मिळाले आहे.[२]

याच्या वंशजांनी — पुढील बाजूवर आपला मुखवटा आणि मागील बाजूवर मध्ये पर्वत, खाली नदी, दोन बाजूस चंद्र व सूर्य व सभोवती लेख — अशी नाणी दीर्घकाल प्रचलित केली. त्यांवरील लेखांत त्या त्या राजाच्या पित्याचे नाव व पदवी आणि स्वतःचे नाव व पदवी यांचा उल्लेख असतो. दामजदश्रीचा पुत्र जीवदामन् याच्या कारकीर्दीपासून या नाण्यांवर शक संवताचे वर्ष संख्या — चिन्हांनी मुखवट्याच्या डोक्यामागे दाखविले असते. त्यावरून त्या क्षत्रपाचा राज्यकाल माहीत होतो. क्षत्रपांचे फारच थोडे कोरीव लेख सापडले आहेत. पण त्यांची अशी मुबलक चांदीची नाणी सापडली असल्याने त्यांवरून त्यांचा इतिहास जुळवता आला आहे.

या क्षत्रपांच्या सारखी नाणी महाक्षत्रप ईश्वरदत्त याने आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या, दुसऱ्या व चौथ्या वर्षी पाडली होती ती कांही संचयांत व इतरत्र सापडली आहेत. अलीकडे इंदूर येथे सापडलेल्या एका नाण्यावर शक संवताचे वर्ष १५४ हे स्पष्टपणे दिसले आहे. त्यापूर्वी हा ईश्वरदत्त केव्हा होऊन गेला याविषयी विविध तर्क केले गेले होते. भगवानलाल इंद्रजींनी हा ईश्वरदत्त क्षत्रप विजयसेन याचा शक संवत् १७० नंतर पराभव करून गादीवर आला असावा व त्यानेच सन २४८–४९ चा कलचुरि संवत् स्थापला असावा असे प्रतिपादिले होते. पण नंतर या काळात क्षत्रपांच्या कारकीर्दीत खंड पडला नसल्याचे आढळून आले. रॅप्सनने ईश्वरदत्त शक संवत् १५८ व १६१ मधील कालात होऊन गेला असावा असे म्हटले. पण सर्वाणिया नाणक संचयावरून त्या काळीही शकवर्षांत खंड पडलेला आढळत नाही. हा ईश्वरदत्त आभीर होता यालाही पुरावा नाही. त्याच्या नाण्यांवर महाक्षत्रप पदवी असल्यामुळे त्याने भूमक, नहपान, चष्टन इत्यादिकांप्रमाणे स्वकालीन कुषाण राजाचे स्वामित्व स्वीकारले होते असे दिसते.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. 72; पट्टिका २६, आकृति ५०.

२ *J. N. S. I.*, XXI, pp. 153 f.

यापूर्वी सापडलेल्या त्याच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर शक संवताची १५१ व १५२ ही वर्षे अनुक्रमे १००, ५० आणि १ आणि १००, ५० आणि २ या चिन्हांनी दर्शविली होती. पण ती यापूर्वी वाचली गेली नव्हती. रॅप्सनने फक्त १ व २ या संख्या आडव्या रेषांनी दाखविल्या आहेत असे म्हटले होते. ती त्याच्या कारकीर्दीची वर्षे असून तीच त्या नाण्यांच्या मागील बाजूवर 'वर्षे प्रथमे' आणि 'वर्षे द्वितीये' या शब्दांनी दर्शविली होती असे त्याचे मत होते. आता त्याने प्रसिद्ध केलेल्या काही नाण्यांच्या फोटोंवर '१' व '२' या चिन्हांपूर्वी '५०' चे चिन्ह वाचता येते. ईश्वरदत्ताचे इंदूरचे नाणे येथे वर्णिले आहे.

महाक्षत्रप ईश्वरदत्ताचे चांदीचे नाणे[१] — प्राप्तिस्थान — इंदूर. चांदीचे; आकार — वाटोळा.

पुढील बाजू — राजाचा मुखवटा उजवीकडे; गळ्यात रत्नहार; कानामागे — (शक संवताचे वर्ष) १५४ चिन्हांनी दर्शविलेले.

मागील बाजू — अस्पष्ट पर्वताभोवती लेख —' [महा]क्षत्रपस ईश्वरदत्तस. वर्षे च[तु]. . '

शक संवत् १५४ (सन २३२–३३) हे वर्ष ईश्वरदत्ताच्या कारकीर्दीचे चौथे होते. तेव्हा तो सन २२९–३० मध्ये गादीवर आला असावा. हे वर्ष सातवाहनांच्या महाराष्ट्रातील राज्यसमाप्तीचे दिसते.

चष्टनाचा वंश भर्तृदामन्पुत्र विश्वसेन (शेवटचे ज्ञात वर्ष शक संवत् २२६ = सन ३०४) याच्यापर्यंत टिकला. पुढे स्वामी जीवदामन्चा पुत्र स्वामी रुद्रदामन् हा गादीवर आला. त्याचा शेवटचा ज्ञात वंशज स्वामी तृतीय रुद्रसिंह याचे शक संवत् ३१(क्ष) (= सन ३८८ + क्ष) या वर्षाचे नाणे मिळाले आहे. त्याचा उच्छेद करून गुप्त सम्राट् द्वितीय चंद्रगुप्ताने माळवा, गुजराथ व काठेवाड हे प्रदेश आपल्या राज्यास जोडले.

पश्चिमी क्षत्रपांची चांदीची द्रम्म नाणी विस्तृत प्रदेशात प्रचारात होती. पश्चिम महाराष्ट्राचे आभीर आणि विदर्भाचे वाकाटक यांची स्वतःची नाणी नसल्यामुळे त्यांच्या राज्यांत क्षत्रपांची नाणी प्रचलित होती. त्यांचे काही संचय व अनेक क्षत्रपांची फुटकळ नाणीही विदर्भात सापडली आहेत. महाराष्ट्र, गुजराथ वगैरे प्रदेशांतही क्षत्रपांच्या नाण्यांचे संचय सापडले आहेत. एक संचय कऱ्हाडला सापडला होता त्यावरून डॉ. अळतेकरांनी तो कोणा करहाटक ब्राह्मणाच्या दक्षिणेचा भाग असावा असे अनुमान केले होते. पण ते बरोबर नाही. कारण नुकताच रांजणगांव (पुणे जिल्हा) येथेही क्षत्रपांच्या नाण्यांचा बराच मोठा संचय सापडला आहे.

---

१ मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक १९७६. पट्टिका २६, आकृति ५१.

## प्रकरण नववे

# १. कोरीव लेखांची भाषा

मागील एका प्रकरणात म्हटल्याप्रमाणे सातवाहन-क्षत्रपांच्या कालात समाजाच्या उच्च थरांतील लोकांमध्येही संस्कृत भाषा प्रचारात नव्हती. आर्य लोक भारतात आले तेव्हा त्यांची भाषा वैदिक पद्धतीची संस्कृत होती यात संशय नाही. पण तिच्यातील क्रियापदांचे दहा प्रकार, तीन भूतकाळ, दोन भविष्यकाळ, नामसर्वनामांची विविध प्रकारांची विभक्ति – प्रत्ययान्त रूपे इत्यादि वारकावे त्यांच्याशी व्यवहारात संबंध आलेल्या आर्येतरांना पेलणे शक्य नव्हते. त्यामुळे त्यांच्या बोलण्यातील संस्कृत भाषेत परिवर्तन होऊन प्राकृत भाषा अस्तित्वात आल्या. आर्यांनाही त्यांच्याशी व्यवहारात त्यांचा उपयोग करावा लागला. ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकात गौतम बुद्ध व वर्धमान महावीर यांनी आपापल्या धर्मप्रसाराकरिता तत्कालीन जानपद भाषांचा उपयोग केला होता. अशोकानेही अफगाणिस्तानापासून मैसूरपर्यंत पसरलेल्या आपल्या विस्तृत साम्राज्यातील प्रजाजनांना उद्देशून काढलेले आपले आदेश तत्कालीन जानपद भाषेतच आहेत. अशोकानंतर उदयास आलेल्या सातवाहनांनीही तोच मार्ग अवलंबिला असला तर नवल नाही.

सातवाहनांनी वैदिक धर्माचा पुरस्कार करून अनेक श्रौत याग केले, तरी त्यांचे वर्णन त्यांनी संस्कृतात न करता प्राकृतातच केले आहे. त्यांचा एकही लेख संस्कृतात नाही. त्यांच्या काळी त्यांच्या प्रदेशावर आक्रमण करून राज्य स्थापणाऱ्या क्षहरात क्षत्रपांचे लेखही प्राकृतातच आहेत, पण त्यांतील भाषेवर संस्कृताचा प्रभाव जाणवतो. क्षहरात – राज्य – संस्थापक नहपानाचा जामात ऋषभदत्त याने मध्य भारतात उत्तमभद्रांच्या प्रदेशावर स्वारी करणाऱ्या मालव गणाच्या लोकांचा पराजय केला. नंतर अजमेरजवळच्या पुष्कर क्षेत्री जाऊन स्नान केले आणि गोसहस्रदान व ग्रामदान केले. त्यांचे वर्णन त्याने कोरविलेल्या नाशिक येथील क्रमांक १० च्या लेण्यातील लेखात केले आहे. ते प्रथम पुरुषी आहे. तेव्हा त्यातील शब्द त्याचे स्वतःचे आहेत यात संशय नाही. ते पुढील प्रमाणे आहेत :—

> भटारका-अंञातिया च गतोस्मि वर्षारतुं मालयेहि रुधं उतमभाद्रं मोचयितुं [।*] ते च मालया प्रनादेनेव अपयाता उतमभद्रकानं च क्षत्रियानं सर्वे परिग्रहा कृता [।*] ततोस्मि गतो पोक्षरानि [।*] तत्र च मया अभिसेको कृतो त्रीणि च गोसहस्रानि दतानि गामो च [।*].

ऋषभदत्ताचे हे शब्द प्राकृतात आहेत खरे, पण त्यांतील काही शब्दांवरील संस्कृताचा प्रभाव स्पष्ट आहे. उदाहरणार्थ, गतोस्मि, क्षत्रियानं, परिग्रहा, कृता, त्रीणि, मया पाहा. माळवा – काठेवाडातील क्षत्रपांनी तर संस्कृतचा जास्तच पुरस्कार केलेला आढळतो. प्रथम रुद्रदामन्‌चा जुनागड येथील प्रस्तरलेख शुद्ध व सुंदर संस्कृतमध्ये गौडी शैलीत लिहिला आहे. त्याच्या राज्यातील संस्कृतचा प्रचार अनेक लेखांवरून स्पष्ट दिसतो. त्याची कन्या वासिष्ठीपुत्र सातकर्णीला दिली होती. जुनागड येथील प्रस्तर-लेखावरून त्यानें सातवाहनांकडून अपरान्त (उत्तर कोंकण) जिंकून घेतला होता असे कळते. तो त्यानें आपल्या जावयास दिलेला दिसतो. तेथे कान्हेरीच्या लेण्यात त्याच्या मुलीच्या अमात्याचा लहानसा लेख कोरला आहे तो संस्कृतात आहे. त्यात फक्त 'श्रीसातकर्णिस्य' एवढेच अशुद्ध रूप आले आहे. माळवा-काठेवाडांत कार्दमक क्षत्रपांच्या प्रजाजनांचे अनेक यष्टिलेख सापडले आहेत. त्यांपैकी बहुतेक संस्कृतात आहेत.[१] त्यांत एखाददुसराच शब्द प्राकृतात आढळतो. सातवाहनांच्या लेखांच्या आरंभी तत्कालीन राजाचा उल्लेख करताना 'रणो', 'रञो', 'राञो' असे शब्द आढळतात तर या कार्दमक क्षत्रपांच्या बहुतेक लेखांत व नाण्यांवर 'राज्ञो' असे रूप आढळते यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. या संस्कृत भाषेविषयी जास्त चर्चा करण्याची जरूरी नाही. सातवाहनांच्या लेखांतील प्राकृत भाषेविषयी मात्र विवेचन केले पाहिजे.

सुबोधता आणि उच्चारसौकर्य यांकरिता प्राकृत भाषांचा उद्‌गम झाला हे मागे सांगितले. ती त्यांनी पुढील प्रकारांनी साध्य केली: (१) नाम-सर्वनामांची व क्रियापदांची द्विवचनी रूपे गाळली. (२) चतुर्थी विभक्तीची रूपे क्वचितच योजिली. (३) शब्दांच्या शेवटच्या व्यंजनास अ जोडून व्यञ्जनान्त शब्द स्वरान्त केले. उदाहरणार्थ, 'श्रीमान्', याचे प्रथमान्त रूप सिरिमातो (सिमुको), 'महिमावताम्' या अर्थी 'महिमावतानं' ही रूपे पाहा. यत्, तत्, एतत् ही सर्वनामे अकारान्त करून नंतर त्यांना विभक्ति प्रत्यय लावण्यात आले. 'य', 'त', 'एत', 'एतस' इत्यादि रूपे पाहा. क्रियापदांची स्वार्थी, आज्ञार्थी व विध्यर्थी, आणि वर्तमान व भविष्य या काळांची रूपे वगळून इतर लकार वर्ज्य केले. (५) भूतकाळाच्या रूपांऐवजी भूतकालवाचक धातुसाधितांचा ('कत', 'गत', 'दत' इत्यादिकांचा) उपयोग करण्याचा प्रघात पाडला. हे सर्व प्रकार प्रस्तुत संग्रहातील लेखांत आढळतात.

प्राकृतात उच्चारसौकर्यासाठी संयुक्त व्यञ्जनाऐवजी त्यातील एकाचे द्वित्व करण्यात येते. उदाहरणार्थ, 'पुत्रः' याच्या ऐवजी 'पुत्तो' असे रूप

---

१ क्र. ५२, ५५, ५६, ६१ इ. पाहा.

योजिले जाते. पण प्रस्तुत संग्रहातील लेखांत अशी द्वित्त व्यंजनांची उदाहरणे आढळत नाहीत. उदाहरणार्थ, 'गोतमिपुतस' पाहा. त्या काळी संयुक्त व्यंजनांचा अगदीच प्रचार नव्हता असे नाही. कारण 'कन्हे', 'विण्हुपालित' अशी रूपे तत्कालीन लेखांत योजिलेली आढळतात. मग द्वित्त व्यंजने का दिसत नाहीत, असा प्रश्न उपस्थित होतो. यावर 'एकेरी व्यंजन योजिले असले तरी त्याचा उच्चार द्वित्तासारखा करण्यात येत असे', असे कांहींचे म्हणणे आहे, पण ते पटत नाही. ती लिहिली आहेत तशीच उच्चारली जात असावी.[१]

प्राकृत लेखांतील शब्दांचे तत्सम, तद्भव व देशी असे विभाग पडतात. त्यांपैकी तत्सम किंवा शुद्ध संस्कृत शब्द तत्कालीन प्राकृत लेखांत फारसे योजिलेले आढळत नाहीत. देशी किंवा संस्कृतातून न आलेले आणि जनसामान्यांच्या बोलीतून घेतलेले, 'अवियेन' सारखे शब्द तर अत्यल्प आहेत. मुख्य भरणा तद्भव शब्दांचा व त्यांच्या रूपांचा आहे. त्यांतील छवत (ऋक्षवत्) सारखे शब्द इतके बदलले आहेत की त्यांची मूळ संस्कृत रूपे सहज ओळखता येत नाहीत. त्यांचे सर्वसंग्राहक विवेचन येथे करणे शक्य व आवश्यकही नाही. जिज्ञासूंना ते डॉ. एम. ए. मेहेंदळे यांच्या 'प्राकृत कोरीव लेखांचे ऐतिहासिक व्याकरण' या इंग्रजी ग्रंथात[२] आढळेल. येथे त्यांचा फक्त परिचय करून देणें शक्य आहे.[३]

## सन्धि

प्राकृतातील वाक्यांत दोन शब्दांमधील स्वर जवळ जवळ आले तरी त्यांचा संधि होत नाही. पण या नियमाला 'अपि' आणि 'इति' यांचा अपवाद आहे. अशा प्रसंगी त्यांच्या आरंभीच्या स्वराचा लोप होतो. 'कितापराधे पि' आणि 'चरित्रतो ति' पाहा.

---

१ तशी द्वित्त व्यंजने सातवाहनानंतर उदयास आलेल्या इक्ष्वाकूंच्या प्राकृत लेखांतही आढळत नाहीत. ए. इं. २०, पृ. १६ इ. पाहा. पण वाकाटकांच्या वाशीम ताम्रपटाच्या प्राकृत भागात मात्र ती आढळतात. वा. नृ. का., पृ. ३३४ इ. पाहा.

२ M. A. Mehendale, *Historical Grammar of Inscriptional Prakrits*, pp. 46 f.

३ या पुढील उदाहरणांचे संदर्भ शेवटी जोडलेल्या शब्दसूचीत दिले आहे.

## प्राकृत वर्णप्रक्रिया

### (१) स्वरप्रक्रिया --

| संस्कृत शब्दातील स्वर | प्राकृतातील रूप | उदाहरण |
|---|---|---|
| ऋ | अ | कृता > कटा |
| | इ | सदृश- > सदिस- |
| | उ | ऋतुकाले > उतुकाले |
| | [लोप] | ऋक्षवत्- > छवत- |
| ऐ | ए | शैल- > सेल- |
| औ | ओ | गौल्मिक > गोमिक |
| अय | ए | लयण > लेण |
| अव | ओ | लवण > लोण |
| अ | आ | अनुवर्षम् > अनुवासं |
| अ | इ | सुदर्शना > सुदिसणा |
| इ | ई | इंद्रस्य > ईदस |
| | उ | दुहितुः > दुहुतुय |
| | ए | विष्णुनन्दिनः > वेण्हुनंदिस |
| ई | इ | गौतमीपुत्रस्य > गोतमिपुतस |
| उ | ऊ | भुक्तं > भूतं |
| | ई | दुहितुः > दीहितु |
| | ओ | पुष्करम् > पोक्षरानि |
| ऊ | उ | पूर्वमार्गे > पुवमगे |

### (२) व्यञ्जन-प्रक्रिया —

| संस्कृत शब्दातील व्यञ्जन | प्राकृतातील रूप | उदाहरण |
|---|---|---|
| क् | ग् | नालिकेर- > नालिगेर- |
| ग् | य् | नागनिकायाः > नायनिकाय |
| च् | ज् | पिशाचीपद्रक > पिसाजिपदक |
| ज् | य् | राजामात्य > रायामच- |
| ट् | ड् | कुटुंबिन्या > कुडुबिनिय |
| ठ् | ढ् | माठरीपुत्रस्य > माढरिपुतस |
| ड् | ळ | गरुड > गरुळ |
| ण | न् | वरुण- > वरुन- |

(२) व्यञ्जन-प्रक्रिया — चालू

| संस्कृत शब्दातील व्यञ्जन | प्राकृतातील रूप | उदाहरण |
|---|---|---|
| त् | द् | सातवाहन– > सादवाहन– |
| प् | व् | प्रपा > पुवा |
| भ् | व | ऋषभदत्तेन > उषवदातेन |
| य् | ज् | भार्यायाः > भरिजाय |

संयुक्त व्यञ्जने —

| | | |
|---|---|---|
| स्क् | ख् | स्कन्दसातकर्णेः > खदसातकणिस |
| ष्ट् | ठ् | यष्टिः > लठि |
| स्त् | थ् | वास्तव्य > वाथव |
| त्य् | च् | अमात्येन > अमचेन |
| त्स् | छ् | वत्ससगोत्रस्य > वछसगोतस |
| क्ष | छ् | ऋक्षवत्– > छवत– |
| क्ष | ख् | दक्षिणा > दखिना – |
| श्र | सिर् | श्री– > सिरि– |
| ज्ञ् | ञ् | यज्ञः > यञो |
| ज्ञ् | न् | आज्ञप्तम् > आनत |
| र्ण | न | सुवर्णम् > सुवंन |
| ष्ण | ण्ह | विष्णु > वेण्हु |
| | न्ह | कृष्ण > कन्ह |
| स्म | म्ह | अस्माकम् > अम्ह |

## प्राकृत प्रत्ययप्रक्रिया

पुल्लिंगी अकारान्त नामे —

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | असो | असा |
| द्वितीया | अमच | खेतपरिहारे |
| तृतीया | समणेन | यञेहि |
| चतुर्थी | सघाय | |
| पंचमी | खधावारा | |
| षष्ठी | उपासकस | सवसतानं |

नपुंसकलिंगी —

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | लेण, लेणं | निवतनसतानि |

स्त्रीलिंगी —

(१) आकारान्त —

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | दखिना | दखिनायो |
| तृतीया | वालिकाय, लोटाय | सुण्हाहि |
| चतुर्थी | पूजाये, | |
| षष्ठी | सेनाये | |
| सप्तमी | बणासाय | |

(२) ईकारान्त —

| | | |
|---|---|---|
| प्रथमा | महादेवी | कुभियो |
| तृतीया | कुडुविनीय | अतेवासिनिहि |
| षष्ठी | वेजयंतिये | गावीनं, अंतेवासिनिण |
| सप्तमी | नदीये | |

**सर्वनामे**

(१) इदम्, एतद्, यद्, तद् ही आपले शेवटचे व्यंजन गाळून अकारान्त नामाप्रमाणे चालतात. इदम् बद्दल इम हा आदेश होऊन त्याची रूपे इमे इमस्मि अशी होतात. त्याचे इण हे प्रथमेचे एकवचनी रूप (क्र. १४.३) उल्लेखनीय आहे.

(२) **पुरुषवाचक सर्वनामे** — प्रथम पुरुषी, तृतीया अनेकवचन — 'अम्हेहि'. षष्ठी अनेकवचनी वैकल्पिक रूपे 'न' व 'नं' (संस्कृत नः) ही उल्लेखनीय आहेत.

**संख्यावाचके** — पायूण (सं. पादोनम्), त्रिनि (सं. त्रीणि), चतुं (सं. चतुर्णाम्), बारसक (सं. द्वादशक), तेरस (सं. त्रयोदश), पनमस (सं. पञ्चदश), पंचत्रिशक (पञ्चत्रिंशत्), ही प्रस्तुत लेखसंग्रहात आली आहेत.

**क्रमवाचके** — पथमे (सं. प्रथमे), बितिये (सं. द्वितीये), ततिये (सं. तृतीये), पंचमे, छठे (सं. षष्ठे), सातमे (सप्तमे), तेरसे (त्रयोदशे), पनर (पञ्चदशे) ही या लेखांत आढळतात.

### क्रियापदांची रूपे

वसति, वितराम ही प्रथम गणाची व ददाति, ददम ही तृतीय गणाची वर्तमान काळाची रूपे आली आहेत. पुढील काळात तृतीय गणाचा लोप झाला. बहुतेक क्रियापदे परस्मैपदात आहेत. एखादे भुजतेसारखे आत्मनेपदी आहे. भूतकाळाचे एकही रूप आले नाही. त्याबद्दल दत (दत्तम्), आणत (आज्ञप्तम्), भूत (भुक्तम्) अशी भूतकालवाचक धातुसाधिते योजून अर्थ व्यक्त केला आहे. भविष्य काळाचे भविसति हे रूप संस्कृतातून (वर्णबदल करून) घेतले आहे.

धातूंची वर्तमानकाळी कर्मणि प्रयोगाची रूपे फार क्वचित् आढळतात. प्रस्तुत संग्रहात कसते (कृष्यते) व ञायते (ज्ञायते) अशी दोनच आढळतात.

संस्कृतात धातूंची प्रयोजक रूपे अय प्रत्यय लावून बनवितात. प्राकृतात त्याचे 'आपे' असे परिवर्तन होते. क्र. ३९ मध्ये भोजापयिता असे रूप आले आहे ते प्रयोजकार्थी वर्तमानकालवाचक धातुसाधिताचे तृतीयेचे एकवचनी रूप दिसते.

आज्ञार्थ---याचे द्वितीय पुरुषी एकवचनी रूप परिहरेहि आणि अनेकवचनी परिहरेठ ही आली आहेत. निबधापेहि व निवधापेथ ही तशीच प्रयोजकार्थी आहेत.

### धातुसाधिते

वर्तमानकालवाचक.---'अत्' प्रत्ययान्त संस्कृत धातुसाधित आपल्या अन्त्य व्यञ्जनाला स्वर जोडून अकारान्त होते. पतिवसतानं (सं. प्रतिवसताम्) पाहा. कांही ठिकाणी संस्कृतातील काही रूपांतील अनुस्वार आढळतो. वसंतानं (सं. वसताम्) पाहा.

कर्मणि प्रयोगातील वर्तमानकालवाचक धातुसाधिते 'मान' प्रत्ययान्त असतात. काहीत कर्मणि 'य' आढळत नाही. 'सुजमान' पाहा.

क्र. १८.१० मधील 'अनुविधीयमान' हे असे कर्मणि वर्तमानकालवाचक धातुसाधित दिसते; पण तेथील संदर्भात त्याचा अर्थ कर्तरि दिसतो.

भूतकालवाचक धातुसाधिते.---ही सामान्यतः 'त' प्रत्यय लागून होतात. 'दत', 'नियुत' वगैरे. 'दा' धातूहून झालेले 'दिन' काही ठिकाणी आढळते. 'त्' चे 'ध्', क्वचित् 'ट्' इत्यादींमध्ये परिवर्तन होते. 'सिधं', 'कटा' इ. पाहा. प्रयोजकार्थी 'आपित' प्रत्यय लागतो---'बंधापितः' पाहा.

विध्यर्थी धातुसाधिते.---ही संस्कृतातल्याप्रमाणे 'तव्य', 'अनीय' व 'य' लागून होतात. 'वतवो' (सं. वक्तव्यः), 'दुपसधनीय' (सं. दुष्प्रधर्षणीयः), सदेयमेयो (सं. सदेयमेयः) पाहा. संस्कृतातील क्त्वा किंवा ल्यप् लागून होणारी धातुसाधिते ( Gerunds ) प्राकृतातही आढळतात---उदाहरणार्थ, क्र. ३८.५ मधील 'कृता' (सं. कृत्वा), 'कीणिता' (सं. क्रीत्वा), 'उदिस' (सं. उद्दिश्य), 'पतिगय्ह' (सं. प्रतिगृह्य) पाहा.

शेवटी प्रस्तुत संग्रहात दिसणाऱ्या प्राकृत भाषेच्या काही लकबा पाहू.

तत्कालीन प्राकृतात खेडेगावांची व ऋतूंची नावे सामान्यत: अनेकवचनात घालण्याचा प्रघात होता. उदाहरणार्थ, गामे कखडीसु (१३.३) (कखडी गावात) पाहा. राजपुतान्यातील पुष्कर क्षेत्र हे काही खेडे नव्हे. पण तेहि क्रमांक ४३.४ मध्ये 'ततोस्मि गतो पोक्षरानि' असे अनेकवचनात घातले आहे.

ऋतूंचे अनेकवचनातील उल्लेख पाहा — वासान पखे (वर्षर्तो: पक्षे) (क्र. १३.७), हेमंताणं पखे (हेमंतस्य पक्षे) (क्र. १४.२), गिम्हाण पखे (ग्रीष्मस्य पक्षे) (क्रमांक १८.१) इत्यादि.

तत्कालीन प्राकृतात विशेषण व संलग्न शब्द विशेष्य व संबंधी शब्दानंतर घालण्याचा प्रघात होता — 'सेनाये वेजयंतिये' (विजयी सेनेच्या) व 'विजयखधावारा गोवधनस' (गोवर्धन येथील विजयी शिबिरातून) हे प्रयोग पाहा. हा प्रघात लक्षात न आल्यामुळे काही विद्वानांनी 'गोवधनस' याचा संबंध पुढील 'बेनाकटक–' याशी जोडून बेनाकटक गोवर्धन प्रदेशात होते असे अनुमान केले आहे. पण ते चूक आहे. बेनाकटक हे विदर्भाच्या भंडारा जिल्ह्यातील वैनगंगेच्या तीरावरच्या विभागाचे नाव होते.

क्र. १९, ओ. २ मध्ये 'गामो सुदिसणा भिखुहि..पतिगय दतो', आणि त्याच लेखात ओ. ३ मध्ये 'गाम सामलिपद भिखुहि देविलेण[वासेहि] .. पतिगय्ह ओयपपेहि' या दोन ठिकाणी प्रतिगृह्य या ल्यबन्ताचा प्रयोग लक्षणीय आहे. संस्कृतात ल्यबन्ते पाणिनीच्या 'समानकर्तृकयो: पूर्वकाले' या सूत्राला अनुसरून मुख्य क्रियापदाने दर्शविलेल्या क्रियेच्या अगोदरची क्रिया दर्शवितात, पण येथे प्रतिग्रहणाची (स्वीकाराची) क्रिया दानक्रियेच्या व अर्पणक्रियेच्या नंतरची आहे. येथे 'भिक्षूंनी स्वीकारावा म्हणून तो गाव दिला' व 'तो गाव अर्पण कर' असे अर्थ अनुक्रमे विवक्षित आहेत.

मागे या संग्रहातील प्राकृत भाषेच्या वर्णप्रक्रियेचे व रूपप्रक्रियेचे जे विवरण केले त्यावरून तत्कालीन भाषा अशोकाच्या आदेशांतील भाषेसारखी होती हे दिसून येईल आणि ते साहजिकही आहे. कारण या संग्रहातील आरंभीचे (क्र. १ ते ४) लेख अशोकाच्या निधनानंतर सुमारे पाउणशे वर्षांच्या आतच कोरले होते व त्यांतील भाषा त्या कालाच्या अखेरीच्या (क्र. ३४ ते ३७ च्या) लेखांतील भाषेहून निराळी भासत नाही.

त्या काळी या भाषेला कोणते विशिष्ट नाव होते ते कोठेही निर्दिष्ट केले नाही. सातवाहनांचे राज्य महाराष्ट्रावर होते, म्हणून त्यांच्या भाषेला 'माहाराष्ट्री' असे नाव असेल असे सकृद्दर्शनी वाटते; पण ते नाव इतके प्राचीन नाही. भरताच्या

'नाटचशास्त्रा'त पात्रांनी योजावयाच्या विविध प्राकृत भाषांसंबंधी नियम दिले आहेत. त्यांत मागधी, अवन्तिजा[१] (उज्जैनजवळची), प्राच्या, शौरसेनी, अर्धमागधी, बाल्हीका आणि दाक्षिणात्या अश्या सात प्राकृत भाषांचा निर्देश आहे.[२] यातील 'दाक्षिणात्या' नावाने सातवाहनकालीन भाषेचा उल्लेख विवक्षित दिसतो; पण तिला माहाराष्ट्री म्हटले नाही. शिवाय नंतरच्या काळातील नियम —पद्यात माहाराष्ट्रीचाच उपयोग करावा हा —नाटच-शास्त्रात आढळत नाही. याच्या उलट पद्यात शौरसेनीचा उपयोग करावा असे भरताचार्य सांगतात[३] —

**शौरसेनीं समाश्रित्य भाषां काव्येषु योजयेत् ।**
**अथवा छन्दतः कार्या देशभाषा प्रयोक्तृभिः ।।**

भरताचा काल निश्चित नाही, पण त्याच्या 'नाटचशास्त्रा'ला प्रस्तुतचे रूप सुमारे ख्रिस्तोत्तर तिसऱ्या – चौथ्या शतकापूर्वी प्राप्त झाले असावे असे मानण्यात येते.[४]

वररुचि हा आद्य प्राकृत व्याकरणकार. त्याने आपल्या 'प्राकृतप्रकाशा'त 'माहाराष्ट्री' भाषेचा उल्लेख फक्त एकाच ठिकाणी केला आहे. त्याने पहिल्या नऊ परिच्छेदांत प्राकृत भाषेविषयी नियम दिले आहेत. तेवढाच भाग फार प्राचीन आहे. नंतरच्या तीन परिशिष्टरूपी परिच्छेदांत पैशाची, मागधी व शौरसेनी या भाषांविषयी नियम देऊन शेवटी 'शेषं माहाराष्ट्रीवत् ।' (या भाषांविषयी बाकीचे नियम माहाराष्ट्रीतल्याप्रमाणे) असे म्हटले आहे. त्यावरून पहिल्या नऊ परिच्छेदांतील नियम माहाराष्ट्रीविषयक आहेत असे मानण्यात येते. वास्तविक त्याच्या काळी हा भाषाभेद निश्चित झाला नसावा. तत्कालीन वाङ्मयावरून हेच दिसते. 'त्' चे 'द्' आणि 'थ्' चे 'ध्' होणे हे शौरसेनीचे वैशिष्टच मानण्यात येते. पण ते महाराष्ट्रातील सातवाहनांच्या लेखांत तसेच त्यांच्या काळच्या 'मृच्छकटिक' नाटकातही दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, 'गोतमिपुतो सिरिसदकणि' (१.१) व 'मृच्छकटिका'तील पुढील श्लोक (१.४३) पाहा—

**मा दुग्गदो त्ति परिहवो णत्थि कअन्तस्स दुग्गदो णाम ।**
**चारित्तेण विहिणो अड्ढो वि अ दुग्गदो होइ ।।**[५]

---

१ अवन्तिजा (आवन्तिका) पदाने पैशाची प्राकृत विवक्षित असावी.

२ *Nāṭyaśāstra* (G. O. S.), Vol. II, p. 376.

३ *Ibid*., Vol. II, p. 376.

४ Kane, Introduction to the *Sāhityadarpaṇa*, p. 22.

५ याची संस्कृत छाया—मा दुर्गत इति परिभवो नास्ति कृतान्तस्य दुर्गतो नाम। चारित्रेण विहीन आढ्योऽपि च दुर्गतो भवति ।।

या श्लोकात 'दुर्गतः' याचे 'दुग्गदो' असे शौरसेनीतल्याप्रमाणे रूप योजिले आहे. माहाराष्ट्रीत त्याचे रूप 'दुग्गओ' झाले असते. बरे, त्या नाटकातील श्लोकांत सर्वत्र शौरीसेनीचीच रूपे योजिली आहेत असेही नाही. त्या नाटकात इतरत्र (अंक ६, श्लो. ५) 'भेत्तूण' अशी माहाराष्ट्रीतली रूपेही आढळतात. तेव्हा सातवाहनकाळी भिन्न भिन्न प्राकृत भाषांची वैशिष्टये अगदी पूर्णपणे निश्चित झाली नव्हती असे दिसते.

असे असले तरी पुढे जी भाषा माहाराष्ट्री म्हणून विख्यात झाली ती महाराष्ट्रातीलच भाषा होय हे दाखविता येते.

सातवाहन कालानंतर माहाराष्ट्री, शौरसेनी, मागधी आणि पैशाची या प्राकृत भाषा प्रख्यात झाल्या. वररुचीच्या 'प्राकृतप्रकाशा'च्या संस्करणात या चारांचाच निर्देश आहे. काही विद्वान् वररुचि आणि पाणिनीच्या सूत्रांवरील वार्त्तिकांचा कर्ता कात्यायन हे एकच मानतात. पण वररुचि खात्रीने इतका प्राचीन नाही. त्याचा काळ ख्रिस्तोत्तर चौथे-पाचवे शतक असावा. दण्डीच्या काळी (ख्रिस्तोत्तर सहाव्या शतकात) माहाराष्ट्री प्राकृत तीतील वाङ्मयामुळे विख्यात झाली होती. दण्डीने 'काव्यादर्शा'त (१.३४) म्हटले आहे—

**महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः ।**

तेव्हा त्याच्या काळी या इतर भाषाही आपापल्या वैशिष्टयांमुळे भिन्न-भिन्न गणण्यात येत होत्या यात संशय नाही.

माहाराष्ट्रीत व शौरसेनीत अकारान्त पुल्लिंगी प्रथमेचे एकवचन ओकारान्त असते, तर मागधीत ते एकारान्त असते. वररुचीने आपल्या आरंभीच्या 'कगचजतदपयवां प्रायो लोपः ।' या सूत्रात सांगितल्याप्रमाणे प्राकृत भाषांत 'पदातील दोन स्वरांच्या मध्ये असणाऱ्या क्, ग्, च्, ज्, त्, द्, प्, य् आणि व् या व्यंजनांचा बहुधा लोप होतो' असे म्हटले आहे. जसे मुकुलः > मउलो ; नगरं > णअरं ; गजः > गओ इत्यादि.[१] हा नियम सामान्यतः सर्व प्राकृतांना लागू असला तरी माहाराष्ट्रीत या व्यञ्जनलोपाचा अतिरेक केला जातो; त्यामुळे असा व्यञ्जन-लोप हे माहाराष्ट्रीचे एक वैशिष्टय झाले आहे. शौरसेनीत त् चा द् आणि थ् चा ध् होतो. माहाराष्ट्रीत 'गरूडा'चे गरूळ असे रूप होते तर शौरसेनीत ते तसेच राहते. मागधीत स् चा श् आणि र् चा ल् सर्व शब्दांत होतो. इतर प्राकृतांत त्याला विकल्प सांगितला आहे. यांशिवाय इतरही या भाषांची वैशिष्टये आहेत पण त्यांचा निर्देश करण्याची आवश्यकता नाही.

---

१ या नियमाची काही उदाहरणे प्रस्तुत संग्रहातील काही लेखात आढळतात. उदाहरणा[र्थ] नागनिकायाः > नाअनिकाय > नायनिकाय (क्र. ५ पाहा). शेवटच्या रूपात यश्रु[ति] आहे. पुलुमाइस (सं. पुळुमायेः) (क्र. १४.१). रायामचस (सं. राजामात्यस्य) (१०·२), यातही यश्रुति आहे.

व्याकरणकारांच्या नियमांप्रमाणे प्रस्तुत संग्रहातील लेखांच्या भाषेला माहाराष्ट्री म्हणता येईल काय, असा प्रश्न उपस्थित होतो, कारण माहाराष्ट्रीचे मुख्य लक्षण पदातील द्विस्वरमध्यगतव्यञ्जनलोप त्यांत आढळत नाही. त्यांतील पुढील रूपे पाहा—अगपोगलस (३२.१) ; अमचस (१३.१); उजेनिय (४०.४) ; खतिय (१८.५) ; निकायस (१२.२) इत्यादि. या शब्दांतच नव्हे तर इतरत्रही तसा व्यञ्जनलोप आढळत नाही.

यावर एक असे उत्तर दिले जाते की या लेखांची भाषा माहाराष्ट्री नाही. माहाराष्ट्री प्राकृत ही आरंभी सध्या आपण ज्याला महाराष्ट्र म्हणतो तेथील प्राकृत नव्हती. टर्नरने म्हटले आहे की 'माहाराष्ट्री भाषेचे ठिकाण अशोक सम्राटाच्या कारकीर्दीच्या वेळी बरेचसे उत्तरेकडे होते. तो प्रदेश सध्याच्या महाराष्ट्राच्या उत्तरेकडील असावा आणि जसजसे त्या प्रांतात गुजराथी भाषा बोलणाऱ्या काठी किंवा गुर्जर लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊ लागल्या तसतसे माहाराष्ट्री बोलणारे लोक खालील प्रांतांत रेटले गेले'. टर्नरसारख्या विद्वानांच्या मते 'महाराष्ट्र' शब्द रूढ अर्थाने घ्यावयाचा नसून 'अनेक लहान राष्ट्रे मिळून झालेले मोठे राष्ट्र', अर्थात् मध्य भारतातील विशाल प्रदेश या यौगिक अर्थाने घेतला पाहिजे.

पण याला काही पुरावा आहे काय ? महाराष्ट्र शब्द 'महावंसा'त रूढ अर्थानेच घेतलेला दिसतो. मोग्गलिपुत्त तिस्साने अशोकाच्या कारकीर्दीत महाराष्ट्रात बौद्ध धर्माचा प्रचार करण्याकरिता महाधर्मरक्षित याला पाठविले होते. कोरीव लेखांतील महाराष्ट्राचा पहिला उल्लेख चालुक्यवंशी द्वितीय पुलकेशीच्या काळच्या सन ६३४ च्या ऐहोळे शिलालेखात[२] प्रथम आढळतो असे मानण्यात येत असे. पण सुमारे २५ वर्षांपूर्वी आम्ही तो एरण येथील स्तंभलेखात[३] आलेला दाखविला होता. त्यात शकवंशी महाक्षत्रप राजन् श्रीधरवर्मा याचा आरक्षिक (रक्षक – प्रमुख) सत्यनाग याने एरण येथे झालेल्या घोर युद्धात पडलेल्या नाग सैनिकांच्या स्मृत्यर्थ एक यष्टि (स्मारक – स्तंभ) उभारल्याचा उल्लेख आहे. त्या लेखात सत्यनागाला 'माहाराष्ट्रक' म्हटलेले दिसते. त्या लेखामध्ये काळाचा उल्लेख नाही, पण श्रीधरवर्म्याच्याच दुसऱ्या

१ टर्नरचा मूळ ग्रंथ मला पाहण्यास मिळाला नाही. त्याचे येथे उल्लेखिलेले मत कृ. पां. कुळकर्णी यांच्या 'मराठी भाषा: उद्गम व विकास' (१९७३), पृ. १३२ वरून घेतले आहे.

२ पाहा—

अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां
नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणाम् ।।
ए. इं. ६.१ इ.

३ *C. I. I.*, IV, p. 610.

एका लेखात शक संवत् १०२ (सन १८०) चा उल्लेख दिसतो[१] त्यावरून महाराष्ट्र हे देशनाम निदान ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाइतके प्राचीन ठरते.

महाराष्ट्र हे देशनाम दण्डीच्या (ख्रिस्तोत्तर सहावे शतक) 'काव्यादर्शा'तही (१.३४) आले आहे. महत्त्वाची गोष्ट ही की तो उल्लेख माहाराष्ट्री प्राकृताच्या संबंधी आहे. दण्डी म्हणतो—

**महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः ।**
**सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम् ।।**

(महाराष्ट्रातील भाषा ही मुख्य प्राकृत आहे असे म्हणतात. त्या भाषेत उत्कृष्ट वचनरत्नांचा जणू सागरच असे 'सेतुबन्धा'दि ग्रंथ रचले आहेत).

हा 'सेतुबन्ध' प्राकृत ग्रंथ वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेनाने रचला होता. तो दण्डीने वर्णिल्याप्रमाणे माहाराष्ट्री प्राकृत भाषेत आहे.[२] त्यासारख्या भाषेत लिहिलेली लीलावती ही 'मरहट्ठदेसीभासा' मध्ये रचली आहे असे तीत म्हटले आहे.[३] हालाची 'गाथासप्तशती' तशाच द्विस्वरमध्यगत व्यञ्जनांचा लोप करून रचली आहे.[४] तेव्हा तिची भाषा माहाराष्ट्री प्राकृत आहे हे सांगण्याची आवश्यकता नाही. हाल हा गौतमीपुत्र सातकर्णीच्या पूर्वी सहाव्या पिढीत होऊन गेला होता. तेव्हा त्या सातकर्णीच्या व नंतरच्या सातवाहनांच्या लेखातील भाषा माहाराष्ट्री प्राकृतच मानली पाहिजे.

मग जसा 'गाथासप्तशती'त पूर्वोक्त प्रकारचा व्यंजनलोप सर्वत्र आढळतो तसा प्रस्तुत संग्रहातील लेखांत का आढळत नाही, असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर हे की त्या लेखांतील भाषा तत्कालीन बोलीसारखी होती तर गाथांतील भाषा ग्रांथिक पद्धतीची होती. प्रस्तुत संग्रहातील काही लेख तत्कालीन शासनाने काढलेले आदेश आहेत. ते जसे काढले होते तसे नाशिक लेण्यांत कोरले आहेत. उदाहरणार्थ, क्र. १३ मधील गौतमीपुत्र सातकर्णि आणि त्याची माता गौतमी बलश्री यांच्या नावे काढलेली आज्ञा पाहा. क्र. ४३, ओळ ३—५ मध्ये तर ऋषभदत्ताच्या तोंडचे शब्दच दिले आहेत हे मागे दाखविले आहे. तत्कालीन बोलीत व्यंजनांचे द्वित्व व त्यांचा लोप ही होत नसत. म्हणून ती

---

१ श्रीधरवर्म्याचा कानाखेडा शिलालेख (पूर्वोक्त, पृ. १२ इ. पाहा). या लेखातील १०२ हे वर्ष आम्ही पूर्वी आभीर संवताचे मानले होते; पण ते आता संभवनीय वाटत नाही. ते वर्ष शक संवताचे असावे. त्याचे समान ख्रिस्ती शकाचे वर्ष सन १८०-८१ येईल. श्रीधरवर्मा हा चष्टन, नहपान, रुपिअम्म यांसारखा कुषाणांचा प्रांताधिपति दिसतो.

२ यातही शौरसेनीतल्या प्रमाणे द्विस्वरमध्यगत त् चा द् झालेला दिसतो. या काळीही हा नियम कसोशीने पाळला जात नव्हता असे दिसते. *Setubandha*, tr. by Handiqui, Introd. p. 132.

३ लीलावई (सं. आ. ना. उपाध्ये), गाथा १३३० पाहा.

४ 'साहित्य' प्रकरणातील तिचे उतारे पाहा.

त्या लेखांत आढळत नाहीत. कालान्तराने लेखांत व्यञ्जनांचे द्वित्व दाखविण्याचा प्रघात पडला तो वाकाटक नृपति द्वितीय विन्ध्यसेनाच्या वाशीम ताम्रपटात आढळतो. ग्रांथिक भाषेत मात्र व्यंजनांचे द्वित्व, लोप वगैरे विशेष दाखविले जात असत. म्हणून ते 'गाथासप्तशती'त आढळतात.

कोणत्याही भाषेचे व्याकरण ती काही काळ प्रचारात आल्यावर आणि तीत ग्रंथनिर्मिति झाल्यावर रचले जाते. वररुचीचा 'प्राकृतप्रकाश'ही असाच रचला गेला असावा. म्हणून त्यात सातवाहनकालीन 'सत्तसई' सारख्या ग्रंथांतील प्रयोगांस अनुसरून व्याकरण नियम दिले आहेत.

सातवाहनकालीन काव्यनिर्मितीमुळे माहाराष्ट्री भाषेचे महत्त्व वाढले; म्हणून पुढे पद्यांत सर्वत्र माहाराष्ट्रीचा उपयोग करावा असा नियम प्रचलित झालेला दिसतो.[१] तसेच ती भाषा दण्डीने म्हटल्याप्रमाणे प्रकृष्ट प्राकृत (उत्तम प्राकृत) मानण्यात आली आणि व्याकरण रचताना तिचेच नियम प्रमाण मानून इतर प्राकृत भाषांना अपवादस्वरूप प्राप्त झाले. म्हणून वररुचीच्या 'प्राकृतप्रकाशा'च्या संस्करणात ही पद्धती अवलंबिली आहे. तिचे कारण टर्नर म्हणतात त्याप्रमाणे 'माहाराष्ट्री भाषा प्रथम नर्मदेच्या उत्तरेस प्रचारात होती आणि कालान्तराने ती भाषा बोलणारे लोक त्या नदीच्या दक्षिणेस रेटले गेल्यावर तिचा महाराष्ट्रात प्रचार झाला आणि तिला 'माहाराष्ट्री' नाव प्राप्त झाले' हे नव्हे.

## २. प्राकृत-शब्द-सूची

या सूचीत प्राकृत शब्दांबरोबर प्रस्तुत संग्रहातील लेखांचे क्रमांक प्रथम देऊन नंतर त्यांतील ओळींचे दिले आहेत. तसेच कंसांत प्राकृत शब्दांची संस्कृत रूपान्तरे दिली आहेत.

### अ

अक्षयनिवि (अक्षयनीविः) ३८·१.
अखयनिवि १९·२; २७·१०.
अखयनिविहेतु (अक्षयनीविहेतोः) १९·३.
अखयं (अक्षयम्) १८·८.
अगपोगलस (अग्न्यपुद्गलस्य) ३२·१.
अगाधेययंञो (अग्न्याधेययज्ञः) ३·६.
अगियतणकस (अगियतणकस्य) १०·२.
अंगियकुलवधनस (अंगियकुलवर्धनस्य) ३·२.

---

१ पाहा—
शौरसेनी प्रयोक्तव्या तादृशीनां च योषिताम् ।
आसामेव तु गाथासु माहाराष्ट्रीं प्रयोजयेत ।।
साहित्यदर्पण, ६. १५९.

**अ—चालू.**

### त



### थ



### द

## कोरीव लेखांच्या वाचनासंबंधी सूचना

१ काटकोनाकृति [ ] कंसातील अक्षरे मूळ लेखात अस्पष्ट आहेत, असे समजावे.

२ काटकोनाकृति कंसातील अक्षरांवर तारकांकित चिन्ह* असल्यास ती अक्षरे मूळ लेखात अस्पष्ट असून किंवा मुळीच नसून ती अनुमानाने दिली आहेत, असे समजावे.

३ अर्धवर्तुळाकार कंसातील ( ) अक्षरे शुद्ध पाठाची आहेत असे समजावे.

# खंड पहिला—सातवाहन राजवंशाचे लेख

## क्रमांक १

## नाशिकच्या लेण्यातील कृष्णाच्या काळचा लेख

हा लेख नाशिक येथील क्र. १४ च्या लेण्यातील उजवीकडील खिडकीच्या चौकटीच्या वरील वाजूवर कोरला आहे. सन १८६५ मध्ये एडवर्ड वेस्ट आणि आर्थर वेस्ट यांनी याच्याकडे त्याच्या यथादृष्ट प्रतीने प्रथम लक्ष वेधले. त्यानंतर रा. गो. भांडारकर, व्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी व सेनार्ट यांनी त्याचे वाचन प्रसिद्ध करून त्याची चर्चा केली.[१] सेनार्टच्या वाचनाबरोबर छापलेल्या छापावरून येथे त्याचे वाचन दिले आहे. हा लेख चांगल्या स्थितीत आहे. फक्त पहिल्या व दुसऱ्या ओळींतील पहिले अक्षर किंचित् खराब झाले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—या लेखाचा उद्देश क्र. १४ चे लेणे **सातवाहन** कुलातील **कन्ह** (कृष्ण) राजा राज्य करीत असता **नासिकच्या समण** (श्रमण) नामक महामात्राने (श्रेष्ठ अधिकाऱ्याने) कोरविले, हे नमूद करण्याचा होता. सातवाहन वंशाचा हा सर्वांत प्राचीन उपलब्ध लेख आहे. यात कृष्ण राजाचे वर्णन 'सातवाहन कुलातील' असे केल्यामुळे तो सातवाहन राजाचा साक्षात् पुत्र नव्हता, त्याच्या व सातवाहनाच्या मध्ये निदान एक पिढी होऊन गेली असावी असे अनुमान करता येते. समण (श्रमण) महामात्राने हे लेणे कोरविले होते याचा अर्थ श्रमणांच्या व्यवस्थेकरिता नेमलेल्या महामात्राने (श्रेष्ठ धर्माधिकाऱ्याने) ते काम करविले असा सेनार्टने केला आहे, तथापि, हा अर्थ आनुमानिक आहे असेही त्याने म्हटले आहे. प्राकृतात विशेषण किंवा समानाधिकरण शब्द विशेष्यानंतर घालण्याचा प्रघात आहे. म्हणून महामात्र पदावर असलेल्या एका बौद्ध श्रमणाने हे लेणे कोरविले असाही अर्थ संभवतो; पण बौद्ध श्रमण महामात्र कसा झाला असेल अशी शंका भगवानलालनी व्यक्त केली आहे. कदाचित् समण हे त्या महामात्राचे वैयक्तिक नाव असेल. तसेच दुसरे नाव 'तापस' हे क्र. ११ च्या लेखात आले आहे

---

१ ल्यूडर्स्‌ची यादी, क्रमांक ११४४ मधील संदर्भ पाहा.

ते पाहा. प्राचीन काळी आपल्या नावाचा उल्लेख दानविषयक लेखात कर-ण्याचा प्रघात होता. तदनुसार नाशिकच्या समण (श्रमण) नामक महामात्राने हे लेणे कोरविले असावे. प्राचीन काळी अनेक खासगी व्यक्ति लेणी कोरवून त्यांतील लेखांत आपला नामनिर्देश करीत असत. तसाच हा प्रकार दिसतो

**स्थलनिश्चय** — या लेखात एकच – **नासिक** हे – स्थलनाम आले आहे. ते सध्याचे गोदातीरचे नाशिक होय. त्या काळी नाशिक हे तीर्थ म्हणून प्रसिद्ध होते, पण ते सध्याप्रमाणे त्या विषयाचे (जिल्ह्याचे) मुख्य ठिकाण नव्हते. नाशिकजवळचे सध्याही आपल्या प्राचीन नावाने ओळखले जाणारे गोवर्धन त्या काळी आहाराचे (महाविभागाचे) मुख्य ठिकाण होते. त्याचा उल्लेख इतर लेखांत आला आहे.

**ओळ** **वाचन**

**१ सादवाहनकुले कन्हे राजिनि नासिककेन**

**२ समणेन महामातेण लेण कारित [।*]**

**अनुवाद**

**सातवाहन** कुलातील **कृष्ण** राजा असताना **नाशिक** येथील महामात्र **श्रमणाने** [हे] लेणे कोरविले.

**क्रमांक २**

## सांची स्तूपाच्या दक्षिण तोरणावरील सातकर्णीच्या काळचा लेख

हा लेख सांची येथील स्तूप क्र. १ च्या दक्षिण दरवाज्याच्या तोरणावर आतील बाजूस कोरला आहे. त्याचे पहिले वाचन कनिंग्हाम सन १८५४ मध्ये आपल्या 'भिलसा स्तूप' (पृ. २६४ इ.) या ग्रंथा[त] केले होते.[१] त्यानंतर भगवानलाल, मैसे, ब्यूह्लर व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली. मार्शल व फूशेर यांनी आपल्या 'मॉन्यूमेंट्स् ऑफ सांची' व्हॉ. १, भाग २ (पृ. ३४) मध्ये त्याचे वाचन व भाषांतर, आणि पृ. २७३ इ. वर त्याची चर्चा केली आहे. त्याच ग्रंथाच्या व्हॉ. भाग २ मध्ये त्याचा छाप दिला आहे. त्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

---

१ ल्यूडर्स्‌ची यादी, क्रमांक ३४६ मधील संदर्भ पाहा.

**लिपी व भाषा** — प्रस्तुत लेख तीन ओळींत कोरला असून तो सुस्थितीत आहे. त्याची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या लेखाचा उद्देश राजा **श्रीसातकर्णि** याचा 'आवेशनि' (शिल्पशाळेचा मुकादम)[१] वासिष्ठीपुत्र आनंद याने हे दान दिले हे नमूद करण्याचा होता.

ज्या सातकर्णि राजाचा हा वासिष्ठीपुत्र आनंद शिल्पिमुख्य होता त्याच्या काळाविषयी विद्वानांनी भिन्न भिन्न मते व्यक्त केली आहेत. ब्यूह्लरच्या मते या लेखाची लिपी नाणेघाटातील नागनिकेच्या लेखाच्या लिपीसारखी असून हा सातकर्णि सिमुकाचा पुत्र असावा,[२] आणि त्याचा काळ ख्रिस्तपूर्व १५० असावा. जयस्वाल व राखालदास बॅनर्जी यांचे तेच मत होते,[३] पण रमाप्रसाद चंदा यांच्या मते या लेखाच्या अक्षरवटिकेवरून तो राजा द्वितीय सातकर्णि असावा. त्याचा काळ त्यांनी ख्रिस्तपूर्व ७५ ते २० असा ठरविला आहे.[४] मार्शल व फूशेर यांनी हाच काळ समर्थित केला आहे. रॅप्सनलाही हा नंतरचा काळ मान्य होता. त्याने त्याच्या समर्थनार्थ सुचविले की, हा लेख कोरताना 'वासिठिपुतस' हे वस्तुत: 'सातकणिस' याचे विशेषण असताना कोरक्याच्या चुकीने 'आनंदस' याचे विशेषण म्हणून कोरले गेले असावे. तेव्हा हा लेख वासिष्ठीपुत्र सातकर्णीच्या काळचा असावा.[५]

रॅप्सनच्या या मताला काडीचाही आधार नाही. 'वासिष्ठीपुत्र' अशी मातृनामनिदर्शक विशेषणे केवळ राजांच्या बाबतीतच नव्हे तर सामान्य जनांच्या बाबतीतही योजिली जात असत.[६] शिवाय, हा लेख वासिष्ठीपुत्र सातकर्णीचा मानल्यास त्याचा काळ ख्रिस्तोत्तर दुसरे शतक मानावा लागेल; कारण, त्या काळातील वासिष्ठीपुत्र सातकर्णि हा शकवंशी महाक्षत्रप रुद्रदामन् याचा जावई म्हणून सुप्रसिद्ध आहे.[७] दुसरा कोणी वासिष्ठीपुत्र सातकर्णि ज्ञात नाही. पण हा लेख इतक्या नंतरच्या काळातील आहे असे कोणीच मानीत नाही.

---

१ हेमचंद्राच्या 'अभिधानचिन्तामणि' मध्ये 'आवेशन' याचा अर्थ 'शिल्पिशाला' असा दिला आहे.

२ *E. I.* VI, p. 88. *Indian Palæography* (Eng. Tr.), p. 39.

३ *E. I.* XX, p. 74.

४ *Mem. A. S. I.*, No. 1, pp. 7 and 10; *I.H.Q.* 1929, pp. 600 f.

५ *B. M. C.* (*Andhras* etc.), Introd., p. xlvii.

६ उदाहरणार्थ, 'कौशिकीपुत्र मित्रदेव', क्रमांक १७, ओ. २ पाहा.

७ क्रमांक २५, ओ. १ पाहा.

ब्यूह्लरने दाखविल्याप्रमाणे प्रस्तुत लेखाची लिपी नाणेघाटातील नागनिकेच्या लेखाच्या लिपीसारखी आहे. तिच्या पतीच्या – प्रथम सातकर्णीच्या – कारकीर्दीला पुराणांनी फक्त १० वर्षे दिली आहेत.[१] पण ही वर्षसंख्या चूक दिसते. त्याने दोन अश्वमेध, एक राजसूय आणि १५ – २० इतर श्रौत यज्ञ केले होते. तेव्हा त्याने दीर्घ काळ राज्य केले असावे. त्यानेच मध्य भारतात विजय संपादन करून तेथे आपला अंमल काही काळ बसविला असावा. त्याचे उत्तराधिकारी इतके प्रबळ नव्हते. तेव्हा हा लेख त्याच्याच काळचा असावा. तो स्वत: वैदिक धर्माचा कट्टा पुरस्कर्ता होता; पण त्याचा शिल्पिमुख्य बौद्धधर्मी होता, असे दिसते. त्याने सांची स्तूपाच्या तोरणावर स्वत: काम करून किंवा इतरांकडून ते करवून आपल्या दानाची नोंद करणारा हा लेख कोरविला असे दिसते.

| ओळ | वाचन |
|---|---|
| १ | **रञो सिरि सातकणिस** |
| २ | **आवेसनिस वासिठिपुतस** |
| ३ | **आनंदस दानं [।*]** |

**अनुवाद**

[हे] दान राजा **श्रीसातकर्णि** याचा मुकादम **वासिष्ठीपुत्र आनंद** याचे [आहे].

**क्रमांक ३**

## नाणेघाट लेण्यातील नागनिकेचा लेख

हा लेख पुण्याच्या उत्तरेस सुमारे ५६ मैलांवरील नाणेघाटातील एका विशाल लेण्याच्या डाव्या व उजव्या भिंतींवर कोरला आहे. त्याचा पहिला उल्लेख साइक्सने सन १८३७ च्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्ये (व्हॉ. ४१, पृ. २८८ इ.) त्याच्या लहानशा तुकड्याची यथादृष्ट प्रत छापून केला होता.[२] त्यानंतर प्रिन्सेप, स्टीव्हन्सन् आणि भगवानलाल यांनी त्याची चर्चा केली. शेवटी ब्यूह्लरने आर्किऑलॉजिकल सर्व्हे

१ *D.K.A.*, p. 39.

२ ल्यूडर्स्‌ची यादी, क्रमांक १११२.

ऑफ वेस्टर्न इंडिया, व्हॉ. ५, पृ. ६० इ. मध्ये छापांसह त्याचे संपादन केले. नंतर स्वतः ब्यूह्लर, फ्रांके व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली. अलीकडे परमेश्वरीलाल गुप्त[१] यांनी व आम्हीही[२] त्याची चर्चा केली आहे.

ब्यूह्लरने म्हटले आहे की, "नाणेघाटातील लेख पश्चिम भारतातील सर्वांत प्राचीन ऐतिहासिक लेखांपैकी असून त्यांचे महत्त्व व मनोरमता ही इतर सर्व कोरीव लेखांच्या समूहापेक्षा अधिक आहेत. पण हे लेख दुर्दैवाने अत्यंत भग्न स्थितीत असल्यामुळे त्यांचे वाचन व अर्थही विद्वानांनी भिन्न भिन्न प्रकारे केला आहे."

**अक्षरवटिका** — हा लेख प्राचीन ब्राह्मी लिपीत लिहिला आहे. त्याविषयी ब्यूह्लरने म्हटले आहे की, "हा लेख लिपीच्या पुराव्यावरून अशोक व दशरथ या राजांच्या लेखांनंतर थोड्याच काळात कोरला गेला असावा. त्याची लिपी नाशिक येथील कृष्णाच्या लेखाच्या लिपीशी पूर्णपणे जुळत असल्यामुळे तो अंध्रांच्या (सातवाहनांच्या) आरंभीच्या राजाचा असावा. या दोन्ही लेखांत द, क, ज, र, ल, व आणि ह् यांच्या आकृतींत साम्य आहे. अक्षरांच्या कानांचे वरचे भाग जाड केले नाहीत; आणि त व म यांच्या आकृतीत तशीच धरसोड दिसून येते. तेव्हा ज्या सातकर्णि राजाच्या राणीने हा लेख कोरविला तो पुराणांत कृष्ण राजाचा पुत्र (वस्तुतः पुतण्या) म्हणून निर्दिष्ट केलेला तिसरा अंध्र (सातवाहन) राजा असावा.[३]"

**भाषा** — या लेखाची भाषा प्राकृत आहे. यातील पुढील शब्दरूपांकडे ब्यूह्लरने लक्ष वेधले आहे: "ओ. ४ मधील 'भारिया' हे रूप 'भारियाय' याच्या ऐवजी योजिले आहे. कान्हेरी येथील व इतर प्राचीन प्राकृत लेखांत तृतीयेचा प्रत्यय 'य' नसून 'अ' आहे. तो 'भारिया' मधील शेवटच्या 'या' मध्ये लुप्त होऊन ते शब्दरूप तृतीयान्त झाले असावे. ओ. ४ मधील 'वेदिसिरिमातु' हे रूप कान्हेरी येथील एका लेखातल्याप्रमाणे 'वेदिसिरिमातुय' याऐवजी योजलेले दिसते."

**विवेचन** — इतर लेखांच्या प्रमाणे या लेखाचा आरंभ 'सिधं' (सिद्धि असो!) या शब्दाने झाला असावा, पण तो शब्द आता नष्ट झाला आहे.

नंतर धर्म, इंद्र, संकर्षण (बलराम), वासुदेव (कृष्ण), चंद्र, सूर्य, चार दिक्पाल — यम, वरुण, कुबेर व वासव (इंद्र) — आणि कुमारवर

१ *Studies in Epigraphy*, II, pp. 9 f.

२ *Ibid.*, III, pp. 86 f.

३ *A. S. W. I.* V, p. 67.

(कार्त्तिकेय) यांना नमन केले आहे. ब्यूह्लर आणि रॅप्सन यांना 'कुमारवर' याचा खरा अर्थ कळला नव्हता. ब्यूह्लरने म्हटले आहे की, 'कुमारश्रेष्ठ वेदिश्री याला प्रस्तुत लेखात नमन केले असून मंगलाचरणातील इतर देवांच्या बरोबरीने बसविले आहे.' पुढे ब्यूह्लरने म्हटले आहे की, 'ज्या नागनिका राणीने हा लेख कोरविला ती त्या काळी विधवा असून आपल्या कुमार (अल्पवयी) वेदिश्रीतर्फे राज्यकारभार (रीजंट म्हणून) पाहत होती.' रॅप्सनला 'प्रस्तुत लेखात राजकुमार वेदिश्रीला नमस्कार आहे' हे ब्यूह्लरचे म्हणणे पटेना; म्हणून त्याने प्रत्येक 'नमो' चा अन्वय पुढील शब्दाशी न करता मागील शब्दाशी (उदाहरणार्थ, 'यमवरुनकुबेर-वासवानं' याशी) करावा असे सुचविले.[१] तथापि, त्यालाही नागनिका राणी आपल्या वेद(वेदि)श्री नामक कुमार (अल्पवयी) मुलातर्फे राज्यकारभार पाहत होती, असेच वाटत होते. हेच मत इतर सर्वांनी स्वीकारले होते.

हे अन्वयार्थ चूक आहेत हे आम्ही प्रथम अभ्यासकांच्या दृष्टीस आणून दिले.[२] प्राचीन कोरीव लेखांत 'नमो' याचा अन्वय त्यापुढील शब्दाशी करावयाचा असतो.[३] तेव्हा 'नमो कुमारवरस' हाच अन्वय बरोबर आहे. पण त्याचा अर्थ 'कुमारश्रेष्ठ कार्त्तिकेय याला नमन असो' असा आहे. त्यापुढील 'वेदिसिरिस रञो' याचा संबंध नंतरच्या ओ. २ च्या आरंभी नष्ट झालेल्या अक्षरांशी लावला पाहिजे. त्यांत वेदिश्री राजाच्या कारकीर्दीचे संवत्सर, ऋतु, पक्ष व दिवस यांचा उल्लेख आला असावा.[४] दुर्दैवाने हा सर्व भाग आता पूर्णपणे नष्ट झाला आहे. शिवाय, त्या काळी नागनिका पुढे दाखविल्याप्रमाणे अत्यंत वृद्ध झाली होती; ती आपले आयुष्य अत्यंत संयत वृत्तीने व्रतोपवासादिकांत घालवीत होती. तिला ऐहिक जीवनात रस वाटत नव्हता. म्हणून ती आपल्या अल्पवयी मुलाच्या वतीने राज्यकारभार पाहत असणे अशक्य आहे.

हा लेख अतिशय खंडित झाला आहे. म्हणून त्याच्या अवशिष्ट भागावरून त्याचा अर्थ अनुमानाने लावावा लागतो. त्यामुळे त्याच्या अर्थाविषयी भिन्न भिन्न मते उत्पन्न झाली आहेत. आरंभीच्या देवतानमना-

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. xlv.

२ *Studies in Indology*, (second ed.), pp. 135 f.

३ पाहा—(१) नमो अरहंतानं। (खारवेलाचा हाथीगुंफा लेख), ए. इं., व्हॉ. २०, पृ. ७९. (२) नमो भगवतो देवराजसकतस। (वीरपुरुषदत्ताचा नागार्जुनकोंड लेख). ए. इं., व्हॉ. २०, पृ. १६.

४ कोरीव लेखांच्या आरंभी तत्कालीन राजाचा उल्लेख व काल घालण्याची पद्धत आहे. विष्णुकुंडी द्वितीय गोविन्दवर्म्याचा तुम्मळगुडेम ताम्रपट, ओ. १३ पाहा. सं. मु., सर ८, पृ. १९०.

नंतर त्यात तत्कालीन राजा **वेदिश्री** याच्या कारकीर्दीचे वर्ष, ऋतु, पक्ष व दिवस यांचा उल्लेख आला असावा. तो आता पूर्णपणे नष्ट झाला आहे. फक्त वेदिश्री राजाचे नाव अवशिष्ट आहे. त्यानंतर या कोरीव लेखातील मध्यवर्ती व्यक्ति – **नागनिका** राणी – हिचे वर्णन सुरू होते. ती एका शूर, वीर, अजिंक्य अशा दक्षिणापथपतीची स्नुषा,[1] गिरिसमुद्रवलयांकित पृथ्वीवर श्रेष्ठ गणलेल्या व **अंगिय**कुलात जन्मलेल्या पुरुषाची कन्या, सर्वश्रेष्ठ अशा · · · श्री नामक पुरुषाची भार्या आणि पूर्त कर्मे[2] (लोकोपयोगी कृत्ये) करणाऱ्या, लोकांना इष्ट वर देणाऱ्या, त्यांची इच्छा पूर्ण करणाऱ्या, त्यांना धनदान करणाऱ्या राजा **वेदिश्रीची** आणि श्रीमान् **सति**(शक्ति) [कुमार] याची माता असा तिचा निर्देश आला आहे. पुढे तिचे वर्णन पुढील शब्दांत केले आहे – 'ती नागकुलोत्पन्न श्रेष्ठ स्त्री होती; ती महिना महिना उपवास करीत असे; ती स्वगृही तपस्विनीप्रमाणे संयत वृत्तीने राहत असे; ती दीक्षा, व्रते व यज्ञ यांच्या अनुष्ठानात निष्णात होती.' पुढे तिने केलेल्या पुढील यज्ञांचे, त्यांत दिलेल्या गाई, घोडे, हत्ती, रथ, वस्त्रे व कार्षापण नाणी यांच्या संख्यांसह उल्लेख आले आहेत. अग्न्याधेय, अन्वारंभणीय, [अंगा]रिक, राजसूय, व दोन अश्वमेध, भगलदशरात्र, गर्गत्रिरात्र, गवामयन, अप्तोर्याम, अंगिरसामयन, शतातिरात्र, अंगिरसातिरात्र आणि छंदोपवमानत्रिरात्र हे यज्ञ तिने आपल्या पतीची सहधर्मचारिणी म्हणून केले होते. यांशिवाय तिने **स्वतः**(सयं) केलेल्या यज्ञांचे निर्देश १७ व्या ओळीपासून आले आहेत. ते यज्ञ तिने पतिनिधनानंतर पुरोहिताद्वारे केले असावे.[3] ते येणेप्रमाणे – अंगिरसामयन,

---

१ ओळ ३ मध्ये पहिले अवशिष्ट अक्षर 'य' आहे ते 'वधूय' (सुनेने) या शब्दाचे शेवटचे अक्षर दिसते. म्हणून त्यापूर्वी ओ. २ व ३ मध्ये नागनिकेचा श्वशुर सिमुक सातवाहन याचे वर्णन आले असावे. ब्यूह्लरने '–लाय' अशी अक्षरे वाचून ती 'बालाय' ची अवशिष्ट अक्षरे आहेत असे मानले आणि त्या शब्दाचा अन्वय पुढील 'महारठिनो' याशी केला. पण तसा अन्वय येथे संभवनीय वाटत नाही हे ओ. ४ मधील '–सिरिस भारिया' यावरून दिसून येईल. रॅप्सनने ती 'कळलाय' ची अवशिष्ट अक्षरे मानली; कारण कळलाय महारठीची नाणी सापडली आहेत. पण हे दोन्ही तर्क प्रत्ययोत्पादक नाहीत.

२ 'पुतदस' हे 'पुत्रदस्य' या संस्कृत शब्दाचे प्राकृत रूप मानून ब्यूह्लरने 'पुत्र देणाऱ्याची (माता)' असा विलक्षण अर्थ केला होता. पण कोणताही राजा पुत्र कसा देणार? तेव्हा येथे 'पूर्त' शब्द विवक्षित असून त्याचा 'लोकोपयोगी कृत्य' असा अर्थ येथे विवक्षित आहे.

३ आपस्तंबधर्मसूत्रात (२, ७. १५. १७) 'न स्त्री जुहुयात्।' असे म्हणून स्त्रियांना यज्ञ करण्याचा अधिकार नाकारला आहे. नागनिकेचे वर्णन तर ती 'दीक्षाग्रहणात निपुण होती' असे आहे. हा विरोध कसा घालवावयाचा? स्त्रियांना यज्ञकृत्ये करता येतात काय, या प्रश्नाची सविस्तर चर्चा ब्यूह्लरने केली आहे. स्त्रीयाजकांचा कडक निषेध केला जात असे, तरी राण्यांच्या बाबतीत अपवाद असावा असे त्याने म्हटले आहे. *A. S. W. I.* V. pp.66-67.

त्रयोदशातिरात्र आणि दशरात्र. यांशिवाय इतरही काही यज्ञांचे उल्लेख १८–२० या ओळींत आले असावे, पण ते आता नष्ट झाले आहेत.

प्रस्तुत लेखाच्या आरंभीच्या देवतानमनानंतर ज्या राणीचे वर्णन आले आहे ती नाणेघाटातील एका मूर्तिलेखात उल्लेखिलेली **नागनिका** होय हे आता बहुधा सर्व संशोधकांनी मान्य केले आहे. ज्या शूर, वीर, अजिक्य अशा दक्षिणापथपतीची ती स्नुषा होती तो पुराणांतील अंध्र (सातवाहन) वंशावळीत प्रथम उल्लेखिलेला राजा **सिमुक** होय. त्याने सबंध दक्षिणापथावर आपला अंमल बसविला होता. नंतर **अंगियकुलोत्पन्न** गिरिसमुद्रवलयांकित पृथ्वीवर वीरश्रेष्ठ म्हणून ख्याति पावलेला तिचा पिता हा नाणेघाटातीलच पुढील एका लेखामध्ये उल्लेखिलेला महारठि **त्रनकयिर** दिसतो. पुढे बराचसा भाग नष्ट झाला आहे. त्यात तिचा पति **सातकर्णि** राजा याचे वर्णन आले असावे. ओ.१०-११ मधील निर्देशावरून त्याने अनेक श्रौत यज्ञांशिवाय राजसूय व दोन अश्वमेध केले होते असे कळते. नंतर तिचा पुत्र तत्कालीन राजा **वेदिश्री** आणि त्याचा बंधु **शक्तिश्री** यांचे उल्लेख आले आहेत, हे मागे दाखविले आहे.

प्रस्तुत लेखातील वेदिश्री व शक्तिश्री यांशिवाय इतर राजपुरुषांची नावे नष्ट झाल्यामुळे डॉ. परमेश्वरीलाल गुप्त यांनी हा लेख नागनिका राणीचा नसून दुसऱ्याच कोणा अज्ञात राणीचा असावा, असे प्रतिपादिले आहे. त्यांच्या मते त्यात तिचे वर्णन 'अंगिय कुलाची स्नुषा, श्रीपदांकित एका महारठीची राणी आणि दक्षिणापथपति अशा बलाढ्य राजाची कन्या' असे आले आहे. पुराणोक्त वंशावळीतील तेविसावा राजा गौतमीपुत्र सातकर्णि याने प्रथम 'दक्षिणापथपति' ही पदवी धारण केली होती. म्हणून ही राणी त्याच्यानंतरच्या काळातील (इ. स. च्या दुसऱ्या शतकातील) असावी, असे त्यांनी म्हटले आहे.

हे मत चुकीचे आहे. नाणेघाटातील मूर्तिलेख आणि प्रस्तुत लेख हे भिन्न काळांतील आहेत, याला मुळीच प्रमाण नाही. त्यांच्या अक्षरवटिका ते सर्व लेख एकाच काळातील होत हे स्पष्टपणे दाखवितात. गौतमीपुत्र सातकर्णीच्या पूर्वी कोणी 'दक्षिणापथपति' ही पदवी धारण केली नव्हती हे प्रमाण अभावात्मक (*argumentum ex silentio*) आहे.[१] असे प्रमाण निर्णयात्मक मानले जात नाही. गौतमीपुत्र सातकर्णीच्या पूर्वीच्या सर्व राजांचे कोरीव लेख आपणांस उपलब्ध झाले नाहीत. तेव्हा वरील विधान

१. गौतमीपुत्राने कुन्तल देश जिंकला नसल्याने तो 'दक्षिणापथपति' (किंवा 'दक्षिणापथेश्वर') नव्हता. वस्तुतः 'दक्षिणापथेश्वर' ही पदवी नाशिकच्या क्रमांक १८ च्या लेखात गौतमीपुत्र सातकर्णीला लावली नसून त्याचा पुत्र पुळुमावि याला लावली आहे.

प्रमाण मानता येत नाही. शिवाय, डॉ. गुप्त यांच्या मताप्रमाणे प्रस्तुत लेखात उल्लेखिलेला वेदिश्री हा केवळ एका महारठीचा पुत्र असता तर त्याला प्रस्तुत लेखात 'देव' व 'राजन्' म्हटले नसते. कारण महारठी हे सामन्त असत; त्यांना 'राजा' ही पदवी लावली जात नसे. सारांश, प्रस्तुत लेखात वर्णिलेली राणी ही पुराणांत अंध्र (सातवाहन) वंशाचा तिसरा राजा म्हणून निर्देशिलेल्या सातकर्णि राजाची राणी होती यात संशय नाही.

प्रस्तुत लेख अशोकाच्या व दशरथाच्या लेखांनंतर थोड्याच काळाने कोरला असावा हे त्याच्या अक्षरवटिकेच्या प्रमाणावर आधारलेले ब्यूह्लरचे मत त्यातील वर्णनावरून समर्थित होते. या लेखात सातकर्णि व नागनिका यांनी एक दोन नव्हे तर निदान अठरा श्रौत यज्ञ केल्याचे वर्णन आहे. त्यांत अश्वमेध (दोनदा) आणि राजसूय यांची गणना आहे. ही परिस्थिति अशोकानंतरच्या काळातील दिसते. मौर्यांचा उच्छेद करून गादीवर आलेल्या पुष्यमित्र शुंगाने श्रौत यज्ञांवरील निर्बंध काढून स्वतः दोन अश्वमेध केल्याचा कोरीव लेखात उल्लेख आहे.[१] त्यासारखाच उपक्रम दक्षिणेतील सातवाहन राजांनी केलेला दिसतो. त्यांनी स्वतःच्या नावे नाणी पाडून आणि अनेक श्रौत यज्ञ करून वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन केले, त्या काळातील हा लेख आहे. सातकर्णि राजाने दोन अश्वमेध, एक राजसूय, व इतर अनेक श्रौत यज्ञ करून ब्राह्मणांना हजारो गाई, घोडे, हत्ती, रथ व कार्षापण दिले. त्यावरून त्याच्या राज्यातील सुबत्ता व त्याची वैदिक धर्मावरील निष्ठा व्यक्त होते. ही परिस्थिति अशोकाच्या निधनानंतरच्या कालातील आहे. त्यानंतर काही शतके गेल्यावर तशी परिस्थिति असल्याचा यत्किंचित्‌ही पुरावा नाही. म्हणून प्रस्तुत लेखात वर्णिलेली राणी ही सातकर्णि राजाची पत्नी नागनिका होय यात संशय नाही.

अलीकडे या मताचा समर्थक असा पुरावा अकल्पितपणे उपलब्ध झाला आहे. श्री. पां. ज. चिन्मुलगुंद यानी जुन्नर येथे सापडलेले सातकर्णि आणि नागनिका यांचे चांदीचे जोड नाणे प्रसिद्ध केले आहे.[२] त्या नाण्याच्या पुढील बाजूवर '[र]ञो सिरिसा–' आणि त्याच्या खाली लांबट चौकोनात 'नागनिका' अशी अक्षरे आहेत. डावीकडच्या कोपऱ्यात एक अस्पष्ट आकृति आहे ती श्री. चिन्मुलगुंद घोड्याची असावी असे

---

१ ए. इं. २०, पृ. ६७ इ.

२ 'सातवाहनांची नाणी' या प्रकरणातील या नाण्याची आकृति पाहा. पट्टिका २०, क्र. ३३.

म्हणतात. त्यांच्या मते हे चांदीचे नाणे सातकर्णि राजाने अश्वमेध यज्ञ केला त्या प्रसंगी पाडले असावे. नाण्याच्या मागील बाजूवर आडवे उभे डंबेल्सचे उज्जैनी चिन्ह आहे. या नाण्यावरून सातकर्णि आणि नागनिका यांचे परस्पर संबंध आणि त्यांनी केलेला अश्वमेध यज्ञ यांचा भक्कम पुरावा उपलब्ध झाला आहे. सातवाहनच नव्हे तर दक्षिणेतील इतर वंशांच्या चांदीच्या राजनामांकित नाण्यांत हे कालक्रमाने पहिले आहे.

ओळ **वाचन**[१]

**[डावीकडील भिंत]**

१ **[सिधं नमो पजापति*]नो धंमस नमो ईंदस नमो संकंसनवासुदेवानं चंदसू[या]नं[२] म[हि]मा[व]तानं चतुंनं चं(च) लोकपालानं यमवरुनकुबेरवासवानं नमो कुमारवरस [।*] वेदिसिरिस रञो**[३]

२ . . . . . . . . . . . . . . **[वी]रस सूरस अप्रतिहत-चकस दखिना[पथ]प[तिनो*]**[४] . . . . . . . . .

. . . . . . . . . . . . . . . . . . . . .

. . . . . . . . . . . . . . . . . . . . .

३ . . . . . . . . . . . . . **य महारठिनो अंगियकुलवधनस सगरगिरिवलयाय पथविय पथमवीरस**[५] **वस** . . . . . . . . . .

. . . . . . . . . . . . . . . . . **य महतो मह**[६] . . .

१ आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया, व्हॉ. ५ मधील प्लेट ५१ वरून. यापुढील ओळींत नष्ट झालेली अक्षरे अदमासाने टिंबांनी दाखविली आहेत. त्यांवरून आता नष्ट झालेल्या भागाची कल्पना येईल.

२ ब्यूह्लरने 'चंदसूतानं' वाचले. पण ते बरोबर नाही.

३ यापुढे या राजाच्या कालाचे वर्ष, ऋतु, पक्ष व दिवस उल्लेखिले असावे. तत्कालीन राजाचा काळ त्याच्या लेखाच्या आरंभी असा घालून मग त्याची वंशावळ देण्याची पद्धत होती, हे क्र. २ च्या तुम्मळगुडेम ताम्रपटावरून दिसून येईल. सं. मु., सर ८, पृ. १९०.

४ हे सिमुक सातवाहनाचे वर्णन दिसते. या विशेषणांचा अन्वय ओ. ३ मधील '[वधू]य' याशी असावा. नाशिक येथील पुळुमावि याच्या लेखातील गौतमी बलश्रीचे असेच वर्णन पाहा. येथे 'य' एवढेच अक्षर स्पष्ट दिसते. ब्यूह्लर व रॅप्सन येथे 'लाय' वाचतात. ब्यूह्लर पूर्ण शब्द 'बालाय' घेऊन त्याचा अन्वय पुढील 'महारठिनो' याशी करतो. पण तसे असणे शक्य नाही. ओ. ४ मधील '–सिरिस भारिया' यातील अन्वय पाहा. रॅप्सन ती अक्षरे 'कळलाय' याची अवशिष्ट आहेत असे सांगतो, पण ते नाव येथे आले असणे संभवनीय नाही.

५ ही विशेषणे नागनिकेच्या पित्याची असावी. पुढे 'बालाय' सारखा शब्द आता नष्ट झाला आहे. पुढील मूर्तिलेखावरून हा पिता 'महारठि त्रनकयिरो' असावा.

६ येथून नागनिकेचा पति सातकर्णि याचे वर्णन सुरू झाले असे दिसते. ओ. ४ मधील 'सिरिस भारिया' पाहा.

४ . . . . . . . . . . . . . . . सिरिस भारिया देवस पुतदस[1] वरदस कामदस धनदस वेदिसिरिमातु[2] सतिनो सि[रिमत]स च मातुय [सी]म . . . . . . . . . . . . .
. . . . . . . पथमय . . . .

५ वरिय . . . . . . . . . . . . . . . . [ना]गवरद-यिनिय मासोपवासिनिय गहतापसाय चरितब्रम्हचरियाय दिखव्रतयंञ-सुं[डा]य यञा हुता धूपनसुगंधाय निय[मेन*] . . . . . .
. . . . . . . . . . . . . . .

६ रायस[3] . . . . . . . . . . . . (य]ञेहि यिठं वनो । अगाधेययंञो द[खि]ना दिना गावो बारस १०[+*]२ असो च १ अन्वारभनियो यंञो दखिना धे[नु] . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . .

७ . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . दखिनायो दिना गावो १०००[+*]७०० हथी १० . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . .

८ . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . स . सतरय(स) वासलठि २००[+*]८०[+*]९[4] कुभियो रुपामयियो १०[+*]७ भि . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . .

९ . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . रिको यंञो दखिनायो दिना गावो १००००[+*]१००० असा १००० पस[पको*] . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

---

१ ब्यूह्लरने याचे संस्कृत रूप 'पुत्रदस्य' असे मानले आहे. पण ते असंभवनीय आहे. वेदिश्री राजा याचकांना पुत्र कसे देणार? 'पूर्तदस्य' विवक्षित असावे. 'पूर्त' म्हणजे 'धर्मदाय कृत्य'.

२ हा समास 'सापेक्षत्वेऽपि गमकत्वात्समासः ।' या प्रकारचा आहे.

३ याच्या मागील व पुढील अक्षरे नष्ट झाल्यामुळे या पदाचा अन्वय नीट समजत नाही. पण पुढील 'यञेहि यिठं' वरून येथे कर्मणि प्रयोग दिसतो. पुढे ओ. १७ मध्ये सयं-(स्वयं) शब्द आला आहे. त्यानंतरचे यज्ञ पतिनिधनानंतर पुरोहिताकडून तिने करविले असावे.

४ ९ या संख्येचे चिन्ह निश्चित नाही. ब्यूह्लरने ते कदाचित 'द' हे अक्षर असावे, असे म्हटले आहे. 'दकुभियो' (उदकभियो) म्हणजे 'पानीयपात्रे' असावी. 'रुपा-मयियो' याबद्दल 'रुपिमयियो' वाचावे असे ब्यूह्लरने सुचविले आहे.

१० . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . १०[+*]२ गमवरो[1] १ दखिना काहापना २००००
[+*]४०००[+*]४०० पसपको काहापना ६०००[+*]१
राज[सूययंञो] . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . सकटं .

[उजवीकडील भिंत]

११ धंञगिरितंसपयुतं[2] सपटो १ असो १ असरथो १ गावीनं १००
[+*][१*] असमेधो बितियो [यिठो] दखिनायो
[दि]ना असो रुपालं[का]रो १ सुवंन . . . नि १०
[+*]२ दखिना दिना काहापना १००००[+*]४०००
गामो १ ह[ठि] . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . [दखि]ना
दिना

१२ गावो[3] . . . सकटं धंञगिरितंसपयुतं . . . . . . . .
वायो यंञो . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . १०[+*]
७ धेनु . . वाय सतरस –

१३ . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
१०[+*]७ अच . . . . . . . . . . . . . पसपको
दिनो . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . १०[+*]२ [अ]सो रुपा[लंका]रो १
दखिना काहाप[ना] १०००० . . . . २[4].

---

१ 'गामवरो' वाचावे.

२ हे धान्यकटकासारखे स्थलनाम नसून त्याचा अर्थ 'धान्याच्या पर्वतासारख्या राशि' असा ब्यूह्लरने केला आहे.

३ येथील संख्यावाचक चिन्ह आता अस्पष्ट झाले आहे. पं. भगवानलालनी ते ६०००० चे द्योतक मानले आहे.

४ १०००० नंतर काही संख्या आता अस्पष्ट झालेल्या दिसतात.

१४ . . . . . . . . . . . . . . . . [गा*][वो]
२०००० भगलदसरतो यंञो यि[ठो] दखिना दिना गावो १००००
[+*]१ गर्गतिरतो यञो यिठो [दखिना] . . . . . .
पसपको पटा ३००[+*]१ ग[वा]मयनं यंत्रो यिठो . . . .
गावो १०००[+*]१००[+*]१ . . . . . . . . . गावो
१००० [+*]१०० पसपको काहापना १००[+*]१ पटा १००
अतुयामो यंञो . . .

१५ . . . . . . . . . गवामयनं यञो दखिना दिना गावो
१०००[+*]१००[+*]१ अंगिरस(सा)मयनं यंञो यिठो [दखिना]
गावो १०००[+*]१००[+*]१ त . . . . . . . [दखि]ना
दिना गावो १०००[+*]१००[+*]१ सतातिरतं यंञो . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . दखिना
गावो १००० [+*] १०० अंगिरस[ति]रतो यंञो यिठो [दखि]ना
[गावो].

१६ . . . . . . . . . . . . . गावो १०००[+*]२ छंदोपवमा–
[नतिरतो*] दखिना गावो १०००[+*]१ अं[गि]रस[तिरतो*] यंञो
[यि*]ठो दखिना दिना . . . . . . . . . . . . . यंञो
यिठो दखिना दिना गावो १०००[+*]१ . . . . . . . .

१७ . . . . . . . . . . . न . सयं . . . . . . . .
दखिना दिना गावो . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . [अं]गि[रसा]मयनं छवस
. . . . . . . . [दखि]ना दिना गावो १००० . . .
. . . . . . . . . . . . . . दिना गावो १०००
[+*]१ तेरस . . . . .

१८ . . . . . . . . . . . . . . . तेरसरतो स . . . . . .
ग दखिना दिना गावो . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . दसरतो म . . . . . . . . . दिना
गावो १०००[+*]१ उ . . . . . . . . . . . . दिना
गावो १०००[+*]१ उ . . . . . . . . . . . .

१९ . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . यञो
दखिना [दिना] . . . . . . . . . . . . . . . . . .
. . . . . . . . . . . . . . . . . .

२० . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . दखिना
दिना . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . [*].[1]

## अनुवाद

सिद्धि असो! प्रजापति धर्म, इंद्र, संकर्षण (बलराम), वासुदेव (कृष्ण), चंद्र, सूर्य, माहात्म्यवान् असे चार लोकपाल – यम, वरुण, कुबेर आणि इंद्र – तसेच कुमारश्रेष्ठ (कार्त्तिकेय) यांना नमस्कार असो!

**वेदिश्री** राजाच्या[2] . . . . . . . वीर, शूर, अजिक्य अशा दक्षिणापथपतीच्या[3] . . . . . . महारठी, **अंगिय**कुलोत्पन्न, गिरि-समुद्रवलयांकित पृथिवीवरील वीरश्रेष्ठ[4] . . . . . . . महान् अशा पुरुषांत श्रेष्ठ अशा – [5]श्रीची भार्या, तसेच पूर्त (लोकोपयोगी) कर्मे करणारा, इष्ट वर देणारा, इच्छा पूर्ण करणारा, धन देणारा, राजा **वेदिश्री** याची माता, तसेच **श्रीशक्तीची** माता, **नाग**कुलातील श्रेष्ठ महिला – महिना महिना उपवास करणारी, स्वगृहात तपस्विनीप्रमाणे राहणारी, ब्रह्मचर्याचे पालन करणारी, दीक्षा, व्रत व यज्ञ यांच्या अनुष्ठानात प्रवीण, अशा . . . नियमाने धूपाने सुगंधित यज्ञ केले. अग्न्याधेय यज्ञात दक्षिणा बारा – १२ – गाई आणि १ अश्व; अन्वारंभणीय यज्ञ – त्यात दक्षिणा धेनु . . . . दक्षिणा दिली – गाई १७००, हत्ती १० . . . . . . उदकपात्रे २८०, चांदीचे घट १७ . . . . [अंगा]रिक यज्ञ, (त्यात) दक्षिणा दिली – गाई ११०००, अश्व १०००, यज्ञकर्मातील सेवकास . . . . . . . . . . १२, उत्तम गाव १, दक्षिणा कार्षापण २४४००, यज्ञसेवकास कार्षापण ६००१, राजसूय यज्ञ [दक्षिणा] . . . . शकट, धान्य-राशीच्या विनियोगाकरिता नेमलेल्यास उंची वस्त्र १, अश्व १, अश्वरथ १

१ ही ओळ शेवटची होती काय याविषयी संशय आहे असे ब्यूह्लरने म्हटले आहे.

२ यानंतर या राजाच्या कारकीर्दीचे वर्ष, ऋतु, पक्ष व दिवस यांचा उल्लेख आला असावा.

३ ही सिमुक सातवाहनाची विशेषणे असावी. पुढे 'वधूय' (सुनेने) असे पद असावे त्यातील 'य' तेवढे आता दिसते.

४ ही विशेषणे 'महारठि त्नकयिरो' याची असावी. पुढे 'बालाय' सारखा शब्द नष्ट झाला आहे.

५ येथे सातकर्णीचे नाव नष्ट झाले आहे.

गाई १०१; दुसरा अश्वमेध यज्ञ केला. त्यात दिलेल्या दक्षिणा – रूप्यालंकारयुक्त अश्व १, सुवर्ण [अलंकार] . . . . १२, दक्षिणा दिली – कार्षापण १४०००, गाव १, हत्ती . . . दक्षिणा दिली – गाई . . . शकट १, धान्यराशिविनियोगार्थ प्रयुक्ताला . . . . . वाय यज्ञ [केला] . . . १७ गाई . . . सप्तदशातिरात्र . . . . १७ . . . . . यज्ञकर्मचाऱ्यास देणगी दिली . . . . १२, रुप्यालंकारयुक्त अश्व १, दक्षिणा कार्षापण १०००० . . . . . गाई २००००; भगलदशरात्र यज्ञ केला, दक्षिणा दिली १०००१; गर्गत्रिरात्र यज्ञ केला; दक्षिणा . . . यज्ञकर्मचाऱ्यास वस्त्रे ३०१; गवामयन यज्ञ केला, गाई ११०१ . . . गाई ११०१, यज्ञकर्मचाऱ्यास कार्षापण . . . १०१, वस्त्रे १००; अप्तोर्याम यज्ञ . . . . गवामयन यज्ञ [केला], दक्षिणा दिली गाई ११०१; अंगिरसामयन यज्ञ केला, दक्षिणा गाई ११०१ . . . . दक्षिणा गाई ११०१; शतातिरात्र यज्ञ . . . . दक्षिणा गाई ११००; अंगिरसातिरात्र [यज्ञ केला], दक्षिणा गाई . . . . . . . . गाई १००२; छंदोपवमानत्रिरात्र [यज्ञात] दक्षिणा १००१; अंगिरसातिरात्र यज्ञ केला; दक्षिणा दिली . . . – [तिरात्र] यज्ञ केला दक्षिणा दिली गाई १००१ . . . . **स्वतः** . . . . दक्षिणा दिली गाई . . . अंगिरसामयन सहा वर्षांचा . . . दक्षिणा दिल्या . . . गाई १००० . . . . गाई १००१; त्रयोदश[रात्र] . . दक्षिणा दिली – गाई . . . दशरात्र . . . गाई १००१ . . . गाई १००१ . . . यज्ञ केला; दक्षिणा दिली . . . . .

**क्रमांक ४ – ९**

## नाणेघाटाच्या लेण्यातील प्रतिमालेख

हे प्रतिमालेख पुणे जिल्ह्यातील जुन्नर गावाजवळील **नाणेघाटातील** एका विशाल लेण्यात कोरले आहेत. पुण्याच्या जुन्या 'जिल्हा गॅझेटीयर' मध्ये (पृ. २२१ वर) त्यांचे पुढील वर्णन आले आहे —

"नाणेघाटातील लेण्याच्या मागील भिंतीतील ९ इंच खोल कोरलेल्या मोठ्या आकाराच्या कोनाड्यात काही प्रतिमा कोरल्या होत्या. त्यांतील पहिली प्रतिमा पूर्वेकडील भिंतीपासून १ फूट ७ इंचावर असून शेवटची पश्चिमेकडील भिंतीपासून १ फूट ६ इंचापर्यंत कोरली आहे. या विशाल

कोनाड्यात एकूण आठ प्रतिमा कोरल्या होत्या. पण त्या आता जवळ जवळ पूर्णपणे नष्ट झाल्या आहेत. त्यांचे आता केवळ पाय, आणि तेही वाटोळ्य ठोकळ्यांच्या रूपाने अवशिष्ट आहेत. पण त्यांच्या शीर्षभागी त्या प्रतिमांची नावे मोठ्या आकाराच्या अक्षरांत कोरली होती ती मात्र, एक अपवाद करून, अद्यापि वाचता येतात. त्यांतील पहिली प्रतिमा सातवाहन सिमुक राजाची होती. त्याचे पाय व त्यांमधील धोतराचा सोगा हे पूर्वेकडील भिंतीपासून १ फूट ५ इंचावर दिसतात. नंतर राणी नागनिका आणि सातकर्णि राजा यांची जोड प्रतिमा कोरली होती. ती आता समूळ नष्ट झाली आहे. फक्त त्यांचे पाय सिमुक सातवाहनाच्या पायांपासून अनुक्रमे १ फूट ९ इंच व २ फूट ११ इंचावर किंचित् उंचवटयाच्या रूपाने आता दिसतात. चौथी प्रतिमा कुमार भाय[ल] याची होती. त्यानंतर २ फू. १ इं अंतरावर पाचवी प्रतिमा कोरली होती. पण तिच्या शीर्षभागावरील लेख आता पूर्णपणे नष्ट झाला आहे. सहावी प्रतिमा पाचव्या प्रतिमेच्या पलीकडे २ फू. ५ इं. वर कोरली होती. तिच्यावरील लेखात 'महारठि त्रनकयिरो' असे नाव कोरले आहे. त्याच्या पलीकडे २ फू. ४ इं. वर असलेल्या पायांच्या ठोकळ्यावरून व वरील लेखावरून तेथे हकुसिरि याची सातवी प्रतिमा कोरली होती असे कळते. आठवी प्रतिमा २ फू. ५ इं. वर होती तिच्या वरील लेखावरून ती 'कुमार सातवाहना'ची होती असे समजते. त्यानंतर दीड फुटावर हा कोनाडा संपतो."

या लेखांकडे साइक्सने सन १८३७ मध्ये लक्ष वेधले.[१] त्यानंतर भगवानलाल व ब्यूह्लर यांनी त्यांची चर्चा केली. ब्यूह्लरने त्यांचे छा दिले आहेत.

**लिपी व भाषा** — या लेखांची अक्षरवटिका प्राचीन ब्राह्मी लिपीची आहे. लेख क्रमांक ५ मधील 'च' या अक्षराची आकृति देवटेक येथील पहिल्या लेखातील 'चिकम्बुरि'मधील 'च'च्या सारखी आहे हे उल्लेखनीय आहे. भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या कोनाड्यात एकंदर आठ प्रतिमा किंवा पुतळे कोरण्यात आले होते असे दिसते. ते असे – (१) राजा श्रीमान् **सिमुक सातवाहन**; (२-३) राणी **नागनिका** आणि राजा **श्रीसातकर्णि**

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १११३ ते १११८ यांतील संदर्भ पाहा.

(४) कुमार **भाय[ल]**; (५) (नाव नष्ट); (६) महारठि **त्रनकयिर** (७) कुमार **हकुश्री**; आणि (८) कुमार **सातवाहन**. यांमध्ये सिमुक हा पुराणांतील अंध्रांच्या (सातवाहनांच्या) वंशावळीतील शिशुक होय. त्याचे संस्कृत नांव 'श्रीमुख' असावे. पुराणांतील वंशावळीत त्याचा धाकटा भाऊ कृष्ण याचे नाव त्याचा उत्तराधिकारी म्हणून येते. वहुधा सिमुकाच्या निधनप्रसंगी त्याचा पुत्र सातकर्णि हा अल्पवयस्क असल्यामुळे सिमुकाचा धाकटा भाऊ कृष्ण याला गादी मिळाली असावी. पुढे एक-दोन पिढ्यांनी नाणेघाटातील लेख कोरले तेव्हा सरळ वंशावळीतील राजपुरुषांच्या व कुमारांच्या प्रतिमा कोरावयाच्या ठरल्यामुळे कृष्णाची प्रतिमा तेथे कोरली नसावी.[१] कारण नंतरचा राजा सातकर्णि हा पुराणांत चुकीने सांगितल्याप्रमाणे कृष्णाचा पुत्र नसून पुतण्या (सिमुकाचा पुत्र) होता. सिमुकानंतर नागनिका व सातकर्णि यांची जोड प्रतिमा होती. नागनिकेच्या नावावरून ती नागवंशातील होती हे स्पष्ट आहे.[२] या जोड प्रतिमेत तिला प्रथम स्थान दिल्यावरून ती सातकर्णीची माता असावी असा डॉ. कटारे यांचा तर्क होता. पण तो चूक आहे. तिच्या महत्त्वामुळे तिला हे स्थान मिळाले असावे, यात संशय नाही. तत्कालीन चांदीच्या नाण्यावरही तिचा उल्लेख आहे. तसा प्राचीन काळच्या दक्षिणेतील कोणत्याही दुसऱ्या स्त्रीनामाचा नाही. नंतर कुमार भाय[ल]ची प्रतिमा होती. तो नागनिका–सातकर्णि यांचा वडील मुलगा असावा. नंतरच्या प्रतिमेवरील नाव आता नष्ट झाले आहे. ते बहुधा वेदिश्रीचे असावे असे अनुमान नाणेघाटातील क्रमांक ३ च्या विस्तृत लेखावरून करता येते. त्यानंतरची प्रतिमा महारठी त्रनकयिर याची होती. हा नागनिकेचा पिता असावा. यानंतरच्या दोन प्रतिमा कुमार हकुश्री व कुमार सातवाहन यांच्या होत्या. हे नागनिका–सातकर्णीचे धाकटे मुलगे दिसतात. हकुश्री हा नाणेघाटातील विस्तृत लेखात उल्लेखिलेला नागनिकेचा धाकटा मुलगा शक्तिश्री दिसतो[३]. शेवटचा सातवाहन याला वंश-

---

१ कदाचित् सिमुकाच्या निधनानंतर त्याचा मुलगा सातकर्णि हा अल्पवयस्क असल्यामुळे कृष्णाने गादी बळकाविली असेल, किंवा गादीवर आल्यावर चालुक्य मंगलेश आणि यादव महादेव यांच्याप्रमाणे त्याचे आपला पुतण्या सातकर्णि याच्याशी वितुष्ट उत्पन्न झाले असेल. म्हणून त्याची प्रतिमा नाणेघाटातील लेण्यात कोरली नसेल.

२ 'निका' म्हणजे स्त्री. उदाहरणार्थ, ईश्वरसेनाच्या काळच्या नाशिकच्या लेखात 'शकनिका' (शक स्त्री) हा शब्द पाहा. (कॉ. इ. इं., ४, पृ. ३.)

३ 'शक्तिश्री' चे प्राकृतात 'हकुश्री' असे रूप होणे कठीण आहे. बहुतकरून 'हकुश्री' हे त्याचे लाडके नाव असावे. 'शक्तिश्री' चे 'सतिसिरि' असे रूप नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात आले आहे.

कर्त्याचे नाव ठेवलेले दिसते. अशी उदाहरणे प्राचीन कोरीव लेखांत आढळतात.[१]

वरील प्रतिमांचा क्रम सकृद्दर्शनी घोटाळ्याचा दिसतो. कारण यांत नागनिका सातकर्णि या राजदंपतीनंतर प्रथम दोन राजकुमार (भायल व वेदिश्री), नंतर राजश्वशुर (त्ननकयिर) आणि पुनः दोन राजकुमार (हकुश्री व सातवाहन) असा विलक्षण क्रम दिसतो. त्याचे कारण अद्यापि कोणी दाखविले नाही, पण ते अनुमानणे कठीण नाही. ह्या प्रतिमा एका वेळी कोरल्या नसून दोन भिन्न काळी कोरलेल्या दिसतात. सातकर्णि राजाच्या कारकीर्दीच्या मध्यात पहिल्या सहा प्रतिमा कोरल्या असाव्या. त्यांत तत्कालीन राजाचा दिवंगत पिता, तो स्वतः व त्याची राणी, त्याचे दोन पुत्र (भायल व वेदिश्री) आणि राजश्वशुर (महारठी त्ननकयिर) यांचा समावेश होता. पुढे काही काळाने नागनिकेला दोन पुत्र (हकुश्री व सातवाहन) झाले. त्यांच्याही प्रतिमा कोरविण्यात आल्या. तरीही दीड फूट जागा पलीकडे राहिली होती. पुढे सातकर्णीच्या निधनानंतर वेदिश्री गादीवर आला. त्याच्या पूर्वी त्याचा वडील भाऊ भायल दिवंगत झाला असावा. वेदिश्रीच्या कारकीर्दीत नागनिकेने यज्ञ केल्याचा उल्लेख आहे. तिने नाणेघाटातील आपला विस्तृत लेख कोरविला त्या वेळी ती अत्यंत वृद्ध झाली होती हे तिच्या लेखावरून मागे दाखविले आहे. त्यात तिच्या फक्त दोन पुत्रांचा – राज्यकर्ता वेदिश्री आणि त्याचा धाकटा भाऊ शक्तिश्री (हकुश्री) यांचा – उल्लेख आहे. इतर दोन पुत्रांचा – भायल व सातवाहन यांचा – नाही. याचे कारण हे दिसते की ते दोन राजपुत्र त्या काळी निधन पावले असावे. वरील उपपत्तीवरून 'सातवाहन' नावाची नाणी या सातवाहन कुमाराने गादीवर आल्यावर पाडली असावी, हा काही विद्वानांचा तर्क निर्मूल ठरतो. ती वंशकर्त्या सातवाहन राजाची होती हे स्पष्ट आहे.

**ओळ** **वाचन**

**क्रमांक ४**

**१ राजा सिमुकसातवाह –**
**२ नो सिरिमातो [।*]**

---

१ उदाहरणार्थ, उत्तर चालुक्यनृपति षष्ठ विक्रमादित्याच्या काळच्या शक संवत् १००४ च्या तिडगुंडी ताम्रपटातील सिंद राजांच्या वंशावळीत (भीम-सिंदराज-मुंज असा) सिंद राजाच्या नावाचा उल्लेख आहे तो पाहा. तसेच गौतमीपुत्राचे 'सातकर्णि' नाव पाहा.

क्रमांक ५

१ देवि-नायनिकाय[१] रञो
२ च सिरि-सातकनिनो [।*]

क्रमांक ६

१ कुमारो भा–
२ य[लो*][।*]

क्रमांक ७

महारठि त्रनकयिरो [।*]

क्रमांक ८

कुमारो हकुसिरि [।*]

क्रमांक ९

कुमारो सातवाहनो [।*]

अनुवाद

क्र. ४ राजा **सिमुक सातवाहन** श्रीमान्.
क्र. ५ देवी **नागनिकेची** आणि **श्रीसातकर्णीची** [ही प्रतिमा].
क्र. ६ कुमार **भाय[ल]**.
क्र. ७ महारठी **त्रनकयिर**.
क्रं. ८ कुमार **हकुश्री**.
क्र. ९ कुमार **सातवाहन**.

## क्रमांक १०

## नाशिकच्या लेण्यातील भटपालिकेचा लेख

हा लेख **नाशिक** येथील क्रमांक १८ च्या चैत्य लेण्यातील उजवी-कडच्या पाचव्या व सहाव्या खांबांवर दोन दोन ओळींत उभा कोरला आहे. त्याची अक्षरवटिका नाशिक येथील अनेक लेखांच्याहून निराळी व जुनी दिसते. लेख बऱ्या स्थितीत आहे.

या लेखाकडे बर्ड व ओर्लेबार यांनी सन १८४७ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन, ब्रेट, एडवर्ड आणि आर्थर वेस्ट, रा. गो. भांडारकर, ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी, सेनार्ट आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.

---

१ या लेखातील नावे षष्ठयन्त आहेत. इतर लेखांत ती प्रथमान्त आहेत.

ब्यूह्लर, भगवानलाल व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व अनुवाद दिला आहे.[१] सेनार्टच्या छापावरून हा लेख येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश **भटपालिका** नामक स्त्रीने तिरण्हु (त्रिरश्मि) पर्वतात—जेथे हा लेख कोरला आहे तेथे—चैत्य लेणे पूर्ण केले हे **नमूद** करण्याचा आहे. ही भटपालिका **चलिसीलण** येथील **अरहलय** या राजामात्याची कन्या, **महाहकुसिरीची** नात, भांडागारिक (कोषाध्यक्ष) राजामात्य **अगियतणक** याची भार्या आणि **कपणणक** याची माता होती असे या लेखात नमूद केले आहे.

प्रस्तुत लेखातील हकुसिरी व नाणेघाटांतील एका प्रतिमा-लेखात निर्दिष्ट केलेला कुमार हकुसिरी हे एक किंवा भिन्न याविषयी विद्वानांत तीव्र मतभेद आहेत. मार्शलने ह्या लेण्याच्या दरवाजावरील कमान, तीतील प्राण्यांची व सर्पांची शिल्पे, जवळच्या द्वारपालाची आकृति,[२] यांवरून हे लेणे ख्रिस्ती शकाच्या आरंभानंतरच्या काळातील असावे व हा हकुसिरी नाणेघाटातील प्रतिमालेखात उल्लेखिलेला कुमार हकुसिरी असल्यामुळे सातवाहनांचा उदय ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात झाला असे मानले आहे.[३] याउलट डॉ. अ. स. अळतेकरांनी हे दोन हकुसिरी भिन्न मानले असून भटपालिकेचा आजा हकुसिरी हा राजा नव्हता, कारण त्याला ती पदवी लावली नाही. तेव्हा या लेण्यातील लेखामुळे सातवाहनांचा उदय ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या आरंभी झाला या मताला आक्षेप घेता येत नाही असे प्रतिपादिले आहे.[४] ही दोन्ही मते काही अंशी बरोबर नाहीत. प्रस्तुत लेखातील महाहकुसिरी व नाणेघाटाच्या प्रतिमालेखातील कुमार हकुसिरी हे एकच होत. या हकुसिरीचा उल्लेख नंतरच्या नागनिकेच्या नाणेघाटातील लेखात श्रीमान् सति (शक्ति) असा केला आहे. तो वेदिश्रीनंतर गादीवर आला असावा. 'रञो सिरि-सतस' अशा लेखाची नाणी त्याचीच असावी. त्याला प्रस्तुत लेखात राजा म्हटले नाही ; कारण हा लेख त्याच्या काळचा नसून त्याच्या नातीच्या काळचा आहे. त्याचे राजवंशीयत्व 'महा' या उपपदाने दाखविले आहे. अंध्रातील क्रमांक २९ च्या शिलालेखात यज्ञ सातकर्णीचे राजवंशीयत्व

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११४१ मधील संदर्भ पाहा. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ९१.

२ पट्टिका ८, आकृति १२ पाहा.

३ *C. H. I.*, p. 637. See also *C. T. I.*, pp. 273 f.

४ *M. S. G.*—History I, p. 82.

'अरक' (आर्यक) या उपपदाने सूचित केले आहे.[१] तसाच हा प्रकार आहे. प्रस्तुत लेखाची अक्षरवटिका नागनिकेच्या लेखातल्या पेक्षा निदान दोन पिढ्या नंतरची दिसते असे सेनार्टने म्हटले आहे. त्यावरूनही हे समीकरण समर्थित होते.

ज्याच्या आतील खांबांवर प्रस्तुत लेख कोरला आहे त्या चैत्य लेण्याचा दरवाजा मार्शलने म्हटल्याप्रमाणे नंतरचा दिसतो खरा, पण त्याचे कारण तो नंतर कोरला होता. त्याच्या दर्शनी कमानीवर 'नासिक-कानं धंभिकगामस दानं' असा लेख आहे, त्यावरून भटपालिकेने कोरविलेल्या लेण्याचा दरवाजा कोरवावयाचा राहिला होता, तो पुढे नाशिकच्या लोकांनी कोरवून ते लेणे पुरे केले आणि त्यातील भिक्षुसंघाला धंभिक गाव दान दिला, असे दिसते[२].

**स्थलनिश्चय — चलिसीणक** गाव सध्या नाशिक जिल्ह्यात आढळत नाही. **धंभिकही** सध्या विद्यमान नाही.

**ओळ** **वाचन**[३]

१ **रायामच-अरहलयस चलिसीलणकस[४] दुहुतुय महाहकुसि—**

२ **[रि] . . य[५] भटपालिकाय रायामचस अगियतणकस भंडाकारिक—**

३ **यस भारियाय[६] कपणणकमातुय चेतियघरं**

४ **तिरण्हुमि निठपापित [।*]**

**अनुवाद**

चलिसिलण येथील राजामात्य **अरहलय** याची कन्या आणि **महा-हकुसिरीची** [नात] **भटपालिका**, जी राजामात्य भांडागारिक **अगियतणक** याची भार्या आणि **कपणणकाची** माता आहे, [तिने] **त्रिरश्मि** पर्वतातील हे चैत्यगृह पूर्ण केले.

---

१ क्र. २९, ओ. २.

२ प्रस्तुत लेखात 'निठपापित' (पूर्ण केले) असे म्हटले असले तरी ही लेणी एका पिढीत खोदून पूर्ण होत नसत. क्रमांक १८ चा लेख पाहा.

३ ए. इं., व्हॉ. ८, प्लेट ३ वरून.

४ भगवानलालनी 'च' हे पुढील 'लीसिणकस' पासून विभक्त केले आहे.

५ भगवानलालनी 'महाहकुसिरिराय' व ब्यूह्लरने 'महाहकुसिरियाय' असे वाचले आहे. सेनार्टने 'रि' आणि 'य' यांच्यामध्ये दोन अक्षरे नष्ट झाली आहेत असे दाखविले आहे व येथे 'णतिय' (नातीचा) असा पाठ सुचविला आहे.

६ भगवानलालनी 'सतारियाय' असे वाचून त्याचा अर्थ 'सतारियेने' असा केला आहे तो ठीक दिसत नाही.

## क्रमांक ११

# नाशिकच्या लेण्यातील गौतमीपुत्र सातकर्णीचा लेख : संवत्सर १८

[पट्टिका १, आकृति १]

ह्या लेख **नाशिक** येथील क्रमांक ३ च्या लेण्याच्या व्हरांड्यात पूर्वेच्या भिंतीवर छताखाली कोरला आहे. तेथे या लेखाने पहिल्या पाच ओळी व सहाव्या ओळीचा पहिला अर्धा भाग व्यापला आहे. त्यानंतर स्वस्तिक चिन्ह कोरून पुढे क्रमांक १३ च्या लेखाला सुरवात केली आहे.

ह्या लेखाचा प्रथम उल्लेख स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ५ (१८५३), पृ. ४६ इ. मध्ये त्याची यथादृष्ट प्रत देऊन केला होता. त्यानंतर त्याची चर्चा एडवर्ड आणि आर्थर वेस्ट, रा. गो. भांडारकर, ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी, पिशेल, फ्रांके, हुल्श आणि रॅप्सन यांनी केली.[1] ब्यूह्लरने आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया, व्हॉ. ४, पृ. १०० इ. आणि नंतर सेनार्टने एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ८, पृ. ७१ इ. मध्ये छापासह त्याचे संपादन केले आहे. सेनार्टच्या छापावरून त्याचे वाचन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** — हा लेख सुस्थितीत आहे. त्याची अक्षरवटिका प्राचीन ब्राह्मी लिपीची आहे. क्रमांक १ च्या अक्षरवटिकेहून ती बरीच नंतरची दिसते. क, ग, च, त, द, म, प आणि ह यांच्या आकृत्या पाहा. या लेखात १, २, १८ व २०० या संख्यांची चिन्हे आली आहेत. भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखात '**बेनाकटकस्वामी**' **गौतमीपुत्र सातकर्णीची गोवर्धन** येथील विजयी सेनेच्या विजयशिबिरातून काढलेली आज्ञा कोरली आहे. ती **गोवर्धन** येथील अमात्य **विष्णुपालित** याला उद्देशून आहे. तीत म्हटले आहे की, '**अपरकखडी** गावातील **उषवदात** (ऋषभदत्त) याच्या मालकीचे असलेल्या **अजकालक** (यक्षाच्या) नावे ज्ञात अशा शेतातील २०० निवर्तने जमीन आम्ही **तेकिरसि** (त्रिरश्मि) येथील भिक्षूंना दिली आहे.' पुढे त्या भूमीच्या संबंधात दिलेल्या सवलतींचा निर्देश आला आहे—'यामध्ये कोणीही राजसेवकाने प्रवेश करू नये. याला कोणीही हात लावू नये. यात मिठासाठी खोदू नये, यात राज्याच्या दंडाधिकाऱ्यांनी कोणताही हस्तक्षेप करू नये. याला सर्व प्रकारच्या सवलती मिळाव्या. ही आज्ञा आम्ही स्वमुखाने दिली होती.

---

१ ल्यूडर्सची यादी क्र. ११२५. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ७१ इ. मधील छापही पाहा.

ती **शिवगुप्ताने** लेखनिविष्ट केली. ही राजाज्ञा महास्वामिकांनी सुरक्षित ठेवली आहे. **तापसाने** केलेली हिची पट्टिका [राज्य] **संवत्सर १८, वर्षापक्ष २, दिवस १** या दिवशी (पूर्वोक्त भिक्षूंना) दिली आहे.'

प्रस्तुत लेखात उल्लेखिलेली आज्ञा गौतमीपुत्र सातकर्णीने शक क्षत्रप नहपान याच्यावर संस्मरणीय विजय मिळविल्यावर गोवर्धन येथील आपल्या विजयी शिबिरातून काढली होती. तीत त्याच्या सेनेला 'वेजयन्ती' (विजयी) असे म्हटले आहे. या विशेषणाचा अर्थ विद्वानांनी अनेक प्रकारे केला होता. ब्यूह्लरने हे विशेषण 'विजयन्त किंवा इन्द्र याने संरक्षित' या अर्थी घेतले आहे. पण त्याचा या अर्थी प्रयोग इतरत्र कोठेही आढळत नाही. त्याने दुसराही अर्थ सुचविला आहे. हा शब्द 'वैजयन्ती' असावा. वैजयन्ती (ग्रीकांनी उल्लेखिलेली बेझांटियन्) ही कोकणातील सुप्रसिद्ध तन्नामक (सध्याची वनवासी) नगरी असावी. ती त्या काळी कोकणच्या अंध्रांच्या (सातवाहनांच्या) राज्यात समाविष्ट होती. हा अर्थ स्वीकारल्यास गौतमीपुत्राची सेना वैजयन्ती नगरीत भरती झालेली किंवा तेथील शिबिरात असलेली अशी होती, असा अर्थ होईल.' हा अर्थ विलक्षण आहे ! वस्तुतः या काळात गौतमीपुत्राची सत्ता वैजयन्ती (वनवासी) नगरीच्या सभोवारच्या उत्तर कानडा प्रदेशापर्यंत पसरली नव्हती हे आम्ही वाटेगाव येथील नाणकसंचयावरून दाखविले आहे.[1] शिवाय त्या वेळी ती सेना वैजयन्ती नगरीत नसून गोवर्धन येथे होती हे स्पष्ट आहे. म्हणून ब्यूह्लरचा अर्थ स्वीकारता येत नाही. 'वैजयन्ती' याचा अर्थ 'विजयी' असा आहे. तोच अर्थ 'विजयखधावारा' (विजयी शिबिरातून) या पदाने व्यक्त होत आहे. हे दान देण्यापूर्वी गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानावर संस्मरणीय विजय संपादन केला होता, याची ही विशेषणे द्योतक आहेत.

प्रस्तुत लेखात गौतमीपुत्राला 'बेनाकटकस्वामी' असे विशेषण लावले आहे. त्याचाही अर्थ विद्वानांनी विविध प्रकारे केला होता. ब्यूह्लरने 'बेनाकटका' असे वाचून त्याचा अन्वय 'गोवधनस' या पदाशी केला आहे आणि त्या दोन पदांचा अर्थ 'गोवर्धनातील बेनाकटकातून' असा केला आहे. पण गोवर्धन प्रदेशात बेनाकटक असे स्थानच नाही. शिवाय 'गोवधनस' याचा अन्वय (प्राकृत भाषेच्या पद्धतीप्रमाणे) त्यामागील 'विजयखधावारा' (विजयी शिबिरातून) याशी आहे. तेव्हा ब्यूह्लरचे अन्वयार्थ स्वीकारता येत नाहीत.

---

१ Mirashi, *Literary and Historical Studies in Indology*, pp. 167 ff. नाण्यांवरील प्रकरण पाहा.

**'बेनाकटक'** म्हणजे बेणा (विदर्भातील वैनगंगा) हिच्या काठचा प्रदेश होय. प्राचीन काळी जिल्ह्यांची नावे 'कट'पदान्त असत. उदाहरणार्थ, 'वरदाकट' (वऱ्हाड), 'नान्दीकट' (नान्देड), आणि 'करहाकट' (कऱ्हाड) पाहा. गौतमीपुत्र सातकर्णीने आपला उल्लेख आपल्या देशावरून (मूलकस्वामी), किंवा राजधानीवरून (प्रतिष्ठानस्वामी) असा न करता 'बेनाकटकस्वामी' असा केला आहे. याचे कारण पश्चिम महाराष्ट्रातील नहपानावरील विजयापूर्वी त्याने विदर्भातील क्षत्रपांवर बेणाकटक (भंडारा जिल्ह्यातील वैनगंगेच्या तीरावरील पौनीजवळचा प्रदेश) येथे तसाच संस्मरणीय विजय प्राप्त केला होता हे आहे[१]. दुसऱ्याही एका दृष्टीने हा निर्देश सहेतुक आहे हे आम्ही इतरत्र[२] दाखविले आहे.

प्रस्तुत लेखातील मिति सातवाहनांच्या इतर लेखांतल्याप्रमाणे ऋतुनिर्देशात्मक आहे. ही पद्धति महाराष्ट्रात व विदर्भात ख्रिस्तोत्तर पाचव्या शतकाअखेर टिकली. शेवटचा वाकाटक नृपति हरिषेण (ख्रिस्तोत्तर ४७५–५००) याच्या अलीकडे सापडलेल्या लेखात ती आढळली आहे.[३] याउलट महाराष्ट्रातील तत्कालीन क्षत्रपांच्या कोरीव लेखांत चैत्रादि मास, शुक्लादि पक्ष व तिथि यांचा निर्देश असतो हे उल्लेखनीय आहे. तसेच कालनिर्देशात प्रस्तुत लेखात 'संवत्सर' शब्दाचा उल्लेख आहे. क्षत्रपांच्या (शक संवतातील कालनिर्देशांत) त्या अर्थी 'वर्ष' शब्द योजिला असतो हेही लक्षणीय आहे.

**स्थलनिश्चय**—प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले **गोवर्धन** नाशिकच्या पश्चिमेस सहा मैलांवर गोदावरीच्या उजव्या तीरावर अद्यापि आपल्या प्राचीन नावाने प्रसिद्ध आहे. त्या काळी ते त्या 'आहारा'चे (विभागाचे) मुख्य ठिकाण होते. **अपरकखडी** (पश्चिम कखडी) हे गाव मात्र सध्या नाशिक जिल्ह्यात सापडत नाही.

**ओळ** **वाचन[४]**

**१ सिधं [।*] सेनाये वेजयंतिये[५] विजयखधावारा गोवधनस बेनाकटकस्वामि[६] गोतमिपुतो सिरिसदकणि**

---

१ पौनी येथे महाक्षत्रपकुमार रुपिअम्म याचा स्तंभलेख सापडला आहे. क्र. ६२ पाहा.

२ प्रकरण पहिले, 'विदर्भातील क्षत्रप', पाहा.

३ हा ताम्रपट अद्यापि अप्रकाशित आहे.

४ ए. इं., व्हॉ. ८ मधील छापावरून.

५ 'वेजयतिये' (ब्यू.).

६ 'बेनाकटका स्वामि' (भ. व ब्यू.).

२ **आनपयति गोवधने अमच विण्हुपालित[१] [।*] गामे अपरक-खडिये य[२] खेतं अजकालकियं उसभदतेन[३] भूतं निवतन –**

३ **सतानि बे २०० एत अम्हखेत निवतनसतानि बे २०० इमेस पवजितान तेकिरसिण[४] वितराम [।*] एतस चस खेतस परिहार**

४ **वितराम अपवेस[५] अनोमस अलोणखादक अरठसविनयिक सवजात-पारिहारिक च [।*] एतेहि नं परिहारेहि परिह[रे]हि[६] [।*]**

५ **एते चस खेतपरिहा[रे][७] च एथ निबधापेहि [।*] अवियेन[८] आणतं [।*] अमचेन सिवगुतेन छतो [।*] महासामियेहि उपरखितो [।*]**

६ **दता पटिका सवछरे १०[।*]८ वासपखे २ दिवसे २ तापसेन कटा [।*]**

## अनुवाद

सिद्धि असो ! **गोवर्धनातील** विजयी सेनेच्या विजय शिबिरातून **बेणाकटकाचा** अधिपति[९] **गौतमीपुत्र श्रीसातकर्णि गोवर्धनातील** अमात्य **विष्णुपालिताला** आज्ञा करतात की **पश्चिम कखडी** गावातील अजकालक[१०] (यक्षाच्या नावाने ज्ञात) २०० – दोनशे – निवर्तनांचे शेत

१ 'विण्हुपालितं' (भ. व. ब्यू.).
२ '–कखडियं यं' (भ.).
३ 'उषभदातेन' (भ.).
४ 'तेकिरसिन' (भ.).
५ 'अपावेस' (भ.).
६ 'परिहरहि' (भ.) ; 'परिहरिहि' (ब्यू.).
७ 'परिहा[र]' (से.).
८ 'अवियेण' (ब्यू.).
९ सेनार्टने 'गोवर्धनातील बेणाकटकाचा अधिपति' असा अर्थ केला आहे. पण तो चूक आहे हे मागे दाखविले आहे.
१० 'अजकालकिय खेत' याचा अर्थ ब्यूह्लर आणि भगवानलाल या दोघांनीही 'आतापर्यंतचे (अद्यकालिक) शेत' असा केला आहे. त्यांचा आशय हा की 'ते शेत आतापर्यंत ऋषभ-दत्ताच्या मालकीचे होते.' पण या अर्थी ते विशेषण योजिले असल्यास त्याचे रूप विलक्षण दिसते. सेनार्टने म्हटले आहे की येथे ते शेत कोठले याचा निर्देश अपेक्षित आहे. म्हणून 'अजकालकातील शेत' असा अर्थ घ्यावा. मात्र हे स्थान कोठले हे आपणांस सांगता येत नाही अशी प्रांजळ कबूली त्याने दिली आहे. त्याचा खरा अर्थ 'अजकालक यक्षाच्या नावे ओळखले जाणारे शेत' असा आहे. या यक्षाची प्रतिमा भारहूत स्तूपाजवळ कोरली आहे. असेच दुसरे उदाहरण 'सुदिसणा' गाव एका यक्षिणीच्या नावाने तेथे ज्ञात होते. क्रमांक १९, ओळ २ पाहा.

[ पूर्वी ] **ऋषभदत्ताच्या** मालकीचे होते ते आमचे २०० – दो
निवर्तनांचे शेत **त्रिरश्मि**[1] (लेण्यातील) या भिक्षूंना आम्ही दिले
आणि त्या शेताच्या सवलती देत आहो. [त्या अश्या – ] यामध्ये [क
राजसेवकाने ] प्रवेश करू नये. याला [कोणीही] हात लावू
यात मिठासाठी खोदू नये. यात राज्याच्या दंडाधिकाऱ्यांनी [को
हस्तक्षेप] करू नये. याला सर्व प्रकारच्या सवलती मिळाव्य
शेताची आणि त्याच्या सवलतींची नोंद तुम्ही करावी. ही आज्ञा
दिली आहे. अमात्य **शिवगुप्ताने** ती लिहून घेतली आहे. ती म
मिकांनी[2] सुरक्षित ठेवली आहे. तिची पट्टिका[3] **संवत्सर १८, वर्षा**
**दिवस १** या दिवशी [भिक्षूंना] दिली. **तापसाने** ती [प
तयार केली.[4]

## क्रमांक १२

# काल्र्याच्या लेण्यातील [ गौतमीपुत्र सातकर्णीचा लेख : संवत्सर [ १८ ]

ह्या लेख पुणे जिल्ह्यातील **कार्ले** येथे चैत्य लेण्याच्या
आणि उजवीकडील दरवाजांवरील गलथ्याच्या खालील पट्टीवर
ओळींत कोरला आहे.

ह्या लेखाकडे स्टीव्हन्सनने सन् १८३४ मध्ये जर्नल ऑफ दि
एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ३, पृ. ४९८ वर त्याची यथादृ
छापून प्रथम लक्ष वेधले. नंतर प्रिन्सेप, बर्ड – मिचेल – विल्सन,
हुल्श, स्टीव्हन्सन – ब्रेट, भगवानलाल इंद्रजी, पिशेल, आणि
यांनी त्याची चर्चा केली.[5] ब्यूह्लरने आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ
इंडिया, व्हॉ. ४, पृ. ११२, आणि सेनार्टने एपिग्राफिया इंडिका, व

---

१ 'तेकिरसिण' हे 'तेरसिकानं' (त्रैरश्मिकांना) बद्दल चुकीने लिहिलेले दि

२ हे महास्वामिक गोवर्धन येथील त्या लेण्याचे भिक्षुमुख्य असावे. इतरत्र त्यांना 'मह
स्वामी' म्हटले आहे.

३ प्राचीन काळी कागदाच्या अभावी या प्रती कापडाच्या पट्टिकांवर करीत असत

४ ताम्रपटांत जसा 'दूतका'चा निर्देश 'राजाज्ञा अमलात आणणारा अधिकारी
दानपत्राच्या शेवटी येतो तसा हा उल्लेख दिसतो. 'तापस' हे विशेषनाम
मधील 'समणा'सारखे दिसते.

५ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११०५, मधील संदर्भ पाहा.

पृ. ६४ इ. वर छापासह त्याचे संपादन केले आहे. त्याच छापावरून त्याचे वाचन येथे दिले आहे.

हा लेख दुसऱ्या ओळीत लेण्याच्या सहा तुळयांमुळे मधून मधून खंडित झाला आहे. भगवानलाल इंद्रजींनी त्याचा छाप प्रसिद्ध केला होता, पण त्याचे वाचन आणि अनुवाद ही मात्र दिली नव्हती. ब्यूह्लर व सेनार्टनी ती दिली आहेत.

**लिपी व भाषा** — सातवाहनांच्या इतर लेखांच्याप्रमाणे या लेखाचीही लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचा उद्देश **वलुरक** लेण्यांत वास्तव्य करणाऱ्या **महासंघिक** निकायाच्या (संघाच्या) भिक्षूंच्या निर्वाहाकरिता उत्तर दिशेच्या मार्गावरील **मामाल** आहारातील (विभागातील) **करजक** गाव भिक्षुहल[1] (भिक्षूंची जमीन) म्हणून दान दिल्याची नोंद करणे हा आहे. ही आज्ञा **मामाडचा**[2] अमात्य [पुरुगुप्त] याला तोंडी दिली होती. ती विजयी शिबिरात लिहिली होती. तिची पट्टिका **शिवस्कन्दगुप्ताने संवत्सर** [१८], **वर्षापक्ष** ४, **दिवस** १ या दिवशी तयार केली असे शेवटी म्हटले आहे.

प्रस्तुत लेखाचा आरंभीचा भाग आता नष्ट झाल्यामुळे या लेखातील आज्ञा कोणा राजाने आपल्या विजयी शिबिरातून काढली होती हे अनुमानाने ठरविले पाहिजे. प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले **करजक** गाव[3] पूर्वी **ऋषभदत्ताने वलूरक** येथील भिक्षूंच्या निर्वाहाकरिता दिले होते असा निर्देश कार्ले येथील क्र. ३९ च्या लेखांत आहे. तेच गाव त्याच भिक्षूंच्या निर्वाहाकरिता दिले असल्याने नाशिक येथील क्र. ११ च्या लेखातल्याप्रमाणे ही आज्ञा गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानावरील विजयानंतर दिलेली दिसते. प्रस्तुत लेखातील संवत्सर स्पष्ट नाही. ब्यूह्लरने ते अनिश्चितपणे १४ असे वाचले होते.[4] सेनार्टला ते वाचन संशयास्पद वाटले, तरी त्यात फरक करण्यास आधार नसल्याने त्याने तेच दिले आहे. पण रॅप्सनने म्हटल्याप्रमाणे गौतमीपुत्राने करजक – ग्रामदानाची ही आज्ञा

---

१ 'भिक्षुहल' म्हणजे भिक्षूंना दिलेली जमीन; जसे 'ब्रह्मदाय' म्हणजे ब्राह्मणांना दिलेले दान.

२ 'मामाड' आणि 'मामाल' यांनी एकच प्रदेश (सध्याचा मावळ तालुका) दाखविला आहे.

३ ऋषभदत्ताच्या क्रमांक ३९ च्या लेखात त्याचे नाव 'करजिक' असे आले आहे.

४ नाशिकच्या लेण्यातील पूर्वोक्त क्र. ११ च्या लेखांचे संवत्सर ब्यूह्लरने प्रथम १४ असेच वाचले होते, पण नंतर ते १८ आहे अशी दुरुस्ती त्याने केली.

विजयी शिबिरातून काढली असल्यामुळे नाशिक लेण्यातील क्र. ११ च्या लेखातल्याप्रमाणे ती नहपानावरील विजयानंतर लौकरच काढली असावी.[१] अर्थात् या लेखातील संवत्सर नाशिकच्या लेखातल्याप्रमाणे १८ हेच असावे. नाशिक येथे संवत्सर १८, वर्षापक्ष २, दिवस १ या दिवशी तेथील भिक्षूंना अजकालकिय शेत दान दिल्यावर दोन आठवड्यांनी गौतमीपुत्र सातकर्णीनें पुणे जिल्हा ताब्यात आल्यावर कार्ले येथील महासंघिक पंथाच्या भिक्षूंना हे करजक गाव दान दिले असे दिसते.

नाशिक आणि कार्ले येथील लेण्यांतील लेखांत उल्लेखिलेल्या आज्ञा एकाच वर्षी दिल्या होत्या हे दाखविताना रॅप्सनने नाशिकच्या लेखातील राजाज्ञा लिहून घेणारा शिवगुप्त हा कार्ले लेण्यातील राजाज्ञेची पट्टिका तयार करणारा शिवस्कन्दगुप्त होय असे म्हटले आहे ते मात्र पटण्यासारखे नाही. या दोन अधिकाऱ्यांची नावे भिन्न आहेत. एकाचे कार्यक्षेत्र नाशिक प्रदेश तर दुसऱ्याचे कार्ले प्रदेश होते. तेव्हा ते एक असणे शक्य नाही.

**स्थलनिश्चय** — प्रस्तुत लेखातली राजाज्ञा **मामाड** किंवा **मामाल** नामक आहारातील (विभागातील) अमात्याला केली होती. मामाल म्हणजे सध्याचा पुणे जिल्ह्यातील सह्याद्रि पर्वतालगतचा मावळ तालुका होय. त्यातच कार्ले गाव आहे. त्याचे प्राचीन नाव **वलुरक** होते. त्याच्या ईशान्येस सरळ रेषेत सुमारे ५ मैलांवर करजगाव आहे तेच प्राचीन कालचे **करजग्राम** होय.

**ओळ** **वाचन**[२]

**१ . . . . . . . . . . . . [ आनपयति ] [*] मामाडे[३] अमच परगत . मसु[४] एथ लेनेस वालुरकेस[५] वाथवान**

**२ पवजितान भिखुन निकायस महास[घि]यान यपनय एथ मामालाहारे उतरे मगे[६] [ गामे ] करजके[सु*][७]**

---

१ *B. M. C. (Andhras)*, p. xlix.

२ भगवानलालनी याचा फक्त छाप *I.C.T.W.I.* मध्ये दिला आहे. ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन, अनुवाद व टीपा दिल्या आहेत.

३ 'मामाले' (ब्यू.), पण 'डे' हे अक्षर स्पष्ट आहे.

४ रॅप्सनने येथे गुप्तांच्या भीतरी लेखातल्याप्रमाणे 'पुरुगुप्त' वाचावे असे सुचविले आहे.

५ 'लेनेसु वालुरकेसु' वाचावे.

६ 'उतरमगे' वाचावे.

७ प्राकृतात गावांची नावे अनेकवचनात असतात.

३ **भिखुहले[ल]**[१] **ददम** [ ।* ] **एतेस तु गाम करजके**[२] **भिखुहल ओयपापेहि** [ ।* ] **एतस चस**

४ **गामस करजकान भिखुहलपरिहार वितराम** [ ।* ] **अपावेस अ . . . .**[३] **पारिहारिक च** [ ।* ] **एतेहि न परिहारेहि परिहरह** [ ।* ] **एतस चस गाम करजके**[४]

५ **भिखुहलपरिहारे च एथ निबधापेहि** [ ।* ] **अवियेन आनत . . . . छतो विजयठसातारे**[५] **दतो ठे . .**[६] [ ।* ] **पटिका सव** १० [+*] [८][७]

६ **वा प ४ दिव १ सिवखदगुतेन कटा** [ ।* ].

## अनुवाद

. . . . . . . . **मामाड** येथील अमात्य [पुरुगुप्त] यास आज्ञा करतात की येथील **वलुरक** लेण्यांत वास्तव्य करणाऱ्या संन्यासी भिक्षूंच्या संघाला – **महासंघिकांना** – निर्वाहाकरिता मामाड आहारातील (विभागातील) उत्तरेच्या मार्गावरील **करजक** ग्रामात आम्ही भिक्षुहल (भिक्षूंच्या करिता जमीन) दिले आहे. म्हणून तुम्ही त्यांना त्या **करजक** गावातील **भिक्षुहल** जमिनीचा तावा द्यावा.[८]

या **करजक** ग्रामातील भिक्षुहल जमिनीच्या (पुढील) सवलती आम्ही देत आहो – या जमिनीत कोणी [अधिकाऱ्यांनी] प्रवेश करू नये. त्यात हस्तक्षेप करू नये. तश्याच [अन्य] सवलती दिल्या आहेत. या [सर्व] सवलती तुम्ही त्यांना द्याव्या. आणि हा करजक गाव आणि त्याच्या भिक्षुहलविषयक सवलती यांची नोंद तुम्ही करवावी.

---

१ 'भिखुहल' कोरावयाचे होते, पण शेवटचे अक्षर 'ले' कोरल्यावर ते भेगेत गेल्यामुळे पुन: 'ल' कोरले असावे, असे सेनार्टने म्हटले आहे.

२ ब्यूह्लरचा 'गामे करजकेसु' हाच पाठ योग्य दिसतो, पण वरील पाठ सेनार्टने जास्त संभवनीय म्हणून दिला आहे.

३ क्र. १३, ओ. ५ मध्ये अशाच संदर्भात 'अनोमस' आले आहे. तसे येथे वाचावे.

४ 'गामे करजकेसु' वाचावे.

५ 'विजयखधावारे' वाचावे. क्र. ११, ओ. १ पाहा.

६ 'ठे रञा' (ब्यू.).

७ ब्यूह्लरने हे चिन्ह '४' चे मानले आहे. सेनार्टला ते संशयास्पद वाटले तरी त्यानेही तेच दिले आहे. पण ते '८' चे द्योतक असावे असे रॅप्सनने दाखविले आहे.

८ 'ओयपापेहि' हे आज्ञार्थी द्वितीय पुरुषी एकवचनी रूप आहे हे हुल्शने कोंडमुडी ताम्रपटावरून दाखविले. ते सेनार्टने मान्य केले. अनुवादात द्वितीय पुरुषी बहुवचन योजिले आहे.

ही आज्ञा तोंडी दिली आहे. ती [या] विजयी शिबिरात राजाने दिली आहे. तिची पट्टिका **संवत्सर** [१८] **वर्षापक्ष** ४, **दिवस** १ या दिवशी **शिवस्कन्दगुप्ताने** तयार केली.

## क्रमांक १३

# नाशिकच्या लेण्यातील गौतमीपुत्र सातकर्णीचा लेख : संवत्सर २४

[पट्टिका १, आकृति १]

हा लेख नाशिक येथील क्र. ३ च्या लेण्यात व्हरांड्याच्या पूर्वेच्य भिंतीवर छताखाली क्र. ११ च्या लेखानंतर स्वस्तिक काढून पुढे सा ओळींत कोरला आहे. याकडे स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी सन् १८५ मध्ये जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी व्हॉ. ७, पृ. ४६ वर त्याची यथादृष्ट प्रत प्रकाशित करून प्रथम लक्ष वेधले. त्यानंतर त्याची चर्चा एडवर्ड आणि आर्थर वेस्ट, रा. गो. भांडारकर ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी, पिशेल, फ्रांके, हुल्श, सेनार्ट आणि रॅप्सन यांनी केली.[1] ब्यूह्लरने छापासह त्याचे वाचन आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑ वेस्टर्न इंडिया, व्हॉ. ४, पृ. १०५ इ.वर आणि सेनार्टने तसेच एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ८, पृ. ७३ इ.वर केले आहे. सेनार्टच्या छापावरून हा लेख येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—याची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृ आहे. यात २, ४, १०, २० व १०० या संख्यांची चिन्हे आली आहेत

**विवेचन**—प्रस्तुत लेखात राजा **गौतमीपुत्र सातकर्णि** आणि त्याची 'जीवसुता' (भाग्यवान्) माता **महादेवी** यांची आज्ञा **गोवर्ध** येथील अमात्य **सामक** (श्यामक) याला कळविली आहे. ती येणेप्रमाणे 'आम्ही पूर्वी त्रिरश्मि पर्वतातील आमच्या धर्मदाय लेण्यात वास्तव्य क णाऱ्या संन्यासी भिक्षूंना **कखडी** गावातील शेत दिले होते. ते शेत कस जात नाही व तो गावही उद्ध्वस्त झाला आहे. म्हणून आता या (गोवर्धन नगराच्या सीमेवरील आमचे सरकारी शेत आहे. त्यातून १०० निवर्त जमीन या **त्रिरश्मि** पर्वतातील लेण्यात राहणाऱ्या संन्यासी भिक्षूंना दे आहो.' नंतर त्या शेताच्या नेहमीच्या सवलतींचा निर्देश आहे.

---

१ ल्यूडर्सच्या यादीतील, क्रमांक ११२६ मधील संदर्भ पाहा.

ही राजाज्ञा तोंडी दिली होती. ती द्वारपालिका **लोटा** हिने लिहून घेतली. तिची पट्टिका **सुजीविन्** याने **संवत्सर २४, वर्षापक्ष ४, दिवस ५** या दिवशी केली. त्यापूर्वी **संवत्सर २४, ग्रीष्मपक्ष २, दिवस १०** या दिवशी (राजधानीत) तिची नोंद केली होती. मध्यंतरीचा काळ ती राजधानीहून नाशिकला पोचण्यास लागला असावा.

प्रस्तुत लेखात गौतमीपुत्र सातकर्णीबरोबर ज्या महादेवीचा उल्लेख आहे तिचे नाव दिले नाही. तथापि ती त्याची माता होती असे म्हटले आहे. तिचे वर्णन 'जीवसुता' असे केले आहे. ऋग्वेद कालापासून[१] पुत्र जिवंत असणे हे भाग्याचे लक्षण मानण्यात येत असे. तशात गौतमीपुत्र सातकर्णीसारखा दिग्विजयी सम्राट् जिचा पुत्र विद्यमान होता तिने आपला निर्देश 'जीवसुता' असा सार्थ अभिमानाने केला असला तर नवल नाही, तिचे नाव नाशिकच्या क्र. १८ च्या लेण्यातील लेखावरून 'गौतमी बलश्री' (गौतमकुलोत्पन्न बाला) होते असे कळते.

प्रस्तुत लेखात नाशिक येथील क्र. ३ च्या लेण्याला गौतमीपुत्र सातकर्णीने व त्याच्या मातेने काढलेल्या आज्ञेत 'आमचे लेणे' असे म्हटले आहे. आपल्या कारकीर्दीच्या १८ व्या वर्षापर्यंत नाशिक प्रदेश गौतमीपुत्र सातकर्णीच्या अमलाखाली नव्हता. त्या वर्षी त्याने नहपानावर नेत्रदीपक विजय मिळविल्यावर नाशिकच्या लेण्यांतील भिक्षूंना जे भूमिदान केले त्यात त्यांच्याकरिता लेणे कोरविल्याचा उल्लेख नाही. नंतर त्याने क्र. ३ चे लेणे कोरविले असावे. त्याच्या कारकीर्दीच्या १८ व २४ या वर्षांच्या दरम्यान ते लेणे निर्माण झाले ही महत्त्वाची माहिती या लेखावरून मिळते.

क्र. ११ च्या लेखात दान दिलेली भूमि असलेले गाव **अपरकखडी** हे होते; पण प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले गाव **कखडी** आहे. म्हणून ही गावे भिन्न असावी; तसेच पूर्वीचे दान गौतमीपुत्राने केले होते, पण प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले दान त्या राजाने व त्याच्या मातेने केले होते असे म्हटले आहे. तेव्हा ही कखडी गावे भिन्न असावी असे सेनार्टने म्हटले आहे. पण ते पटण्यासारखे नाही. दोन्ही लेखांत उल्लेखिलेले कखडी गाव एकच होय. प्रस्तुत लेखाची आज्ञा गौतमी बलश्रीच्या सांगण्यावरून काढलेली दिसते. तिजवरून तिची बौद्ध धर्मावरील निष्ठा व राजाच्या धर्मकृत्यांत तिच्या शब्दाला असलेले महत्त्व ही प्रत्ययास येतात. पुढील क्र. १८ च्या लेखावरूनही हे स्पष्ट होते.

---

१ ऋग्वेद, १०·३६·९. तसेच महाभारत, ५·१४४·९, आणि रामायण, ४·१९·११ पाहा.

### वाचन[१]

१ सिद्धं [।*] गोवधने अमचस सामकस देयो राजाणितो[२] [।*].
२ रञो गोतमिपुतस सातकणिस महादेविय च जीवसुताय राजमातुय वचनेन गोवधने [अम*]चो सामको अरोग वतवो ततो एव च
३ वतवो एथ अम्हेहि पवते तिरण्हुम्हि अम्ह धमदाने लेणे पतिवसतानं पवजितान भिखून गामे कखडीसु पुव खेतं दत त च खेत
४ [न*] कसते सो च गामो न वसति [।*] एवं सति य दानि एथ नगरसीमे राजकं खेतं अम्हसतकं ततो एतेस पवजितान भिक्ष्नं तेरण्हुकानं ददम
५ खेतस निवतनसतं १०० [।*] तस च खेतस परिहार वितराम [।*] अपावेस अनोमस अलोणखादक अरठसविनयिक सवजात-पारिहारिक च [।*].
६ एतेहि न परिहारेहि परिहरेठ [।*] एत चस खेतपरीहारे च एथ निबधापेथ [।*] अवियेन आणत [।*] पटिहारखिय[३] लोटाय छतो लेखो [।*] सवछरे २०[+*]४
७ वासान पखे ४ दिवसे पचमे ५ सुजिविना कटा [।*] निबधो निबधो[४] सवछरे २०[+*]४ गिम्हाण पखे २ दिवसे १० [।*].

### अनुवाद

सिद्धि असो! **गोवर्धनातील** अमात्य **सामक** (श्यामक) याला ही राजाज्ञा कळवावी. 'राजा **गौतमीपुत्र सातकर्णि** याच्या आणि भाग्यवान्[५] राजमाता **महादेवी** हिच्या आज्ञेवरून **गोवर्धनातील** [अमात्य] **सामक** (श्यामक) याला [आमचे] कुशल सांगावे[६] आणि नंतर कळवावे

१ ए. इं., व्हॉ. ८, प्लेट २ वरून.

२ 'देया राजाणति' असे वाचावे असे सेनार्टने सुचविले आहे.

३ 'पटिहाररखिय' असे वाचावे.

४ 'निबधो' हे पुनरुक्त आहे.

५ मुळात 'जीवसुता' (जिचा पुत्र जिवंत आहे अशी) हे विशेषण योजिले आहे. त्यावरून 'या वेळी राजा आजारी होता, प्रजेला तो जिवंत आहे हे सांगणे जरूर होते. त्याचा उत्तराधिकारी राजधानीस जात असावा. म्हणून राज्यकारभार पाहणाऱ्या वृद्ध राजमातेला त्याच्या नावाने ही आज्ञा काढणे जरूर वाटले असावे. पुढे तो (गौतमीपुत्र सातकर्णि) लौकरच निधन पावला असावा' असे विलक्षण तर्कट दिनेशचंद्र सरकारनी केले आहे! (*Selected Inscriptions*, second ed., p. 200.)

६ 'अरोग वतवो' याचा अर्थ सेनार्टने 'नेहमीचे कुशल विचारावे' असा केला आहे. पण तो चूक आहे. येथे आज्ञा काढणाऱ्याचे कुशल विवक्षित आहे. याच अर्थी नंतरच्या दानपत्रांत 'कुशली' किंवा 'कुशलमनुवर्ण्य' असे शब्द येतात.

की, येथे **त्रिरश्मि पर्वतातील** आमच्या धर्मदाय [लेण्यात] वास्तव्य करणाऱ्या संन्यासी भिक्षूंना आम्ही पूर्वी **कखडी** गावातील [एक] शेत दिले होते. [पण] ते शेत नांगरले जात नाही व तो गावही ओसाड झाला आहे. असे असल्यामुळे या [गोवर्धन] नगराच्या सीमेवरील आमच्या सरकारी शेतातील शंभर – १०० – निवर्तने जमीन **त्रिरश्मि** पर्वतात [राहणाऱ्या] संन्यासी भिक्षूंना आम्ही देत आहो आणि त्या शेताच्या सवलती देत आहो. [त्या अश्या] – यात [कोणी अधिकाऱ्याने] प्रवेश करू नये. याला हात लावू नये. यात मिठाकरिता खणू नये. यात राज्याच्या दंडाधिकाऱ्यांनी [ढवळाढवळ करू नये.] याला सर्व तऱ्हेच्या सवलती मिळाव्या. या शेताच्या [या] सवलती तुम्ही येथे नोंदून ठेवाव्या.

ही आज्ञा तोंडी दिली आहे. [तिचा] लेख द्वारपालिका **लोटाने** लिहून घेतला आहे. **संवत्सर** २४, **वर्षापक्ष** ४, **दिवस** ५, या दिवशी **सुजीविनाने** तिची [पट्टिका] केली. [त्यापूर्वी] **संवत्सर** २४, **ग्रीष्मपक्ष** २, **दिवस** १० या दिवशी [राजधानीत] तिची नोंद केली होती.

## क्रमांक १४

# नाशिकच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख : संवत्सर २

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. २३ च्या लेण्यापलीकडील एका अपूर्ण लेण्याच्या समोरच्या भिंतीवर कोरला आहे.

वेस्ट – द्रय साहेबांनी सन १८६५ मध्ये जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ७, पृ. ४७ इ. मध्ये यथादृष्ट प्रत छापून या लेखाकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर रा. गो. भांडारकर यांनी त्याची चर्चा केली. ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी, व सेनार्ट यांनी त्याचे वाचन देऊन चर्चा केली आहे.[1] सेनार्टच्या छापावरून त्याचे वाचन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे. यातील तिसऱ्या ओळीतील 'इण' हे 'इदं' या अर्थी योजलेले

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११४७ मधील संदर्भ पाहा. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ९४ मध्ये सेनार्टने याचे वाचन दिले आहे.

रूप उल्लेखनीय आहे. प्रस्तुत लेख शेवटच्या ओळीत बराच खराब झाला आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचा उद्देश **धणम** नामक कुटुंबियाने (कुणब्याने) हे लेणे आपल्या मातापित्यांच्या व भगिनींच्या पुण्योपार्जनाकरिता कोरविले हे नमूद करण्याचा आहे. लेखाच्या आरंभी **वासिष्ठीपुत्र** स्वामी **श्रीपुलुमावि** याचा **संवत्सर** २, **हेमंत पक्ष** ८, **दिवस** [८] असा कालाचा उल्लेख आहे.

ह्या लेख वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या कारकीर्दीतील अगदी आरंभीचा आहे. तत्कालीन एका शेतकऱ्याने बौद्ध धर्मावरील निष्ठेने हे लेणे कोरविण्यास आरंभ केला होता, पण त्याच्या हातून ते पूर्ण झाले नाही, असे दिसते. त्या कालच्या संयुक्त कुटुंबपद्धतीचाही त्यात पुरावा आढळतो. त्या दृष्टीनेही त्याचे महत्त्व आहे.

**ओळ** **वाचन**[१]

**१ सिधं [।*] रञो वासिठिपुतस सामिसिरिपुलु—**
**२ माइस संवछरे २ हेमंता[णं*] पखे ४ दिवसे [८]**[२]
**३ एतिय पुवाय कुटुंबिकेण धणमेण इण**
**४ कारितं सह [माता*]पितुहि सह [भगिने] . .**

**अनुवाद**

सिद्धि असो! **वासिष्ठीपुत्र** स्वामी श्री **पुलुमाइ** राजाच्या **संवत्सर** २, **हेमंत ऋतु, पक्ष** ४, **दिवस** [८] या पूर्वोक्त तिथीस **धणम** या कुणब्याने आपले मातापिता व भगिनी यांच्यासह[३] हे [लेणे] करविले.

## क्रमांक १५

# कार्ल्याच्या लेण्यातील [वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा] लेख : संवत्सर ५

ह्या लेख पुणे जिल्ह्यातील **कार्ले** येथील चैत्य लेण्याच्या उत्तरेकडील एका विहाराच्या अर्धचंद्राकृति टाक्याच्या दोन बाजूंवर कोरला आहे.

---

१ ए. इं., व्हॉ. ८, पृ. ९४ समोरील छापावरून.

२ या संख्यावाचक चिन्हाचे वाचन निश्चित नाही. भगवानलालनी ते ६ असे वाचले. ब्यूह्लरने ते ८ चे द्योतक मानले आहे. सेनार्टने त्याचे वाचन दिले नाही.

३ म्हणजे त्यांच्या पुण्योपार्जनाकरिता.

या लेखाकडे स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी सन् १८५४ मध्ये जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ५, पृ. १५८ वर यथादृष्ट प्रत छापून प्रथम लक्ष वेधले. नंतर भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर – बर्जेस आणि सेनार्ट यांनी त्याची चर्चा केली.[१] सेनार्टने प्रसिद्ध केलेल्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** — हा लेख अत्यंत त्रुटित अवस्थेत आहे. त्याच्या सर्व ओळींतील आरंभीची, मध्यातील व शेवटचीही अनेक अक्षरे आता अस्पष्ट झाली आहेत. त्याची **लिपी** प्राचीन ब्राह्मी आणि **भाषा** प्राकृत आहे. ५ या संख्येचे चिन्ह पहिल्या ओळीत आले आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखातील अनेक अक्षरे आता नष्ट झाल्यामुळे त्याचा अर्थ लावणे कठीण झाले आहे. तथापि त्याचा उद्देश कोणा भदन्ताच्या (बौद्ध भिक्षूच्या) शिष्यिणींनी आपल्या श्राविका भगिनींच्या पुण्योपार्जनार्थ बौद्ध संन्याश्यांच्या संघाला हे लेणे आणि त्याजवळील पाण्याचे टाके ही आपले दान म्हणून अर्पण केली हे नमूद करण्याचा होता असे दिसते.

प्रस्तुत लेखाच्या आरंभी पूर्ण कालनिर्देश होता; पण आता त्यातील **[संवत्स]र ५, हेमन्त ऋतूचा पक्ष** . . . एवढेच शब्द शिल्लक राहिले आहेत. हे संवत्सर कोणत्या राजाच्या कारकीर्दीचे हे आता स्पष्ट नाही. तथापि ते कोणा पश्चिमी क्षत्रपाचे असणे शक्य नाही. कारण त्या क्षत्रपांच्या लेखांतील वर्षे शक संवताची (चाळीस नंतरची) पश्चिम महाराष्ट्रातील कोरीव लेखांत उल्लेखिली आहेत. हे संवत्सर गौतमीपुत्र सातकर्णीच्या राज्यकालाचेही असणे शक्य नाही. कारण त्याने हा प्रदेश आपल्या राज्यकालाच्या १८ व्या वर्षी जिंकला होता. तेव्हा हे संवत्सर पुळुमावीचे असावे. कारण यानंतर दोनच वर्षांनी कोरलेला त्याच्या काळचा लेख कार्ले येथे विद्यमान आहे.

**ओळ** **वाचन**

१ . . . . . . **[सवछ*]रे ५ हेमताण[२] प[खे*]** . . . . . . **[एता*]य पुवाय [भ]यत –**

२ . . . . . . **हिण अतेवासिनिण लेणं भगि[ने]** . . **साविकान सदिगा –**

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११०७ यातील संदर्भ पाहा.

२ हेमाताण (भ. व ब्यू.).

**३ . . . [घसु] काले पवइतान सघाय बु[धाय*] [च] [देय*] धम पोढि**
**४ . . . . . . [परिवारेण उपय] . . . .**
**५ . . . . . . अतेवासिनिहि उसभाए [।*]**

### अनुवाद

. . . . . . . **संवत्सर ५, हेमंताचा पक्ष** . . . या पूर्वोक्त [तिथीस] भदन्ताच्या . . . . शिष्यिणींनी [हे] लेणे [कोरविले]. आणि तिच्या श्राविका भगिनींनी बौद्ध संन्याश्यांच्या संघाला व बुद्धाला [येथील] टांके धर्मदाय म्हणून अर्पण केले. . . . . परिवाराने . . . शिष्यीण **ऋषभा** हिने[१] . . .

### क्रमांक १६

## नाशिकच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख : संवत्सर ६

हा लेख नाशिक येथील क्रमांक २ च्या लेण्यात व्हरांड्याच्या मागील भिंतीवर कोरला आहे.

प्रस्तुत लेखाकडे वेस्ट-द्रय साहेबांनी सन १८६५ मध्ये त्याची यथादृष्ट प्रत जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटीच्या व्हॉ. ७, पृ. ५२ वर प्रकाशित करून प्रथम लक्ष वेधले.[२] त्यानंतर रा. गो. भांडारकर, ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी व सेनार्ट यांनी त्याची चर्चा केली. सेनार्टच्या लेखाबरोबर छापलेल्या छापावरून त्याचे वाचन येथे दिले आहे.

**लिपी व भाषा** — प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे. त्यात १, ५ व ६ या संख्यांची चिन्हे आहेत.

**विवेचन** — प्रस्तुत लेख अतिशय खंडित झाला आहे. त्याची फक्त पहिली ओळ आता वाचता येते. तीत या लेखाचा काळ **वासिष्ठीपुत्र**

१ हा भाग अतिशय खंडित झाल्यामुळे त्याचा आशय समजत नाही.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११२२ मधील संदर्भ पाहा. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ५९ शी संबद्ध छाप पाहा.

**श्रीपुळुमावीच्या सहाव्या संवत्सरातील ग्रीष्म पक्ष ५, दिवस** . . . असा दिला आहे. दिवसाची संख्या आता नष्ट झाली आहे. हा लेख अत्यंत त्रुटित झाल्यामुळे त्याचा उद्देश सांगता येत नाही.

**ओळ** **वाचन**

**१ सिधं [।*] रञो वासिठिपुतस सिरिपुळुमाविस संवछरे छठे ६ गिम्हपखे पचमे ५ दिवसे [१]**[1] . . . .

**अनुवाद**

सिद्धि असो ! राजा **वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमावि** याच्या **संवत्सर** सहा ६, **ग्रीष्मपक्ष पांच** ५, **दिवस** [१]. . . .

## क्रमांक १७

# कार्ल्याच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख : संवत्सर ७

हा लेख कार्ले येथील चैत्य लेण्याच्या मधल्या दरवाज्याच्या डाव्या बाजूस वरील गलथ्याच्या पट्टीवर खोदला आहे.

या लेखाकडे सन १८४७ मध्ये बर्ड आणि मिचेल यांनी हिस्टॉरिकल रीसर्चेस, पृ. ५८ इ. वर प्रथम लक्ष वेधले.[2] नंतर स्टीव्हन्सन, ब्रेट व फ्रांके यांनी त्याची चर्चा केली. भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व अनुवाद केला आहे. सेनार्टच्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेखाने तीन ओळी व्यापिल्या असून चौथ्या ओळीच्या उजव्या बाजूस राहिलेला एक शब्द कोरला आहे. लिपी प्राचीन ब्राह्मी असून भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश **ओखळक** येथील महारठी **कौशिकीपुत्र मित्रदेव** याचा पुत्र महारठी **वासिष्ठीपुत्र सोमदेव** याने एक गाव (त्याचे नाव येथे दिले नाही) **वलुरक** लेण्यातील वलुरक संघाला

१ ब्यूह्लरने ‘दिवस १’ असे वाचले होते, पण आता ती संख्या अस्पष्ट झाली आहे असे सेनार्टने म्हटले आहे.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११०० मधील संदर्भ पाहा.

दिला हे नमूद करण्याचा आहे. हा गाव लहान मोठ्या करांसह,[१] तसेच देय (रोख नाणी) व मेय (धान्यादिक) यांसह दिला आहे असे म्हटले आहे.

प्रस्तुत लेखाची मिती **वासिष्ठीपुत्र पुळुमावि** याच्या कारकीर्दीचे **सातवे संवत्सर, पाचवा ग्रीष्मपक्ष** आणि **प्रथम दिवस** अशी दिली आहे.

**स्थलनिश्चय — वलुरक** हे कार्ल्याचे प्राचीन नाव होय. दान दिलेल्या गावाचे नाव अनवधानामुळे येथे दिले नसावे. दान देणारा महारठी **ओखळक** गावाचा रहिवासी होता. '**ओखळक**' याचे रूप कालान्तराने 'उखळी' किंवा 'उखळगाव' असे व्हावे. त्या नावांची गावे अहमदनगर व जळगांव, औरंगाबाद जिल्ह्यांत सापडतात. पुणे जिल्ह्यात मात्र तसे गाव नाही. कार्ल्याच्या लेण्याला दूरदूरच्या लोकांनी देणग्या दिल्या असल्यामुळे 'ओखळक' पुण्यातीलच असले पाहिजे असे नाही. त्याच्या चतु:सीमा येथे दिल्या नसल्यामुळे ते कोठे होते हे निश्चितपणे सांगता येत नाही.

**ओळ** **वाचन**[२]

१ **सिधं**[३] **[।*] रञो वासिठिपुतस सामिसिरि[पु][ळुमावि*]स सवछरे सतमे ७ [गि]म्हपखे पचमे ५**

२ **[दि]वसे पथमे १ एताय पुवाय ओखळकियान महारथिस**[४] **कोसिकिपुतस मितदेवस पुतेन**

---

१ प्रस्तुत लेखाच्या तिसऱ्या ओळीतील 'सकरुकरो' याचा अर्थ भगवानलाल व ब्यूह्लर यांनी 'वलुरक लेण्याच्या संस्काराकरिता (डागडुजीकरिता)' असा केला आहे. 'वलुरकलेनान' याचा अन्वय त्यामागील 'वलुरकसघस' याशी आहे. अशा अन्वयाची अनेक उदाहरणे नाशिकच्या लेण्यांतील लेखांत आली आहेत. नंतरच्या अनेक कोरीव लेखांत 'सोद्रंग: सोपरिकर:' असा शब्दप्रयोग आढळतो. त्याच अर्थी 'सकरुकरो' हा शब्द येथे योजिलेला दिसतो.

'सदेयमेयो' याचा अर्थ सेनार्टने 'निश्चित किंवा प्रमाणयुक्त' (fixed or proportional) असा केला आहे तो बरोबर वाटत नाही. 'देय' याने 'नाण्यात रोख दिलेला' आणि 'मेय' याने 'मोजून दिलेला' असे अर्थ विवक्षित दिसतात. प्राचीन काळी सरकारी सारा अशा द्विविध रूपाने दिला जात असे. आमचा 'शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख,' पृ. ११० पाहा.

२ ए. इं., व्हॉ. ७, प्लेट २ वरून.

३ चिन्हाने प्रदर्शित. भगवानलाल, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी याची दखल घेतली नाही.

४ 'महारठिस' (भ.). पण येथे 'थ' चा मध्य बिंदु स्पष्ट दिसतो. शिवाय 'महारथिना' हे तिसऱ्या ओळीत आले आहे ते पाहा.

३ [म]हारथिना वासिठिपुतेन सोमदेवेन गामो दतो वलुरकसघस वलुरकलेनान[1] सकरुकरो[2] सदेय–
४ मेयो [।*]

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **वासिष्ठीपुत्र** स्वामी **श्रीपुळुमावि** याच्या [राज्यकाळाचे] **संवत्सर सातवे – ७ – ग्रीष्म पक्ष पाचवा – ५ – दिवस पहिला – १** – या पूर्वोक्त तिथीस **ओखळकीय** गावातील महारठी कौशिकीपुत्र **मित्रदेव** याचा पुत्र महारठी वासिष्ठीपुत्र **सोमदेव** याने **वलुरक** लेण्यांतील **वलुरक** संघाला कर व उपकर यांसहित तसेच देय (रोख रक्कम) व मेय (धान्य) यांसहित [हा] गाव[3] दिला आहे.

## क्रमांक १८

# नाशिकच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख : संवत्सर १९

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. ३ च्या लेण्यात व्हरांडचाच्या मागील भिंतीवर – दरवाजाच्या वरील बाजूस – कोरला आहे. याकडे सन १८५३ मध्ये स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ५, पृ. ४१ इ. वर त्याची यथादृष्ट प्रत छापून प्रथम लक्ष वेधले. नंतर वेस्ट-द्वय, रा. गो. भांडारकर व फ्रांके यांनी त्याची चर्चा केली.[4] ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व अनुवाद प्रसिद्ध केले. सेनार्टच्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** –– या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे. हा लेख प्रथम संस्कृतात लिहून मग प्राकृतात त्याचे रूपान्तर

---

१ 'वलूरकलेनन' (ब्यू.).

२ भगवानलालनी 'सकरो(र)करो [स]देयमेयो' असे वाचून त्याचा अर्थ, 'हा गाव वलुरक लेण्याच्या दुरुस्तीकरिता' आहे असा अर्थ केला आहे. ब्यूह्लरने शुद्ध पाठ 'सकारकारस' (संस्कारकाराय) असा सुचवून तोच अर्थ केला आहे. यापेक्षा वर दिलेले सेनार्टचे 'सकरोत्करः' (कर व उपकर यांसहित) या अर्थाचे वाचन चांगले आहे.

३ या गावाचे नाव येथे दिले नाही.

४ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११२३ मधील संदर्भ पाहा.

केल्यासारखा दिसतो. इतर प्राकृत लेखांत क्वचितच दिसणारे शब्दालंकार व अर्थालंकार तसेच दीर्घ समास यात आले आहेत हे या लेखाचे वैशिष्टच आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश सातवाहन कुलातील राजा **दक्षिणापथेश्वर पुळुमावि** याने नाशिक येथे **महादेवी बलश्री** या आपल्या आजीने कोरविलेल्या लेण्याच्या अलंकरणार्थ आणि आपला पिता [गौतमीपुत्र सातकर्णि] याच्या पुण्योपार्जनार्थ **त्रिरश्मि पर्वताच्या** नैर्ऋत्येस असलेला **पिशाचीपद्रक** गाव सर्व प्रकारच्या उपभोग हक्कांचा त्याग करून तेथील **भदावनीय** भिक्षुसंघाला आपला धर्मदाय म्हणून दान दिला हे नमूद करण्याचा होता. या लेखाचा काळ **वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या** कारकीर्दीचे **संवत्सर १९, ग्रीष्म पक्ष २, आणि दिवस १३** असा आरंभी दिला आहे.

ज्या क्रमांक ३ च्या लेण्यात हा लेख कोरला आहे ते लेणे गौतमीपुत्र सातकर्णीच्या मातेने—महादेवी गौतमी बलश्री हिने—कोरविले होते व ते पूर्वोक्त भिक्षुसंघाला पूर्वी दान दिले होते. प्रस्तुत लेखात तिला 'महादेवी', 'महाराज-माता' आणि 'महाराज-पितामही' अशी विशेषणे लावली आहेत. ती सार्थ आहेत. कारण ती एका महाराजाची राणी होती. त्याचे नाव अद्यापि कोणत्याही कोरीव लेखात आढळले नाही, पण पुराणांत ते 'शिवस्वाति' असे दिले आहे. तिचा पुत्र सातकर्णि हा मध्य व दक्षिण भारतातील विशाल प्रदेशाचा महाराज होता, आणि तिचा नातू पुळुमावि याला तर प्रस्तुत लेखात 'दक्षिणापथेश्वर' असे म्हटले आहे. या अनुपम भाग्यवत्तेचा तिला सार्थ अभिमान होता. तो तिच्या वरील तीन विशेषणांत व्यक्त झाला आहे.

गौतमी बलश्रीला आपल्या पराक्रमी व सच्चरित अशा सातकर्णि पुत्राबद्दल अत्यंत अभिमान वाटत होता, तो प्रस्तुत लेखाच्या आरंभी घातलेल्या त्याच्या विस्तृत वर्णनावरून सुस्पष्ट रीतीने व्यक्त होतो. अश्या तऱ्हेचे वर्णन प्राचीन काळच्या इतर कोणत्याही भारतीय राजाबद्दल कोरीव लेखांत आढळत नाही.

प्रस्तुत लेखात म्हटले आहे की हा **गौतमीपुत्र सातकर्णि असिक** (ऋषीक), **असक** (अश्मक), **कुकुर, अपरान्त, विदर्भ** व **आकरावन्ती** या देशांचा अधिपति होता. त्याच्या राज्याचा विस्तार दाखविण्याकरिता पुढे त्याच्या राज्यातील पुढील पर्वतांचा नामनिर्देश केला आहे—**विन्ध्य ऋक्षवत्, पारियात्र, सह्य, कृष्णगिरि, मच, श्रीस्तन, मलय, महेन्द्र श्वेतगिरि** आणि **चकोर**. तसेच पुढे त्याच्या सैन्यातील [हत्ती, घोडे

वगैरे] वाहनांनी [त्याच्या दिग्विजयात] तीन समुद्रांचे पाणी प्याले होते असे म्हटले आहे. नंतर सर्व राजमंडळे त्याची आज्ञा पाळीत असत असेही सांगितले आहे.

गौतमीपुत्र सातकर्णि स्वरूपाने [पौर्णिमेच्या] पूर्ण चंद्रासारखा होता; त्याची चालण्याची ढब उत्कृष्ट हत्तीच्या चालीसारखी होती; त्याचे बाहू शेषाच्या शरीराप्रमाणे भरदार होते असे त्याच्या रूपाचे वर्णन आले आहे. तो सदैव लोकांना अभयदान करणारा, मातृसेवातत्पर, प्रजाजनांच्या सुखदु:खांत सहभागी होणारा, धर्मोपार्जित संपत्तीचा योग्य विनियोग करणारा, द्विजांच्या तसेच इतर वर्णांच्या लोकांना त्यांच्या आपत्तीत साहाय्य करणारा, चातुर्वर्ण्यसंकर निवारण करणारा, आगमांचे निवासस्थान, सत्पुरुषांचा आश्रय व राज्यलक्ष्मीचे अधिष्ठान, अनुपम धनुर्धर, आणि अद्वितीय ब्राह्मण होता. त्याला हिंसेचा तिटकारा असे. म्हणून शत्रूने अपराध केला, तरी तो त्याला देहदंड न करिता क्षमा करीत असे.

पुढे त्याच्या पराक्रमाविषयी म्हटले आहे की त्याने क्षत्रियांचा गर्व दमन केला होता, **शक, यवन, पह्लव** यांचा नाश केला होता, **क्षहरात** वंशाचा समूळ उच्छेद केला होता, आणि आपल्या **सातवाहन** कुळाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली होती. त्याची विजयपताका कधीही शत्रूंनी काबीज केली नव्हती, आणि त्याच्या राजधानीला शत्रूचा कधीही उपसर्ग पोचला नव्हता.

नाशिक येथील क्रमांक ३ चे लेणे गौतमी बलश्रीने आपल्या सातकर्णि पुत्राला सांगून बौद्ध संघाकरिता कोरविले होते हे मागे क्रमांक १३ च्या लेखावरून दाखविले आहे. क्रमांक १९ च्या लेखात त्याला 'देवी–लेणे' म्हटले आहे. पण त्या लेण्याला उत्कृष्ट शिल्पांनी भूषविले नव्हते. म्हणून तिचा नातू दक्षिणापथेश्वर पुळुमावि याने **पिशाचीपद्रक** गाव भिक्षु-संघाला देऊन त्याच्या उत्पन्नातून त्या लेण्यातील शिल्पे कोरविण्याची तजवीज केलेली दिसते.

**स्थलनिश्चय — दक्षिणापथ** म्हणजे नर्मदा नदीच्या दक्षिणेचा प्रदेश. 'नर्मदाया दक्षिणेन देशो दक्षिणापथः ।[१]' आणि 'माहिष्मत्याः परतो दक्षिणापथः ।[२]' अश्या त्याच्या व्याख्या संस्कृत ग्रंथांत आढळतात. '**असिक**' म्हणजे 'ऋषीक.' 'रामायण' व 'महाभारत' यांतील निर्देशांवरून हा देश

---

१ काव्यमीमांसा (गायकवाड ओरिएंटल सीरीज), पृ. ९३.

२ वात्स्यायन, कामसूत्र (काशी संस्कृत सीरीज), पृ. ११२ वरील जयमङ्गला टीका पाहा.

अनूप, विदर्भ व अश्मक यांना लागून होता असे दिसते.[१] असा देश सध्याचा खानदेशच असला पाहिजे. **असक** (अश्मक) हा गोदावरीच्या दक्षिणेचा प्रदेश होता असे पालि 'सुत्तनिपाता'वरून दिसते. त्यात सध्याच्या अहमदनगर व बीड जिल्ह्यांचा अंतर्भाव होत असावा. **मूलक** हा सध्याचा औरंगाबाद जिल्हा दिसतो. त्याची राजधानी 'पतिट्ठान' (सध्याचे पैठण) होती असे पालि वाङ्मयावरून कळते.[२] **कुकुरचे** स्थान निश्चित नाही. वराहमिहिराने तो प्रदेश मध्य देशात घातला आहे.[३] त्यावरून तो नर्मदेच्या उत्तरेस असावा. **अपरान्त** म्हणजे उत्तर कोंकण. **अनूप** देशात सध्याच्या मध्यप्रदेशाचा नेमाड जिल्हा समाविष्ट होत असे. त्याची राजधानी माहिष्मती[४] (सध्याचे नर्मदातीरावरील महेश्वर) ही होती. **विदर्भ** आपल्या प्राचीन नावाने अद्यापि ज्ञात आहे. पण प्राचीन काळी त्याचा विस्तार उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस गोदा-वरीपर्यंत होता. **आकरावन्ती** हे माळव्याचे प्राचीन नाव. या देशाचे पूर्व व पश्चिम असे दोन भाग क्षत्रप रुद्रदामन् याच्या जुनागड येथील लेखात उल्लेखिले आहेत. पूर्व आकरावन्तीची राजधानी आकर आणि पश्चिम आकरावन्तीची अवन्ति (उज्जयिनी) होती. या दोन्ही राजधान्या अद्यापि आपल्या प्राचीन नावांनी ज्ञात आहेत.

प्रस्तुत लेखात अनेक पर्वतांचा उल्लेख आला आहे. **विन्ध्य, सह्य** व **मलय** हे सर्वांस माहीत आहेत. **ऋक्षवत्** हे सातपुड्याचे प्राचीन नाव. **पारियात्र** हे अबूच्या पहाडाचे प्राचीन नाव असावे. **कण्हगिरि**[५] (कृष्णगिरि) हा सध्याचा कान्हेरी लेण्यांचा पर्वत. **मच** (मंच) कोणता पर्वत हे निश्चितपणे सांगता येत नाही. तो नाशिकच्या उत्तरेस सहा मैलांवरचा रामशेज डोंगर असावा असा भगवानलालांचा तर्क होता. **सिरिटन** (श्रीस्तन) याचे निश्चित् स्थान सांगता येत नाही. तो कदाचित् श्रीशैल असेल. **सेटगिरि** (श्वेतगिरि) हे अन्ध्रातील नागार्जुनकोंडजवळच्या टेकडीचे नाव होते. त्याचा उल्लेख नागार्जुनकोंड येथील आभीर राजा वसुषेण याच्या लेखात आला आहे. कदाचित् तो नाणेघाटजवळचा

---

१ *Studies in Indology*, I, pp. 184 f.

२ सुत्तनिपात, पारायणवग्गो, वत्थुगाथा, ५.२.

३ बृहत्संहिता, १४.२.

४ महेश्वर येथील लेखांत त्याचा उल्लेख 'माहिष्मती' या नावाने आला आहे. *Potdar Commemoration Volume*, p. 319.

५ *Nasik District Gazetteer* (old ed.), p. 32.

डोंगर असेल.[1] **महेन्द्र** हे दक्षिण भारतातील पूर्व किनाऱ्याजवळील पर्वतराजीचे नाव होय. **चकोर** पर्वताचा पत्ता लागत नाही. दान दिलेले **पिशाचीपद्रक** गाव आता सापडत नाही.

**ओळ** **वाचन**[2]

**१ सिद्धं[3] । रञो वासिठीपुतस[4] सिरिपुळुमाविस सवछरे[5] एकुनवीसे १० [+*]९ गिम्हाण[6] पखे वितिये २ दिवसे तेरसे १०[+*]३ राजरञो गोतमीपुतस हिमव[त]मेरु–**

**२ मंदरपवतसमसारस असिकअसकमुळकसुरठकुकुरापरंत[7]अनुपविदभआकरावंतिराजस विझछवतपरिचात[8]सय्ह(ह्य)कण्हगिरिमचसिरिटनमलयमहिद–**

**३ सेटगिरिचकोरपवतपतिस सवराज[लोक]मडलपतिगहीतसासनस दिवस–कर[क]रविबोधितकमलविमलसदिसवदनस तिसमुदतोयपीतवाहनस पटि-[पु]णचदमडलससिरीक–**

**४ पियदसनस वरवारणविकमचारुविकमस भुजगपतिभोगपीनवाटविपुलदीघ-[9] सुद[र*]भुजस अभयोदकदानकिलिननिभयकरस अविपनमातुसुसूसाकरस सुविभततिवगदेसकालस**

**५ पोरजननिविसेससमसुखदुखस खतियदपमानमदनस[10] सकयवनपल्हवनिसूदनस धमोपजितकरविनियोगकरस कितापराधे पि सतुजने अपाणहिसारुचिस दिजावरकुटुबविवध–**

**६ नस खखरातवस[11]निरवसेसकरस सातवाहनकुलयसपतिथापन[12]करस सवमंडलाभिवादितच[र*]णस विनिवतितचातुवणसकरस अनेकसमरावजितसतुसघस अपराजितविजयपताकसतुजनदुपसधनीय–**

**७ पुरवरस कुलपुरिसपरपरागतविपुलराजसदस आगमान निलयस सपुरिसान असयस सिरिये अधिठानस उपचारान[13] पभवस एककुसस एकधनुधरस एकसूरस एकबम्हणस राम–**

---

१ क्रमांक २३ मधील 'सतगरपवता'चा उल्लेख पाहा.

२ ए. इं., व्हॉ. ८, पृ. ६० समोरील छापावरून.

३ इतरत्र हा शब्द 'सिधं' या प्राकृत रूपाने येतो.

४ 'वासिठिपुतस' (भ. व ब्यू.).

५ 'संवछरे' (ब्यू.).

६ 'गिम्हान–' (भ. व ब्यू.)

७ '–परात' (भ.).

८ 'परिवात' (ब्यू.).

९ 'पीनवट' (भ. व ब्यू.).

१० 'दमनस' वाचावे.

११ 'वंस' (ब्यू.).

१२ 'पतिठापन' (ब्यू.).

१३ 'उपचारानं' (भ.).

८ केसवाजुनभीमसेनतुलपरकमस[१] छणधनुसव[२]समाजकारकस नाभाग-[३] नहुसजनमेजयसकरययातिरामाबरीससमतेजस अपरिमितमखयमचितमभुत-[४] पवनगरुळसिधयखरखसविजाधरभूतगधवचारण –

९ चददिवाकरनखतगहविचिणसमरसिरसि जितरिपुसघस नागवर[५]खधा गगनतलमभिगाढस कुलविपुलसिरिकरस सिरिसातकणिस मातुय महादेवीय गोतमिय बलसिरीय सचवचनदानखमाहिसानिरताय तपदमनिय –

१० मोपवासतपराय राजरिसिववधुसद[६]मखिलमनुविधीयमानाय कारित देयधम [केलासपवत*]सिखरसदिसे तिरण्हुपवतसिखरे वि[मा]- नवरनिविसेसमहिढीकलेण [।*] एत च लेण महादेवी महाराजमाता महाराज[पि]तामही ददाति निकायस भदावनीयानं भिखुसघस [।*]

११ एतस च लेण[स] चितण[७]निमित महादेवीय अयकाय सेवकामो[८] पियकामो च णता . . . . दखिणापथेसरो[९] पितुपतियो धमसेतुस [ददा]ति गाम तिरण्हुपवतस अपरदखिणपसे पिसाजि[१०]पदक सवजातभोगनिरठि [।*]

## अनुवाद

सिद्धि असो! राजा **वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमावि** याच्या [राज्य-कालाच्या] **एकोणिसाव्या – १९ – संवत्सरी ग्रीष्मऋतूच्या दुसऱ्या – २ – पक्षाच्या तेराव्या – १३ – दिवशी** राजराज **गौतमीपुत्र श्रीसातकर्णि** – जो **हिमालय, मेरु** आणि **मंदर** [या] पर्वतांसारखा सामर्थ्यवान् होता; जो **ऋषीक, अश्मक, मूलक, सुराष्ट्र, कुकुर, अपरान्त, अनूप, विदर्भ** [आणि] **आकरावन्ती** या देशांचा राजा होता; जो **विंध्य, ऋक्षवत्, पारियात्र, सह्य, कृष्णगिरि, मंच, श्रीस्तन, मलय, महेन्द्र, श्वेतगिरि** व **चकोर** या पर्वतांचा स्वामी होता; ज्याच्या आज्ञा सर्व राजमंडलांचे अधिपति पाळीत असत; ज्याचे वदन सूर्याच्या किरणांनी उमललेल्या कमलासारखे विमल होते; ज्याच्या [घोडे, हत्ती वगैरे] वाहनांनी

---

१ 'पराकमस' (ब्यू.).
२ 'छणयनुसव–' (भ.).
३ 'नभाग' (ब्यू.).
४ '–मभुतं' (भ.).
५ 'णगवर–' (भ.); 'नगवर–' (ब्यू.).
६ 'वधूसद–' (ब्यू.).
७ 'चितना–' (ब्यू.).
८ 'सेवाकामो' (भ.)
९ 'दखिणापठिसरो' (ब्यू.).
१० 'पिसाचि–' (ब्यू.).

तीन समुद्रांचे पाणी प्याले होते; ज्याचे मुख पूर्ण चंद्रमंडलाप्रमाणे सुंदर आणि आनंददायक होते; ज्याची चालण्याची ढब उत्कृष्ट हत्तीच्या चालीप्रमाणे होती; ज्याचे बाहू शेषाच्या शरीराप्रमाणे पीळदार, पुष्ट, लांब आणि सुंदर होते; ज्याचा निर्भय हात [इतरांना] अभयाचे उदकदान करण्याने [सदैव] ओला होत असे; जो आपल्या सुखी[१] मातेची शुश्रूषा करीत असे; जी आपल्या [आचरणात] [धर्म, अर्थ व काम या] तीन पुरुषार्थांच्या देशकालांचे उत्तम विभाग करीत असे; जो आपल्या पौर जनांच्या सुखदु:खांत सहभागी होत असे; जो क्षत्रियांचा गर्व आणि अभिमान यांचे दमन करीत असे; ज्याने शक, यवन व पह्लव यांचा उच्छेद केला होता; जो न्यायाने मिळविलेल्या करांचा [योग्य] विनियोग करीत असे; ज्याला अपराधी शत्रूंचे [ही] प्राण-हरण करणे आवडत नसे; जो द्विज तसेच खालच्या जातींच्या लोकांच्या कुटुंबांचे पालनपोषण करीत असे; ज्याने **क्षहरात** वंश समूळ नष्ट केला होता; ज्याने **सातवाहन** कुलाला प्रतिष्ठा मिळवून दिली होती; ज्याच्या चरणांना सर्व [राज]मंडळे अभिवादन करीत असत; ज्याने चातुर्वर्ण्यसंकर थांबविला होता; ज्याने अनेक युद्धांमध्ये शत्रूंच्या समूहांना जिंकले होते; ज्याची विजयपताका [शत्रूकडून] कधीही जिंकली गेली नव्हती; ज्याची राजधानी शत्रूंना अजिक्य होती; ज्याची थोर राजपदवी पूर्वजांपासून परंपरेने प्राप्त झाली होती; जो आगमांचे निवासस्थान होता; जो सत्पुरुषांचे आश्रयस्थान होता; जो राज्य-लक्ष्मीचे अधिष्ठान होता; जो शिष्टाचारांचे उगमस्थान होता; जो असामान्य नियन्ता, अप्रतिम धनुर्धर, अद्वितीय योद्धा [आणि] अनुपम ब्राह्मण होता; ज्याचा पराक्रम राम, कृष्ण, अर्जुन व भीमसेन यांच्या-सारखा होता; जो धनुष्योत्सव, समाज इत्यादिकांत भाग घेत असे; ज्याचे तेज नाभाग, नहुष, जनमेजय, सगर, ययाति, राम व अंबरीष यांच्यासारखे होते; जो पवन, गरुड, सिद्ध, यक्ष, राक्षस, विद्याधर, भूत, गंधर्व, चारण, चंद्र, सूर्य, नक्षत्र, ग्रह यांच्याप्रमाणे समरांगणात शत्रुसंघावर अपरिमित, अक्षय, अचिन्त्य व अद्‍भुत असा विजय मिळवीत

---

१ 'अविपन्न' हे 'मातृ' याचे विशेषण घेऊन भगवानलाल इंद्रजींनी असा अर्थ केला आहे की, 'जो आजारी नसलेल्या मातेचीही शुश्रुषा करीत असे.' सामान्यत: लोक आपल्या मातापित्यांची सेवा आजारी असतानाच करतात तसा हा गौतमीपुत्र सातकर्णि नव्हता. ब्यूह्लरने 'ज्याने कधीही मातेची अवज्ञा केली नाही' असे भाषांतर केले आहे, ते मुळाला धरून नाही. 'जो मातेची पूर्णपणे आज्ञा पाळीत असे' असे सेनार्टचे भाषांतर आहे. 'अविपन्न' हे विशेषण क्र. १३, ओ. २ मधील 'जीवसुता' या विशेषणासारखे गौतमी बलश्रीच्या 'भाग्यवान्' किंवा 'सुखी' जीवनाचे द्योतक दिसते.

असे; जो उत्कृष्ट हत्तीच्या स्कन्धावर बसला असता सर्व गगनतलाला [आपल्या तेजाने] आक्रमित असे;[१] ज्याने आपल्या कुळाला मोठी राज्यलक्ष्मी प्राप्त करून दिली होती — अशा **श्रीसातकर्णीची** माता, महादेवी **गौतमी बलश्री** – जी सत्यवचन, दान, क्षमा आणि अहिंसा यांमध्ये [सदैव] गुंतलेली असते ; जी तपश्चर्या, दम, नियम, उपवास यांच्या अनुष्ठानात [सदैव] तत्पर असते ; जिने आपली 'राजर्षिवधू' ही पदवी सर्वकाळ पाळली आहे — तिने हे कैलासपर्वताच्या शिखरासारख्या **त्रिरश्मि** पर्वताच्या शिखरावर उत्कृष्ट स्वर्गीय प्रासादासारखे[२] बहुमोल लेणे आपला धर्मदाय म्हणून करविले आहे. हे लेणे महादेवी, महाराजमाता आणि महाराजपितामही **भदावनीयांच्या** भिक्षुसंघाला दान देत आहे.

(ओ. ११) या लेण्याच्या अलंकरणार्थ[३] आपल्या महादेवी आजीची सेवा करण्याची व तिला आवडेल असे काम करण्याची इच्छा करणारा तिचा **दक्षिणापथेश्वर** नातू आपल्या पित्याच्या [पुण्य]प्राप्त्यर्थ[४]

---

१ भगवानलाल व ब्यूह्लर हे येथे 'नगवरखधा–' असे वाचतात. भगवानलाल त्याचा अर्थ 'जो पर्वतश्रेष्ठाप्रमाणे आकाशात घुसत असे' असा करतात, तर ब्यूह्लर 'जो आकाशात पर्वतश्रेष्ठाच्या स्कन्धापेक्षाही जास्त उंच जात असे', असे त्याचे भाषांतर करतात. 'स्कन्ध' या शब्दाचा येथे उपयोग केला असल्यामुळे 'नाग' पाठ चांगला वाटतो. त्याचा अर्थ 'हत्ती' असा येथे विवक्षित दिसतो. सेनार्टने तो पाठ घेऊन 'जो उत्कृष्ट हत्तीवर बसला असता आकाशात उडी मारीत आहे असे वाटे' असा अर्थ केला आहे.

२ 'विमान' याचा अर्थ 'स्वर्गीय रथ' (विमान) असा भगवानलालनी केला आहे, पण येथे त्याचा अर्थ 'प्रासाद' (देवालय) असा आहे.

३ 'चितणनिमित' याचा अर्थ ब्यूह्लरने 'काळजी (चिंतन) घेतली जावी म्हणून' असा केला आहे तर भगवानलालनी 'चित्रे काढण्याकरिता' असा घेतला आहे. पण या लेण्यात चित्रे नाहीत. 'चित्रे काढण्याचा उद्देश असावा, पण ती काढली गेली नसावी' असे त्यांनी म्हटले आहे. सेनार्टने सुचविलेला 'अलंकरण' हा अर्थ जास्त चांगला दिसतो. लेणे कोरून झाल्यावर त्याला शिल्पे कोरून भूषविण्याकरिता पुळुमावीने हे दान दिले असावे. या लेण्याच्या दरवाज्याच्या दोन्ही बाजूंस शिल्पपट्ट कोरून तत्कालीन राजकीय घटना सुचविल्या आहेत हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. परिशिष्ट ४ पाहा. त्यांना अनुलक्षून ही देणगी दिली असावी.

४ 'पितुपतियो' याचा अर्थ नीट लागत नाही. भगवानलालनी त्याचा अर्थ 'पितृपैतृक' (वडिलोपार्जित) असा घेऊन त्याचा संबंध 'दक्षिणापथेश्वर' या पदवीशी लावला आहे. ब्यूह्लरने त्याचा संबंध 'धमसेतुस' याच्याशी जोडून त्याचा अर्थ 'पिता आणि त्याची पत्नी यांच्या धर्मसेतूकरिता' असा केला आहे, तोही समाधानकारक नाही. सेनार्टने 'पति' याचे बौद्ध वाङ्मयातील 'पत्ती'शी ऐक्य जोडून 'पित्याच्या पुण्यप्राप्तीकरिता' असा केला आहे तो जास्त समर्पक वाटतो. यावेळी पुळुमावीची माता जिवंत होती ; म्हणून त्याने फक्त आपल्या पित्याच्या पुण्योपार्जनाचा निर्देश केला आहे. यासारखा वाकाटक दानपत्रातील निर्देश द्वितीय प्रवरसेनाच्या तिरोडी ताम्रपटात आला आहे तो पाहा. 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ,' पृ. २६०.

धर्मसेतूकरिता[1] **त्रिरश्मि** पर्वताच्या नैऋत्येस [असलेला] **पिशाचीपद्रक** हा गाव, त्याच्या सर्वप्रकारांच्या उपभोगांचा त्याग करून, [दान] देत आहे.

## क्रमांक १९

# नाशिकच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख : संवत्सर १९ व २२

हा लेख **नाशिक**जवळच्या क्रमांक ३ च्या लेण्यात व्हरांडचाच्या मागील भिंतीवर दरवाजावरच्या जागेत क्रमांक १८ च्या लेखानंतर स्वस्तिक चिन्ह काढून चार ओळींत कोरला आहे. काही ठिकाणी तो आता नष्ट किंवा अस्पष्ट झाला आहे.

स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी सन १८५३ च्या जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रॅन्च ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ५, पृ. ४५ इ. मध्ये या लेखाची यथादृष्ट प्रत छापून त्याच्याकडे प्रथम लक्ष वेधले. त्यानंतर वेस्ट–द्वय, रा. गो. भांडारकर, पिशेल, फ्रांके, हुल्श आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली. भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर आणि सेनार्ट यांनी त्याचे वाचन व अनुवाद दिले आहेत[2]. सेनार्टच्या लेखाबरोबरच्या छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—याची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखातील आज्ञा **नवनगराचा** स्वामी[3] **पुळुमावि** याने **गोवर्धन** येथील अमात्य **शिवस्कंदिल** याला उद्देशून काढली होती.

---

१ भगवानलालनी 'धर्मसेतु' हे या लेण्याच्या व्यवस्थापकाचे नाव असावे असे म्हटले आहे; पण ते बरोबर नाही. पुढील (क्र. १९ व्या) लेखातला हा शब्द 'धार्मिक दान' या अर्थी योजिला आहे. 'अशा दानाचा उपयोग संसारसागरातून तरून जाण्यास होतो' ही कल्पना या शब्द-प्रयोगाच्या मुळाशी आहे.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११२४; ए. इं., व्हॉ. ८, पृ. ६५.

३ लेखकाच्या चुकीने येथे 'नवनगरस्वामी' याच्या ऐवजी 'नवनरस्वामी' असे लिहिले व नंतर कोरले गेले असे दिसते. अशा तऱ्हेची चूक ऋद्धपूर ताम्रपटात 'भवदत्तवर्मन्' च्या ऐवजी 'भवत्तवर्मन्' कोरण्यात झाली होती. (ए. इं., व्हॉ. १९, पृ. १०२ पाहा.) पुढे नल राजांची नाणी मिळाल्यावर ती दुरुस्त करता आली. हे नवनगर पुळुमावि याने स्थापिले असावे. त्यापूर्वीच्या नहपान क्षत्रपाची राजधानी जुन्नर (जीर्ण नगर किंवा जुने नगर) येथे होती. म्हणून पुळुमावीने आपल्या नगरास हे नाव दिलेले दिसते. त्याचे निश्चित स्थान माहीत नाही. पण पुळुमावीने आपली राजधानी तेथे नेली नव्हती. कारण टॉलेमीने (सन १४०) त्याला 'प्रतिष्ठानाचा राजा' म्हटले आहे.

तीत म्हटले आहे की, 'या **त्रिरश्मि** पर्वतात वास्तव्य करणाऱ्या **बेणाकटकाच्या** भिक्षूंच्या [विनंतीवरून] आम्ही **संवत्सर १९, ग्रीष्मपक्ष २, दिवस १३** या दिवशी येथील धर्मदाय म्हणून दिलेल्या लेण्याच्या जपणुकी-करिता अक्षयनीवि (कायमची ठेव) निर्माण करण्याच्या हेतूने **गोवर्धन** आहारातील (विभागातील) दक्षिण मार्गावरील **सुदर्शना** गाव **भदायनीय**[१] भिक्षुसंघाला दान दिला होता. त्या **सुदर्शना** ग्रामाच्या ऐवजी येथील **गोवर्धन** आहारातील पूर्व मार्गावरील **शाल्मलीपद्र** गाव [आता] देत आहो. हा **शाल्मलीपद्र** गाव थोर आर्यांनी[२] धर्मदाय म्हणून दिलेल्या लेण्याच्या जपणुकीकरिता अक्षयनीवि निर्माण करण्याच्या हेतूने देवी-लेण्यात वास्तव्य करणाऱ्या **भदायनीय** संघाच्या भिक्षूंना तुम्ही द्यावा.' यानंतर **शाल्मलीपद्र** ग्रामाचे परिहार (सवलती) नमूद केले आहेत. पुढे म्हटले आहे, 'या सवलती तुम्ही शाल्मलीपद्र व सुदर्शना ग्रामांच्या बाबतीत नमूद कराव्या. याविषयी आज्ञा सुदर्शना ग्रामाचे दान रद्द करणाऱ्यांनी काढली आहे.' पुढे म्हटले आहे की, 'ही आज्ञा महासेनापति **मेधुन** याने लिहून घेतली असून ती **बेणाकटवासकांनी** सुरक्षित ठेवली आहे[३]. त्या आज्ञेची पट्टिका **संवत्सर २२, ग्रीष्मपक्ष, दिवस ७** या दिवशी [**सातकर्णीने**][४] तयार केली.'

शेवटी '**गोवर्धन** येथे राहणाऱ्यांच्या कल्याणार्थ **विष्णुपालाने** भगवान बुद्धाचे वर्णन करून नमन केले' असे कोरले आहे.

---

१ या संघाचे नाव क्रमांक १८ च्या लेखात दहाव्या ओळीत 'भदावनीय' असे आले आहे.

२ 'महअइरक' याने 'महाआर्यक' विवक्षित आहे असे भगवानलालनी म्हटले आहे. ब्यूह्लरच्या मते येथे पुळुमावि विवक्षित असावा. सेनार्टने हा महाआर्यक तेथील विहाराधिपति असावा असे प्रतिपादिले आहे, पण ते बरोबर नाही. हा शब्द पुळुमावी-च्या प्रस्तुत आज्ञापत्रात 'देवीलेण्या'च्या दात्याच्या संबंधात आला आहे. ते लेणे गौतमीपुत्र सातकर्णीने आपल्या मातेच्या नावे कोरविले होते. म्हणून प्रस्तुत लेखात त्याचा उल्लेख 'देवीलेण' असा केला आहे. तेव्हा 'महअइरक' (थोर आर्य) या पदाने गौतमीपुत्र सातकर्णिच विवक्षित दिसतो.

३ नाशिकच्या बौद्ध लेण्यातील भिक्षु विदर्भातील वेणाकटातून (वैनगंगेच्या काठच्या प्रदेशातून) आले होते. ते तेथे अधिकारावर असल्याने ही दानपट्टिका त्यांच्या स्वाधीन केलेली दिसते.

४ येथील नाव आता बहुतेक नष्ट झाले आहे पण अवशिष्ट अक्षरांवरून ते 'सातकर्णि' असावे. यावर सेनार्टचा आक्षेप हा की येथे कोरक्याचे नाव आले असावे. तो राजकुला-तील सातकर्णीसारखा असणे शक्य नाही. पण नंतरच्या ताम्रपटांत जसा 'दूतका'चा (दिलेल्या दानाची अंमलबजावणी करणाऱ्याचा) उल्लेख असतो तसा हा उल्लेख आहे. राजघराण्यांतील पुरुषांचाही दूतक म्हणून उल्लेख ताम्रपटांत येतो. येथे 'सातकर्णि' पदाने पुळुमावीचा धाकटा भाऊ वासिष्ठीपुत्र सातकर्णि विवक्षित असावा. प्रस्तुत लेखातील राजाज्ञेची अंमलबजावणी त्याच्यावर सोपविलेली दिसते.

**चर्चा** — प्रस्तुत लेखातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या राज्यकालातील ज्या दोन मित्या दिल्या आहेत त्यांपैकी पहिली मागील क्रमांक १८ च्या लेण्यातीलच आहे. त्यावरून त्या लेखातील **पिशाचीपद्रक** गाव प्रस्तुत लेखातील **सुदर्शना** असावे असे ब्यूह्लरने म्हटले आहे.[१] पण तसे असल्यास पूर्वीच्या लेखात त्याचा त्या नावाने उल्लेख का केला नव्हता याचे कोडे सेनार्टला पडले होते. वास्तविक ही दोन गावे निराळी होती. त्यांची दाने निरनिराळ्या हेतूंनी केली होती. पिशाचीपद्रक गाव देवी – लेण्याच्या अलंकरणार्थ पुळुमावीने आपल्या राज्यकालाच्या १९ व्या वर्षी दिले होते. सुदर्शना हे एका यक्षिणीचे नाव होते. त्या नावाचे गाव पूर्वी (बहुधा पुळुमावीनेच) देवी – लेण्याच्या व्यवस्थेकरिता दान दिले होते. कांही कारणाने त्याने त्याच्या ऐवजी शाल्मलीपद्र गाव आपल्या राज्यकालाच्या पूर्वोक्त १९ व्या वर्षीच दान दिले होते. फक्त त्याची अंमलबजावणी त्या वेळी झाली नव्हती ती २२ व्या वर्षी या लेखाने केली आहे.

क्रमांक ३ चे लेणे बेणाकटकाच्या भिक्षूंच्या विनंतीवरून [गौतमीपुत्र सातकर्णीने] दिले होते हे प्रस्तुत लेखातील विधान महत्त्वाचे आहे.[२] या उताऱ्यात 'धनकटसमनेहि' असे पूर्वीच्या संपादकांनी वाचले होते आणि ते धनकटक अन्ध्र प्रदेशातील धंञकटक (सध्याचे धरणीकोट) असावे असे म्हटले होते. पण धंञकटक येथील भिक्षु हे महासंघिक शाखेचे होते.[३] ज्या भदायनीय भिक्षुसंघाला हे लेणे दिले होते तो स्थविरवादी शाखेचा होता. त्या शाखेच्या भिक्षुसंघाला लेणे द्यावे अशी विनंती धंञकटकाचा (महासंघिक) संघ करणे संभवनीय नाही. म्हणून येथे 'बेनाकटसमनेहि' हे सेनार्टने सुचविलेले वाचनच योग्य आहे. **बेणाकटाचा** उल्लेख पुढे प्रस्तुत लेखाच्या चौथ्या ओळीतही आला आहे. हे बेणाकट गोवर्धन आहारात असावे असे सेनार्टने म्हटले होते.[४] पण तसे स्थान नाशिक जिल्ह्यात नाही. बेणाकट हा विदर्भातील वेणा (वैनगंगा) नदीच्या तीरावरील प्रदेश होय. तेथे प्राचीन काळी एक विख्यात बौद्ध केन्द्र

---

१ सुदर्शना ही एक यक्षी होती. तिचे नाव भारहूत येथील एका लेखात आले आहे. त्यासारखेच 'अजकालकिय' हे क्रमांक ११ मधील एका शेताचे नाव पाहा. कॉ. इ. इं. २ (२), पृ. ८०. सुदर्शना आणि पिशाचीपद्रक ही एक नव्हत. पिशाचीपद्रक नैऋत्य दिशेस होते, तर सुदर्शना दक्षिण मार्गावर होते. शिवाय ही गावे भिन्न भिन्न काळी धर्मदाय म्हणून दिली होती. तेव्हा ती भिन्न होत.

२ क्रमांक १३ मधील 'अम्ह धमदाने लेणे' हे शब्द पाहा. त्या लेखातील आज्ञा गौतमीपुत्र सातकर्णि व त्याची माता या दोघांच्या नावे काढली आहे.

३ *Amrāvatī Sculptures in the Madras Govt. Museum*, pp. 15 f.

४ ए. इं., व्हॉ. ७, पृ. ७२.

होते.[१] तेथील भिक्षु भदायनीय शाखेचे होते असे दिसते. त्यांचा उल्लेख कान्हेरी येथील लेखातही आला आहे.

**स्थलनिश्चय — नवनगर** आणि **सुदर्शना** या गावांच्या स्थानांची चर्चा इतरत्र (पृ. ४७ व ४९ वर) केली आहे. **शाल्मलीपद्र** या नावाचे गाव सध्या नाशिक जिल्ह्यात नाही व असणेही शक्य नाही. त्या ग्राम-नामाचे सावरगाव असे रूपांतर झाले असावे. या नावाची तीन गावे नाशिक जिल्ह्याच्या नाशिक आणि निफाड तालुक्यात आहेत. त्यांपैकी नाशिक तालुक्यातील सावरगाव तर गोवर्धनला लागून आहे, पण ते त्याच्या पश्चिमेस आहे. प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले शाल्मलीपद्र पूर्व-मार्गावर होते म्हणून गोवर्धन जवळचे सावरगाव येथे विवक्षित असणे शक्य नाही. निफाड तालुक्यातील सावरगाव गोवर्धनच्या पूर्वोत्तर भागी आहे. तेच येथे विवक्षित असावे.

**ओळ** **वाचन**[२]

१ **सिध [।*] नवनरस्वामी[३] वासिठिपुतो सिरिपुळुमवि आनपयति गोवधने आमच**

२ **सिवखदिल य अम्हेहि सव १०[+*]९ गि प २ दिव १० [+*]३ बेनाकटसमनेहि[४] एथ पवते तिर[ण्हुम्हि*] . . . . . . . . . . .[५] धमसेतुस लेनस पटिसथरणे अखय[निवि*]हेतु एथ गोवधनाहारे दखिणमगे गामो सुदिसणा[६] भिखुहि देविलेणवासेहि निकायेन भदायनियेहि पतिगय दतो [।*] एतस दानगामस सुदसनास परिवटके एथ गोवधनहरे पुवमगे**

३ **गाम समलिपद ददाम [।*] एत त महअइरकेन ओदेन धमसेतुस लेनस पटिसथरणे अखयनिविहेतु गाम सामलिपद भि[खु]हि देविलेण[वासेहि*] [निका*]येन भदायनियेहि प्रतिगय्ह ओयपेहि [।*] एतस च गामस सामलिपदस भिखुहलपरिहार**

---

१ पौनी (भंडारा जिल्ह्यात वैनगंगेच्या काठी) येथे उत्खननात दोन विशाल स्तूपांचे अवशेष व मौर्य-शुंग कालीन अनेक कोरीव लेख सापडले आहेत. ते ख्रिस्तपूर्व काळा-पासून बौद्ध धर्माचे एक महत्त्वाचे केंद्र होते. सं. मु. ८, पृ. २०३ इ.

२ ए. इं., व्हॉ. ८, मधील छापावरून.

३ 'नवनगरस्वामी' वाचावे.

४ भगवानलाल व ब्यूह्लर यांनी 'धनकटसमनेहि' वाचले होते, पण सेनार्टने वरील पाठ सुचविला आहे. तोच बरोबर आहे.

५ येथे 'पतिवसतान भिखुन' यासारखी अक्षरे नष्ट झाली असावी.

६ 'सुदिसण' (भ.) ; 'सदसना' (ब्यू.).

**४ वितराम [।*]अपालस[१] अनोमस अलोणखादक अरठसविनविक[२] सवजातपारिहारिक च [।*] एतेहि न परिहारेहि परिहरेहि [।*] एत च गाम – समलिपद[३] – परिहारे च एथ निबधापेहि सु[दिसन]गामस च [।*] सुदिसनान विनिबधकारेहि अणता[४] [।*] महासेनापतिना मेधुनेन . . . . ना छतो [।*] बटिका [बेनाकटवास *] केहि[५] हथ[ग *]तो [।*] दता पटिका सव २०[+*]२ गि पखे . . दिव ७ [।*] [सा *]तकणिना[६] कटा [।*] गोवधनवाथवान फास . यो[७] विण्हुपालेन [स्वामि]वणण णत [।*] नम भगतसपति-पतपस[८] जिनवरस बुधस [।*]**

## अनुवाद

सिद्धि असो! **नवनगराचे** अधिपति **वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमावि गोवर्धनातील** अमात्य **शिवखदिल**[९] याला [पुढील] आज्ञा करतात — "आम्ही **संवत्सर १९, ग्रीष्मपक्ष २, दिवस १३** [या दिवशी] येथे **त्रिरश्मि**पर्वताच्या [लेण्यामध्ये] वास्तव्य करणाऱ्या **बेणाकटाच्या**[१०] भिक्षूंनी [विनंती केल्यावरून[११]] येथील **गोवर्धन** आहारातील दक्षिण मार्गावरील जो **सुदर्शना** गाव देवी – लेण्यामध्ये वास्तव्य करणाऱ्या **भदायनीय** भिक्षुसंघाला धर्मदाय म्हणून दिलेल्या या लेण्याच्या जपणुकी-करिता[१२] अक्षय नीवि (कायमची ठेव) निर्माण करण्याच्या हेतूने दिला

---

१ 'अपावेस' वाचावे.
२ 'सविनयिक' वाचावे.
३ 'समलपद' (ब्यू.).
४ 'आनतो' (भ.).
५ 'बिनिकटवासकेहि' (भ.).
६ 'सा·कनेन' (ब्यू.).
७ 'फासुकायं' (भ.); 'फेसकये' (ब्यू.).
८ 'भग[व]तस पतिपतिपस' (भ.) ; सेनार्टने हे 'अभ्युद्गतसंप्राप्तिप्रतापस्य' या अर्थी घेतले आहे.
९ याचे संस्कृत नाव 'शिवस्कंदिल' असे होईल. यातील 'शिव' हे उपपद तत्कालीन अनेक व्यक्तिनामांच्या पूर्वी लावलेले आढळेल. 'स्कंदिल' म्हणजे कार्त्तिकेय.
१० भगवानलाल आणि ब्यूह्लर यांनी येथे 'धनकटसमनेहि' असे वाचले होते, पण तत्कालीन लिपीत 'ध' व 'ब' यांचे साम्य असल्यामुळे येथील खरा पाठ 'बेनाकट-समनेहि' असावा असे सेनार्टने सुचविले आहे. तोच इतर प्रमाणांवरून खरा दिसतो. याची चर्चा इतरत्र केली आहे.
११ हा भाग संदर्भावरून अनुमानिला आहे.
१२ 'परिसंथरण' (संस्कृत, प्रतिसंस्तरण) याचा मूळ अर्थ '(स्वागतार्थं गालिचादि) पसरणे' असा असावा. नंतर पालि भाषेत तो 'स्वागत', 'अभिवादन' असा झालेला दिसतो. संदर्भावरून येथे त्याचा अर्थ 'जपणूक' (care) असा सेनार्टने केला आहे. तो योग्य दिसतो. ब्यूह्लरने 'डागडुजी' असा अर्थ केला आहे.

होता, त्या दान दिलेल्या **सुदर्शना गावाच्या** ऐवजी येथे **गोवर्धन** आहारातील पूर्व मार्गावरील **शाल्मलीपद्र** गाव देत आहो. आर्यश्रेष्ठांनी[१] पुण्योपार्जनार्थ धर्मसेतु[१] म्हणून दिलेल्या या लेण्याच्या जपणुकीकरिता अक्षयनीवि निर्माण करण्याच्या हेतूने हा **शाल्मलीपद्र गाव** देवी – लेण्यात वास्तव्य करणाऱ्या भिक्षूंना – **भदायनीय** भिक्षुसंघाला – [तुम्ही] अर्पण करावा.

(ओ. ३) "या **शाल्मलीपद्र** ग्रामाच्या भिक्षुदायाला [पुढील] सवलती आम्ही देत आहो :— यात [राजसेवकांनी] प्रवेश करू नये. याला हात लावू नये. यातील [जमिनीतून] मीठ काढण्याकरिता खणू नये. यात राज्याच्या दंडाधिकाऱ्यांनी कोणतीही ढवळाढवळ करू नये. याला सर्व प्रकारच्या सवलती तुम्ही द्याव्या. या शाल्मलीपद्र ग्रामाच्या तसेच सुदर्शना ग्रामाच्याही संदर्भात या सवलती नमूद कराव्या."

**सुदर्शना**ग्रामाचे [पूर्वीचे] दान नोंदणाऱ्या अधिकाऱ्यांनी याची आज्ञा दिली आहे. महासेनापति **मेधुन** याने ही राजाज्ञा लिहून घेतली. याची पट्टिका **बेणाकटवासींच्या** स्वाधीन केली आहे. याची पट्टिका [राज्यकालाचे] **संवत्सर २२, ग्रीष्म पक्ष . . दिवस ७** या दिवशी दिली. **सातकर्णीने**[२] ती तयार केली.

(ओ. ४) **गोवर्धन** येथील रहिवाश्यांच्या कल्याणार्थ **विष्णुपालाने** स्वामीचे[३] (बुद्धाचे) (पुढील वर्णन) घोषित केले आहे – "ज्याची धार्मिक

---

१ 'महअइरकेन ओदेन' याचे मागील संपादकांनी भिन्न भिन्न अर्थ केले आहेत. सेनार्टने अइरक (संस्कृत आर्यक) याचा अर्थ 'भिक्षूंचा मुख्य' असा केला आहे, तर ब्यूह्लरने येथे त्या पदाने 'पुळुमावि' विवक्षित असावा असे म्हटले आहे. हा शब्द पुळुमावीने काढलेल्या आज्ञेत आहे. म्हणून येथे 'महाआर्यक' (आर्य – श्रेष्ठ) या पदाने त्याने आपला पिता गौतमीपुत्र सातकर्णि याचा निर्देश केलेला दिसतो. त्याने ओदान (अवदान, पुण्यार्थ कृत्य) म्हणून ते लेणे भिक्षूंकरिता कोरवून आपल्या मातेच्या नावाने त्यांना दिले होते. 'ओदान' याचा अर्थ 'कृपाळु' असा ब्यूह्लरने केला आहे. सेनार्टने आपल्या भाषांतरात तो शब्द 'पुण्योपार्जनार्थ केलेले कृत्य' या अर्थी घेतला आहे.

२ 'सातकर्णि' शब्द स्पष्ट नाही, पण सेनार्टने '– तकणिना' वाचले आहे त्यावरून 'सातकर्णि'च विवक्षित दिसतो. पण सातकर्णि याचे येथे नाव 'कोरक्या' या संदर्भात कसे आले याचे सेनार्टला कोडे पडले होते. (ए. इं., ७, पृ. ७०). पण ते सोडविणे सोपे आहे. ताम्रपटांवरील लेखांच्या शेवटी 'त्यांतील दानाची अंमलबजावणी करणारा (दूतक)' याचा निर्देश असतो व राजकुलातील व्यक्तीही या संदर्भात उल्लेखिली असते, तसा हा निर्देश आहे. तो ही आज्ञा काढणाऱ्या पुळुमावीचा सख्खा भाऊ वासिष्ठीपुत्र सातकर्णि होता. त्याचा हा निर्देश दिसतो.

३ 'स्वामी' पदाने पुळुमावि विवक्षित आहे असे भगवानलाल व ब्यूह्लर यांनी मानले आहे. या वाक्याचा अर्थ भगवानलालनी 'विष्णुपालाने गोवर्धनमध्ये वास्तव्य करणाऱ्यांच्या आनंदाकरिता स्वामीचे (पुळुमावीचे) वर्णन केले आहे असा केला आहे, पण प्रस्तुत लेखात पुळुमावीचे मुळी वर्णनच नाही ! 'स्वामीच्या (पुळुमावीच्या) आज्ञेने गोवर्धन

[पुढील पानावर]

श्रेष्ठता आणि प्रभाव प्रकट झाले आहेत[१]" त्या जिनश्रेष्ठ बुद्धाला नमन असो !

## क्रमांक २०

# कार्ल्यांच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळचा लेख : संवत्सर २४

हा लेख **कार्ले** येथील चैत्य लेण्याच्या उत्तरेकडील विहार लेण्याच्या दरवाज्याच्या उजव्या बाजूस असलेल्या क्रमांक २ च्या खोलीच्या वरील भितीवर कोरला आहे. याकडे बर्डने सन १८४७ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन आणि ब्रेट, फ्रांके आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[२] भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व अनुवाद दिले आहेत. सेनार्टच्या छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेख चार ओळींचा असून साधारणपणे बऱ्या स्थितीत आहे. त्याची लिपी प्राचीन ब्राह्मी आहे. 'एकविसे' मधील 'ए' आणि काही ठिकाणचा ग्रंथियुक्त 'त' ही अक्षरे लक्षणीय आहेत. प्रस्तुत लेखात २, ३, ४ व २० या अंकांची चिन्हे आली आहेत. भाषा प्राकृत आहे. काही ठिकाणी षष्ठीचे रूप संस्कृतातल्याप्रमाणे 'स्य' प्रत्ययान्त आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश **अबुलामा** येथे राहणारा, **सेतफरणाचा** पुत्र, **सुवर्ष** किंवा **काश्यपीय** संघाचा अनुयायी, उपासक **हरफरण** याने नऊ खोल्यांचा मंडप (विहार लेणे) **महासंघिय** भिक्षुसंघाला आपल्या मातापित्यांच्या सन्मानार्थ दिला होता, हे नमूद करण्याचा होता. यामध्ये **बुद्धरक्षिताने** व त्याच्या मातेने आपणांस साहाय्य केल्याचा निर्देश त्याने केला आहे. हे विहारलेणे वासिष्ठीपुत्र **पुळुमावीच्या** राज्यकालाच्या **एकविसाव्या वर्षी** पूर्ण झाले होते, पण त्याचे वितरण नंतर सुमारे तीन

---

[मागील पानावरून]

मध्ये राहणाऱ्यांच्या रक्षणार्थ विष्णुपालाला नेमले आहे' असा अर्थ ब्यूह्लरने केला आहे तोही येथे अप्रासंगिक दिसतो. सेनार्टच्या मते विष्णुपाल हा गोवर्धन येथील कोणी अधिकारी असावा. (तो क्रमांक ११ मधील विष्णुपालित तर नव्हे ?) त्याने आपल्या अधिकारात हे शेवटचे बुद्धस्तुतिपर नमन कोरून घेतले असावे.

१ हे 'बुधस' याचे विशेषण भगवानलालनी 'अप्रतिप्रतिप' (ज्याला कोणी प्रतिस्पर्धी नाही, अद्वितीय) या अर्थी, आणि ब्यूह्लरने 'अप्रतिप्रताप' या अर्थी घेऊन 'ज्याने अर्हत् पदाचे ऐश्वर्य प्राप्त करून घेतले आहे' असे भाषांतर केले आहे. वरील अनुवाद सेनार्टला अनुसरून आहे.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११०६ मधील संदर्भ पाहा.

वर्षांनी – **संवत्सर २४ मध्ये – हेमंताच्या तृतीय पक्षातील दुसऱ्या दिवशी** झाले असे यात म्हटले आहे. शेवटी **बुद्धरक्षिताच्या** उपासिका मातेचे दुसरे लेणे जवळच असल्याचा उल्लेख आहे.

येथे निर्देशिल्याप्रमाणे हे विहार लेणे कार्ले येथील चैत्य लेण्याच्या उत्तरेस असून त्यात नऊ खोल्या कोरल्या आहेत. पुळुमावीने अठ्ठावीस वर्षे राज्य केले असे पुराणांत म्हटले आहे. तेव्हा त्याच्या राज्यकालाच्या चौवीसाव्या वर्षी हे लेणे दिले असणे असंभवनीय नाही. यातील महा-संघिक संघाचा उल्लेख लक्षणीय आहे. प्रस्तुत लेखातील **हरफरण** आणि **सेतफरण** ही नावे इराणी आहेत. त्यांपैकी पहिले ग्रीक – फारशीतील होरोफर्नेस किंवा होलोफर्नेस सारखे दिसते. या नावांच्या अंती असलेल्या 'फरण' शब्दाचा फारशी भाषेत 'स्वामी' असा अर्थ होतो. 'सेत' हे प्राचीन 'क्षएत' व सध्याचे 'शिद' असावे असे ब्यूह्लरने म्हटले आहे.

**स्थलनिश्चय –– अबुलामा** हे स्थान भारतीय नाही. ते इराणमधील एखाद्या प्रदेशाचे किंवा स्थलाचे नाव असावे, असे ब्यूह्लरने म्हटले आहे.[१]

**ओळ** **वाचन** [२]

**१ सिध [।*] रञो[३] वासिठिपुतस सिरिपुळुमाविस सवछरे चतुविसे २०[+*]४ हेमंतान[४] पखे ततिये ३ दिवसे बि–**

**२ तिये २ उपासकस हरफरणस सेतफरणपुतस्य सो[व]सकस्य अबुला-माय वथवस्य इम देयधम म[ड]पो[५]**

**३ नवगभ माहासघियानं परिगहो[६] सघे चातुदिसे दिन[७] . मातापितुनं पुजा[८][ये*] सवसतानं हितसुघस्थतये [।*] एकविसे[९] स–**

**४ वछरे निठितो [।*] सहेत च मे पुन बुधरखितेन मातर चस्य[१०] [उ]पासिकाय [।*] बुधरखितस मातु देयधंम पाठो[११] अनो [।*]**

१ *A. S. W. I.* IV, p. 112.

२ ए. इं., व्हॉ. ७ मधील प्लेट, क्रमांक ३ वरून.

३ 'रणो' (ब्यू.), पण छापात 'रञो' स्पष्ट दिसते.

४ 'हेमतान' (भ. व ब्यू.). पण छापावरून वरील वाचन बरोबर दिसते.

५ 'मटपो' (भ. व ब्यू.). यातील दुसरे अक्षर अस्पष्ट आहे.

६ 'परिगहे' (भ. व ब्यू.). पण छापावरून वरील वाचन बरोबर दिसते.

७ 'दिनं' (भ.). ८ 'पूजा' (भ. व ब्यू.).

९ ब्यूह्लरने 'एकतिस' वाचले आहे, पण छापावरून 'एकविसे' हे भगवानलाल इंद्रजी व सेनार्टचे वाचन बरोबर दिसते.

१० ब्यूह्लरने 'मातरखिआ' असे वाचन सुचविले आहे.

११ 'पाथो' (भ.).

अनुवाद

सिद्धि असो! राजा **वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमावि** याच्या **चौवीसाव्या – २४ – संवत्सरी हेमंताच्या तिसऱ्या – ३ – पक्षातील दुसऱ्या – २ – दिवशी अबुलामा** येथे राहणाऱ्या सौवर्षक[१] उपासक **सेतफरणपुत्र हरफरण** याचा **महासंघियांना** चारी दिशांच्या भिक्षुसंघाकरिता मातापित्यांच्या संमानार्थ आणि सर्व प्राण्यांच्या हितसुखार्थ धर्मदाय दिलेला हा नऊ खोल्यांचा मंडप (हे विहार लेणे) **एकविसाव्या**[२] **वर्षी** पूर्ण झाला होता. तो **बुद्धरक्षित** आणि त्याची उपासिका माता[३] यांनी माझ्या [सह] दिला आहे. **बुद्धरक्षिताच्या** मातेचा अन्य [मंडप] जवळच आहे.[४]

## क्रमांक २१

# अमरावती स्तूपावरील वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळचा शिलालेख

हा लेख अन्ध्र प्रदेशातील **अमरावती** येथे स्तूपाच्या कठड्याच्या एका दरवाज्याच्या खांबाला लावलेल्या शिलेवर कोरला आहे. त्याचे पहिले वाचन पं. भगवानलाल इंद्रजी यांनी सन १८८२ मध्ये केले. नंतर हुल्श, बर्जेस व पिशेल यांनी त्याची चर्चा केली.[५] शिवराममूर्तींनीही त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे[६].

**लिपी व भाषा** — सातवाहनांच्या इतर लेखांतल्याप्रमाणे या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाच्या आरंभी **वासिष्ठीपुत्र स्वामी श्री – पुळुमावीच्या** कारकीर्दीतील संवत्सराचा उल्लेख होता, पण तो आता नष्ट झाला आहे. या लेखाचा उद्देश **पिंडसुतरिय** वंशातील **कहुतर**

---

१ 'सोवसक' (संस्कृत सौवर्षक) म्हणजे सुवर्ष किंवा काश्यपीय संघाचा अनुयायी (ब्यू.).

२ ब्यूह्लरने 'एकतिसे' वाचले होते, पण येथे मंडप तयार झाला त्या वर्षाचा उल्लेख अपेक्षित असल्याने तो पाठ असंभवनीय आहे.

३ ब्यूह्लरने 'मातरखिआ' (संस्कृत, मातृरक्षिता) असे तिचे नाव कल्पिले आहे.

४ शेवटच्या दोन शब्दांचा अर्थ नीट लागत नाही. ब्यूह्लरने 'पाथो' असे वाचून 'निराळा मार्ग पूर्ण झाला' असा अर्थ केला आहे. सेनार्टने हे शब्द आपल्या भाषांतरात गाळले आहेत. 'पाठो' याच्या ऐवजी 'पाठे' (पृष्ठे) असे वाचल्यास 'मागील बाजूस दुसरा (मंडप)' असा अर्थ होईल. तो संभवनीय वाटतो.

५ ल्यूडर्सच्या यादीतील क्रमांक १२४८ मधील संदर्भ पाहा.

६ *Amrāvatī Sculptures in the Madras Govt. Museum*, p. 283.

गृहपति आणि **पुरि** गृहपतीचा पुत्र **इसिलि** (ऋषिल) यांनी [अमरावती येथील] **महाचैत्याच्या चेतिकिय** [बौद्ध] संघाच्या मालकीच्या [स्तूपाच्या] पश्चिम द्वारावरील धर्मचक्र आपले दान म्हणून उभारले हे नमूद करण्याचा होता. यांतील दुसरा गृहपति इसिलि याच्याबरोबर त्याचे भाऊ व बहिणी यांचा, व पुत्रांसह **नाकानिका** (नागस्त्री) या भार्येचाही या दानधर्मात वाटा आहे असा प्रस्तुत लेखात उल्लेख आहे.

या लेखावरून वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळी अन्ध्र प्रदेश त्याच्या साम्राज्यात सामील होता हे स्पष्ट आहे. त्यातच त्याचे महत्त्व आहे. पुळुमावीची नाणीही त्या प्रदेशात मिळाली आहेत. तारानाथने आपल्या ग्रंथात 'नागार्जुनाने अमरावती येथील स्तूपासभोवारचा कठडा उभारला' असे म्हटले आहे त्यावरून व प्रस्तुत लेखातील पुळुमावीच्या राज्यकाळातील संवत्सराच्या उल्लेखावरून नागार्जुन पुळुमावीच्या काळी होऊन गेला असे अनुमान काहींनी केले आहे.

प्रस्तुत लेखातील दानकर्त्यांच्या भावाबहिणींच्या उल्लेखांवरून त्या काळात तेथे संयुक्त कुटुंबपद्धति प्रचलित होती असे दिसते. यातील **'चेतिकिय'** निकाय हा महासंघिक या बौद्ध धर्माच्या शाखेतील एक उपशाखा होता.

**ओळ** **वाचन**

१ **[सि]धं [।*] र[ञो] वा[सिठि]पुत[स] [सा]मिसिरि – पुळुमाविस . . . पिंडसुतरियानं कहुतर – गहपतिस पुरि – गहपतिस च पुतस इसिलिस सभातुकस**

२ **स[भ*]गिनिकस भयाय च सनाकानिकाय सपुतक[स] . . . . [तो] महाचेतियचेतिकियानं निका[य*]स परिगहे अपरदारे धमचकं देयध[म्मं] थापित [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **वासिष्ठीपुत्र स्वामी श्रीपुळुमावि** याच्या [राज्यकालाच्या] . . . . [संवत्सरी] **पिंडसुतरिय** वंशातील **कहुतर** या गृहपतीने व **पुरि** – गृहपतिपुत्र **इसिलि** (ऋषिल) याने, आपले भाऊ, बहिणी आणि आपली भार्या **नाकानिका** यांसह **चेतिकिय** भिक्षुसंघाच्या मालकीच्या महाचैत्याच्या पश्चिम द्वारी [हे] धर्मचक्र आपला धर्मदाय म्हणून उभारले.

## क्रमांक २२

# वनवासी येथील वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा लेख

[ पट्टिका २, आकृति २ ]

हा लेख **वनवासी** येथील मधुकेश्वर देवालयासमोरची जागा साफ करताना दृष्टोत्पत्तीस आला. तो एका बॅसॉल्ट (गडद हिरव्या) जातीच्या शिलाखंडावर कोरला असून त्याच्या शीर्षभागी चैत्याची आकृति आणि खालील बाजूस उथळीत बसविण्याकरिता अरुंद लांबट उभी खुंटी आहे. त्यावरून ही शिळा एखाद्या स्तंभावर बसविली असावी असे दिसते.

प्रस्तुत लेख सन १९७५ मध्ये 'स्टडीज इन् एपिग्राफी', व्हॉ. १, पृ. ३४–३९ वर मैसूरचे ए. व्ही. नरसिंहमूर्ति आणि एच्. आर. रघुनाथ भट यांनी छापासह प्रसिद्ध केला. त्यावरील आमचा लेख त्याच कालिकाच्या व्हॉ. २ मध्ये प्रसिद्ध झाला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेख फक्त दोन ओळींचा असून त्यात तो **छाया – प्रस्तर** (प्रतिमायुक्त शिलाखंड) **राजा वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावीच्या महादेवीचा** (पट्टराणीचा) आहे असे म्हटले आहे.

या लेखाच्या पूर्वोक्त संपादकांनी असे म्हटले आहे की वासिष्ठीपुत्र पुळुमावीनंतर श्रीसातकर्णि गादीवर आला. नंतर शिवश्री पुळुमावि राज्य करू लागला. त्याला सातकर्णि असेही नाव होते. त्याच्या काळचा हा लेख आहे. तेव्हा त्या संपादकांच्या मते या कालखंडातील वंशावळ पुढीलप्रमाणे होती —

गौतमीपुत्र – सातकर्णि
|
वासिष्ठीपुत्र पुळुमावि
|
श्रीसातकर्णि
|
शिवश्री पुळुमावि

पण प्रस्तुत लेखाप्रमाणे हा शिवश्री पुळुमावि पुनः वासिष्ठीपुत्र होता. ही वंशावळ घोटाळ्याची आहे.

शिवश्री हे उपपद काही सातवाहन राजे आपल्या नाण्यांवर कधी लावत तर कधी लावत नसत. तऱ्हाळा येथील नाणक – संचयात दोन्ही प्रकारची नाणी होती.

नाशिक येथील क्र. १८ च्या लेखावरून वासिष्ठीपुत्र पुळुमावि हा गौतमीपुत्र सातकर्णीचा पुत्र होता हे समजते. कान्हेरी येथील एका त्रुटित लेखावरून[१] वासिष्ठीपुत्र सातकर्णि हा कार्दमकवंशी रुद्रदामन्‌चा जावई होता ही माहिती मिळते. हा रुद्रदामन् जुनागड येथील लेखात वर्णिलेला महाक्षत्रप रुद्रदामन् होय. वाटेगाव संचयावरून तिसरा वासिष्ठीपुत्र – वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णि हा – ज्ञात झाला आहे. हे तिघेही सख्खे भाऊ असून गौतमीपुत्र सातकर्णीचे पुत्र होते.

पुळुमावीच्या क्र. १८ च्या नाशिक येथील लेखावरून गौतमीपुत्र सातकर्णीच्या साम्राज्यात दक्षिण भारतातील खालील देश समाविष्ट होते असे कळते –– (१) असिक (ऋषीक किंवा खानदेश); (२) असक (अश्मक किंवा अहमदनगर जिल्हा); (३) मुळक (प्रतिष्ठान राजधानी असलेला प्रदेश, किंवा औरंगाबाद जिल्हा); आणि विदर्भ. त्याच्या राज्यात कुन्तल (सातारा, कोल्हापूर, बेळगाव वगैरे तेव्हाचा कन्नड प्रदेश) समाविष्ट झाला नसावा. म्हणून कुन्तलातील वाटेगावच्या नाणक – संचयात गौतमीपुत्राचे एकही नाणे आढळले नाही. नंतर पुळुमावीने प्रथम कुन्तल देश जिंकलेला दिसतो. म्हणून त्याचा लेख वनवासी येथे मिळाला आहे. त्याच्या पूर्वीच्या एकाही सातवाहन राजाचे लेख किंवा नाणी कुन्तलात मिळाली नाहीत.

प्रस्तुत लेखात पुळुमावीच्या पट्टराणीचा छाया-प्रस्तर (प्रतिमायुक्त शिलाखंड) वनवासी येथे बसविला होता असे म्हटले आहे. अशा प्रस्त-रांवर व स्तंभांवर ज्या व्यक्तीच्या स्मरणार्थ तो उभारला त्याची मूर्ति कोरली असे. अशा प्रतिमा सामान्यतः व्यक्तींच्या निधनानंतर त्यांचे स्मारक म्हणून उभारल्या जात, असे भासाच्या 'प्रतिमानाटका'वरून कळते. अशा तऱ्हेचा प्रतिमालेख नागार्जुनकोंड येथे सापडला आहे.[२] विदर्भात पौनी येथे 'छायास्तंभ[३]' आणि कर्नाटकात वनवासी येथे प्रस्तुत

---

१ क्रमांक २५ पाहा. २ ए. इं., व्हॉ. ३४, पृ. २०.

३ क्रमांक ६२ पाहा.

'छायाप्रस्तर' सापडले आहेत. त्यांवर लेखाबरोबर मूर्तीही कोरली असावी. पण त्या मूर्ति असलेले शिलाखंड आता सापडत नाहीत. पुळुमावीची पट्टराणी कर्नाटकातील वनवासी येथील होती असे दिसते. म्हणून तिचा प्रस्तुत स्मारकलेख तेथे कोरला असावा.

**ओळ** **वाचन**

**१ सिधं [।*] रञो वासिठीपुतस सिवसिरि–**
**२ पुळुमाविस महादेविय छआपथरो [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! हा छाया–प्रस्तर (प्रतिमायुक्त शिलाखंड) **राजा वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावीच्या पट्टराणीचा** आहे.

**क्रमांक २३**

## नाणेघाटातील [स्कंद] सातकर्णीच्या काळचा लेख : संवत्सर १३

**नाणेघाटातील** एका टाक्याच्या वरील बाजूस हा लेख कोरला आहे. पं. भगवानलाल इंद्रजींनी त्याचे वाचन सन १८८३ मध्ये करून तो जर्नल ऑफ दि बाँबे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. १५, पृ. ३१३ इ. वर प्रसिद्ध केला. त्यांच्या लेखाबरोबर त्या लेखाचा छाप प्रसिद्ध झाला नव्हता. त्याची चर्चा करताना डॉ. रॅप्सनला पं. भगवानलालच्या वाचनाचा पडताळा पाहण्यासाठी त्याच्या छापाची जरूरी तीव्रतेने भासली व ती त्याने या लेखाची चर्चा करताना व्यक्तही केली.[१] पण त्या लेखाचा छाप आतापर्यंत कोठेही प्रकाशित झाला नाही. आमच्या विनंतीवरून ॲडिशनल डायरेक्टर जनरल ऑफ आर्किऑलॉजी श्री. थापर यांच्या आदेशानुसार वेस्टर्न सर्कलचे सुपरिंटेंडिंग आर्किऑलॉजिस्ट श्री. आर. जी. पांडेय आणि महाराष्ट्र शासनाचे डायरेक्टर ऑफ आर्किऑलॉजी डॉ. जामखेडकर यांनी आपापले तांत्रिक पाठवून त्याचा छाप घेण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा पत्ता लागला नाही.

---

१ *J.R.A.S.*, 1905, p. 798.

**लिपी व भाषा**—इतर तत्कालीन लेखांप्रमाणे हाही लेख ब्राह्मी लिपीत असावा. त्याचा छाप उपलब्ध न झाल्यामुळे पं. भगवानलालांचे वाचन येथे देऊन त्याची चर्चा केली आहे. याची भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश एका **वासिष्ठीपुत्र सातकर्णीच्या** कारकीर्दीच्या **१३ व्या वर्षी हेमंत ऋतूतील पाचव्या पक्षाच्या दहाव्या दिवशी कामवनाचा** गृहपति **दमघोष** याने त्या **सतगर** (श्वेतगिरि) पर्वतात जेथे हा लेख कोरला आहे तेथे पाण्याचे टाके खोदवून ते [भिक्षुसंघाला] धर्मदाय केले हे नमूद करण्याचा होता.

पं. भगवानलालनी या वासिष्ठीपुत्र सातकर्णीचे नाव '**चतरपन**' असे वाचले. पण 'प' ला वरील बाजूस किंचित् बाक दिसत असल्यामुळे विवक्षित नाव चतरफन्नही असू शकेल असे त्यांनी म्हटले आहे. त्याचे संस्कृत रूप चतुष्पर्ण किंवा चित्रपर्ण असे असावे असे त्यांनी सुचविले आहे.

हे नाव विलक्षण दिसते. ते किंवा त्यासारखे नाव पुराणांतील अंध्रांच्या (सातवाहनांच्या) वंशावळीत आढळत नाही. पण पं. भगवान-लालांना ते नाव सोपारा येथील यज्ञश्रीच्या नाण्यावर आढळले. त्या नाण्याच्या मागील बाजूवर त्यांनी 'चतरपनकुमारु' असे वाचले[१] आणि त्यावरून हा चतरपण यज्ञ सातकर्णीचा पिता होता असे मानले. 'हे यज्ञश्रीचे नाणे क्षत्रपांच्या नाण्यासारखे आहे. त्याच्या पुढील बाजूवर राजाचा उजवीकडे वळलेला मुखवटा आणि मागील बाजूवर टेकडी, नदी वगैरे चिन्हे क्षत्रपांच्या नाण्यांवर दिसतात तशी आहेत. क्षत्रपांच्या नाण्यांवर त्यांच्या पित्याच्या नावाचा उल्लेख दिसतो, तसा या नाण्यावर यज्ञश्रीचा पिता म्हणून चतरपणाचा उल्लेख आहे' असा त्यांचा युक्तिवाद होता. त्यांना गुजराथेत आम्रेली येथे असेच यज्ञश्रीचे दुसरे चांदीचे नाणे मिळाले होते. पण त्याच्या मागच्या बाजूवरील लेख जास्तच अस्पष्ट होता. तथापि, 'प्रस्तुत लेखाच्या अक्षरवटिकेवरून तो यज्ञश्रीच्या काळचा दिसतो. चतरपणाला वासिष्ठीपुत्र म्हटले आहे. तेव्हा तो वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा धाकटा भाऊ असावा. यज्ञश्रीचे सोपारा नाणे क्षत्रप रुद्रदामन्-च्या नाण्यासारखे आहे. तेव्हा तो रुद्रदामन्चा समकालीन असावा. जुनागड लेखात रुद्रदामन्ने ज्या सातकर्णीचा दोनदा पराभव करून त्याला सोडून दिले तो हा यज्ञश्रीच होय. यज्ञश्रीने प्रथम त्याच्या मुलखावर स्वारी केली होती, पण शेवटी तीत त्याचा पराभव झाला असावा' अशी भगवानलालांची विचारसरणी होती.[१]

---

१ *J.B.B.R.A.S.*, XV, p. 314.

गेल्या शंभर वर्षात उघडकीस आलेल्या ऐतिहासिक साधनांवरून भगवानलालांचे वरील मत चूक ठरले आहे. या अवधीत सोपारा व अम्रेली येथे सापडलेल्या नाण्यांसारखी यज्ञश्री सातकर्णीची आणखी काही नाणी मिळाली आहेत. त्यांवरून यज्ञश्रीच्या नाण्यांच्या मागील बाजूवर, पुढील बाजूवरील लेखाप्रमाणेच, लेख असतो, फक्त त्यात अंध्र देशाच्या तेलुगु भाषेतील कांही शब्द व प्रत्यय असतात हे सिद्ध झाले आहे.[१] अर्थातच त्यांत चतरपणाचे नाव येत नाही. प्रस्तुत लेखात भगवानलालांच्या वाचनाप्रमाणेही हा चतरपण वासिष्ठीपुत्र होता.

कान्हेरी येथील एक लेख[२] आणि वाटेगाव येथे सापडलेला शिशांच्या नाण्यांचा संचय[३] यांवरून तीन वासिष्ठीपुत्र ज्ञात झाले आहेत — (१) वासिष्ठीपुत्र पुळुमावि, (२) वासिष्ठीपुत्र स्कंद सातकर्णि आणि (३) वासिष्ठीपुत्र सातकर्णि. हे तिघे सख्खे भाऊ असून गौतमीपुत्र सातकर्णीचे पुत्र होते. त्या सर्वांनी महाराष्ट्रात राज्य केले होते. प्रस्तुत लेखातील वासिष्ठीपुत्र सातकर्णि या तिघांपैकीच असावा. दुसरा कोणी वासिष्ठीपुत्र सातकर्णि त्या काळात महाराष्ट्रात झालेला माहीत नाही.

प्रस्तुत लेखाचा छाप उपलब्ध झाला नाही. तथापि त्यात 'वासिठी-पुतस'च्या नंतर 'सिरि–खद–सातकणिस' अशी अक्षरे होती असे दिसते. हा खद सातकर्णि म्हणजे पुराणांत उल्लेखिलेला 'स्कंद' होय. पुराणांत म्हटल्याप्रमाणे तो पुळुमावीचा पुत्र नसून सख्खा भाऊ होता. पार्गिटरने तद्विषयक श्लोक पुढीलप्रमाणे दिला आहे[४] —

शिवस्कन्दः सातकर्णिर्भवितास्यात्मजः समाः ।

पण यात त्याच्या कारकीर्दीच्या वर्षांचा उल्लेखच नाही. 'वायु-पुराणा'च्या एका प्रतींत वरील ओळ —

शिवस्कन्दः सातकर्णिर्भविष्यति समास्त्रयः ।

---

१ यज्ञ सातकर्णीच्या चांदीच्या नाण्यांच्या पुढील भागावर 'रञो गोतमिपुतस सिरियञ-सातकणिस' असा आणि त्यांच्या मागील बाजूवर 'अरहणष गोतमिपुतष हिरुयञ-हातकणिष' असा लेख असतो.

२ क्रमांक २५ यात वासिष्ठीपुत्र सातकर्णीचा उल्लेख आहे.

३ वाटेगावच्या नाणकसंचयात वासिष्ठीपुत्र पुळुमावि आणि वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णि यांची नाणी होती. 'सातवाहनांची नाणी' हे प्रकरण पाहा.

४ *D. K. A.*, p. 42.

अशी दिली आहे[१]. पण वाटेगाव संचयातील त्याच्या नाण्यांवरून त्याने इतकी थोडी वर्षे राज्य केले असेल असे दिसत नाही.[२] पुराणांतील अनेक विधाने कोरीव लेखांच्या प्रबळ पुराव्यावरून खोटी ठरली आहेत त्यासारखेच हे तीन वर्षांच्या राज्यकालाचे विधान आहे.

तेव्हा हा लेख वासिष्ठीपुत्र स्कंद सातकर्णीच्या कारकीर्दीच्या तेराव्या वर्षी कोरला होता, असे दिसते. स्कन्द सातकर्णीची अनेक शिशाची नाणी वाटेगाव संचयात होती. काही पोटीनची नाणी विदर्भात तऱ्हाळे येथे सापडली होती.[३] अलीकडे त्याचे प्रतिमायुक्त चांदीचे नाणेही नाशिक येथे सापडले आहे.[४] पण त्याच्या काळचा कोरीव लेख मात्र हा एकच मिळाला आहे. यात त्याचे महत्त्व आहे.

**स्थलनिश्चय**—प्रस्तुत लेखात जेथे तो कोरला आहे त्या पर्वताला '**सतगर**' असे म्हटले आहे. पं. भगवानलालनी त्याचे सप्तगिरि असे संस्कृत रूप मानून ते जुन्नरजवळच्या टेकडीचे प्राचीन नाव होते असे प्रतिपादिले आहे.[५] त्यांनी येथे 'देयधमस तगरपवते' असे दुसरे वाचन सुचवून त्या टेकडीचे नाव तगरपर्वत होते असेही प्रतिपादिले आहे आणि या वाचनाने 'प्राचीन तगर म्हणजे सध्याचे जुन्नर' हे आपले मत समर्थित होते असे म्हटले आहे. ही दोन्ही विधाने बरोबर दिसत नाहीत. '**सतगर**' हा पुळुमावीच्या क्र. १८ च्या लेखात उल्लेखिलेला 'सेटगिरि' पर्वत असावा. म्हणून गौतमीपुत्र सातकर्णीला त्याचा स्वामी म्हटले आहे. त्या लेखात सह्य पर्वताचा निराळा निर्देश असूनही जसा कण्हगिरीचा (कृष्णगिरीचा) उल्लेख आहे तसाच हा सतगिरीचा (श्वेतगिरीचा) दिसतो.[६] सह्याद्रि पर्वताच्या एका पश्चिम फाटयाला कृष्णगिरि आणि दुसऱ्या पूर्व फाटयाला 'श्वेतगिरि' अशी नावे होती असे दिसते. जुन्नरला प्राचीन काळी तगर म्हणत असावे ही पं. भगवानलालांची दुसरी कल्पनाही आता चूक ठरली आहे. कारण प्राचीन तगर हे सध्याचे उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर होय हे सिद्ध झाले आहे.

---

१ *D. K. A.* p. 42, n. 7.

२ त्याच्या नाण्यांवरील लेखाचा आरंभ भिन्न भिन्न ठिकाणी होतो. त्यावरून त्याने ती सर्व नाणी केवळ तीन वर्षांत पाडली असतील असे दिसत नाही.

३ 'सातवाहनांची नाणी' हे प्रकरण पाहा.

४ पूर्वोक्त प्रकरण-पाहा.

५ *J. B. B. R. A. S.*, XV, p. 313.

६ नागार्जुनकोंड येथील एका लेखातही 'सेटगिरी'चा उल्लेख आला आहे. ते तेथील एका टेकडीचे नाव होते असे दिसते.

**ओळ** **वाचन**[1]

१ **सिधं रणो वसठिपुतस [खद**[2] **]सातकणिस.**
२ **सवछर तर १०[+*]३ हेमत पख पचमे दिवसे १०**
३ **कमवनस गहपतस दमघसस देयधम**
४ **पनियपुवा देयधम सतगरपवते एथ [।*].**

**अनुवाद**

सिद्धि असो ! राजा **वासिष्ठीपुत्र** [**स्कंद**] **सातकर्णीच्या** [राज्य-कालाच्या] **संवत्सर १३, हेमंत** [ऋतूच्या] **पाचव्या पक्षाचा दिवस १०** [या दिवशी] **कामवनाच्या** गृहपति **दमघोषाचे श्वेतगिरि** पर्वता-वरील येथील हे पाण्याचे टाके धर्मदाय आहे.

## क्रमांक २४

# अमरावती येथील शिवमकसद याचा खंडित लेख

हा लेख अंध्र प्रदेशातील **अमरावती** येथे एका वरवंडीच्या शिला-खंडावर सापडला होता. त्याचे पहिले वाचन बर्जेसने सन १८८२ मध्ये केले होते. त्यानंतर हुल्श आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[3] शिवराममूर्तींनी त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे.[4] त्यावरूनच तो लेख येथे घेतला आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

---

१ पंडित भगवानलालांच्या लेखावरून.

२ येथे भगवानलालांनी 'चतरपन' असे वाचले होते, व तेच नाव यज्ञश्री सातकर्णीच्या पित्याचे म्हणून त्याच्या प्रतिमायुक्त नाण्यांवर आढळते असे प्रतिपादिले होते. पण ते वाचन आता चूक ठरले आहे. येथील वाचनही बरोबर दिसत नाही. येथील राजनाम खद (स्कंद) असावे असे दिसते. गौतमीपुत्राच्या तीन्ही पुत्रांना 'वासिष्ठीपुत्र' असे कोरीव लेखांत म्हटले आहे. त्यांपैकी ज्येष्ठ पुत्र पुळुमावि येथे निर्देशिला असणे शक्य नाही. कारण त्याला 'सातकर्णि' म्हणत नसत. कनिष्ठ पुत्रही येथे निर्देशिला असणे शक्य नाही कारण कोरीव लेखात त्याचा उल्लेख केवळ 'वासिष्ठीपुत्र सातकर्णि' असा येतो. त्याच्या अन्य वैयक्तिक नामाचा उल्लेख नसतो. (क्रमांक २५ पाहा.) तेव्हा प्रस्तुत लेखातील वासिष्ठीपुत्र सातकर्णि हा स्कंद सातकर्णिच असावा.

३ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १२७९ मधील संदर्भ पाहा.

४ *A. S. M. G. M.*, p. 291.

**विषय** — हा लेख अत्यंत खंडित असल्यामुळे त्याचा विषय सांगणे अशक्य आहे. यात राजा श्री**शिवमक सद** (सातकर्णि) याच्या पानीय-घरिकाने (जलाशयांच्या अधीक्षकाने) काही दानधर्म केल्याचा उल्लेख असावा, पण तो निश्चितपणे कोणत्या प्रकारचा होता हे सांगता येत नाही.

प्रस्तुत लेखातील श्री **शिवमक सातकर्णीचा** उल्लेख महत्त्वाचा आहे. या राजाचे नाव याप्रकारे इतरत्र आढळत नाही. त्या नावातील 'शिव' हे पद अनेक सातवाहन राजांनी आपल्या नावांपूर्वी लावलेले आढळते. 'मक' हे आदरार्थी तेलगु उपपद आहे. तेव्हा यातील राजाचे विशेष नाम **सद** (किंवा साद) (सातकर्णि) असावे. तो वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या नंतरचा त्याचा सख्खा भाऊ वासिष्ठीपुत्र सातकर्णि असावा, असे रॅप्सनने सुचविले आहे.[१] ते बरोबर दिसते. याची नाणी अंध्रात सापडली आहेत. वाटेगाव येथील नाणक संचयावरून पुळुमावीनंतर सातवाहन साम्राज्याची वाटणी त्याच्या दोन सख्ख्या भावांत झालेली दिसते. स्कन्द सातकर्णीला विदर्भ व पश्चिम महाराष्ट्र आणि [वासिष्ठी-पुत्र] सातकर्णीला अंध्र प्रदेश मिळाला असावा. स्कन्दाच्या निधनानंतर त्याचे राज्य पश्चिम महाराष्ट्रावर पसरले हे पुढील (क्र. २५ च्या) लेखावरून स्पष्ट आहे.

ज्याचे दान या शिलाखंडावर नमूद केले आहे तो **पानीयघरिक** होता. म्हणजे तो त्या नगरातील जलाशयाची व्यवस्था पाहणारा अधि-कारी होता. त्यावरून अमरावती येथील जलाशयाची व्यवस्था नीट राहावी याची काळजी तेथील शासनाधिकारी घेत असत असे अनुमान करता येते.

**ओळ** **वाचन**

**१ राञो सिवमक–सदस पनियघरिकस प. . . .**

**अनुवाद**

[हे दान] राजा **शिवमकसदाच्या** (शिवश्री सातकर्णीच्या) जलाशयाधीक्षकाचे आहे.

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. lii.

## क्रमांक २५

# कान्हेरीच्या लेण्यातील वासिष्ठीपुत्र सातकर्णीचा लेख

हा लेख **कान्हेरी** येथील लेण्यास जाताना क्र. ५ च्या टाक्याच्या वरील कोनाड्यात कोरला आहे. त्याकडे बर्ड साहेबाने सन १८४७ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन–ब्रेट, वेस्ट, ब्यूह्लर, रामकृष्णपंत भांडारकर आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[१] ब्यूह्लरच्या लेखाबरोबर छापलेल्या प्लेटवरून त्याचे वाचन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा किंचित् अशुद्ध[२] अशी संस्कृत आहे.

**विवेचन**—या लेखाचा उद्देश **वासिष्ठीपुत्र सातकर्णि** राजाची **देवी** (राणी)–जी **कार्दमक** वंशात जन्मली होती आणि **महाक्षत्रप रुद्र** याची कन्या होती—तिच्या विश्वासु अमात्याने आपला धर्मदाय म्हणून या लेखाजवळचे टाके बनविले हे नमूद करण्याचा होता. हा महाक्षत्रप रुद्र म्हणजे माळवा–काठेवाडात राज्य करणारा शक क्षत्रप प्रथम रुद्रदामन् होय. त्याचे संस्कृत भाषेला प्रोत्साहन होते व त्याने स्वतः काही उत्कृष्टगुणयुक्त संस्कृत गद्य व पद्य काव्ये रचली होती हे त्याच्या जुनागड येथील लेखावरून कळते. तेव्हा त्याच्या कन्येच्या अमात्याच्या प्रस्तुत लेखात संस्कृत भाषेचा उपयोग केला गेला आहे हे त्याच वातावरणाचे द्योतक आहे.

रुद्रदामन्च्या वंशाचे '**कार्दमक**' हे नाव या लेखावरूनच कळते. त्याची कन्या सातकर्णीला दिली होती हीही महत्त्वाची माहिती प्रस्तुत लेखावरूनच प्राप्त झाली आहे. तेव्हा या लेखाचे ऐतिहासिक महत्त्व मोठे आहे.

पुळुमावीच्या निधनानंतर त्याचा धाकटा भाऊ सातकर्णि हा प्रथम अंध्रात राज्य करीत होता हे मागील (क्र. २४)च्या लेखावरून दाखविले आहे. पण पुढे स्कन्द सातकर्णीच्या निधनानंतर त्याने आपली सत्ता कोकणासहित पश्चिम महाराष्ट्रावर पसरविलेली दिसते. कदाचित् त्यापूर्वीही रुद्रदामन्ने पुळुमावीचा पराजय करून कोकण प्रदेश आपल्या जावयास दिला असेल. जुनागड येथील लेखात[३] त्याने ज्या सातकर्णीचा

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९९४ मधील संदर्भ पाहा.

२ ओ. १ मध्ये 'सातकर्णिस्य' हे 'सातकर्णेः' बद्दल योजिले आहे.

३ क्रमांक ५१, ओ. १२ पाहा.

दोनदा पराजय केल्यावर निकटच्या संबंधामुळे त्याला सोडून दिले होते तो सातकर्णि – त्याचा जावई नसून – पुळुमाविच असावा हे आम्ही इतरत्र दाखविले आहे. प्रथम सातकर्णीनंतर सातवाहन वंशाला सातकर्णि नाव मिळालेले दिसते. म्हणून त्या वंशाच्या अनेक राजांनी ते आपल्या नावाला जोडले असावे.

**ओळ** **वाचन**[१]

१ [२]. . . . . **वासिष्ठीपुत्रस्य श्रीसात[र्कणि]स्य देव्या[:] कार्दमक-राजवंशप्र[भ]वाया महाक्षत्र[प] रु[द्र*[३]] . . पु[त्र्याः]. . .**

२ . . . . . . .**[स्याः]**[४]. . . **[वि]श्वस्यस्य अमात्यस्य शतेरकस्य पानीयभाजनं देयधर्म्म[:] [।*]**.

**अनुवाद**

. . . . **वासिष्ठीपुत्र श्रीसातकर्णीची** राणी . . . . – जी **कार्दमक** राजवंशात जन्मली आहे आणि महाक्षत्रप **रुद्र[दामन्]** याची कन्या आहे – तिच्या **शतेरक** नामक विश्वासु अमात्याचा हे पाण्याचे टाके धर्मदाय आहे.

## क्रमांक २६

# नाशिकच्या लेण्यातील यज्ञ सातकर्णीच्या काळचा लेख : संवत्सर ७

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. २० च्या लेण्याच्या व्हरांड्याच्या मागील भिंतीवर कोरला आहे. स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी सन १८५३ मध्ये त्याच्याकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर वेस्ट – द्वय, रा. गो. भांडारकर व फ्रांके यांनी त्याची चर्चा केली.[५] भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे. सेनार्टच्या छापावरून तो येथे संपादिला आहे.

---

१ ब्यूह्लरने प्रकाशित केलेल्या छापावरून *A.S.W.I.*, V, Plate LI (11).

२ आरंभी 'सिद्धम् । राज्ञ:' अशी अक्षरे नष्ट झाली असावी.

३ हा महाक्षत्रप प्रथम रूद्रदामन् होय.

४ राणीचे येथील नाव नष्ट झाले आहे.

५ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११४६ मधील संदर्भ पाहा. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ९४.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या लेखाचा उद्देश कौशिकगोत्री महासेनापति **भवगोप** याची भार्या महासेनापत्नी **वासु** हिने **बोपकि** नामक यतीने आरंभ केल्यावर पुष्कळ वर्षे अपूर्ण स्थितीत राहिलेले हे लेणे खोदवून पूर्ण केले, आणि **गौतमीपुत्र** स्वामी **श्रीयज्ञसातकर्णि** याच्या राज्यकालाच्या **सातव्या वर्षी हेमन्त ऋतूच्या तिसऱ्या पक्षातील पहिल्या दिवशी** ते चारी दिशांच्या भिक्षुसंघाला निवासार्थ अर्पण केले हे नमूद करण्याचा होता.

प्रस्तुत लेखावरून त्या काळी महासेनापतीच्या भार्येला 'महासेनापत्नी' म्हणवून घेण्यात विशेष अभिमान वाटत होता असे दिसते.

ओळ **वाचन**[१]

१ **सिधं [।*] रञो गोतमिपुतस सामिसिरियञसातकणिस संवछरे सातमे ७ हेमताण पखे ततिये ३**

२ **दिवसे पथमे कोसिकस महासेणापतिस भवगोपस भरिजाय महासेनापतिणिय**[२] **वासुय लेण**

३ **बोपकियतिसुजमान**[३] **अपयवसितसमाने बहुकाणि वरिसाणि उत्कुते**[४] **पयवसाण निती चातुदि—**

४ **सस च भिखुसघस आवासो दतो ति [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **गौतमीपुत्र** स्वामी **श्रीयज्ञ सातकर्णि** याच्या [राज्यकालाच्या] **सातव्या – ७ – संवत्सरी हेमंताच्या तिसऱ्या – ३ – पक्षातील पहिल्या दिवशी** कौशिकगोत्री महासेनापति **भवगोप** याची भार्या महासेनापत्नी **वासु** हिने हे लेणे, **बोपकि** यतीने आरंभ केल्यावर पुष्कळ वर्षे अपूर्ण राहिलेले,[५] (उत्खननाने) पूर्ण करून चारी दिशांच्या भिक्षुसंघाला निवासार्थ दिले.

---

१ ए. इं., व्हॉ. ८, पृ. ६० समोरच्या प्लेटवरून.

२ 'महासेनापतिनिय' (ब्यू.).

३ 'सुजमाणस पयवसित' (भ. व ब्यू.). यापेक्षा वर दिलेले सेनार्टचे वाचन संदर्भास अनुसरून आहे. त्या काळच्या लिपीत 'अ' व 'स' ही अक्षरे एकसारखी होती.

४ 'उत्कुत' (संस्कृत, उत्कृत्त) 'खोदलेले' या अर्थी.

५ ब्यूह्लरने 'जे पुष्कळ वर्षे नष्ट झाले होते' असा अर्थ केला आहे, तो बरोबर नाही.

## क्रमांक २७

# कान्हेरीच्या लेण्यातील यज्ञ सातकर्णीच्या काळचा लेख : संवत्सर १६

हा लेख कान्हेरी येथील क्र. ८१ च्या लेण्यातील व्हरांड्याच्या वाहेर डाव्या वाजूच्या भिंतीवर कोरला आहे. त्याकडे बर्ड साहेबाने सन १८४७ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन – ब्रेट, वेस्ट, भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर आणि फ्रांके यांनी त्याची चर्चा केली.[१] ब्यूह्लरच्या लेखाबरोबर छापलेल्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—हा लेख तेरा ओळींचा असून त्याची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—हा लेख सातवाहन नृपति **गौतमीपुत्र** स्वामी **यज्ञ सातकर्णि** याच्या राज्यकालाच्या **सोळाव्या वर्षी ग्रीष्म ऋतूच्या पहिल्या पक्षाच्या पाचव्या दिवशी** कोरला होता. त्याचा उद्देश **कालयाण** येथे राहणारा **आनंदाचा** पुत्र उपासक **अपरेणु** या व्यापाऱ्याने आणि त्याच्या सर्व कुटुंबियांनी त्याच्या मातापित्यांच्या पुण्योपार्जनार्थ **कृष्णगिरि** पर्वतात हे लेणे व सभागृह ही चारी दिशांच्या भिक्षुसंघाकरिता कोरविली हे नमूद करण्याचा होता. त्याच वेळी तेथील भिक्षुसंघाला त्याने २०० कार्षापणांची कायम ठेव [दर माहा] दर शेकडा एक या दराने दिली होती. तसेच **मगलथान** येथील एका शेताचा आपल्या मालकीचा अर्धा हिस्साही दिला होता. त्याच्या उत्पन्नातून भिक्षूंना चीवरांकरिता सोळा कार्षापण व [ओषधपाण्याकरिता] वर्षा ऋतूत प्रत्येक महिन्यात एक कार्षापण द्यावयाचे होते.

या तऱ्हेची व्यवस्था नाशिक येथील क्र. ३८ च्या लेण्यातील लेखात ऋषभदत्ताने केली होती. मात्र त्या लेखात तेथील भिक्षुसंख्येचा निर्देश आहे. तो येथे नाही. २०० कार्षापणांवरचे दर माहा दर शेकडा एक याप्रमाणे व्याज २४ कार्षापण येईल. शेताच्या उत्पन्नातून काही कार्षापण मिळतील. त्यांतून ही व्यवस्था करावयाची होती. प्रत्येक भिक्षूला दर महिन्यास एक याप्रमाणे वर्षाऋतूच्या चार महिन्यात जे चार कार्षापण द्यावयाचे होते ते सेनार्टने म्हटल्याप्रमाणे वर खर्चाकरिता नसून त्याच्या

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १०२४ मधील संदर्भ पाहा.

औषधपाण्याकरिता होते. वर्षाऋतूत आजारी पडण्याचा जास्त संभव आणि त्या काळात भिक्षूंना एका ठिकाणी (विहारात) राहावे लागत असे म्हणून ही व्यवस्था केलेली दिसते. इतर ऋतूंत ते उपदेशार्थ हिंडत असत. त्या काळात त्यांच्या औषधपाण्याची व्यवस्था बौद्ध धर्माच्या उपासकांकडून होत असावी. याची चर्चा इतरत्र केली आहे.[१]

**स्थलनिश्चय — कालयाण** हे सध्याचे ठाणे जिल्ह्यातील कल्याण होय. हे प्राचीन काळी बंदर म्हणून प्रसिद्ध होते. **मगलथान** हे त्याच जिल्ह्याच्या वाडा तालुक्यातील मागाठणे असावे.

**ओळ** **वाचन**[२]

**१ सिधं ।।**
**२ रञो गोतमिपुतस सामिसिरिसातकणिस स[त]छरे[३] १०[+*]६ गि –**
**३ म्हाण पख १ दिवस ५ कालयाणवाठवस नेगमस अण –**
**४ दपुतस उसा(पा)सकस अपरेणुस स[प]रिवारस सहा**
**५ कडुबिनिय आनदमातु [जु]वारिणिकाय सहा बालकेन अणदेन**
**६ सह च सु[ण्हा]हि अण . . ल . सिपे [च] धामदेविय**
**७ सह च . . . वेण अह[वि]अपण[४] मातापितरो(रा) उदिस**
**८ पावते कण्हसेले लेणं कोठि च देयधा[मं] चातुदिसे**
**९ भिखुसघे पडिठापित सावस[ता]णं हितसुघथ [।*]**
**१० एतस च अखयनिवि दता काहापणानि सतानि बे २००**
**११ सघस येव हुठे पळिके सते एठ च आधपण –**
**१२ खेतियस खेत गामे मगलथाने भोजकापति एतो**
**१३ संघेण दातवं चिवरिक सोळसक पळिको च मासे उतुकाले [।*].**

## अनुवाद

सिद्धि असो! राजा **गौतमीपुत्र** स्वामी **श्रीसातकर्णि** याच्या [राज्यकालाच्या] **सोळाव्या – १६ – संवत्सराच्या ग्रीष्म** [**ऋतूचा**] **पक्ष १, दिवस ५** – [या दिवशी] **कालयाण** (कल्याण) येथे राहणारा व्यापारी, उपासक, **आनंदाचा** पुत्र **अपरेणु** आपल्या नातलगांसह, आपली पत्नी व

१ परिशिष्ट ६ मधील 'कुशणमूल' वरील टिप्पण पाहा.

२ ब्यूह्लरच्या छापावरून (आ. स. वे. इं. ५, प्लेट १५).

३ 'सवछरे' वाचावे.

४ येथील अक्षरे अस्पष्ट आहेत. ब्यूह्लरने 'पुहविअपेण' असा पाठ सुचविला आहे.

**आनंदाची** माता **जुवारिणिका,** बालक **आनंद** [ आनंदाच्या स्त्रिया ] व आपल्या सुना . . . **धामदेवी** यांच्यासह आपल्या मातापित्यांच्या [ पुण्यप्राप्तीच्या ] उद्देशाने [ या ] **कृष्णशैलावर** सर्व प्राण्यांच्या हित-सुखार्थ, चारी दिशांच्या भिक्षुसंघांकरिता हे लेणे व हे सभागृह कोरविले आहे.

तसेच त्याने त्या संघाच्या स्वाधीन दोनशे – २०० – कार्षापणांची अक्षयनीवि (कायमची ठेव) शेकडा एक पण या व्याजाने केली आहे. आणि **मंगलस्थान** गावातील शेताचा अर्धा हिस्सा दिला आहे. याच्या उत्पन्नातून संघाने भिक्षूंना चीवरांकरिता सोळा पडिक (कार्षापण) आणि ऋतु-काळातील [ प्रत्येक ] महिन्यात [ औषधाकरिता[१] ] एक पडिक (कार्षा-पण) द्यावे.

## क्रमांक २८

# कान्हेरीच्या लेण्यातील यज्ञ सातकर्णीच्या काळचा लेख

हा लेख **कान्हेरी** येथील चैत्य लेण्याच्या दरवाज्याच्या उजव्या खांबावर कोरला आहे. त्याच्या पहिल्या अकरा ओळींतील वरीचशी शेवटची अक्षरे आता नष्ट झाली आहेत. तथापि या लेखाचे तात्पर्य ध्यानात येणे कठीण नाही.

बर्ड साहेबाने सन १८४७ मध्ये या लेखाकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर त्याची चर्चा स्टीव्हन्सन – ब्रेट, वेस्ट, भगवानलाल इंद्रजी आणि ब्यूह्लर यांनी केली.[२] ब्यूह्लरने त्याचा छाप, वाचन व भाषांतर दिले आहे. त्याच छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेख सातवाहन नृपति **गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि** याच्या काळचा आहे. त्याच्या राज्यकालाचे **संवत्सर** दुसऱ्या ओळीच्या शेवटी कोरले होते ते आता नष्ट झाले आहे. फक्त **ग्रीष्म ऋतूच्या पाचव्या पक्षाचा** उल्लेख अवशिष्ट आहे. दिवस-संख्या नष्ट झाली आहे.

---

१ हा कार्षापण वर खर्चाकरिता असावा असे सेनार्टने म्हटले आहे. क्रमांक ३८ मध्ये त्याला 'कुशणमूल' म्हटले आहे. तो औषधपाण्याकरिता असावा. परिशिष्ट क्र. ६ पाहा.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९८७ मधील संदर्भ पाहा. आ. स. वे. इं., व्हॉ. ५, पृ. ७५.

प्रस्तुत लेखाचा उद्देश कान्हेरीचे हे चैत्य लेणे खोदण्यास कोणी आरंभ केला व ते कोणी पूर्ण केले, तसेच त्या काळी कोणा भिक्षूची त्या कामावर देखरेख होती, व कोणी त्याचे पॉलिश केले हे नमूद करण्याचा होता.

हे चैत्य लेणे **गजसेन** आणि **गजमित्र** या श्रेष्ठींनी खोदण्यास आरंभ केला होता. ते **भदायनीय** या बौद्ध धर्माच्या भिक्षुसंघाकरिता खोदले होते. या शाखेचे भिक्षु विदर्भातील बेणाकट प्रदेशातून आले होते हे मागे नाशिकच्या क्र. १८ च्या लेण्यातील लेखावरून दाखविले आहे. पुढे हे लेणे स्थविर **अचल**, भदन्त **गहल**, भदन्त **विजयमित्र,** भदन्त **बोधि,** भदन्त **धर्मपाल,** उपासक **अपरेणुक**[१] श्रेष्ठी यांनी पुरे केले. भदन्त **बोधिक** याने त्या कामावर देखरेख केली वगैरेही शेवटी नमूद केले आहे.

**ओळ** **वाचन**

**१ रञो गोतमि[पुतस सामिसिरियञ–*]**
**२ सो(सा)तकणिस [संवछरे.............गि–]**
**३ म्हपखे पंचमे [५ दिवसे..........**
**४ वाणिजकेहि उतू(?)................**
**५ णुय उपंनेहि गा...........**
**६ खातियेहि भातूहि............**
**७ गजसेनेन गजमि[तेन]............**
**८ कपठायि चेतिय...........**
**९ आचरियानं निका[यस....भदाय*]**
**१० नीयानं परिगहे प[तिठापितं.......मा*]**
**११ तापितूनं अभतीता[नं..............**
**१२ पूजाय कुटुंबिनी[न बाल]कानं बालि[कानं]**
**१३ सवतस भागिनेयान निका[यस नाति–]**
**१४ वगस च अग पटिअसिय सव्वस[तानं]**
**१५ हितसुखाय हेतु [।*] एथ च नव[कमि*]**
**१६ का पवजितो थेरा भदत अचला भादं[त*]**
**१७ गहला भदंत विजयमिता भदत बो[धिको]**
**१८ भदत धमपाला उपासको च नेगमो अन[द]–**

---

१ या अपरेणूचा उल्लेख क्रमांक २७ च्या लेखात आला आहे.

**१९ पुतो अपरेनुको समापिता [।*] आचरियान थेराणं**
**२० भदत सेउंलानं सिसेन उपरखितन भ–**
**२१ दत बोधिकेन कत सेलवढकीहि [नाय]कमि–**
**२२ सेहि कढिचकेहि महाकटकेहि खदर–**
**२३ किना च मीठिकेना [।*]**

### अनुवाद

राजा गोत[मीपुत्र स्वामी **श्रीयज्ञ सातकर्णीच्या संवत्सर** . ] **ग्रीष्म ऋतूच्या पाचव्या [–५–]** पक्षातील [ . दिवशी] . . . . णूचे पुत्र **खातिय,** भाऊ **गजसेन** आणि **गज[मित्र]** [हे] कल्पान्ता-पर्यंत टिकणारे चैत्य **भदायनीय** आचार्यांच्या संघाचे म्हणून, आपल्या निधन पावलेल्या मातापित्यांच्या संमानार्थ, तसेच आपली भार्या, पुत्र कन्या, सावत्र बंधु, सर्व भाचे व ज्ञातिवर्ग यांच्या तसेच सर्व प्राण्यांच्या हितसुखार्थ स्थापन केले. यावर देखरेख ठेवणारे [पुढीलप्रमाणे होते]– प्रव्रजित स्थविर भदन्त **अचल,**[१] भदन्त **गहल,** भदन्त **विजयमित्र,** भदन्त **बोधिक,** भदन्त **धर्मपाल,** उपासक व्यापारी **आनंदाचा** पुत्र **अपरेणुक**[२] यांनी हे काम पूर्ण केले. या कामावरील अधीक्षक आचार्य स्थविर **सेउंल** (शैवल) यांचा शिष्य भदन्त **बोधिक** याने लेणे खोदणारे पाथरवट (शैलवर्धकि), कारागीर आणि उजाळा देणारा **स्कंदरकि** याच्या साहाय्याने हे काम पूर्ण केले.

### क्रमांक २९

## चिन येथील यज्ञ सातकर्णीच्या काळचा शिलालेख : संवत्सर २७

या लेखाची शिला कृष्णा जिल्ह्यातील **चिन** या गावी कृष्णा नदीच्या दक्षिणेस समुद्रकिनारी सापडली होती. ती आता मद्रास गव्हर्नमेंट म्यूझियममध्ये ठेवली आहे. तिच्यावरील बरीचशी अक्षरे आता अस्पष्ट झाली आहेत.

---

१ संमानार्थ यांची नावे बहुवचनात घातली आहेत.
२ याचा उल्लेख क्रमांक २७, ओ. ४ मध्ये आला आहे.

हा लेख सन १८८९ मध्ये ब्यूह्लरने एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १, पृ. ९५-९६ वर छापाशिवाय प्रसिद्ध केला. नंतर फ्लीटने जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, १९०५, पृ. ३०५ वर त्याच्या वाचनात काही दुरुस्त्या सुचविल्या.[१] या लेखाचा छाप उपलब्ध नसल्यामुळे ब्यूह्लरचे वाचन येथे दिले आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आहे. त्यातील अक्षरे किंचित् नक्षीदार केली आहेत. भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — हा लेख राजा अर्यक[२] (स्वामी) **यज्ञ सातकर्णि** याच्या शताब्दी शासनाच्या[३] **२७ व्या वर्षी हेमंत ऋतूच्या चौथ्या पक्षातील पाचव्या दिवशी** कोरला होता. त्याच्या आरंभी भगवंताला (बुद्धाला) नमन आहे. हा लेख फार फुटल्यामुळे त्याचा उद्देश निश्चितपणे सांगता येत नाही. सहाव्या ओळीतील '–धाय' ही अक्षरे 'बुधाय' या शब्दाची असल्यास प्रस्तुत लेखात बौद्ध धर्माला दिलेल्या दानाचा उल्लेख असावा.

पुराणातील वंशावळीत यज्ञश्री सातकर्णीने २९ वर्षे राज्य केले असे म्हटले आहे. तेव्हा या लेखात उल्लेखिलेली त्याच्या राज्यकालातील संवत्सर – संख्या त्याच्याशी जुळते.

यज्ञ सातकर्णीचे राज्य अंध्र प्रदेशावर होते हे प्रस्तुत लेखावरून स्पष्ट आहे. तेथे त्याची अनेक प्रकारची नाणी सापडली आहेत. त्यांपैकी दोन शिडांचे जहाज या चिन्हाची नाणी विशेष उल्लेखनीय आहेत. त्यांवरून त्याची दक्षिण भारताच्या पूर्व किनाऱ्यावरील सत्ता व्यक्त होते.

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १३४० मधील संदर्भ पाहा.

२ क्रमांक १९ च्या ओ. ३ मधील महअइरकेन (महाआर्यकाने) या पदाने पुळुमावीने आपला पूज्य पिता गौतमीपुत्र सातकर्णीचा उल्लेख केला आहे हे यावरून स्पष्ट आहे.

३ या लेखाच्या दुसऱ्या ओळीत 'वससताय' असा शब्द आहे. त्याचा अर्थ अनेकांनी अनेक प्रकारे केला आहे. भगवानलालनी त्याचा अर्थ 'वर्षशत्याम्' (संवत्सर–शताब्दी-मध्ये) असा केला होता. पण तो समाधानकारक वाटत नाही. हा शब्द वनवासी येथील लेखात (क्रमांक ३७ मध्ये) आला आहे. तेथे त्याचा अर्थ 'वंशसत्तायाम्' (राज्य कालातील) असावा असे ब्यूह्लरने म्हटले आहे. ए. इं., व्हॉ. १, पृ. ९६. दिनेशचंद्र सरकारनी 'वससताय' आणि 'वर्षसहस्राय' असे शब्द कोरीव लेखांत येतात हे दाखवून ती ती धर्मकृत्ये शंभर किंवा हजार वर्षांच्या जीवनाच्या हेतूने केली जात, असे दाखविले आहे. ए. इं., व्हॉ. ३४, पृ. २४१, टिप्पणी १ पाहा. तोच अर्थ योग्य आहे. क्रमांक २८, ओ. ८ मधील 'कपठायि' (कल्पान्तापर्यंत टिकणारे) हे चैत्याचे विशेषण त्याच तऱ्हेचे आहे.

| ओळ | वाचन |
|---|---|
| १ | **सिधं [।*] नमो भगवतो [।*] . . . [वस] रञो गोतमि –** |
| २ | **पुतस अरकसिरियञसातकणिस वससताय संवछर सत[वि] –** |
| ३ | **सं २०[+*]७ हेमतानं पखं चतुथं ४ दि[वसं] [पंच*]मं ५ एतिय** |
| ४ | **पुवाय अरकमहतरकेन महा . . . . . .** |
| ५ | **याजिना महाद . . . . . .** |
| ६ | **धाय . . . . . . [।*].** |

### अनुवाद

सिद्धि असो! भगवंताला नमस्कार असो! राजा **गौतमीपुत्र** आर्यश्री **यज्ञ सातकर्णीच्या** शंभर वर्षांच्या (राज्यकाळातील) **सत्ताविसाव्या – २७ – संवत्सरी हेमंत ऋतूच्या चौथ्या – ४ – पक्षातील पाचवा – ५ – दिवस** – या पूर्वोक्त [दिवशी] आर्यमहत्तरकांनी – जे [महादंडनायक आहेत] व [ज्यांनी]. . . यज्ञ केला आहे, त्यांनी बुद्धाला [हे दान दिले].

### क्रमांक ३०

## कान्हेरीच्या लेण्यातील माठरीपुत्र शकसेनाच्या काळचा लेख: संवत्सर ८

हा लेख **कान्हेरी** येथे क्रमांक ३६ च्या लेण्याच्या व्हरांड्याच्या बाहेर उजवीकडील भिंतीवर सात ओळींत कोरला आहे. वेस्ट साहेबाने सन १८६१ मध्ये जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ६, पृ. ६ वर त्याची यथादृष्ट प्रत देऊन त्याकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर, रामकृष्णपंत भांडारकर आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[1] ब्यूह्लरच्या लेखाबरोबर छापलेल्या प्लेटवरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** — प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या लेखाच्या आरंभी **माठरीपुत्र शकसेनाच्या संवत्सर ८, ग्रीष्म पक्ष ५, दिवस १०** या काळाचा उल्लेख आहे. हा राजा सातवाहनवंशी असावा, पण त्याचे नाव पुराणांतील वंशावळीत आढळत नाही. विदर्भातील तऱ्हाळा गावी सापडलेल्या नाणक – संचयातील काही

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १००१ तील संदर्भ पाहा. आ. स. वे. इं., व्हॉ. ५, पृ. ७९.

नाण्यांवर शक सातकर्णि असे राजनाम दिसते.[१] ती नाणी याचीच असावी. त्यांवरून हा राजा यज्ञ सातकर्णीनंतर पश्चिम महाराष्ट्र व विदर्भ यांवर राज्य करीत होता असे दिसते. अंध्रात राजा माठरीपुत्राची तांब्याची हस्तिचिन्हांकित नाणी पेडाबंकुर येथे सापडली आहेत ती याचीच असावी.

प्रस्तुत लेखाचा उद्देश **कलियण** येथे राहणारा आणि व्यापारी **विष्णुनंदीचा** पुत्र, व्यापारी गृहपति [नाव नष्ट] याने **कान्हेरी** येथे क्रमांक ८१ चे लेणे आपल्या स्वतःच्या तसेच आपला पिता **विष्णुनंदी,** माता **बोधिसमा,** भाऊ—**हस्ती,** आणि आपले व्यापारी बांधव यांच्या पुण्योपार्जनार्थ कोरविले हे नमूद करण्याचा होता. याने कान्हेरी येथे दुसरेही एक लेणे कोरविले होते. क्रमांक ३१ पाहा.

**स्थलनिश्चय**—प्रस्तुत लेखात **कलियण** हे एकच स्थळ निर्दिष्ट आहे.[२] ते सध्याचे ठाणा जिल्ह्यातील कल्याण होय. हे प्राचीन काळी बंदर म्हणून प्रसिद्ध होते.

**ओळ** **वाचन**

**१ सिधं [।*] रञो म(मा)ढरिपुतस स्वामिसकसेनस**

**२ सवछरे ८ गि प ५ दिव १० एताय पुवाय क—**

**३ लियणकस नेकमस वेण्हुनंदिस पूतस नेग—**

**४ मस गहपतिस . . . तिस लेण पतिठापि—**

**५ त सहा आय्यकेन .[३]सेन सहा पितुणा वेण्हुन—**

**६ दिना सहा मातुय बोधिसमाय सहा भा—**

**७ [तुना . . ]हथिना सहा [स]वेन [निकायेनेति] [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **माठरीपुत्र** स्वामी **शकसेनाच्या** [राज्य-कालाच्या] **संवत्सर ८, ग्रीष्म पक्ष ५, दिवस १०** या पूर्वोक्त तिथीस **कलियण**चा [रहिवासी] आणि व्यापारी **विष्णुनंदी** याचा पुत्र, व्यापारी आणि गृहपति . . ति याने [हे] लेणे कोरविले. त्याच्याबरोबर आर्यक . . . त्याचा पिता **विष्णुनंदी,** त्याची माता **बोधिसमा,** याचा भाऊ—**हस्ती** आणि सर्व व्यापारी वर्ग [या धर्मकृत्यात] सहभागी आहेत.

१ नाण्यांवरील प्रकरण पाहा.

२ क्रमांक २७ मध्ये याचे नाव 'कालयाण' असे आले आहे.

३ 'आय्यक' (सं. आर्यक) म्हणजे 'पूज्य'. येथे एखाद्या भिक्षुचा, नामनिर्देश आला असावा. इतरत्र 'अइरक' चा उल्लेख राजाच्या बाबतीत आला आहे.

## क्रमांक ३१

# कान्हेरीच्या लेण्यातील माठरीपुत्र शकसेनाच्या काळचा खंडित लेख

हा लेख **कान्हेरी** येथील क्र. ३६ च्या व्हरांड्याच्या बाहेर क्र. ३० च्या लेखाप्रमाणे कोरला आहे. याकडे वेस्ट साहेबाने जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ६, पृ. ७ वर त्याची यथादृष्ट प्रत छापून प्रथम लक्ष वेधले. नंतर ब्यूह्लर, फ्रांके आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली[१]. ब्यूह्लरचे वाचन येथे दिले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेख अतिशय खंडित झाला आहे. तथापि अवशिष्ट भागावरून त्याचा उद्देश क्र. ३० च्या लेखातल्याप्रमाणे असावा. कारण त्या दोन्ही लेखांत काही व्यक्ति समान आहेत.

हा लेख [सातवाहन नृपति] **माठरीपुत्र** स्वामी **शकसेन** याच्या काळचा आहे. त्याच्या राज्यकालाचे वर्ष, ऋतु व पक्ष आता नष्ट झाले आहेत, पण **दिवस** मात्र क्र. ३० च्या लेखांतल्याप्रमाणे १० च आहे. तेव्हा इतर काल-विशेष क्र. ३० च्या लेखातल्याप्रमाणे असावे. प्रस्तुत लेखाचा उद्देशही त्या लेखातल्याप्रमाणे असावा. त्यात म्हटले आहे की [कलियण*] येथे वास्तव्य करणाऱ्या, **विष्णुनंदीचा** पुत्र . . . याची भार्या **हालणिका** हिने हे [दुसरे] लेणे आर्यक . . . **धामय** . . . **बुद्धकय** . . यांच्यासह [पुण्योपार्जनार्थ] [निर्माण केले].

मागे दाखविल्याप्रमाणे हा माठरीपुत्र [शकसेन] तऱ्हाळा येथील नाण्यांवर ज्याचे नाव 'शक सातकर्णि' असे आढळते तोच असावा.

**स्थलनिश्चय**—प्रस्तुत लेखाच्या तिसऱ्या ओळीतील 'वाठवेय-' च्या पूर्वीचे स्थलनाम आता नष्ट झाले आहे. पण क्र. २९ च्या लेखावरून ते **'कलियण'** असावे. ते सध्याचे ठाणे जिल्ह्यातील **कल्याण** होय.

**ओळ** **वाचन**

**१ सध [।*] र[ञो*] म[ढरिपुतस स्वामि]–सकसे–**
**२ [नस] . . . . . . . . . . . . . [दि]वा १० एता[य]**

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १००२ मधील संदर्भ पाहा. आ. स. वे. इं., व्हॉ. ५, पृ. ८२.

३ . . . . . . . . . . . . . . . . . **वठवेय वेण्हुनदिपुत**
४ [स] . . . . . . . **स भजाय हालणिका ले–**
५ [ण पतिठापित स]हा **आय्यकेन ला . . . स . . . . . . .**
६ . . . . . . . . . . . **धामये** . . . . . . . . . . . . .
७ . . . . . **बुद्धकयेन सहा वि** . . . . .

### अनुवाद

सिद्धि असो ! राजा **माठरीपुत्र** स्वामी **शकसेन** याच्या . . . . . . **दिवस १०** या [पूर्वोक्त तिथीस] . . . . . येथे वास्तव्य करणाऱ्या **विष्णुनंदीच्या** पुत्राची . . भार्या **हालणिका** हिने आर्यक . . . . **धामय** . . . . . . . **बुद्धकय** यांच्यासह [पुण्योपार्जनार्थ] हे [लेणे कोरविले].

## क्रमांक ३२

# नागार्जुनकोंड येथील गौतमीपुत्र विजय सातकर्णीचा स्तंभ–लेख : संवत्सर ६

हा लेख **नागार्जुनकोंडा**जवळ कृष्णेच्या काठी सापडला होता. त्याचा उपयोग कृष्णानदीच्या घाटाकरिता केला होता. श्री. एच. सरकार यांनी तो एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ३६, पृ. २७३–७४ वर त्याच्या छापासह संपादिला आहे. त्याच छापावरून त्याचे वाचन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** — याची लिपी प्राचीन ब्राह्मी आहे. येथे 'त' ला गाठ आहे, पण 'न' ला नाही. 'म' व 'व' यांची खालची बाजू चपटी झाली आहे. हा लेख सुस्थितीत असल्यामुळे त्याचे वाचन निश्चित आहे. **लिपी** ब्राह्मी व **भाषा** प्राकृत आहे.

**विवेचन** — या लेखाच्या आरंभी 'अगपोगल' (अग्र्यपुद्गल) बुद्ध याला नमन आहे. नंतर त्या काळी तेथे राज्य करणारा (सातवाहन राजा) गौतमीपुत्र **विजय सातकर्णि** याच्या **संवत्सर ६, ग्रीष्म ऋतूच्या चौथ्या पक्षातील वैशाख पूर्णिमेचा** उल्लेख आहे. त्या तिथीस तेथे स्तंभ उभारला असे म्हटले आहे. वैशाख पूर्णिमेला बौद्ध धर्मात विशेष महत्त्व आहे. कारण त्या तिथीस गौतम बुद्धाचा जन्म, ज्ञानप्राप्ति आणि महापरिनिर्वाण या तीन्ही घटना घडल्या. तन्निदर्शक हा स्तंभ बहुधा राजाज्ञेने उभारला असावा.

विजय सातकर्णीचे नाव पुराणांतील वंशावळींत यज्ञश्रीचा उत्तराधिकारी म्हणून येते. पार्गिटरने —

**षडेव भविता तस्माद् विजयस्तु समा नृपः।**

अशी पंक्ति दिली आहे. काही पुराणांत 'समा दश' असा पाठ आहे. प्रस्तुत लेखात त्याच्या राज्यकालाच्या सहाव्या वर्षाचा उल्लेख असल्यामुळे आणि त्याच वर्षी त्याचे निधन झाल्याबद्दलचा पुरावा नसल्यामुळे त्याने दहा वर्षे राज्य केले असावे.

विजय सातकर्णीचा हा एकच लेख उपलब्ध झाला आहे. यापूर्वी त्याचे नाव अपूर्ण रूपाने विदर्भातील चांदा व तऱ्हाळा येथील सातवाहनांच्या नाणकसंचयातील नाण्यांवर असलेले आम्ही दाखविले होते. तेव्हा त्याच्या अमलाखाली अंध्राप्रमाणे विदर्भ देशही होता यात संशय नाही. त्याची नाणी पश्चिम महाराष्ट्रात मात्र सापडली नाहीत. तेव्हा यज्ञश्रीच्या कारकीर्दीनंतर सातवाहन साम्राज्याची विभागणी झालेली दिसते. विजय सातकर्णीला अंध्र प्रदेश मिळाल्यावर त्याने तेथे आपल्या नावे '**विजयपुरी**' नामक नगरी स्थापून तिला आपली राजधानी केली असावी. त्यालाच आता नागार्जुनकोंड असे म्हणतात.

सातवाहन कालाच्या अखेरीस त्या वंशाची राजधानी पैठणहून अंध्रात हलविली असल्यामुळे त्यानंतर थोड्याच काळाने रचलेल्या पुराणांतील वंशावळीत सातवाहनांना अंध्र का म्हटले याची आता समाधानकारक उपपत्ति लागते. यज्ञश्रीनंतरच्या शकसेन किंवा शक सातकर्णीचे नाव त्या वंशावळीत येत नाही; पण अंध्रात राज्य करणाऱ्या विजय सातकर्णि व शेवटचा पुळुमावि यांची नावे येतात. यावरूनही वरील उपपत्ति समर्थित होते. यज्ञश्रीनंतरच्या सातवाहन राजांच्या नाण्यांचे संग्रह नागार्जुनकोंड येथे सापडले आहेत.[१]

---

१ इक्ष्वाकुवंशी राजांच्या कोरीव लेखांत 'विजय' या एकाच संवत्सर–नामाचा उल्लेख आढळतो. त्यावरून त्यांची राजधानी त्यावर्षी स्थापिली असावी आणि षष्टिसंवत्सर चक्राचा आरंभ त्या काळी त्या संवत्सराने होत असावा ही दिनेशचंद्र सरकारांची कल्पना या लेखामुळे बिनबुडाची ठरली आहे. आमचे *Literary and Historical Studies in Indology*, pp. 103 f. पाहा.

**ओळ** **वाचन**[1]

**१ [न]मो भगवतो अगपोगलस [।*].**
**२ रञो गोतमिपुतस सिरिविजयस –**
**३ तकणिस सव ६ गि प ४ दिव वेसा –**
**४ खपुणिम [।*].**

**अनुवाद**

प्राण्यांमध्ये श्रेष्ठ [बुद्धाला] नमस्कार असो! राजा गौतमीपुत्र **श्रीविजय सातकर्णि** याचे **संवत्सर** ६, **ग्रीष्म पक्ष** ४, **दिवस वैशाख पूर्णिमा** [या दिवशी हा स्तंभ उभारला].

**क्रमांक ३३**

## कोडवलि येथील चंडस्वातीच्या काळचा प्रस्तर–लेख : संवत्सर [११]

अन्ध्र प्रदेशातील पीठापुरम् गावाच्या वायव्येस सुमारे ९ मैलांवर **कोडवलि** गावाजवळील टेकडीवर एका स्तूपाचे अवशेष आढळतात. त्याजवळ एका प्रस्तरावर (खडकावर) हा लेख कोरला आहे. याचे पहिले वाचन स्टेन कोनो याने सन १९०८ मध्ये *Z. D. M. G.* या जर्मन नियतकालिकाच्या व्हॉ. ६२, पृ. ५९२ वर प्रकाशित केले. नंतर कृष्णशास्त्री यांनी हा लेख एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १८, पृ. ३१६ – ३१९ वर संपादिला. त्यांच्या लेखासह छापलेल्या त्याच्या छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आहे. यात 'ख' या अक्षराची गाठ स्पष्ट आहे. 'त' अक्षरालाही गाठ आहे. 'म' अक्षराचा खालचा भाग चपटा झाला आहे. या अक्षरवटिकेवरून प्रस्तुत लेख ख्रिस्तोत्तर दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकातील दिसतो. त्याची **भाषा** प्राकृत आहे. हा लेख फार खराब स्थितीत असल्यामुळे त्याचे वाचन काही ठिकाणी अनिश्चित आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेख **वासिष्ठीपुत्र** स्वामी श्री**चंडस्वातीच्या** काळचा आहे. यात त्याच्या राज्यकालाचे **वर्ष** कोरले होते. ते दोन

---

१ ए. इं., व्हॉ. ३६ मधील छापावरून.

चिन्हांनी दर्शविले होते. त्यांतील पहिले आता अस्पष्ट झाले आहे, पण ते १० या संख्येचे द्योतक असावे. नंतरचे चिन्ह १ या संख्येचे निदर्शक दिसते. पुढे **हे प २, दिवस** २ असे वाचन संभवते. त्यावरून हा लेख सातवाहन नृपति **चंडस्वाति** याच्या **११ व्या वर्षी हेमन्त ऋतूच्या दुसऱ्या पक्षाच्या दुसऱ्या दिवशी** कोरलेला दिसतो. त्याचा उद्देश अमात्य **स्वामी खगु** याने धर्मदाय स्थापिला होता हे नमूद करण्याचा होता. 'खगु' हे व्यक्तिनाम दिसते. कृष्णशास्त्री यांनाही त्याचा अर्थ लागला नव्हता. स्टेन कोनो याने 'अमच भूमिवेश धम ठपित' असे वाचून त्याचा अर्थ 'अमात्याने मातीचे घर धर्मदाय म्हणून बांधले' असा केला होता तोही समाधानकारक वाटत नाही. कारण (१) त्या वाचनात त्या अमात्याचे नाव येत नाही; आणि (२) 'वेश' (संस्कृत, वेश्म) यामध्ये तालव्य 'श' आहे. पण प्रस्तुत लेखात 'सिरि' (संस्कृत, 'श्री') मध्ये श चा स झाल्यामुळे ते वाचन संभाव्य वाटत नाही.

चंडस्वाति याची नाणी अंध्र प्रदेशात कृष्णा आणि गोदावरी जिल्ह्यांत सापडली आहेत. विदर्भात मात्र ती अद्यापि आढळली नाहीत. त्याच्या काही नाण्यांवर राजनाम 'चंद' दिसते. पुराणांत ते 'चंडश्री' आणि 'चंदश्री' अशा दोन्ही प्रकारे आढळते. त्याने विजय सातकर्णीनंतर राज्य केले असे पुराणे सांगतात; पण रॅप्सनने त्याची नाणी यज्ञश्री-च्या पूर्वी घातली आहेत. काही पुराणांत त्याने दहा वर्षे आणि इतर काहीत तीन वर्षे राज्य केले असे म्हटले आहे. प्रस्तुत लेखावरून त्याचे राज्य निदान अकरा वर्षे टिकले असे दिसते.

विदर्भात विजय व शक सातकर्णींची नाणी सापडली आहेत, पण चंड-श्रीची मिळाली नाहीत. त्यावरून विजय व शक सातकर्णीनंतर सातवाहन सत्ता अंध्र प्रदेशातच सीमित झाली असावी.

**स्थलनिश्चय**—कृष्णशास्त्रींनी ओ. ४ मध्ये 'खडुवलि' असे वाचून ते सध्याच्या कोडवलीचे प्राचीन नाव मानले आहे. पण त्या ठिकाणी तसे स्थलनाम आले असण्याचा संभव नाही. स्टेन कोनोनेही हे दाखविले आहे.

**ओळ**   **वाचन**[१]

**१ सिधं [।*] राञो वासिठी–**

**२ पुतस सामि सिरि–**

---

१ ए. इं., व्हॉ. १८, पृ. ३१८ समोरील छापावरून.

३ **चं[ड]सातिस**[1] **[सवछ]रे**[2]
४ **[१०]**[3]**[+*]१ हे प २ दिवस २**[4]
५ **अमचस समिखगु**[5] **धम**
६ **थापित [।* ]**

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **वासिष्ठीपुत्र** स्वामी **श्रीचंडस्वाति** याच्या [राज्यकाळाच्या] **संवत्सर ११, हेमंत पक्ष २, दिवस २ [या** दिवशी] अमात्य [स्वामी **खगु**] याचा धर्मदाय[6] [येथे] उभारला.

**क्रमांक ३४**

## अडोणी तालुक्यातील पुळुमावीच्या काळचा लेख : संवत्सर ८

हा लेख अंध्र प्रदेशातील बेल्लारी जिल्ह्याच्या **अडोणी** तालुक्यात म्याकडोनी आणि चिन्नकडबूरू या दोन गावांमध्ये असलेल्या एका तांबूस खडकावर कोरला आहे. तो डॉ. वि. स. सुखटणकर यांनी एपिग्राफिया

---

१ या राजनामातील दुसरे अक्षर आता खराब झाले आहे, पण स्टेन कोनो आणि कृष्णशास्त्री या दोघांनीही ते 'ड' असेच वाचले आहे. स्टेन कोनोचे वाचन 'चडसातस' असे आणि कृष्णशास्त्रींचे 'चंडसातिस' असे आहे. 'त' वरील वेलांटी स्पष्ट दिसते. नाण्यांवर 'चडसातिस' असे राजनाम आढळते. *B. M. C.* (*Andhras*), pp. 32-33. काही नाण्यांवर रॅप्सनने 'चदसातिस' वाचले आहे.

२ कृष्णशास्त्रींनी 'राजिवच्छरे २' असे वाचले आहे. पण संवत्सर-संख्या पुढील ओळीच्या आरंभी आली असावी.

३ येथील संवत्सर-संख्येतील पहिले चिन्ह आता अस्पष्ट झाले आहे. स्टेन कोनोने येथे १० [+*] ३ (?) अशी संवत्सर-संख्या वाचली आहे.

४ कृष्णशास्त्रींनी 'दि १ खडुवलि' असे वाचले आहे; पण 'दि' व 'ख' मध्ये '१' या संख्येचे चिन्ह दिसत नाही. पुढील अक्षर 'ख' नसून 'व' आहे. 'वासिठी' मधील 'व'कार पाहा. 'दिवस' यातील 'स' 'साति' मधील 'स' सारखा आहे. स्टेन कोनोलाही येथील 'खडुवलि' वाचन मान्य नाही.

५ स्टेन कोनोने 'अमचस भूमिवेश' वाचून त्याचा अर्थ 'अमात्याचे भूमिवेश्म (मातीचे घर)' असा केला आहे; पण तो बरोबर वाटत नाही. ज्याने हा लेख कोरविला त्या अमात्याने आपले नाव खचितच त्यात घातले असते. आमचेही वाचन निश्चित नाही. पण 'अमचस समि खगु (?) धम ठापित' असे वाचन विवक्षित दिसते. 'खगु' याचा अर्थ लागत नाही. 'खगु' हे व्यक्तिनाम असावे.

६ या धर्मदायाचे स्वरूप स्पष्ट नाही.

इंडिका, व्हॉ. १४, पृ. १४३ – १५५ वर छापासह सन १९१७ मध्ये प्रसिद्ध केला होता. त्याच छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी आहे. 'क', 'त्र' व 'र' या अक्षरांचे दांडे लांब असून ते खाली डावीकडे वळविले आहेत. अक्षरांना जोडलेला 'इ'कार वर्तुळाकार वेलांटीने दाखविला आहे. 'आ'-कारदर्शक अक्षरांच्या शीर्षभागाची आडवी रेषा किंचित वाकविली आहे. एकंदरीत अक्षरे इक्ष्वाकूंच्या लेखांतील अक्षरांकडे झुकत असलेली दिसतात. भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचा उद्देश **सातवाहनवंशी** राजा **श्रीपुळुमावि** याच्या कारकीर्दीच्या **आठव्या वर्षी हेमन्त ऋतूच्या दुसऱ्या पक्षातील पहिल्या दिवशी** महासेनापति **स्कन्दनाग** याच्या '**सातवाहनिहार**' या जहागिरीतील सेनादलाधिकारी **कुमारदत्त** याच्या **वेपुरक** गावात राहणाऱ्या कोंतवंशी **संब** नामक गृहपतीने या लेखाजवळचा तलाव खोदला हे नमूद करण्याचा होता.

प्रस्तुत लेखातील **सातवाहन** राजवंशाचा उल्लेख लक्षणीय आहे. असा उल्लेख त्या वंशाच्या नाशिक येथील अगदी आरंभीच्या – कृष्ण राजाच्या – लेखात मात्र आढळतो.[१] या लेखात उल्लेखिलेला **पुळुमावि** कोण हे ठरविताना सुखटणकरांनी त्याच्या कारकीर्दीच्या आठव्या वर्षाच्या उल्लेखाला महत्त्व देऊन तो गौतमीपुत्र सातकर्णीचा पुत्र पुळुमावि असावा असा तर्क केला आहे. कारण त्याने अठ्ठावीस वर्षे राज्य केले होते.[२] शेवटच्या पुळुमावीची कारकीर्द फक्त सात वर्षांची होती. म्हणून तो पुळुमावि येथे विवक्षित असणे शक्य नाही असे त्यांचे अनुमान होते. पण ही अनुमान–पद्धति सदोष आहे. पुराणांत निर्दिष्ट केलेले राजांचे शासनकाल विश्वसनीय नाहीत हे कोरीव लेखांच्या पुराव्यावरून सिद्ध झाले आहे. त्यापेक्षा अक्षरवटिकेचा पुरावा जास्त विश्वसनीय असतो. प्रस्तुत लेखातील अक्षरवटिका सातवाहनानंतर अंध्रात उदयास आलेल्या इक्ष्वाकुवंशी राजांच्या अक्षरवटिकेकडे झुकलेली दिसत असल्यामुळे त्यात निर्दिष्ट केलेला पुळुमावि हा शेवटचा – तिसरा[३] – पुळुमावि असावा. त्याची नाणी विदर्भात तऱ्हाळा येथे सापडली आहेत. त्यावर त्याचे नाव 'पुळुहामवि' असे आढळते.

---

१ क्रमांक १, ओ. १ पाहा.

२ *D.K.A.*, p. 43.

३ शिवश्री पुळुमावि हा वासिष्ठीपुत्र पुळुमावीहून भिन्न गणल्यास हा पुळुमावि चौथा होईल. पण 'शिवश्री' हे केवळ बिरुद होते हे आम्ही इतरत्र दाखविले आहे.

प्रस्तुत लेखावरून सातवाहनकाळी सेनापति व सेनादलातील खालचे अधिकारी यांना वेतन म्हणून गाव, तालुका, जिल्हा यांसारखी भूमिदाने देण्याचा प्रघात होता असे दिसते.

**स्थलनिश्चय** — प्रस्तुत लेखातील **'सातवाहनिहार'** हा प्रदेशनिर्देश पल्लवनृपति शिवस्कन्दवर्म्याच्या हीरहडगल्ली ताम्रपटातील 'सातवाहनिरट्ठा'सारखा आहे. त्यावरून त्याकाळी सध्याच्या बेल्लारी जिल्ह्याला सातवाहनांचे नाव दिले होते असे दिसते. प्रस्तुत लेख जेथे सापडला होता त्या स्थळाचे **'वेपुरक'** नाव सध्या प्रचलित नाही. सातवाहन कालाअखेर त्या वंशाची सत्ता दक्षिणेत बेल्लारी जिल्ह्यापर्यंत पसरली होती हे प्रस्तुत लेखावरून स्पष्ट आहे.

**ओळ** **वाचन**

**१ [सि]धं [।*] रञो सातवाहनानं [सि]रिपुळु[मा]विस सव ८ हेम २ दिव १**

**२ [प्र*][थमस] महासेनाप[ति]स खंद[ना]कस जनपदे सातवहनिहारे**

**३ [गो*]मिकस कुमारदतस गामे वेपुरके वथवेन गहपतिकेन [कों]तानं संबेन**

**४ तळकं खानितं [।*].**

**अनुवाद**

सिद्धि असो! **सातवाहन** वंशातील राजा **श्रीपुळुमावि** याच्या [राज्यकालाच्या] **संवत्सर ८, हेमंत [ऋतूच्या] २ [या पक्षातील] प्रथम – १ – दिवशी** महासेनापति **स्कन्दनाग** याच्या **सातवाहनिहार** या जनपदातील (प्रदेशातील) गौल्मिक (कॅप्टन्) **कुमारदत्त** याच्या **वेपुरक** [गावात] वास्तव्य करणाऱ्या **कोंत** (कुळातील) **संब** या गृहपतीने [हा] तडाग (तलाव) खोदविला.

**क्रमांक ३५**

## मळवळ्ळि येथील चुटुकुलानन्द सातकर्णीचा स्तंभलेख : संवत्सर १

हा लेख कर्नाटक प्रदेशाच्या शिकारपूर तालुक्यातील **मळवळ्ळि** या गावी कल्लेश्वर देवालयाच्या समोर पडलेल्या सहा फूट उंचीच्या काळ्या

दगडाच्या षट्कोनी खांबावर कोरला आहे. त्याच्या सहा बाजूंवर एकूण आठ ओळी खालून वर लिहिल्या आहेत. त्यांपैकी पहिल्या व सहाव्या बाजूंवर प्रत्येकी दोन व इतर चार बाजूंवर प्रत्येकी एक ओळ आहे. या आठ ओळींपैकी पहिल्या तीन ओळींत चुटुकुलानंद सातकर्णीचा लेख व नंतरच्या पाच ओळींत कदम्बनृपति शिवस्कन्दवर्मन् याचा लेख आहे.

या लेखाकडे ब्यूह्लरने सन १८९५ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर राइस, फ्लीट व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[१] राइसने एपिग्राफिया कर्नाटिका, व्हॉ. ७, मध्ये त्याचे छाप, वाचन व भाषांतर दिले आहे. त्याच छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाच्या आरंभी **मळपळि** देवाच्या विजयाचा उल्लेख आहे. नंतर **वैजयन्तीपुराचा मानव्यसगोत्री हारितीपुत्र विण्हुकड चुटुकुलानन्द सातकर्णि** याची पुढील आज्ञा **रज्जुक महावल्लभ** यास कळविली आहे: 'आयुष्य आणि संपत्ति यांच्या वृद्धीकरिता **सहलाटवी** गाव **मळपळि** देवाच्या भोगाकरिता कौण्डिन्यगोत्री हारितीपुत्र **तार्किचाचा** मुलगा **कोण्डमाण** याला आम्ही सर्व परिहारांसह दिला आहे'. शेवटी प्रस्तुत लेखाचा काळ **प्रथम संवत्सर, ग्रीष्म ऋतूचा दुसरा पक्ष** आणि **प्रथम दिवस** असा उल्लेखिला आहे.

अक्षरवटिकेवरून हा लेख सातवाहन काळाच्या अखेरचा दिसतो. त्या काळी उत्तर कानडा प्रांतातील वनवासी नृपति चुटुकुलानन्द सातकर्णि याचा अंमल दक्षिणेत प्रस्थापित होऊन त्याने आपली सत्ता लौकरच उत्तर कोकणापर्यंत पसरविली हे कान्हेरी लेण्यातील क्र. ३६ च्या लेखावरून दिसते. प्रस्तुत लेखातील 'मानव्यसगोत्र', 'हारितीपुत्र' आणि 'विण्हुकडचुटुकुलानन्द' ही राजाची बिरुदे उल्लेखनीय आहेत. यांतील 'चुटुकुलानन्द' हे बिरुद शकवंशी मान राजाच्या वंशजांकडून घेतलेले दिसते. विण्हुकड हे कदाचित् त्या वंशाचे कर्नाटकातील मूलस्थान असेल. 'मानव्यसगोत्र' आणि 'हारितीपुत्र' ही बिरुदे नंतरच्या कदंबांनी व पूर्वकालीन चालुक्यांनी उचललेली दिसतात. 'हारितीपुत्र' हे बिरुद तर वाकाटकांच्या वाशिम ताम्रपटातही आढळते.[२]

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११९५ मधील संदर्भ पाहा.

२ वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ, पृ. ३२९.

**स्थलनिश्चय** — राइसने हा स्तंभलेख जेथे सापडला त्या गावचे नाव 'मट्टपट्टि' असे वाचले होते. त्याचे खरे वाचन '**मळपळि**' असे आहे व तेंच सध्या मळवळ्ळि या रूपाने प्रचलित आहे. '**वैजयन्ती**' ही या सातकर्णीची तत्कालीन राजधानी होती. तिचे दुसरे नाव 'वनवासी' हे अद्यापि प्रचलित आहे. ती उत्तर कानडा प्रदेशात आहे.

**ओळ** **वाचन**

१ **सिद्धम् ।। जयति भगवान् मळपळिदेवो [।*] वैजयन्तीपुरराजा मानव्यसगोत्रो हारितीपुत्तो विण्हुकड्डचुटुकुलानन्दसातकणि आणपयति महावलभं रज्जुकं [।*].**

२ **आयुधनवद्धतीच्छं भगवतोषपटीयसीं सुखान्वयं गामाहारसहलाटवीं ।। मळपळिदेवभोगं महासुराणं ठाणं आत्मरच्चाय सव्वपरिहारेण वीतरासं अभटप्पवेसं ससिद्धिकम्**

३ **एवं उचितं सव्वपरिहारेण तांकिचीसुताय बम्हदेज्जं दिण्णम् कौण्डिन्य-सगोत्ताय हारितीपुत्ताय कोण्डमाणाय इव्वद्धत्ति बितीय गिम्हपक्खं पडमदिवसं पडमसमच्चरम् दिण्णं . . . . [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो ! भगवान् **मळपळिदेव** हा विजयी आहे !

**वैजयन्तीपुराचे** राजे, मानव्यसगोत्री, हारितीपुत्र, **विण्हुकडचुटु-कुलानन्द सातकर्णि** हे **रज्जुक महावल्लभ** यास आज्ञा करतात की [आमच्या] आयुष्य व संपत्ति यांच्या वृद्धीच्या इच्छेने भगवंताचा संतोष करण्यात अत्यन्त कुशल आणि सुखाचे साधन असा **सहलाटवी ग्रामाहार**,[१] आमची अर्चना म्हणून सर्व देवांचे स्थान असलेल्या **मळपळि** देवाच्या भोगाकरिता, सर्व परिहारांनी युक्त आणि [सर्व]बाधारहित,[२] [तसेच] राजसेवकांना अप्रवेश्य आणि न्यायाधिकारासहित[३] असा, कौण्डिन्यगोत्री हारितीपुत्र **तांकिचीचा** पुत्र **कोण्डमाण** याला ब्रह्मदाय

---

१ 'गामाहारसहलाटवीम्' याचा नीट अर्थ लागत नाही. इतरत्र 'आहार' याचा अर्थ महाविभागासारखा प्रदेश असा आढळतो.

२ 'वीतरासं' (वित्रासम्) हे इतरत्र आढळणाऱ्या 'बाधारहित' या विशेषणाच्या अर्थी योजिलेले दिसते.

३ 'ससिद्धिकम्' हे इतरत्र आढळणाऱ्या 'अभ्यन्तरसिद्धिकम्' या अर्थी योजिले आहे. *C. I. I.*, IV, p. 251, 253 n. त्याचा अर्थ 'न्याय करण्याच्या अधिकारासहित' असा आहे. दिलेल्या गावातील कज्जांचा निकाल त्या गावाच्या मालकानेच करावयाचा हा अर्थ.

म्हणून दिला आहे. [तो] **प्रथम संवत्सर, द्वितीय ग्रीष्मपक्ष, प्रथम दिवस** [या दिवशी] दिला.

## क्रमांक ३६

# कान्हेरीच्या लेण्यातील [चुटुकुलानन्द सातकर्णीच्या काळचा] लेख : संवत्सर [९]

हा लेख **कान्हेरी** येथील क्र. ७७ च्या लेण्यात व्हरांडयाच्या बाहेरील उजव्या बाजूच्या भिंतीवर कोरला आहे. याकडे बर्ड साहेबाने सन् १८४७ मध्ये 'हिस्टॉरिकल रीसर्चेस' यात प्रथम लक्ष वेधले. नंतर वेस्टने त्याची यथादृष्ट प्रत प्रसिद्ध केली. ब्यूह्लर, फ्रांके व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[१] ब्यूह्लरच्या वाचनाबरोबर त्याचा छाप दिला नसल्या-मुळे तेच वाचन येथे देऊन त्याची चर्चा केली आहे.

**लिपी व भाषा** — लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाच्या पहिल्या ओळीतील राजाचे नाव, संवत्सर, ऋतु व पक्ष ही आता अस्पष्ट झाली आहेत. तथापि यथादृष्ट प्रतीवरून **संवत्सर** ९ आणि **ऋतु हेमंत** वाचता येतात. तिथि **'दसमी'** स्पष्ट आहे. पहिल्या ओळीत 'पुल' अशी अक्षरे आणि त्यापूर्वी 'इ'-काराचे चिन्ह दिसतात. त्यांवरून त्या काळी राज्य करणारा राजा [स्वामि] किंवा [सिरि]पुळुमावि असावा असा ब्यूह्लरचा तर्क होता.[२] पण यासारखींच व्यक्तिनामे व विशेषणे असलेला लेख वनवासी येथे सापडला आहे. (क्र. ३७ पाहा.) त्यावरून येथील राजाचे नाव विण्हुकड चुटुकुलानन्द सातकर्णि असावे असा तर्क रॅप्सनने केला आहे. तो सयुक्तिक आहे.

प्रस्तुत लेखात महाराजाची कन्या महाभोजी आणि महारठीची पत्नी **स्कन्दनाग सातकाची** माता आणि महाभोज **धणसेण** याची भगिनी **नागमुलनिका** हिने आपल्या मातापित्यांच्या नावाने हे लेणे भिक्षुसंघाला अर्पण केले असे म्हटले आहे.

या लेखात कान्हेरी येथील लेणे खोदविणाऱ्या दात्रीचे वर्णन उत्तर कानडा प्रदेशातील वनवासी येथे कोरलेल्या राजा हारितीपुत्र विण्हुकड चुटुकुलानन्द सातकर्णि याच्या संवत्सर १२ च्या लेखातील शिवस्कन्द

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १०२१. वेस्ट साहेबाने *J.B.B.R.A.S.*, Vol. VI (Old Series), pp. 10 f. वर याची यथादृष्ट प्रत छापली आहे.

२ *A.S.W.I.*, Vol. V, p. 86. ब्यूह्लरने हा लेख वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या काळचा असावा असे म्हटले आहे.

नागश्री कुमाराच्या मातेच्या वर्णनासारखे आहे.[१] तिलाही 'महाभुवि' (महाभोजी) आणि 'महाराजाची कन्या' म्हटले आहे. तिच्या पुत्राचेही नाव तसेच आहे. मात्र तिचे 'नागमुलनिका' हे लेखकाच्या चुकीमुळे तेथे दिले नाही. या साम्यावरून ही दोन दाने देणाऱ्या स्त्रिया एकच असाव्या असा तर्क रॅप्सनने केला होता.[२] तो ल्यूडर्सने आपल्या ब्राह्मी लेखांच्या यादीत स्वीकारला आहे.[३] तो सयुक्तिक दिसतो.

चुटुकुलानन्द सातकर्णि हा वनवासी येथे क्र. २२ चा लेख कोरविणाऱ्या वासिष्ठीपुत्र पुळुमावीनंतर बऱ्याच काळाने उदयास आला. त्याने आपल्या कुलाचे नाव शक नृपति मान याच्या चुटुकुलावरून घेतलेले दिसते.[४] म्हणून हा लेख सातवाहन काळाच्या अखेरीचा दिसतो. ब्यूह्लरने तो वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा असावा असा तर्क केला असला तरी त्यातील काही अक्षरे नंतरची दिसतात असे म्हटले आहे.[५] ते विधान रॅप्सनच्या पूर्वोक्त तर्काला उपोद्बलक आहे.

**ओळ** **वाचन**

१ . . . . . स . . . . . . [कुल] . . . . . . सव ९[?] **हेम**
२ . . . **स दसमिय एताय पुवाय महाराजबालिकाय म[हाभोजि]य**
३ **बा[लि]काय महारठिनिय खंदनागसातकमातुय महा[भो]जस[अहि–]**
४ **[जस] च धणसेणस[?] भगिनिय नागमुलनिकाय लेण देयधम**
५ . . . . . . . . . . **भिकुसघे पतिठापि[तं] मा[तुपित]रा उदिस**
**का . . एण अ – . .**

**अनुवाद**

[चुटुकुलानंद सातकर्णि[६]] याच्या **संवत्सर** [९], **हेमंत**-**[पक्षा]ची दशमी** तिथी – या पूर्वोक्त तिथीस महाराजाची कन्या, महाभोजी आणि महारठीची पत्नी **स्कन्दनाग सातकाची** (सातकर्णीची)

---

१ पुढील क्रमांक ३७ चा लेख पाहा.

२ *B.M.C.* (*Andhras*), p. liii.

३ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १०२१ पाहा.

४ *Studies in Indology*, Vol. III, pp. 68–70.

५ *A.S.W.I.*, Vol. V, p. 86.

६ येथील राजनाम अस्पष्ट झाले आहे. ब्यूह्लरने ते वासिष्ठीपुत्र पुळुमावि असावे असा तर्क केला होता. पण रॅप्सनने ते चुटुकुलानन्द सातकर्णि असावे हे क्रमांक ३७ वरून दाखविले आहे.

माता व महाभोज **धणसेण** याची भगिनी **नागमुलनिका** हिने आपल्या मातापित्यांच्या नावे हे लेणे . . . . भिक्षुसंघाला अर्पण केले.

**क्रमांक ३७**

## वनवासी येथील हारितिपुत्र चुटुकुलानन्द सातकर्णीचा शिलालेख : संवत्सर १२

[ पट्टिका २७ ]

हा लेख **वनवासी** येथील मधुकेश्वर देवालयात एका विशाल मऊ 'स्लेट' दगडाच्या दोन्ही कडांवर तीन ओळींत कोरला आहे. पहिली ओळ डावीकडे आणि दुसऱ्या दोन उजवीकडे तश्याच कोरल्या आहेत. त्याच दगडावर एक पाच फण्यांच्या सुंदर नागाची आकृति कोरली आहे.

या लेखाकडे बर्जेस याने सन १८७९-८० मध्ये प्रथम लक्ष वेधले. त्यानंतर भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर, रॅप्सन, ल्यूडर्स, लक्ष्मीनारायण राव, पंचमुखी आणि दिनेशचंद्र सरकार यांनी त्याची चर्चा केली.[१] शेवटी जी. एस्. गै यांनी तो एपिग्राफिया इंडिका (व्हॉ. ३४, पृ. ३३९ इ.) मध्ये छापासह संपादिला. त्याच छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**— या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**— प्रस्तुत लेखाचा काळ राजा **हारितीपुत्र विष्णुकड चुटुकुलानन्द सातकर्णि** याच्या शंभर वर्षे चालणाऱ्या कारकीर्दीतील[२] **संवत्सर १२, हेमन्त ऋतूच्या ७ व्या पक्षातील १ला दिवस** असा आरंभी दिला आहे. त्या दिवशी महाभुवी (महाभोजी), भाग्यवान्,[३] महाराजबालिका, युवराजाची माता **शिवस्कन्दनागश्री** हिने आपला धर्मदाय म्हणून नाग कोरविला, तलाव खोदविला आणि विहार बांधला असे

---

१ ए. इं., व्हॉ. ३४, पृ. २३८ इ. यातील संदर्भ पाहा.

२ 'वससताय' याचा अर्थ अनेकांनी अनेक प्रकारे केला आहे. ब्यूह्लरने प्रथम तो 'वंशसत्तायाः' (वंशाच्या सत्तेचे अमुक वर्ष) असा केला होता. पण नंतर तो 'विश्वसत्तायाः' (विश्वसत्तेचे अमुक वर्ष) असा केला. तोच गै यांनी स्वीकारला आहे. यासारख्याच संदर्भात क्रमांक ५१ च्या रुद्रदामन्‌च्या जुनागड लेखात 'वर्ष-सहस्राय' असा शब्द येतो. तेव्हा प्रस्तुतसारख्या ठिकाणी त्याचा अर्थ 'शंभर वर्षांच्या कारकीर्दीकरिता' असा करावा हे दिनेशचंद्र सरकारांचे मत ग्राह्य आहे. हे शब्द-प्रयोग उपचारात्मक होते.

३ 'जीवपुत्रा' (जिचा पुत्र जिवंत आहे ती) हे विशेषण भाग्यवत्तेचे लक्षण म्हणून अनेक कोरीव लेखांत योजिलेले आढळते. क्रमांक १३, ओ. २ पाहा.

येथे नमूद केलेले दिसते. पण हा लेख लिहिण्यात व नंतर कोरण्यात चूक झाली असावी. स्कन्दनागश्री हे स्त्रीचे नाव नसून पुरुषाचे आहे. या तथाकथित स्त्रीच्या बाबतीत योजिलेली हीच विशेषणे कान्हेरी येथील क्र. ३६ च्या कोरीव लेखात योजिलेली आढळतात. तेव्हा या दोन्ही लेखांतील दानकर्त्या स्त्रिया एकच असाव्या. कान्हेरीच्या लेखात तिचे नाव नागमुलनिका असे आले आहे आणि तिला स्कन्दनागसातकाची माता म्हटले आहे. प्रस्तुत लेखात लेखकाच्या प्रमादामुळे,[१] दानकर्त्या स्त्रीचे नाव गळले आहे. तथापि तिचे 'जीवपुत्रा युवराजमाता' असे वर्णन केले आहे. पुढील 'सिवखदनागसिरिय' या पदात त्या युवराजाचे नाव आलेले दिसते. आम्ही इतरत्र दाखविल्याप्रमाणे आरंभीच्या 'सिव' (शिव) या उपपदाला महत्त्व नाही. ते उपपद अनेक प्राचीन राजे आपल्या नावांपूर्वी कधी कधी लावीत असत. राहिलेले 'खदनागसिरि' (श्रीस्कन्दनाग) हे कान्हेरी लेखातील 'खदनागसातक' (स्कन्दनाग-सातक)हून भिन्न नाही. लेखकाने शेवटी प्रमादाने जोडलेल्या 'य' या प्रत्ययाने हे दान कोणा स्त्रीने केले होते असा भास उत्पन्न झाला आहे.[२] वास्तविक लेखकाला 'सिवखदनागसिरिस युवराजस मातुय' असे म्हणावयाचे होते. पण त्याने चुकीने 'युवराजमातुय सिवखदनाग-सिरिय' असे लिहिले. 'सिवखदनागसिरिस युवराजमातुय' असे लिहिले असते तर संस्कृतातल्या 'सापेक्षत्वेऽपि गमकत्वात्समासः।' या म्हणीप्रमाणे 'युवराज श्रीशिवस्कन्दनागाच्या मातेने' असा अर्थ करण्यात कोणतीही अडचण आली नसती.

ज्या हारितीपुत्र सातकर्णीच्या काळी हा लेख कोरविला होता त्याला 'विष्णुकड चुटुकुलानन्द' असे विशेषण लावले आहे. त्याविषयी विवेचन मागील (क्र. ३६ च्या) लेखात केले आहे. हा शिवस्कन्दनाग सातवाहन राजवटीच्या अखेरीस झालेला दिसतो. कारण मळवळ्ळी येथील एका स्तंभावरील लेखात वनवासीच्या हारितीपुत्र शिवस्कन्दवर्म्याने दिलेले गाव नंतर एका कदम्ब नृपतीने दिलेले दिसते.[३] तेव्हा हे 'चुटु' किंवा 'चुटुकुलानन्द' राजे सातवाहन कालाच्या अखेरीस व कदंबांच्या उदयापूर्वी होऊन गेलेले दिसतात.

---

१ लेखकाकडून झालेले असे अनेक प्रमाद दुरुस्त न होता राहिले आहेत. क्रमांक १९ मधील 'नवनरस्वामी', व क्रमांक ३८ मधील 'कुशणमूल' हे शब्द पाहा.

२ 'बलसिरिय' (क्रमांक १८, ओ. ९) पाहा. पण 'शिवश्री' हे उपपद स्त्रियांच्या बाबतीत लावले जात नसे.

३ *Ep. Carn.*, Vol. VII, p. 252.

प्रस्तुत लेखाच्या शेवटी त्यात उल्लेखिलेली धर्मकृत्ये अमात्य **स्कन्दसाति** ह्याच्या देखरेखीखाली झाली आणि '**सजयत**' येथील आचार्य **इदमोरक** (इंद्रमयूरक) याच्या **नटक** नामक शिष्याने या शिलेवरील नाग कोरविला असे म्हटले आहे.

**स्थलनिश्चय — सजयत** (संजयन्ती) हे वनवासी (वैजयन्ती) चे प्राचीन नाव दिसते.

**ओळ** **वाचन**

१ **सिधं [।*] रञो हारितीपुतस विण्हुकडचुटुकुलानन्दसातकणिस वससताय सवछरं १० [+*] २ हेमतान पखो ७ दिवस १ महाभुविय महाराज-बालिकाय जिवपुताय**

२ **युव[रा]ज[मातुय] सि[व]खदनागसिरिय देयधंमं नागो तडागं विहारो च [।*] एथ कमतिको अमचो खदसाति [।*] सजयतकस अचरियस [इ-]**

३ **दमोरकस सिसेन नटकेन नागो कतो [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! राजा **हारितीपुत्र विण्हुकड चुटुकुलानन्द सातकर्णीच्या** शंभर वर्षांच्या राज्यकालातील **संवत्सर १२, हेमंताचा पक्ष ७, दिवस १** या दिवशी महाभुवी (महाभोजी), महाराजबालिका, जीवपुत्रा (भाग्यवान्), **शिवस्कन्दनागश्री** या युवराजाची माता. . .[१] हिने आपला धर्मदाय म्हणून नाग, तलाव व विहार करविले. अधीक्षक अमात्य **स्कंदसाति** हा होता. **सजयंती** येथील **इंद्रमयूरक** आचार्यांच्या **नटक** [नामक] शिष्याने [हा] नाग केला.

---

१ हिचे 'नागमुलनिका' हे नाव लेखकाच्या प्रमादाने गळले आहे. क्रमांक ३६, ओ. ४ पाहा.

# खंड दुसरा—पश्चिमी क्षत्रपांचे लेख

## (अ) क्षहरात क्षत्रपांचे लेख

### क्रमांक ३८

## नाशिकच्या लेण्यातील ऋषभदत्ताचा लेख : वर्षे ४१, ४२ आणि ४५.

हा लेख **नाशिक** येथील क्र. १० च्या लेण्याच्या व्हरांड्यात डावीकडच्या लहान खोलीच्या दरवाज्याच्या वरील भागी आणि व्हरांड्याच्या मागील भिंतीवर कोरला आहे. पूर्वी हे दोन भाग चुकीने निराळे समजले जात होते;[१] पण आता या लेखाच्या ओळींचा आरंभ डावीकडच्या खोलीच्या वरील भागी होऊन नंतर त्या ओळी व्हरांड्याच्या मागील भिंतीवर चालू होतात, हे लक्षात आले आहे. या लेखाचे दोन भाग पडतात. पहिला लेख [शक] वर्ष ४२ चा असून त्याने पहिल्या तीन ओळी व चौथीचा आरंभीचा तीन-चतुर्थांश भाग व्यापला आहे. त्याची अक्षरे मोठ्या आकाराची आहेत. नंतर दुसऱ्या भागातील परिशिष्टाचा आरंभ होतो. तो लेख [शक] वर्ष ४५ मध्ये लहान अक्षरांत कोरला होता. त्यांने चौथ्या ओळीचा उजवीकडचा एक-चतुर्थांश भाग व्यापल्यावर त्याच्या पाचव्या ओळीचा आरंभ लहान खोलीवरील जागी न होता व्हरांड्याच्या मागील भिंतीवरच झाला आहे. पण या परिशिष्टात्मक लेखाचे शेवटचे तीन शब्द पुन: त्या खोलीच्या वरील भिंतीवर सहाव्या ओळीत मोठ्या आकारात कोरले आहेत. प्रस्तुत लेखाचे हे दोन्ही भाग लक्षात घेतल्याशिवाय त्याचा अर्थ नीट लागू शकत नाही.

सन १८४७ मध्ये बर्ड, रीव्हज् व ओर्लेबार यांनी 'हिस्टॉरिकल रीसर्चेस' (पृ. ५९) मध्ये या लेखाकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन-ब्रेट, वेस्ट-द्वय, रा. गो. भांडारकर, फ्रांके आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[२] ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे. सेनार्टच्या लेखातील छापावरून येथे त्याचे संपादन केले आहे.

---

१ ही चूक ब्रेटने प्रथम केली होती. तिचे अनुसरण वेस्ट आणि रा. गो. भांडारकर यांनी केले असे भगवानलाल इंद्रजींनी म्हटले आहे. *Nāsik District Gazetteer* (old ed.), p. 573.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११३३ मधील संदर्भ पाहा.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे. त्यात ८०००, ७०००, ३०००, २०००, १०००, ४० आणि ५ या संख्यांची चिन्हे आली आहेत. सातवाहनांच्या लेखांत ऋतुमितीने काळ दाखविला जात असे, येथे महिन्याचा, पक्षाचा व तिथीचा उल्लेख कालगणनेकरिता केला आहे. तसेच 'संवत्सर' शब्दाचा उपयोग न करता 'वर्ष' शब्दाचा केला आहे हे लक्षणीय आहे. ही सर्व शककालगणनेची वैशिष्टचे आहेत.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचे दोन भाग पडतात. त्याच्या पहिल्या भागाचा उद्देश [शक] **वर्ष ४२ च्या वैशाख महिन्यात**[१] **क्षहरात क्षत्रप** राजा **नहपान** याचा जावई आणि **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याने हे क्र. १० चे लेणे चारी दिशांच्या भिक्षूंना अर्पण केले आणि त्यात राहणाऱ्या भिक्षूंच्या चीवरांच्या (वस्त्रांच्या) व औषधाच्या[२] खर्चाकरिता **गोवर्धन** येथील श्रेणींमध्ये ३००० कार्षापणांची रक्कम दोन अक्षय

१ हे दान बहुधा वैशाख पौर्णिमेस केले असावे, त्या तिथीस गौतम बुद्धाचा जन्म, ज्ञानप्राप्ति आणि महापरिनिर्वाण झाले. म्हणून ती तिथि फार पवित्र गणण्यात येते.

२ 'कूशणमूल' याचा अर्थ अनेकांनी अनेक प्रकारे केला आहे. पण तो प्रस्तुत संदर्भात जुळत नाही. बौद्ध भिक्षूंना विहारांत राहताना तीन गोष्टींची गरज पडे.—(१) अन्न, (२) चीवर (वस्त्र), आणि (३) औषधे. ऋषभदत्ताने नाशिक येथे आपले लेणे कोरविले तेव्हा त्याने या तीन्हींची व्यवस्था केली होती. त्याने ते लेणे भिक्षूंच्या निवासार्थ अर्पण केले होते. क्रमांक ४३ च्या लेखात उल्लेखिल्याप्रमाणे त्याने गोवर्धनजवळचे एक शेत देऊन भिक्षूंच्या भोजनाच्या खर्चाची व्यवस्था केली होती. प्रस्तुत लेखात सांगितल्याप्रमाणे दोन हजार कार्षापणांची अक्षयनीवि करून तिच्या २४० कार्षापणांच्या व्याजातून २० भिक्षूंना प्रत्येकी १२ कार्षापण चीवरांकरिता देण्याची व्यवस्था केली होती. नंतर राहिले कुशणमूल (औषधपाणी). त्याकरिता त्याने १,००० कार्षापणांची ठेव पाऊण टक्क्याने ठेवून त्याचे व्याज म्हणून मिळणाऱ्या ९० कार्षापणांतून आजारी भिक्षूंच्या औषधपाण्याची व्यवस्था केलेली दिसते. चीवरांप्रमाणे कोणत्या भिक्षूला औषधाकरिता किती कार्षापण लागतील हे सांगणे शक्य नसल्याने त्याने हे ९० कार्षापण भिक्षूंमध्ये वाटण्याची व्यवस्था न करता तो सामाइक निधि मानावा असे आदेशिले असावे. भिक्षूंच्या केवळ औषधाकरिता प्राचीन काळी देणग्या दिल्या जात. अश्या तऱ्हेच्या एका देणगीचा उल्लेख याच लेण्यातील आभीर ईश्वरसेनाच्या काळच्या लेखात 'चातुर्दिश-भिक्षुसंघस्य गिलानभेषजार्थमक्षयनीवी प्रयुक्ता' असा आला आहे. तो पाहा *C.I.I.*, Vol. IV, p. 3.
पण 'कुशणमूल' याचा अर्थ 'औषधे' असा कसा होईल ? असा प्रश्न उपस्थित होतो. येथे लिहिणाऱ्याच्या व खोदणाऱ्याच्या चुकीने 'कुशलमूल' याच्या ऐवजी 'कुशणमूल' असे कोरले गेले असावे. इतरत्र 'कुशलमूल' असाच शब्द येतो. त्याचा अर्थ 'पारलौकिक कल्याणाचे मूळ' अर्थात् 'पुण्य' असा दिसतो. *C.I.I.*, II, part i, pp. 149, 158 and 170 पाहा. तोच शब्द विष्णुकुंडींच्या तुम्मळगुडेम ताम्रपटात आला आहे. परिशिष्ट ६ पाहा. पारलौकिक कुशलाचे (कल्याणाचे) कारण जसे धार्मिक कृत्यांपासून होणारे पुण्य, तसेच ऐहिक कुशलाचे (आरोग्याचे) मूळ औषध होय. तेव्हा 'कुशलमूल' असा शब्द विवक्षित दिसतो. 'कुशला'चा अर्थ 'आरोग्य' हा येथील संदर्भात ठीक जमतो.

नीवींत (कायम ठेवींत) व्याजाने ठेवली हे नमूद करण्याचा होता. पहिली ठेव दोन हजार कार्षापणांची असून ती एका कोष्टयांच्या श्रेणीत [दर माहा] दर शेकडा १ पडिक (पदिक)[१] (कार्षापण) या व्याजाच्या दराने ठेवली होती. त्याचे व्याज [दरवर्षी २४० कार्षापण हे] एकेका भिक्षूला १२ कार्षापण याप्रमाणे २० भिक्षूंना चीवरांकरिता म्हणून द्यावयाचे होते. दुसरी जी १००० कार्षापणांची ठेव होती ती दुसऱ्या एका कोष्टयांच्या श्रेणीत (दर माहा) दर शेकडा पाऊण पडिक (कार्षापण) या दराने ठेवली होती. तिच्यावरील व्याजाचा उपयोग भिक्षूंच्या कुशलमूलाकरिता (औषधांच्या खर्चाकरिता) करावयाचा होता. या ठेवी परत घेतल्या जाऊ नयेत. फक्त त्यांच्या व्याजाचा उपयोग [भिक्षूंची चीवरे आणि औषधे यांच्याकरिता] केला जावा असे या लेखात स्पष्टपणे म्हटले आहे.

याशिवाय आणखी एका दानाचा उल्लेख प्रस्तुत लेखात केला आहे. ऋषभदत्ताने **कापुर** नामक **आहारातील** (विभागातील) **चिखलपद्र** या गावी [भिक्षुसंघाला] नारळीची आठ हजार झाडे दान दिली होती. ही दाने देवांना व ब्राह्मणांना दिली होती.[२]

ही सर्व दाने [गोवर्धन येथील] निगमसभेत[३] (नगर प्रतिनिधींच्या सभेत) जाहीर करून नंतर ती तेथील नोंदणी खात्यात नोंदली होती.[४]

यानंतर परिशिष्टातील लेखाचा आरंभ होतो. त्यात म्हटले आहे की [शक] **वर्ष ४१, कार्त्तिक शुद्ध पंधरावी [तिथि]** या दिवशी [ऋषभदत्ताने] भगवंत देवांना आणि ब्राह्मणांना देण्याकरिता संकल्पिलेले सत्तर हजार – ७०००० – कार्षापणांचे दान, पस्तीस कार्षापणांस एक

---

१ येथे 'पडिक' याचा अर्थ 'कार्षापण' असा दिसतो.

२ याविषयीचा लेख, ब्राह्मणधर्मासंबंधी असला तरी, ऋषभदत्ताच्या आग्रहावरून या बौद्ध लेण्यात कोरला आहे. तसाच क्रमांक ४० चा लेख पाहा. देवांना दिलेली दाने देवळांच्या व्यवस्थापकांच्या स्वाधीन केली असावी.

३ सेनार्टने 'निगमसभा' याचा अर्थ 'टाऊन हॉल' असा केला आहे. पण तसा अर्थ विवक्षित असता तर 'निगमसभागहे' असे म्हटले असते.

४ भगवानलालनी 'फलकवारे चरित्र तोति' असे वाचले, आणि 'तोति' हे संस्कृत 'स्तौति' याचे प्राकृत रूप समजून त्याचा अर्थ '[हा लेख] द्वारफलकावर माझे [धार्मिक] कृत्य सांगत आहे' असा केला आहे. ब्यूह्लरने त्याचा अर्थ 'रीतीप्रमाणे हे सर्व फळयावर लिहिले आहे', असा केला आहे. सेनार्टने 'वारे' याचा अर्थ 'कागदपत्र ठेवण्याची इमारत' असा केला आहे. इतर लेखांत लेख लिहिलेल्या पट्टिकेचा उल्लेख येतो (क्रमांक ११, ओ. ६ पाहा), तसा येथे फलकाचा आलेला दिसतो. कदाचित् ही दाने सुरक्षिततेकरिता फळयांवर (किंवा ताम्रपत्रांवर) लिहून ठेवली जात असावी.

सुवर्ण याप्रमाणे दोन हजार सुवर्णरूपाने[१] **वर्ष ४५, [कार्त्तिक] पौर्णिमेस** अर्पण केले आणि ते दानही नोंदणी खात्यात रीतीप्रमाणे नोंदविले.

**स्थलनिश्चय**—प्रस्तुत लेखात **आहाराचे** (महाविभागाचे) मुख्य ठिकाण म्हणून उल्लेखिलेले **कापुर** हे अद्यापि पूर्वीच्याच नावाने सुरत जिल्ह्यात व्यारा गावाच्या नैऋत्येस सुमारे तीन मैलांवर विद्यमान आहे. त्याचा उल्लेख त्रैकूटक दह्रसेनाच्या पारडी ताम्रपटात आला आहे. **चिखलपद्र** हे सुरत जिल्ह्यातील चिखली असावे.

**ओळ** **वाचन**[२]

१ **सिधं [।*] वसे ४०[+*]२ वेसाख–मासे राञो क्षहरातस क्षत्रपस नहपानस जामातरा दीनीकपुत्रेन उषवदातेन संघस चातुदिसस इमं लेणं नियातितं [।*] दत चानेन अक्षयनिवि काहापणसहस्रा–**

२ **नि त्रिनि ३००० संघस चातुदिसस य इमस्मि लेणे वसंतानं[३] भविसति चिवरिक कुशणमूलं[४] च [।*] एते च काहापणा प्रयुता गोवधन-वाथवासु श्रेणिसु कोलीकनिकाये[५] २००० वृधि पडिकशत अपर-कोलीकनिका–**

३ **ये १००० वधि पायून[६]पडिकशत [।*] एते च काहापणा अपडिदातवा वधिभोजा [।*] एतो चिवरिक–सहस्रानि बे २००० ये पडिके सते [।*] एतो मम लेणे वसवुथान भिखुनं वीसाय एकीकस चिवरिक बारसक [।*] या[७] सहस्र प्रयुतं पायूनपडिके शते अतो कुशण–[८]**

४ **मूल[९] [।*] कापुराहारे च गामे चिखलपद्रे दतानि नालिगेरान मुल-सहस्रानि अठ ८००० [।*] एत च सर्वं[१०] स्रावित निगमसभाय**

---

१ ही सुवर्ण नाणी कुशाण सम्राटांची असावी.

२ सेनार्टच्या लेखातील छापावरून.

३ 'वसातानं' (भ. व ब्यू.).

४ 'कुशणमुलं' (भ.).

५ 'कोलिक–' (ब्यू.).

६ ५ 'पायुन' (भ. व ब्यू.).

७ 'य' (भ. व ब्यू.).

८ 'कुशन–' (सेनार्ट). पण त्याच्या छापात 'कुशण' स्पष्ट दिसते.

९ 'मुल' (भ.).

१० 'सर्व' (भ.).

**निबध च फलकवारे चरित्रतो ति [।*] भूयो नेन दतं वसे ४०[+*]१ कातिकशुधे पनरस [।*] पुवाकवसे ४०[+*]५**
५ **पनरस नियुतं भगवतां देवानं ब्राह्मणानं च कार्षापणसहस्राणि सतरि ७०००० पंचत्रिशक सुवर्ण कृता दिन सुवर्णसहस्रणं मूल्यं[।*]**
६ **फलकवारे चरित्रतो ति [।*]**

## अनुवाद

सिद्धि असो ! **वर्ष ४२ च्या वैशाख मासात**[१] **क्षहरात क्षत्रप** राजा **नहपान** याचा जावई, **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याने चारी दिशांच्या संघाला हे लेणे अर्पण केले. तसेच त्याने चारी दिशांच्या संघाला तीन हजार – ३००० – **कार्षापणांची** कायमची ठेव दिली. ती या लेण्यात निवास करणाऱ्या [भिक्षूंच्या] चीवरांच्या आणि औषधांच्या[२] खर्चा-करिता होईल.

(ओ. २) आणि हे कार्षापण **गोवर्धन** येथील श्रेणींमध्ये [ठेव म्हणून] ठेवले आहेत – [एका] कोष्टयांच्या श्रेणीमध्ये [दर माहा] दर शेकडा एक पडिक[३] या व्याजाने २०००, आणि दुसऱ्या कोष्टयांच्या श्रेणीत [दर माहा] दर शेकडा पाऊण **पडिक** या व्याजाने १०००. हे कार्षापण परत करावयाचे नाहीत. त्यांच्या व्याजाचा मात्र उपयोग करावयाचा आहे.

(ओ. ३) हे जे चीवरांच्या खर्चाकरिता दोन हजार – २००० – **कार्षापण** [दर माहा] दर शेकडा [एक] **पडिक** [या व्याजाने] ठेवले आहेत [त्यांच्या व्याजातून] माझ्या लेण्यात पावसाळ्यात निवास करणाऱ्या वीस भिक्षूंना प्रत्येकी बारा [कार्षापण] याप्रमाणे चीवरांच्या खर्चाकरिता मिळावे. जे हजार **कार्षापण** [दर माहा] दर शेकडा

---

१ अनवधानाने येथे तिथि कोरावयाची राहिलेली दिसते. पण ती बुद्धाच्या जन्माची, ज्ञानप्राप्तीची आणि महापरिनिर्वाणाची 'पौर्णिमा' हीच असावी.

२ 'कुशणमूल' याचा अर्थ अनेक विद्वानांनी अनेक प्रकारे केला आहे. भगवानलालनी (कु+अशन) 'हलके अन्न', (कुशय) 'आसन' किंवा 'पानपात्र' असे अर्थ सुचविले आहेत. ब्यूह्लरला त्याचा अर्थ लागला नव्हता. सेनार्टने त्याचा अर्थ 'वर खर्चा-करिता दिलेले किरकोळ द्रव्य' असा केला आहे. दिनेशचंद्र सरकार त्याचा अर्थ 'कृशान्न' (जाडे भरडे अन्न) असा करतात. दे. रा. भांडारकरांनी 'कुषाणांचे नाणे' असा अर्थ सुचविला आहे. हे अर्थ येथे लागू पडत नाहीत. येथे 'कुशलमूल' असा शब्द विवक्षित असावा. त्याचा अर्थ 'आरोग्याकरिता अवश्य ते औषध' असा असावा. ईश्वरसेनाच्या लेखात त्याला 'गिलान-भेषज' म्हटले आहे.

३ पडिक (संस्कृत, प्रतिक) याचा येथे 'कार्षापण नाणे' असा अर्थ दिसतो.

पाऊण **पडिक** [या व्याजाने] ठेवले आहेत [त्यांच्या व्याजातून] त्यांच्या औषधाचा खर्च [करावा.]

(ओ. ४) **कापुर** आहारातील (विभागातील) **चिखलपद्र** या गावी नारळाची आठ हजार – ८००० – झाडे [भिक्षुसंघाला] दान दिली आहेत

हे सर्व निगमसभेमध्ये जाहीर केले आहे आणि रीतीप्रमाणे (नोंदणी खात्यात) फलकांवर[१] नोंदले आहे.

(ओ. ४)[२] पुन: त्याने पूर्वी **वर्ष ४१** मध्ये **कार्त्तिक शुद्ध पंधरा** [या दिवशी] दान म्हणून संकल्पिलेले[३] भगवान् देव व ब्राह्मण यांना सत्तर हजार – ७०००० – **कार्षापण** – पस्तीस [कार्षापणांस] एक **सुवर्ण** याप्रमाणे [दोन][४] हजार **सुवर्णांच्या** रूपाने **वर्ष ४५ . . पंधरा** [या दिवशी] दिले. [आणि]ते [नोंदणी-खात्यात] रीतीप्रमाणे फलकांवर [नोंदले आहे.]

### क्रमांक ३९

## कार्ल्याच्या लेण्यातील ऋषभदत्ताचा लेख

हा लेख **कार्ले** येथील चैत्य लेण्यात मधल्या दरवाजाच्या उजव्या बाजूस पट्टी (frieze) वर कोरला आहे.

या लेखाकडे स्टीव्हन्सन व ब्रेट यांनी सन १८५४ मध्ये प्रथम लक्ष वेधले. नंतर फ्रांके व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली. भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर प्रसिद्ध केले आहे.[५] सेनार्टच्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** –– हा लेख पाच ओळीत कोरला असून साधारणत बऱ्या स्थितीत आहे. काही ठिकाणी त्याची शब्द – योजना संक्षिप्त असल्याने ऋषभदत्ताच्या क्र. ४३ च्या नाशिक लेण्यातील लेखावरून त्याचा अर्थ लावावा लागतो. त्याची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

---

१ 'फलकवारे' याचा अर्थ 'दरवाज्यावर' असा भगवानलालनी केला आहे. सेनार्ट 'वार' याचा अर्थ 'ऑफिस', आणि 'फलकवारे' याचा अर्थ 'नोंदणी खात्याचे ऑफीस' असा करतो.

२ येथून पुढील लेख मागील लेखानंतर तीन वर्षांनी कोरला होता. तो जरा लहान अक्षरांत लिहिला आहे. मात्र शेवटची 'फलकवारे चरित्रतोति' ही शेवटल्या ओळीतील अक्षरे पहिल्या लेखातल्याप्रमाणे ठोकळ आहेत.

३ 'नियुतं' याचा अर्थ 'संकल्पिलेले,' 'ज्याचे उदक सोडले आहे ते' असा आहे. मूळ वाक्यातील शब्दरचना विस्कळीत झाली आहे.

४ 'दिन' याचा अर्थ भगवानलाल व सेनार्ट यांनी 'दोन' असा केला आहे.

५ ल्यूडर्सची यादी, क्रमांक १०९९ मधील संदर्भ पाहा.

**विवेचन** --- या लेखाचा उद्देश **क्षहरातवंशी राजा क्षत्रप नहपान** याचा जावई आणि **दीनीकाचा पुत्र ऋषभदत्त** याने वर्षाऋतूत सर्व दिशांच्या बौद्ध भिक्षूंच्या निर्वाहाकरिता **करजिक** गाव **वलूरक** येथील लेण्यात राहणाऱ्या बौद्ध भिक्षूंना दान दिला हे नमूद करण्याचा होता.

येथे ऋषभदत्ताच्या वर्णनात त्याच्या खालील धार्मिक कृत्यांचा उल्लेख आहे. त्याने तीन गोसहस्रदाने केली होती; **बार्णासा** नदीवर सुवर्णदान करून घाट[1] बांधला होता; देवांना व ब्राह्मणांना सोळा ग्रामदाने केली होती; **प्रभास** या पुण्य क्षेत्री आठ ब्राह्मणांचे विवाह करून दिले होते; आणि दरवर्षी लक्ष ब्राह्मणभोजने घातली होती.

प्रस्तुत लेखात काळाचा उल्लेख नाही. हिंदूधर्मीय दानांचा मात्र उल्लेख आहे. शिवाय नाशिकच्या लेण्यातील क्र. ४३ च्या लेखात निर्देशिलेल्या त्याच्या पराक्रमांचाही उल्लेख नाही. तेव्हा हे **करजिक** गावाचे दान त्याने शक संवत् ४२ (सन १२०) पूर्वी केले असावे. क्षहरात क्षत्रपांच्या लेखांतील वर्षे शक संवताची असतात हे इतरत्र दाखविले आहे.

**स्थलनिश्चय** --- प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले **वलूरक** हे सध्याच्या कार्ले गावाचे प्राचीन नाव होय. **करजिक** गाव कार्ल्याच्या ईशान्येस सुमारे ५ मैलांवरचे करजगाव असावे. क्र. १२ च्या लेखात त्याचे नाव '**करजक**' असे आले आहे. **बार्णासा** नदी पूर्व राजपुतान्यातून वाहून चंबळेला मिळणारी बनासा असावी.

**ओळ** **वाचन**[2]

१ **सिधं [।*] रञो[3] खखरातस खतपस नहपानस जा[मा]तरा [दीनीक*]पूतेन उसभदातेन ति--**

२ **गोसहस[दे]ण नदिया बनासाया सुवण[ति]थकरेण देवान ब्रह्मणान च सोळ[स]गा--**

३ **मदे[न*] पभासे पूततिथे[4] ब्रह्मणाण अठभायाप्र[देन*] [अ]नुवासं पि तु सतसहसं[5] भो--**

४ **जापयिता वलूरकेसु लेणवासिनं पवजितानं चातुदिसस सघस**

५ **यापनथ गामो [क]रजिको दतो स[वा]न [वास]वासितानं [।*].**

---

१ 'तीर्थकरेण' याचा अर्थ 'तीर्थयात्रा करणाऱ्याने' असा भगवानलालनी केला आहे. ब्यूह्लर व सेनार्ट यांनी आपल्या भाषांतरात 'तीर्थ' हाच शब्द ठेवला आहे. 'तीर्थ' म्हणजे नदीवर स्नानादिकांकरिता बांधलेला घाट.

२ सेनार्टने ए. इं., व्हॉ. ८ मध्ये दिलेल्या छापावरून.

३ 'रणो' (ब्यू.).

४ 'पूत्रतिथे' (ब्यू.).

५ 'गावसापि त्रिसतसहस्रं' (भ.); '[अ]नुवासं पितु सतसाहसि--' (ब्यू.).

### अनुवाद

सिद्धि असो! **राजा क्षहरात क्षत्रप नहपान** याचा जावई आणि **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** – ज्याने तीन हजार गाई दान दिल्या, **बार्णासा** नदीवर सुवर्णदान केले (आणि) घाट बांधला,[१] देवांना व ब्राह्मणांना सोळा गाव दान दिले, पुण्यतीर्थ **प्रभास** येथे ब्राह्मणांना आठ भार्या करून दिल्या, दर वर्षी एक लाख [ब्राह्मणांना] भोजन घातले – त्याने या **वलूरक** लेण्यात वर्षाऋतूत राहणाऱ्या सर्व भिक्षूंच्या निर्वाहार्थ **करजिक** गाव [दान] दिला आहे.[२]

### क्रमांक ४०

## नाशिकच्या लेण्यातील ऋषभदत्ताचा लेख

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. १० च्या लेण्याच्या समोरील अंगणाच्या उजव्या बाजूच्या भिंतीवर कोरला आहे. याचे दोन भाग पडतात. पहिला भाग बारा ओळींचा होता. त्याच्या पहिल्या अकरा ओळींतील ९-१० अक्षरे आता पावसाने नष्ट झाली आहेत. त्यांपैकी काही याच लेण्यातील इतर लेखांवरून जोडता येतात, पण ९, १० व ११ ओळीतील डाव्या बाजूची अक्षरे व सबंध बारावी ओळ ही जुळविता येत नाही. बाराव्या ओळीच्या शेवटी 'च ति' असे भगवानलाल इंद्रजींनी वाचले आणि त्यावरून पहिल्या भागाचा शेवट तेथे झाला असे त्यांना वाटले. पण सेनार्टला ती अक्षरे दिसली नाहीत.

या भागानंतर दोन–तीन ओळींची जागा सोडून खाली चार ओळींचा लेख कोरला होता. तोही आता फार खराब झाला आहे पण त्याच्या अवशिष्ट अक्षरांवरून तो स्वतंत्र लेख नसून पहिल्या भागाचे ते परिशिष्ट दिसते. त्याची नष्ट अक्षरे आता जुळविता येत नाहीत.

या लेखाकडे बर्ड व ओर्लेबार यांनी सन १८४७ मध्ये प्रथम लक्ष वेधले नंतर वेस्ट–द्वय, रा. गो. भांडारकर, फ्रांके आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली. ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी आणि सेनार्ट यांनी त्यां

---

१ नाशिकच्या क्रमांक ४३ च्या लेखात याचे विस्तृत रूप 'नद्यां बार्णासायां सुवर्णदान तीर्थकरेण' असे आले आहे.

२ हा गाव वलूरक येथील लेण्यात राहणाऱ्या भिक्षूंना दिला असला तरी त्याचा उपयो वर्षाऋतूत येथे आश्रयार्थ येणाऱ्या सर्व संघांच्या भिक्षूंच्या निर्वाहार्थ करावयाचा अ अर्थ येथे विवक्षित आहे.

वाचन व भाषांतर ही दिली आहेत.[१] सेनार्टच्या छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—याची लिपी ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—हा लेख **क्षहरात** क्षत्रप राजा **नहपान** याचा जावई व **दीनीकाचा** पुत्र **शक ऋषभदत्त** याचा असून त्याच्या नित्य चालू असलेल्या धर्मदायांचा निर्देश यात आला आहे. प्रस्तुत लेखातील त्याचे वंश-निदर्शक '**शक**' हे उपपद उल्लेखनीय आहे. या लेखातील काही दानांचे उल्लेख ऋषभदत्ताच्या इतर लेखांत आढळतात, पण काही नवीन आहेत.

ऋषभदत्ताने **शोर्पारग, चेचिञ, दाहनूकनगर, केकापुर, भरुकच्छ, अनुगामि, उजेनी, साखा** या ठिकाणी वर्षभर लक्ष ब्राह्मणांच्या अन्नदानाची व्यवस्था केली होती. देवांना व ब्राह्मणांना सोळा गाव दान दिले होते, **चैत्र शुद्ध पौर्णिमेस क्षहरात** [नहपाना]करिता लक्ष गोदान केले होते, **बार्णासा** नदीवर सुवर्णदान करून घाट बांधला होता असे वर्णन या लेखात आले आहे.

परिशिष्ट लेखात ब्राह्मणांना पाच हजार [कार्षापण] दिल्याचा व एका नदीला घाट बांधल्याचा उल्लेख आला असावा. पण हा भाग आता अगदीच भग्न झाला आहे.

**स्थलनिश्चय**—**शोर्पारग** हे ठाणे जिल्ह्यातील सोपारा होय. **दाहनुक** हे त्याच जिल्ह्याच्या डहाणू तालुक्याचे मुख्य ठिकाण होय. **चेचिञ** हे मुंबईच्या उत्तरेस सुमारे आठ मैलांवरचे चिंचणी–तारापूर गाव असावे. **भरुकच्छ** हे भडोच होय. **उजेनी** सुप्रसिद्ध आहे. **अनुगामि, केकापुर** आणि **साखा** यांचा पत्ता लागत नाही.

**ओळ** **वाचन**[२]

**१ [सिधं। रञो क्षहरा*]तस क्षत्रपस नहपानस जामा–**
**२ [तु दीनीकपुत्रस*] शकस उषवदातस नेत्यकेसु**
**३ . . . [शोर्पार*]गे चेचिंञे[३] दाहनूकानगर[४] केकापुरे**
**४ . . . [भरुक*]छे अनुगामिम्हि उजेनिय साखाय–**
**५ . . . [अनुवासं भगवं*]तो ब्राह्मणा भुजते सतसाह–**
**६ [त्री*] . . . [भग*]वतां ब्राह्मणानं गवां सतस–**

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११३५ व ११३६ यांतील संदर्भ पाहा. ए. इं., व्हॉ. ८, पृ. ८५ व ८७ सोबतची प्लेट पाहा.

२ सेनार्टच्या लेखाबरोबरच्या छापावरून.

३ 'वेचिंये' (ब्यू.). ४ 'नगरे' (भ. व ब्यू.).

७ [हस्रानि तीणि दतानि*] भगवतां देवान ब्राह्मणानं च दता–
८ [सोळस गामा वसे*] . . चेत्रसुधे पनरस क्षहरा–
९ . . . . . . . . . . . . . गवां [श]तसहस्रदेन उष–
१० [वदातेन*] . . . . . . . नदीये बणासाय द–
११ . . . . . . . . . सुवणतिथ च जायते तस
१२ . . . . . . . . . . . . . . . . . . [च ति] [।*]
१३[१] . . . . . . . गवता ब्राह्मणा
१४ . . . . . . . . . . [सह*]स्राणि पंचाशं [५००००]
१५ . . . . . . . . . . . . . मासाय[२] तीर्थे
१६ . . . . . . . . . . . देय न जप [।*]

अनुवाद

सिद्धि असो! **राजा क्षहरात क्षत्रप नहपानाचा** जावई [आणि] **दीनीकाचा** पुत्र **शक ऋषभदत्त** याच्या नित्याच्या दानधर्मात **शोर्पारग, चेचिज, दाहनूकनगर, केकापुर . . भरुकच्छ, अनुगामि, उज्जैनी** [आणि] **साखा** या ठिकाणी एक लक्ष पूज्य ब्राह्मण वर्षभर भोजन करतात. पूज्य ब्राह्मणांना [तीन हजार] गाई दान दिल्या. पूज्य देवांना व ब्राह्मणांना [सोळा गाव दान दिले.] . . . वर्षी **चैत्रशुद्ध पौर्णिमेस क्षहरातांच्या** [पुण्यप्राप्त्यर्थ] एक लक्ष गाई [दान देणाऱ्या] **ऋषभदत्ताने बार्णासा** नदीच्या काठी सुवर्णाचे दान केले व घाट बांधला. पूज्य ब्राह्मणांना पन्नास हजार–५००००–[गाई दान दिल्या.] . . . **बार्णासा** [नदीच्या] तीर्थाच्या ठिकाणी . . . . .[३]

## क्रमांक ४१

# नाशिकच्या लेण्यातील दक्षमित्रेचा लेख (क्रमांक १)

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. १० च्या लेण्यातील उजवीकडच्या लहान खोलीच्या दरवाज्याच्या वरील बाजूस कोरला आहे.

---

१ ही ओळ व यापुढील ओळी मागील लेखाच्या खालीच कोरल्या आहेत. त्या मागील लेखाशी संबद्ध असाव्या. काही विद्वानांनी त्या निराळ्या लेखाच्या मानल्या आहेत, पण प्रस्तुत लेखाच्या आरंभावरून तसे दिसत नाही.

२ 'बाणासीयतीर्थे' विवक्षित असावे.

३ हे शेवटचे वाक्य अगदीच त्रुटित असल्यामुळे त्यात कोणत्या दानाचा उल्लेख होता हे सांगता येत नाही.

बर्ड आणि ओर्लेबार यांनी सन १८४७ मध्ये या लेखाकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन व ब्रेट, वेस्ट-द्वय, रा. गो. भांडारकर आणि फ्रांके यांनी त्याची चर्चा केली.[१] ब्यूह्लर, भगवानलाल इंद्रजी आणि सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे. सेनार्टच्या लेखातील छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या लेखाचा उद्देश **क्षहरात क्षत्रप राजा नहपान** याचा जावई आणि **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याची पत्नी **दक्षमित्रा** हिने जिथे हा लेख कोरला आहे ती खोली आपला धर्मदाय [म्हणून भिक्षुसंघाला अर्पण केली] हे नमूद करण्याचा होता.

प्रस्तुत लेखात कालनिर्देश नाही. पण त्यात उल्लेखिलेली खोली मुख्य लेण्याप्रमाणेच [शक संवत्] ४२ मध्येच पूर्ण खोदल्यावर दक्षमित्रेने आपला पति ऋषभदत्त याला सांगून ती भिक्षुसंघाला अर्पण केली असावी.

**ओळ** **वाचन**[२]

**१ सिधं [।*] राञो क्षहरातस क्षत्रपस नहपान-**
**२ स दीहितु दीनीकपुत्रस उषवदातस**
**३ कडुंबिनिय**[३] **दखमित्राय देयधंमं ओवरको [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो ! **राजा क्षहरात क्षत्रप नहपान** याची कन्या [आणि] **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याची गृहिणी **दक्षमित्रा** हिचा ही ओवरी (लहान खोली) धर्मदाय आहे.

## क्रमांक ४२

# नाशिकच्या लेण्यातील दक्षमित्रेचा लेख (क्रमांक २)

हा लेख **नाशिकजवळच्या** क्रमांक १० च्या लेण्यातील डावी-कडच्या लहान खोलीच्या दरवाज्याच्या वरील बाजूस दोन ओळींत कोरला आहे.

---

१ ल्यूडर्सच्या यादीतील, क्रमांक ११३४ मधील संदर्भ पाहा.

२ ए. इं., व्हॉ. ८ मधील सेनार्टच्या लेखातील छापावरून.

३ 'कुटुंबिनिय' (भ.).

या लेखाचा पहिला उल्लेख सन १८४७ मध्ये वर्ड आणि रीव्हज् यांनी केला. त्यानंतर स्टीव्हन्सन व ब्रेट, वेस्ट-द्वय, रा. गो. भांडारकर आणि फ्रांके यांनी त्याची चर्चा केली.[१] भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर व सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर प्रसिद्ध केले आहे. सेनार्टच्या लेखातील छापावरून येथे त्याचे संपादन केले आहे.

**लिपी व भाषा**— या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**— प्रस्तुत लेखाचा उद्देश नाशिकच्या क्र. १० च्या लेण्यातील डावीकडील ही खोली [ओवरक] **क्षहरात क्षत्रप** राजा **नहपान** याचा जावई [आणि] **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याची पत्नी **दक्षमित्रा** हिचा धर्मदाय आहे हे नमूद करण्याचा होता.

क्रमांक १० च्या लेण्याप्रमाणे त्यातील ही खोली शक संवत् ४२ [सन १२०–२१] मध्ये खोदून पुरी झाल्यावर दक्षमित्रेनें आपला पति ऋषभदत्त याला सांगून ती भिक्षुसंघास अर्पण केली असावी.

**ओळ** **वाचन**[२]

१ **सीधं**[३] [।*] **रांञो**[४] **क्षहरातस क्षत्रपस नहपानस दीहि**–

२ **तु दीनीकपुत्रस उषवदातस कुडुंबिनिय दखमित्राय**[५] **देयधंमं ओवरको** [।*]

**अनुवाद**

सिद्धि असो ! **क्षहरात क्षत्रप राजा नहपान** याची कन्या [आणि] **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याची गृहिणी **दक्षमित्रा** हिचा [ही] ओवरी [लहान खोली] हा धर्मदाय [आहे].

### क्रमांक ४३

## नाशिकच्या लेण्यातील ऋषभदत्ताचा लेख

हा लेख **नाशिक**जवळच्या क्र. १० च्या लेण्यातील व्हरांड्याच्या मागील भिंतीवर छताच्या खाली पाच ओळींत कोरला असून त्याने सबंध भिंत व्यापिली आहे. नाशिक येथील सर्व लेखांत हा मोठा असून

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११३२ मधील संदर्भ पाहा.

२ ए. इं., व्हॉ. ८, प्लेट ७ वरून. ३ ‘सिधं’ (भ. व ब्यू.).

४ ‘राञो’ (भ.) ; रञो (ब्यू.). इतरत्र याचे ‘रञो’ हे रूप लेखांत व नाण्यांवर आढळते.

५ ‘दखमिताय’ (ब्यू.).

त्याची अक्षरे ठळक रीतीने कोरली आहेत. हा सर्व लेख एकदम कोरला नव्हता, असे अक्षरांच्या आकारावरून व भाषेवरून स्पष्ट दिसते. पहिल्या दोन ओळी व तिसऱ्या ओळीचा पहिला तीन-चतुर्थांश भाग मोठ्या अक्षरांत असून तो हे लेणे खोदून झाल्यावर लागलीच कोरला असावा. त्याचा काळ यात उल्लेखिला नाही, पण क्र. ३८ च्या लेखावरून तो शक संवत् ४२ (सन १२०-२१) असावा.[१] नंतर पहिल्या परिशिष्टाचा लेख थोड्या लहान अक्षरांत कोरला आहे. त्यात ऋषभदत्ताच्या एका विजयाचा उल्लेख आहे. नंतर त्यापेक्षाही लहान अक्षरांत कोरलेल्या दुसऱ्या परिशिष्टात त्याने त्या लेण्यात राहणाऱ्या भिक्षूंच्या भोजनाकरिता दिलेल्या एका शेताच्या दानाचा उल्लेख आहे. ही परिशिष्टे पहिल्या लेखानंतर दोन-तीन वर्षांत कोरविली असावी.

या लेखाकडे सन १८४७ च्या 'हिस्टॉरिकल रीसर्चेस्' मध्ये बर्ड, स्टीव्हन्सन, रीव्हज् व ओर्लेबार यांनी प्रथम लक्ष वेधले. नंतर स्टीव्हन्सन-ब्रेट, वेस्ट-द्वय, रा. गो. भांडारकर, फ्रांके, होर्नेल व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[२] भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर आणि सेनार्ट यांनी त्याचे वाचन व भाषांतर दिले आहे. सेनार्टच्या लेखातील छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आहे. लेखाच्या पहिल्या भागाची भाषा काही अंशी अशुद्ध असलेली संस्कृत असून वाक्यरचना तृतीय पुरुषी आहे. नंतरचे पहिले परिशिष्ट प्राकृतात असून त्यातील वाक्यरचना प्रथम पुरुषी आहे. दुसरे परिशिष्टही प्राकृतात आहे, पण त्यातील वाक्यरचना पुनः तृतीय पुरुषी आहे.

**विवेचन**—पहिल्या लेखाचा उद्देश **राजा क्षहरात क्षत्रप नहपान** याचा जावई आणि **दीनीकाचा** पुत्र **ऋषभदत्त** याने **गोवर्धन** [नगरा]च्या **त्रिरश्मि** पर्वतात प्रस्तुत लेणे व त्याची [पाण्याची] टांकी खोदविली हे नमूद करण्याचा आहे. ऋषभदत्ताच्या वर्णनात त्याने केलेल्या पुढील धर्मकृत्यांचा उल्लेख आहे—त्याने तीन लाख गाई दान दिल्या; **बार्णासा** नदीच्या काठी सुवर्णदान केले व घाट बांधला; देव व ब्राह्मण यांना सोळा गाव दान दिले; प्रतिवर्षी एक लक्ष ब्राह्मणांना भोजन घातले; **प्रभास** या पुण्य तीर्थी आठ ब्राह्मणांची लग्ने लावून दिली; **भरुकच्छ,**

---

१ त्या लेखाच्या आरंभी वर्ष ४२ मध्ये ऋषभदत्ताने ते लेणे चारी दिशांच्या भिक्षुसंघास दिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. क्षत्रपांची वर्षे शक संवताची आहेत हे इतरत्र दाखविले आहे.

२ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११३१ मधील संदर्भ पाहा.

**दशपुर, गोवर्धन** व **शूर्पारक** येथे चौसोपी घरे निवासाकरिता दान दिली ; उद्याने, तलाव व विहिरी निर्माण केल्या ; **इबा, पारदा, दमण, तापी, करबेणा** आणि **दाहनुका** या नद्या पार करण्याकरिता धर्मार्थ तरींची सोय केली ; या नद्यांच्या दोन्ही काठांवर धर्मशाळा बांधल्या व पाणपोई घातल्या, आणि **पिंडितकावड, गोवर्धन, सुवर्णमुख, शोर्पारग** आणि **रामतीर्थ** येथे वैदिकधर्मी संन्याश्यांच्या परिषदांना **नानंगोल** गावातील बत्तीस हजार नारळीची झाडे दान दिली. ही सर्व दाने वैदिक धर्माच्या अनुयायांना व सामान्य जनांच्या उपयोगाकरिता दिली होती.

प्रस्तुत लेण्याचे दान करणाऱ्या ऋषभदत्ताचा उल्लेख या लेखात 'धर्मात्मा' असा केला आहे. त्यावरून सेनार्टने अनुमान केले आहे की, ह्या लेख कोरण्याच्या वेळी त्याने बौद्ध धर्म स्वीकारला होता.[१] पण हे अनुमान चुकीचे आहे. कारण त्याने हे लेणे कोरविल्यावरही पुष्कर-क्षेत्री जाऊन स्नान केले व गोदान केले. क्र. ३८ च्या लेखात म्हटल्याप्रमाणे त्याने त्यानंतरही बौद्ध भिक्षूंप्रमाणे ब्राह्मणांनाही दाने देणे चालू ठेवले. त्यावरून सातवाहनांप्रमाणे त्याचाही बौद्ध धर्माप्रमाणे वैदिक धर्मालाही आश्रय चालू राहिला असे स्पष्ट दिसते.

पहिल्या परिशिष्ट लेखात **ऋषभदत्त** सांगतो की **भट्टारकांच्या** (माझे स्वामी नहपान यांच्या) आज्ञेवरून मी वर्षाऋतूमध्ये **मालयांनी**[२] वेढा घातलेल्या **उत्तमभद्रांना**[३] सोडविण्याकरिता चालून गेलो. माझ्या

---

१ ए. इं., व्हॉ. ८, पृ. ८०. दान देणाऱ्या व्यक्तीला धर्मात्मा असे विशेषण लावणे साहजिक आहे. एका बौद्धधर्मी यवनालाही ते लावलेले आहे. नाशिक येथील लेण्यांतील कोरीव लेख, क्रमांक १८, नाशिक जिल्हा गॅझेटीयर (जुनी आवृत्ती), पृ. ५८७ पाहा.

२ ब्यूह्लरने 'मालय' हे मलय पर्वतातील राहणारे असावे असे म्हटले आहे. (आ. स. वे. इं., व्हॉ. ४, पृ. १००, टीप ४ पाहा.) पण ते चूक आहे. मालयांवर विजय मिळवून ऋषभदत्त पुष्करक्षेत्री स्नानास गेला, यावरून हे मालय उत्तर भारतातील मालव होत यात संशय नाही. हा मालव गण प्राचीन काळी सुप्रसिद्ध होता. पाणिनीच्या अष्टाध्यायी (५, ३, ११४)वरील काशिका टीकेत त्याचा आयुधजीविसंघ म्हणून उल्लेख आला आहे. अलेक्झांडरच्या स्वारीचे वर्णन करणाऱ्या ग्रीक लेखकांनीही त्याचा उल्लेख केला आहे. त्या काळी हे मालव पंजाबमध्ये होते. पुढे ग्रीक, शक वगैरेंच्या आक्रमणांमुळे ते दक्षिणेस सरकून जयपुर-उदेपुर भागात त्यांनी आपले वर्चस्व स्थापले. तेथे त्यांची नाणी सापडली आहेत. नंतर ते मध्य भारतात स्थायिक झाल्यावर त्यांच्या प्रदेशास 'मालव' असे नाव पडले. त्यापूर्वी त्या प्रदेशाचे नाव आकरावन्ती होते. क्रमांक १८, ओ. २ आणि क्रमांक ५१, ओ. ११ पाहा.

३ 'उत्तमभद्र' हे नाव अनेकवचनात योजिले आहे. ते गणाचे वाचक आहे. त्या गणाचा प्रदेश मध्य भारतात उदेपूरच्या दक्षिणेस असावा. हल्लीचा माळवा त्या वेळी नहपानाच्या अमलाखाली होता. प्रस्तुत लेखाच्या दुसऱ्या ओळीतील दशपुराचा (सध्याच्या मन्दसोरचा) उल्लेख पाहा.

स्वारीच्या निर्घोषाने ते **मालय** पळू लागले; तेव्हा त्यांना पकडून मी त्यांना **उत्तमभद्र** क्षत्रियांच्या ताब्यात दिले. नंतर मी **पुष्कर** क्षेत्री जाऊन स्नान केले, आणि तीन सहस्र गाईंचे आणि एका गावाचे दान दिले.

या परिशिष्टात उल्लेखिलेले **मालय** हे मालव गणाचे लोक होत. त्यांची नाणी जयपुर-उदेपुर या प्रदेशात सापडली आहेत. उत्तमभद्रांचे राज्य त्यांच्या राज्याच्या दक्षिणेस आणि गुजरातच्या उत्तरेस असावे. या लेखात त्यांना क्षत्रिय म्हटले आहे हे उल्लेखनीय आहे.

दुसऱ्या परिशिष्टात ऋषभदत्ताने **वाराहीपुत्र अश्विभूतीकडून** त्याच्या पित्याच्या मालकीचे **गोवर्धन** नगराच्या ईशान्य दिशेस असलेले एक शेत चार हजार कार्षापण नाणी देऊन विकत घेतले आणि ते आपल्या लेण्यात राहणाऱ्या चारी दिशांच्या भिक्षूंच्या मुख्य आहाराकरिता दान दिले असे सांगितले आहे.

**स्थलनिश्चय** -- प्रस्तुत लेखात अनेक नद्यांचे व स्थलांचे उल्लेख आले आहेत. भगवानलाल इंद्रजींनी त्यांतील बहुतेकांचे समीकरण सुचविले आहे. **बार्णासा** (क्र. ३९ मधील बनासा) ही नदी गुजराथेत पालनपूर मधून वाहत जाऊन कच्छच्या आखातास मिळणारी बनास असावी. **इबा** ही गुजराथेत बांसड टेकडीतून निघून बलसाडच्या उत्तरेस १० मैलांवर अरबी समुद्रास मिळणारी अंबिका असावी. **पारदा** दमणच्या उत्तरेस बारा मैलांवर वाहणारी पारडीजवळची पार नदी दिसते. **दमण** ही सध्याची दमणगंगा होय. **तापी** ही अद्यापि आपल्या प्राचीन नावाने प्रसिद्ध आहे. **करबेणा** ही 'कुमारपालप्रबंधा'त उल्लेखिलेली कलावेणी – **अंबिका** नदीला मिळणारी सध्याची कावेरी – असावी असे पं. भगवानलालनी सुचविले आहे. **दाहानुका** ही मुंबईच्या उत्तरेस ७८ मैलांवर असलेली डहाणू गावाजवळची खाडी दिसते.

**प्रभास** हे काठेवाडातील पुण्यक्षेत्र प्रसिद्ध आहे. **भरुकच्छ** हे सध्याचे भडोच आणि **दशपुर** हे माळव्यातील मन्दसोर होय. **शोर्पारग** हे प्राचीन काळचे कोकणच्या राजधानीचे शहर शूर्पारक – सध्याचे सोपारा – होय. **पिंडितकावड** आणि **सुवर्णमुख** यांचा पत्ता लागत नाही. **पोक्षर** हे अजमेरजवळचे पुष्कर क्षेत्र होय. **रामतीर्थ** हे सोपाऱ्याजवळचे कुंड असावे असे भगवानलालनी म्हटले आहे, पण सोपाऱ्याचा उल्लेख यापूर्वीच आला आहे. प्राचीन काळी पुण्याच्या वायव्येस रामतीर्थिका नामक प्रदेश होता. त्याचा उल्लेख एका प्राचीन ताम्रपटात आला आहे.[१]

---

१ *Ep. Ind.*, XXV, p. 168.

त्याचे मुख्य ठिकाण प्रस्तुत लेखात उल्लेखिलेले रामतीर्थ असण्याचा संभव आहे. रामतीर्थ या नावाचे गाव मात्र सध्या पुणे जिल्ह्यात आढळत नाही. **नानंगोलचा** पत्ता लागत नाही.

**ओळ** **वाचन**[१]

**१ सिद्धम् [।*][२] राज्ञः क्षहरातस्य क्षत्रपस्य नहपानस्य जामा[त्रा][३] दीनीकपुत्रेण उषवदातेन त्रिगोशतसहस्रदेन नद्या बार्णासायां सुवर्णदान-तीर्थकरेण देवताभ्यः ब्राह्मणेभ्यश्च षोडशग्रामदेन अनुवर्षं ब्राह्मणशत-साहस्रीभोजापयित्रा**

**२ प्रभासे पुण्यतीर्थे ब्राह्मणेभ्यः अष्टभार्याप्रदेन भरुकच्छे दशपुरे गोवर्धने शोर्पारगे च चतुःशालावसधप्रतिश्रयप्रदेन आरामतडाग – उदपानकरेण इबापारदादमणतापीकरबेणादाहनुका नावा पुण्यतरकरेण एतासां च नदीनां उभतोतीरं सभा –**

**३ प्रपाकरेण पींडितकावडे गोवर्धने सुवर्णमुखे शोर्पारगे च रामतीर्थे चरकपर्षद्भ्यः ग्रामे नानंगोले द्वात्रीशतनाळीगेरमूलसहस्रप्रदेन गोवर्धने त्रिरश्मिषु पर्वतेषु धर्मात्मना इदं लेणं कारितं इमा च पोढियो [।*] [४]भटारका – अंञातिया[५] च गतोस्मि वर्षारतुं मालयेहि[६] रुधं उतमभाद्रं[७] मोचयितुं**

**४ ते च मालया प्रनादेनेव अपयाता उतमभद्रकानं[८] च क्षत्रियानं सर्वे परिग्रहा कृता [।*] ततोस्मि गतो[९] पोक्षरानि [।*] तत्र च मया अभिसेको कृतो त्रीणि[१०] च गोसहस्रानि दतानि गामो च [।*][११] दत चानेन[१२] क्षेत्रं ब्राह्मणस वाराहिपुत्रस अश्विभूतिस हथे कीणिता मुलेन[१३] काहापणसहस्रेहि चतुहि ४००० य सपितुसतक नगरसीमाय उतरापराय दीसाय [।*] एतो मम लेणे वस –**

**५ तानं चातुदीसस भिकुसघस मुखाहारो भविसती [।*].**

---

१ सेनार्टच्या लेखातील छापावरून.  २ येथे स्वस्तिक चिन्ह कोरले आहे.

३ यातील 'आ'कारला उजवीकडे निरर्थक उकार चिन्ह जोडले आहे.

४ पुढील लेख बारीक अक्षरांत आहे.

५ 'अं' हे अक्षर 'का' आणि 'ञा' या अक्षरांमध्ये मागाहून कोरलेले दिसते.

६ 'ये' आणि 'हि' यांच्यामध्ये तीन चार अक्षरे खोडून टाकलेली दिसतात.

७ 'उत्तमभद्रं' (ब्यू.).  ८ 'उतमभद्रकानां' (ब्यू.).

९ 'ततोस्मि गतो' (ब्यू.).  १० 'तीणि' (ब्यू.).

११ येथे ८–१० अक्षरांची जागा सोडून पुढील लेख अधिकच लहान अक्षरांत लिहिला आहे.

१२ 'दत च नेन' (भ.).  १३ 'मूलेन' (भ. व ब्यू.).

## अनुवाद

सिद्धि असो ! **राजा क्षहरात क्षत्रप नहपान** याचा जावई, **दीनीकाचा** पुत्र, **उषवदात** (ऋषभदत्त)– ज्याने तीन लाख गाईंची दाने दिली ; ज्याने **बार्णासा** नदीवर सुवर्ण (नाणी) दिली व घाट बांधला; ज्याने देवांना आणि ब्राह्मणांना सोळा गाव दान दिले ; जो प्रतिवर्षी लक्ष ब्राह्मण-भोजन घालतो ; ज्याने **प्रभास** या पवित्र तीर्थी ब्राह्मणांचे आठ भार्यांशी विवाह लावून दिले ; ज्याने **भरुकच्छ, दशपुर, गोवर्धन** [व] **शूर्पारक** या नगरांत चौसोपी घरांची निवासस्थाने [बांधून] दिली ; ज्याने [अनेक] उद्याने, तलाव व विहिरी [लोकोपयोगार्थ] निर्माण केल्या; **इबा, पारदा, दमण, तापी, करबेणा,** आणि **दाहनुका** या नद्यांवर धर्मार्थ नौकांच्या तऱ्या स्थापन केल्या ; या नद्यांच्या दोन्ही तीरांवर धर्मशाळा बांधल्या व पाणपोया घातल्या ; ज्याने **पिंडितकावड, गोवर्धन, सुवर्णमुख, शोर्पारग** आणि **रामतीर्थ** या ठिकाणांच्या संन्याश्यांच्या परिषदांना **नानंगोल** गावातील बत्तीस हजार नारळांची झाडे अर्पण केली – त्या धर्मात्म्याने **त्रिरश्मि** पर्वतात हे लेणे खोदविले. तसेच ही टाकी बनविली.

(ओ. ३) **भट्टारकांच्या** आज्ञेवरून **वर्षाऋतूमध्ये मालयांनी** वेढा घातलेल्या **उत्तमभद्रांना** सोडविण्याकरिता मी गेलो होतो. ते माझ्या स्वारीच्या निर्घोषाने पळू लागले. त्यांना मी **उत्तमभद्र** क्षत्रियांच्या स्वाधीन केले. नंतर मी **पुष्कर**[क्षेत्रा]ला गेलो. त्या ठिकाणी मी स्नान केले आणि तीन गोसहस्र दाने दिली आणि एक गाव दान दिला.

(ओ. ४) त्याने **वाराहीपुत्र अश्विभूतीकडून** [या] नगराच्या सीमेवर ईशान्य दिशेस असलेले त्याच्या पित्याचे शेत चार हजार – ४००० – कार्षापण किंमत देऊन विकत घेतल. त्याच्या उत्पन्नातून माझ्या लेण्यामध्ये राहणाऱ्या चारी दिशांच्या भिक्षुसंघांच्या मुख्य अन्नाची व्यवस्था केली जाईल.

### क्रमांक ४४

## जुन्नरच्या लेण्यातील नहपानाच्या काळचा लेख : वर्ष ४६

हा लेख **जुन्नरजवळच्या** मानमोडी टेकडीच्या पूर्वेकडील चौथ्या लेण्यात कोरला आहे. याकडे सन १८५४ मध्ये स्टीव्हन्सन व ब्रेट

यांनी प्रथम लक्ष वेधले. नंतर बर्जेस, भगवानलाल इंद्रजी, ब्यूह्लर, फ्रांके आणि रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[१] भगवानलाल व ब्यूह्लर यांनी त्याचे छापही दिले आहेत. त्यांवरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे. लेख फक्त तीन ओळींचा आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचा उद्देश **राजा महाक्षत्रप स्वामी नहपान** याच्या वत्सगोत्री **अयम** (अर्यमा) नामक अमात्याने त्या लेखाजवळचे टाके (पोढि) व मंडप (विहार) आपल्या पुण्योपार्जनाकरिता धर्मदाय म्हणून खोदविले हे नमूद करण्याचा होता. शेवटी ४६ **वर्ष** असा कालाचा निर्देश आला आहे. हे वर्ष पश्चिमेच्या क्षत्रपांच्या इतर लेखांतल्याप्रमाणे शक संवताचे मानले पाहिजे. त्याचे ख्रिस्ती शकाचे वर्ष सन १२४-२५ येईल.

नहपानाचा स्वतःचा कोरीव लेख अद्यापि सापडला नाही. त्याच्या ऋषभदत्त नामक जावयाचे लेख नाशिक व पुणे जिल्ह्यांत सापडले आहेत. त्याची राजधानी बहुधा जुन्नर येथे असावी. म्हणून त्याच्या अमात्याचा लेख जुन्नर येथे मिळाला असावा. या प्रश्नाची चर्चा इतरत्र केली आहे.

| **ओळ** | **वाचन** |
|---|---|
| १ | **[रञो] महाखतपस सामिनहपानस** |
| २ | **[आ]मतस वछसगोतस अयमस** |
| ३ | **[दे]यधम च [पो]ढि मटपो च पुजथय वसे ४०[+*]६ कतो [।*]** |

### अनुवाद

**राजा महाक्षत्रप स्वामी नहपानाच्या** वत्सगोत्री **अर्यम** अमात्याने [हे] टाके व [हा] मंडप (विहार) पुण्योपार्जनार्थ धर्मदाय म्हणून **वर्ष ४६** मध्ये केला.

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ११७४ मधील संदर्भ पाहा.

## (आ) कार्दमक क्षत्रपांचे लेख

### क्रमांक ४५

# अन्धौ येथील चष्टनाच्या काळचा यष्टिलेख : वर्ष ११

[पट्टिका २९]

हा लेख कच्छमध्ये खावडा गावाच्या आग्नेयेस २४ किलोमीटर अंतरावर **अन्धौ** गावी सन १९६८ मध्ये सापडला होता. तो डॉ. शोभना गोखले यांनी जर्नल ऑफ एन्शंट इंडियन हिस्टरी, व्हॉ. २, पृ. १०४–११ वर छापासह संपादिला आहे. त्याच छापावरून त्याचे वाचन व विवेचन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**—प्रस्तुत लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**—ज्या शिलाखंडावर प्रस्तुत लेख कोरला आहे, त्याच्या डाव्या बाजूचा लहानसा भाग फुटून गेल्यामुळे सुमारे तीन अक्षरे नष्ट झाली आहेत, असे दुसऱ्या ओळीच्या आरंभावरून दिसते.

या लेखाचा आरंभ 'सिधं' या मंगलवाचक शब्दाने झाला असावा. नंतर **त्सामोतिकाचा** पुत्र [ चष्टन ] याच्या कारकीर्दीत **११ व्या वर्षी पालितकाचा** . . . पुत्र **माधुकान** याच्या पुत्रांनी ही **यष्टि**[१] (स्मारकशिला) उभारली असे म्हटले आहे.

प्रस्तुत लेखातील ११ व्या वर्षाचा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. हा लेख सापडण्यापूर्वी अन्धौ येथील यष्टिलेखांवरून चष्टन आणि रुद्रदामन् यांच्या संयुक्त राजवटीतील ५२ वे वर्ष हेच पहिले वर्ष म्हणून ज्ञात होते. ही वर्षे शक संवताची गणली जातात. कारण चष्टनाच्या सर्व वंशजांनी आपल्या लेखांत व नाण्यांवर शक संवताचाच उपयोग केला आहे. किंबहुना, तो संवत् कुषाण सम्राट् कनिष्क याने चालू केला असला तरी चष्टनाच्या शकवंशीयांनी त्याचा दीर्घकाळ उपयोग केला असल्यामुळेच त्याला कालान्तराने 'शक संवत्' असे नाव पडले असे दिसते. त्या संवताच्या इतर अनेक लेखांतल्याप्रमाणे प्रस्तुत लेखात कालाचा उल्लेख करताना 'वर्ष' या शब्दाचाच उपयोग केला आहे.

---

१ यष्टि किंवा स्मारकशिला उभारण्याची पद्धत फार प्राचीन आहे. 'मनुस्मृत्ति' (९·२८५) मध्ये तिचा उल्लेख असून तिची नासधूस करणाऱ्यास शासन सांगितले आहे. कच्छ मध्ये अश्या अनेक यष्टचा उभारल्या होत्या. क्रमांक ४६ इ. पाहा.

चष्टनाला कुषाण सम्राट् कनिष्काने आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या दशकातच[१] कच्छ [व कदाचित् सौराष्ट्राचा काही भाग] यांवर क्षत्रप किंवा प्रांताधिपति नेमले होते. त्यावेळी तो अगदी तरुण असावा. कारण प्रस्तुत लेखाच्या कालानंतर निदान ४१ वर्षे त्याने ते पद उपभोगिले असे क्र. ४६–४९ च्या लेखांवरून दिसते. आरंभी तरी गुजराथ, मध्यभारत, सौराष्ट्राचा निदान काही भाग व उत्तर महाराष्ट्र या प्रदेशांवर भूमक या क्षहरातवंशी क्षत्रपाची नेमणूक झाली असावी. नंतर हे प्रदेश नहपानाच्या अमलाखाली आले असे क्र. ३८ आणि ४३ या लेखांवरून स्पष्ट आहे.

**ओळ** **वाचन**[२]

**१ [सिधं क्ष*][त्र]पस य्सामोतिकपुत्रस**
**२ . . . स[३] वर्षाये १०[+*]१ पालितकस[४]**
**३ . . . पुत्रस माधुकानस जात-**
**४ . . .[५]लषि पुत्रहि उथापिता [।*]**

**अनुवाद**

[सिद्धि असो !] **य्सामोतिकाचा** पुत्र **क्षत्रप** [चष्टन] याच्या **११ व्या वर्षी पालितक** . . . चा पुत्र **माधुकान** याच्या . . . पुत्रांनी [ही] स्मारकशिला उभारली.

## क्रमांक ४६–४९

# अन्धौ येथील चष्टन आणि रुद्रदामन् यांच्या काळचे यष्टिलेख : वर्ष ५२

या चार लेखांच्या **यष्टि** (स्मारकशिला) कच्छमध्ये **अन्धौ** या गावी एका टेकाडावर उभ्या होत्या. भूज संस्थानचे दिवाण रणछोडभाई उदेराम यांनी त्या तेथून भूज येथे हलविल्या. तेथे देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांनी त्या १९०६ मध्ये पाहिल्यावर त्यांकडे लोकांचे लक्ष वेधले. नंतर राखालदास बॅनर्जींनी हे यष्टिलेख एपिग्राफिया इंडिका,

---

१ दौलतपुर येथील लेख चष्टनाच्या राज्यकालाच्या सहाव्या वर्षाचा आहे. (क्र. ६३ पाहा.)
२ ज. ए. इं. हि., व्हॉ. २ मधील छापावरून.
३ या ओळीतील पहिली तीन नष्ट अक्षरे 'चष्टन' होती असे दिसते.
४ 'पालितक' ही राज्यशासनातील 'रक्षक' या अर्थाची संज्ञा असावी.
५ येथे तीन अक्षरे नष्ट झाली आहेत. त्यांत कदाचित् पुत्रांची संख्या उल्लेखिली असेल.

व्हॉ. १६, पृ. १९–२५वर छापांसह प्रसिद्ध केले. त्याच छापांवरून ते येथे संपादिले आहेत.

**लिपी व भाषा** — या लेखांची लिपी प्राचीन ब्राह्मी असून तिचे कुषाणकालीन लिपीशी साम्य आहे. भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — या चारी लेखांच्या आरंभी **य्सामोतिकाचा** पुत्र राजन् **चाष्टन** आणि **जयदामन्चा** पुत्र राजन् **रुद्रदामन्** यांच्या कारकीर्दीतील **५२ व्या वर्षाच्या फाल्गुन कृष्ण द्वितीयेचा** कालनिर्देश आहे. हे ५२ वे वर्ष शक संवताचे समजले पाहिजे. त्याचे ख्रिस्ती शकाचे वर्ष १३० – ३१ येईल. बॅनर्जींनी हा लेख चष्टनाचा नातू रुद्रदामन् याच्या काळचा मानला होता. त्यांच्या मते 'चाष्टनस' याच्यापुढे 'पौत्रस' यासारखा शब्द गळला असावा, किंवा दूर उज्जैनी येथे राज्य करणाऱ्या चष्टन आणि रुद्रदामन् या क्षत्रपांचा परस्पर संबंध कच्छमध्ये ही स्मारके उभारणाऱ्यास माहीत नसावा. पण हे मत ग्राह्य वाटत नाही. कारण त्या काळी कदाचित् उज्जैनी चष्टनाच्या वंशजांच्या ताब्यात नसेल. सन १२४ पर्यंत तरी ती नहपानाच्या राज्यात मोडत होती हे क्र. ४३ मध्ये उषवदाताने दशपुर येथे केलेल्या धर्मदायावरून स्पष्ट आहे. पुढे ती गौतमीपुत्र सातकर्णीने त्याच्याकडून जिंकून घेतली होती हे क्र. १८ मधील त्याच्या अमलाखालील 'आकरावन्ती'च्या उल्लेखावरून स्पष्ट आहे.

पश्चिमेच्या क्षत्रपांमध्ये अशी वहिवाट होती की मुख्य राजा – ज्याचा उल्लेख महाक्षत्रप असा त्याच्या लेखांत व नाण्यांवर आढळतो तो – आपल्या भावाला किंवा मुलाला 'क्षत्रप' पदवी देऊन राज्यकारभारात आपला सहाय्यक म्हणून घेत असे. त्याला आपली 'क्षत्रप' पदवी उल्लेखून स्वतःच्या नावे नाणीही पाडता येत असत. प्रस्तुत चारी लेखांत चष्टन व रुद्रदामन् या दोघांनाही 'राजन्' ही पदवी लावली आहे. त्यावरून त्या काळी दोघांच्या नावे राज्यकारभार चालत होता असे दिसते. त्यावेळी चष्टन हा म्हातारा झाल्यामुळे त्याने आपला नातू – जयदामपुत्र – रुद्रदामन् याला 'राजन्' पदवी देऊन कारभारात मदत करण्यास घेतले असावे.

या चारी लेखांचा उद्देश काही व्यक्तींनी आपल्या मृत नातलगांच्या स्मरणार्थ **यष्टि** (स्मारकशिला) उभारल्या होत्या हे नमूद करण्याचा होता. यासारख्या यष्टींचा उल्लेख मनुस्मृतीत (९, २८५) आला आहे हे मागे दाखविले आहे.

या चार यष्टींपैकी पहिल्या तीन यष्टि औपशति – गोत्री **सीहिल-दत्ताचा** पुत्र **मदन** याने अनुक्रमे आपली बहीण **सीहिलाची** कन्या

**ज्येष्ठवीरा**, आपला भाऊ **सीहिलाचा** पुत्र **ऋषभदेव**, आणि आपली पत्नी श्रेणिक-गोत्री **सीहमिताची** कन्या श्रामणेरी **यशोदत्ता** यांच्या स्मरणार्थ उभारल्या होत्या. चौथी यष्टि औपशति-गोत्री श्रामणेर **त्रेष्ठदत्त** याने आपला पुत्र **ऋषभदेव** याच्या स्मरणार्थ उभारली होती.

## क्रमांक ४६

**ओळ** **वाचन**

**१ [राज्ञो चाष्ट]नस य्सामोतिकपुत्रस राज्ञो रुद्रदामस जयदामपुत्रस**
**२ व[र्षे] [द्वि]प[ञ्चाशे] ५०[+*]२ फगुण बहुलस द्वितिय वा**[1] **२ मदनेन सीहिलपुत्रेन भगिनिये जेष्ठवीराये**
**३ सीहिलधित ओपशतिसगोत्राये लष्टि उथापित [।*]**

### अनुवाद

**य्सामोतिकाचा** पुत्र [राजा चाष्टन] [आणि] **जयदामन्चा** पुत्र **राजा रुद्रदामन्** यांच्या कारकीर्दीच्या **बावन्नाव्या – ५२ – वर्षी फाल्गुन कृष्ण द्वितीय वासर २** [या दिवशी] **सीहिलाचा** पुत्र **मदन** याने **सीहिलाची** कन्या आणि आपली बहीण औपशति – गोत्री **ज्येष्ठवीरा** हिच्या [नावाने] [ही] स्मारकशिला उभारली.

## क्रमांक ४७

**ओळ** **वाचन**

**१ राज्ञो चाष्टनस य्सामोतिक–**
**२ पु[त्र]स राज्ञो [रु]द्रदामस**
**३ जयदामपुत्रस वर्षे द्वि[पं] –**
**४ [चा]शे ५०[+*]२ बहुलस**
**५ द्वितियं वा २ ऋषभदेवस**
**६ सीहिलपुत्रस ओपशतिसगोत्रस**
**७ भ्रा[ता] [मदनेन] [सीहिल]पुत्रेन**
**८ लष्टि उथापित [।*]**

---

१ बॅनर्जींनी येथे ‘व २’ असे वाचून त्याचा अर्थ ‘बहुल द्वित्तीया’ असा केला आहे. ‘वा’ अक्षर स्पष्ट आहे. ते ‘वासर’ चे संक्षिप्त रूप असावे. क्र. ६३, ओ. ४ पाहा.

### अनुवाद

**य्सामोतिकाचा** पुत्र **राजा चाष्टन** याच्या [आणि] **जयदामन्चा** पुत्र **राजा रुद्रदामन्** याच्या [कारकीर्दीच्या] **बावन्नाव्या –५२– वर्षी फाल्गुन कृष्ण द्वितीय वासर २** [या दिवशी] **सीहिलपुत्र** औपशति-गोत्री **ऋषभदेव** याचा भाऊ **सीहिलपुत्र मदन** याने [त्याची] [ही] स्मारकशिला उभारली.

## क्रमांक ४८

**ओळ** **वाचन**

**१ राज्ञो चाष्टनस य्सामोतिकपुत्रस राज्ञो रुद्रदामस जयदामपुत्रस वर्षे द्विपंचाशे ५०[+*]२**
**२ फगुणबहुलस द्वितियं वा २ यशदताये सीहमितधिता शेनिकसगोत्राये शामणेरिये**
**३ मदनेन सीहिलपुत्रेन कुटुबिनिये [लष्टि] उथापित [।*]**

### अनुवाद

**य्सामोतिकाचा** पुत्र **राजा चाष्टन** [आणि] **जयदामन्चा** पुत्र **राजा रुद्रदामन्** यांच्या [कारकीर्दीच्या] **बावन्नाव्या –५२– वर्षी फाल्गुन कृष्ण द्वितीय वासर** २ [या दिवशी]– **सीहिलपुत्र मदन** याने **सीहमिताची** कन्या **शेनिक**(श्रेणिक)गोत्री श्रामणेरी [आपली] पत्नी **यशोदता** (यशोदत्ता) हिची [ही] स्मारकशिला उभारली.

## क्रमांक ४९

**ओळ** **वाचन**

**१ राज्ञो चाष्टनस य्सामोतिकपु[त्र]स [राज्ञो] रु[द्रदामस] जयदाम–**
**२ पुत्र[स] वर्षे ५०[+*]२ फगु[न] बहुलस द्वितियं वा २**
**३ ऋषभदेवस त्रेष्ठदतपुत्रस ओपशतिगोत्रस**
**४ पित्रा त्रेष्टदतेन श्रामणेरेन लष्टि उथापित [।*]**

### अनुवाद

**य्सामोतिकाचा** पुत्र **राजा चाष्टन** [आणि] **जयदामन्चा** पुत्र **राजा रुद्रदामन्** याच्या [कारकीर्दीच्या] **५२ व्या वर्षी फाल्गुन कृष्ण द्वितीय**

**वासर** २ [या दिवशी] **त्रेष्ठदत्ताचा** पुत्र औपशति-गोत्री **ऋषभदेव** याची [ही] स्मारकशिला त्याचा पिता श्रामणेर **त्रेष्ठदत्त** याने उभारली.

## क्रमांक ५०

## खावडा येथील प्रथम रुद्रदामन्च्या काळचा लेख : वर्ष [६३]

हा लेख कच्छ जिल्ह्यात **खावडा** गावाच्या नैऋत्येस दीड मैलांवर एका ढिगाऱ्यावर १५′ ४″ × ३′ २″ × ११″ या आकाराच्या शिला-खंडावर कोरलेला श्री. जे. एन्. नानावटी यांना आढळला होता तो त्यांनी व डॉ. एच्. जी. शास्त्री यांनी जर्नल ऑफ दि ओरिएंटल इन्स्टिटयूट, व्हॉ. ११, पृ २३७-३८ वर फोटोसह संपादिला आहे. त्याच फोटोवरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा**— या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी आणि भाषा प्राकृत मिश्रित संस्कृत आहे.

**विवेचन**— प्रस्तुत लेखाचा उद्देश **राजा स्वामी रुद्रदामन्** याच्या कारकीर्दीत **शत्रुंसहाचा** पुत्र श्रामणेर – गोत्री – याची **यष्टि** त्याचा पुत्र **धनदेव** याने उभारली हे नमूद करण्याचा होता. यात रुद्रदामन्च्या कारकीर्दीचे वर्ष दोन संख्यादर्शक चिन्हांनी दर्शविले होते, त्यांतील पहिले चिन्ह या शिलेचा तुकडा फुटून नष्ट झाल्यामुळे आता नाहीसे झाले आहे. दुसरे चिन्ह ३ या संख्येचे निदर्शक आहे.

प्रस्तुत लेखात रुद्रदामन्चे वर्णन **ग्सामोतिकाचा** पुत्र राजा महाक्षत्रप स्वामी **चाष्टन** याचा पुत्र राजा स्वामी **जयदामन्** याचा पुत्र राजा स्वामी **रुद्रदामन्** असे केले आहे. यात चाष्टनाला महाक्षत्रप पदवी लावली आहे, तर जयदामन् व रुद्रदामन् या दोघांनाही 'राजन्' आणि 'स्वामि' अशा पदव्या लावल्या आहेत हे उल्लेखनीय आहे. तसेच यातील शब्दयोजना मागील क्र. ४६–४९ मधील शब्दयोजनेसारखी चाष्टन आणि रुद्रदामन् यांचे संयुक्त राज्यशासन दाखविणारी नाही. तेव्हा हा लेख चाष्टनाच्या निधनानंतर रुद्रदामन्ने आपल्या पराक्रमाने 'महाक्षत्रप' पदवी मिळविण्यापूर्वीचा असावा. अर्थातच त्यातील शक वर्ष ५२ च्या नंतरचे आणि ७२ च्या पूर्वीचे[१] असावे. ते बहुधा ६३ असावे असा तर्क करता येतो.

---

१ शक ७२ या वर्षी खोदलेल्या जुनागड प्रस्तर लेखात रुद्रदामन्ने स्वतः महाक्षत्रप पदवी मिळविल्याचा उल्लेख आहे.

**ओळ** **वाचन**

**१ राज्ञो महाक्षत्रपस**
**२ य्सा(य्सा)मोतिकपुत्रस स्वामिचा[ष्ट] –**
**३ नस पुत्रस राज्ञो स्वामिज[यदा*]मस पुत्रस**
**४ राज्ञो स्वामिरुद्रदामस [वर्षे*] ३ श्रावणस**
**५ १०[+*]५[१] अ . . कस शतुंसहपु –**
**६ त्रस श्रामणेर[स] . . गोत्रस पुत्रे –**
**७ ण धनदेवेन य[ठि अ]धिस्थापिता [।*]**

**अनुवाद**

**य्सामोतिकाचा** पुत्र **राजा महाक्षत्रप स्वामी चाष्टनाचा** पुत्र **राजा स्वामी जयदामन्** याचा पुत्र **राजा स्वामी रुद्रदामन्** याच्या – . ३[२] [या वर्षी] **श्रावणाच्या १५**[३] [या दिवशी] शतुंसहाचा पुत्र –श्रामणेर –गोत्री –याची [ही] यष्टि (स्मारकशिला) त्याचा पुत्र **धनदेव** याने [येथे] स्थापिली.

## क्रमांक ५१

# जुनागड येथील रुद्रदामन्‌चा लेख : वर्ष ७२

हा लेख काठेवाडातील **जुनागड** शहराच्या पूर्वेस सुमारे एक मैलावर गिरनार पर्वताच्या सभोवारच्या दरीच्या तोंडाशी एका विशाल प्रस्तराच्या पश्चिमेच्या बाजूवर कोरला आहे. त्याच प्रस्तरावर अशोकाचे सात प्रस्तर आदेश आणि स्कंदगुप्ताचाही लेख कोरला आहे.

सन १८३८ मध्ये जेम्स प्रिन्सेपने या लेखाचे वाचन व त्याचा लहानसा छाप प्रसिद्ध करून त्याकडे प्रथम लक्ष वेधले. नंतर लासेन, एच्. एच्. विल्सन, भाऊ दाजी, भगवानलाल इंद्रजी, एग्लिंग आणि ब्यूह्लर यांनी त्याची चर्चा केली.[४] शेवटी कीलहॉर्नने एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ८, पृ. ३६–४९ वर उत्कृष्ट छापासह त्याचे संपादन केले ते अद्यापि प्रमाणभूत मानण्यात येते.

---

१ याच्या पूर्वी पक्षाचा उल्लेख गळलेला दिसतो.
२ येथील वर्ष बहुधा ६३ असावे हे वर दाखविले आहे.
३ येथे पक्षाचा उल्लेख नाही. कदाचित् '१५' या संख्येने पौर्णिमा विवक्षित असल्याने तो अनावश्यक वाटला असावा.
४ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९६५ मधील संदर्भ पाहा.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी दक्षिणी वळणाची ब्राह्मी असून भाषा संस्कृत आहे. हा लेख बहुतांशी निर्दोष आहे, पण क्वचित् त्यात संधि केले नाहीत. या विस्तृत लेखात फक्त पाच वाक्ये असून त्यात चारच क्रियापदे आहेत. बाकीचा भाग समासप्रचुर गौडी रीतीत लिहिला आहे. यात आनुषंगिक रीतीने आलेल्या स्फुट, मधुर, चित्र, कान्त इत्यादि संज्ञांवरून तत्कालीन साहित्यशास्त्रीय प्रगति अजमावता येते या दृष्टीनेही या लेखाचे महत्त्व आहे.

**विवेचन**—या लेखाचा उद्देश **गिरिनगराजवळचा सुदर्शन** तलाव **महाक्षत्रप रुद्रदामन्**च्या राजवटीत [शक] **वर्ष ७२, मार्गशीर्ष कृष्ण प्रतिपदेला** झालेल्या भयंकर वृष्टीने **ऊर्जयत्** पर्वतातून निघणाऱ्या **सुवर्णसिकता** व **पलाशिनी** नद्यांना पूर आल्यामुळे आणि वादळात बांधाला मोठे भगदाड पडल्यामुळे उद्ध्वस्त झाला होता ; त्याचा बांध पुन: तिप्पट बळकट करून बनविला आहे, हे नमूद करण्याचा होता.

प्रस्तुत लेखात या तलावाचा पूर्वेतिहास पुढीलप्रमाणे दिला आहे. हा तलाव **मौर्य** नृपति **चन्द्रगुप्त** याच्याकरिता त्याचा **राष्ट्रिय** (प्रांताधिपति) **पुष्यगुप्त** याने बांधला होता. नंतर **मौर्य** [नृपति] **अशोक** याच्या **तुषास्फ** नामक **यवनराज** अधिकाऱ्याने त्याचे कालवे काढले होते.

ज्या रुद्रदामन्च्या राजवटीत या तलावाचा बांध दुरुस्त केला होता त्याचे सविस्तर वर्णन या लेखात आले आहे. तो **महाक्षत्रप स्वामी चष्टनाचा** नातू आणि [क्षत्रप जयदामन्चा] पुत्र होता. स्वत:च्या सामर्थ्याने त्याने '**महाक्षत्रप**' पदवी संपादन केली होती. त्याच्या साम्राज्यात पूर्व आणि पश्चिम **आकरावन्ती, अनूप देश, आनर्त, सुराष्ट्र, श्वभ्र, मरुदेश, कच्छ, सिन्धुसौवीर, कुकुर, अपरान्त** आणि **निषाद** हे देश अन्तर्भूत होते. त्याने बलाढ्य आणि गर्विष्ठ अशा यौधेयांचा उच्छेद केला होता. **दक्षिणापथपति सातकर्णि** याचा दोनदा पराभव केल्यावरही तो आपला जवळचा नातलग असल्यामुळे त्याने त्याचा समूळ उच्छेद केला नव्हता, इत्यादि माहिती या लेखात दिली आहे.

रुद्रदामन् हा आदर्श राजा होता. त्याच्या राज्यातील सर्व वर्णांच्या प्रजाजनांनी त्याला आपला अधिपति म्हणून निवडले होते. अनेक राजकन्यांनी स्वयंवरांत त्याला माळ घातली होती. तो शस्त्रास्त्रांत निपुण होता. त्याला युद्धाखेरीज इतरत्र हिंसेचा तिटकारा होता. त्याने अनेक पदच्युत राजांना त्यांचे राज्य मिळवून दिले होते. तो स्वत: गद्य, पद्य काव्ये रचू शकत असे. तो अत्यंत उदार होता. तो आपल्या प्रजेला

चोर, रोगराई वगैरेंपासून संरक्षण देत असे. तो न्याय्य असेच कर प्रजेवर वसवी, तरी त्याचा खजीना सोने, रुपे व रत्ने यांनी तुडुंब भरून वाहत असे.

शेवटी, हा बांध पुनः कोणी व कोणत्या परिस्थितीत बांधला याची माहिती दिली आहे. जुन्या बांधाला पडलेले भगदाड इतके मोठे होते की रुद्रदामन्‌च्या कार्यक्षम मंत्र्यांनी व कार्यकारी अधिकाऱ्यांनीही त्याच्या दुरुस्तीविरुद्ध आपले मत व्यक्त केले होते. पण त्यामुळे प्रजेमध्ये हाहाकार उत्पन्न झाला. तेव्हा **आनर्त** व **सुराष्ट्र** या देशांवर नेमलेल्या **कुलैपपुत्र सुविशाख** नामक **पह्लवाने** हा सेतु अल्पावधीत बांधून आपल्या स्वामीचे पुण्य व कीर्ति ही वृद्धिगत केली, असे प्रस्तुत लेखाच्या शेवटी म्हटले आहे.

**कालनिर्णय** — पश्चिमेच्या क्षत्रपांच्या इतर लेखांतल्याप्रमाणे प्रस्तुत लेखातील ७२ हे वर्ष शक संवताचे धरले पाहिजे. लेखांत उल्लेखिलेले वर्ष सामान्यतः 'गत' असते. शक संवताच्या ७२ या गत वर्षी मार्गशीर्ष महिना अधिक होता. म्हणून लेखातील मिति १८ ऑक्टोबर किंवा १६ नोव्हेंबर सन १५० या दिवशी पडेल असे कीलहॉर्नने म्हटले आहे.

**स्थलादींचा निश्चय** — **ऊर्जयत्** हे सध्याच्या गिरनार पर्वताचे प्राचीन नाव होय. त्यातून निघणाऱ्या **सुवर्णसिकता** नदीला सध्या सोनरेखा म्हणतात. स्कन्दपुराणात तिचे नाव 'स्वर्णरेखा' असे आले आहे.[१] ही नदी फार पवित्र गणण्यात येते. दुसरी नदी **पलाशिनी** मात्र जवळपास दिसत नाही. **आकरावन्ती** हे संपूर्ण माळव्याचे प्राचीन नाव. याच्या पूर्व भागाला आकर असे प्राचीन नाव होते ते आगरवाल या जातीचे मूळ ठिकाण होय. पश्चिमेचा भाग अवन्ती याची राजधानी उज्जैनी ही होती. **अनूप** हे सध्याच्या मध्यप्रदेशाच्या नेमाड जिल्ह्याचे प्राचीन नाव. याची राजधानी माहिष्मती–सध्याचे महेश्वर–ही होती. **आनर्त** म्हणजे उत्तर गुजराथ. **सुराष्ट्र** हे काठेवाडाचे प्राचीन नाव. **श्वभ्र** हा श्वभ्रमती (सध्याची साबरमती) ज्यातून वाहते तो प्रदेश असावा. **मरु** म्हणजे मारवाड. **कच्छ** हे अद्यापि आपल्या प्राचीन नावाने ज्ञात आहे. महाभारतादि ग्रंथांतील संदर्भांचा विचार करून बी. डी. मीरचंदानी यांनी अलीकडे असे दाखविले आहे[२] की, जेव्हा

---

१ पुराण, व्हॉ. १४, पृ. १५.

२ *A.B.O.R.I.*, Vol. LVII, pp. 81–93.

'सिन्धुसौवीर' अशा जोडनामाचा उल्लेख येतो तेव्हा त्याने पंजाबातील सिंधुनदीच्या पश्चिम व पूर्व तटांवरील प्रदेश विवक्षित असतो. सिंधु-पदाने सध्याचा देरजात प्रदेश आणि सौवीर पदाने मुलतानसभोवारचा प्रदेश दाखविला जात असे. रुद्रदामन्ने **यौधेयांचा** उच्छेद केला असल्याने हा प्रदेश त्याच्या अमलाखाली असणे सुतरां संभवनीय आहे. **कुकुराचे** निश्चित स्थान माहीत नाही. **अपरान्त** म्हणजे उत्तर कोंकण. **निषाद** हा गुजराथ – राजपुतान्यातील आदिवासींचा प्रदेश असावा.

**ओळ** **वाचन**[१]

१ **सिद्धम् [।*] इदं तडाकं[२] सुदर्शनं गि[रि]नगराद[पि] [दू]र-[मन्त[३] . . . . . . . . . . . . . . [मृ*][त्ति]-कोपलविस्तारायामोच्छ्रयनिःसंधिबद्धदृढसर्व्वपाळीकत्वात्पर्व्वतपा –**

२ **दप्रतिस्पर्द्धिसुश्लिष्ट[बन्ध*] . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . [व]जातेनाकृत्रिमेण सेतुबन्धेनोपपन्नं सुप्रतिविहितप्रनाळीपरीवाह –**

३ **मीढविधानं च त्रिस्क[न्ध*] . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . नादिभिरनुग्रहैर्महत्यु-पचये वर्त्तते [।*] तदिदं राज्ञो महाक्षत्रपस्य सुगृही –**

४ **तनाम्नः स्वामिचष्टनस्य पौत्र[स्य] . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .[४] पुत्रस्य राज्ञो महाक्षत्रपस्य गुरुभिरभ्यस्तनाम्नो रुद्रदाम्नो वर्षे द्विसप्ततितमे ७०[+*]२**

५ **मार्ग्गशीर्षबहुलप्रति[पदि*] . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . सृष्टवृष्टिना पर्ज्जन्येन एकार्णवभूतायामिव पृथिव्यां कृतायां गिरेरूर्जयतः सुवर्णसिकता –**

६ **पलाशिनीप्रभृतीनां नदीनां अतिमात्रोद्वृत्तैर्वेगैः सेतु[म] . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . यमाणानुरूपप्रतीकारमपि गिरिशिखरतरुतटाट्टालकद्वारशरणोच्छ्रयविध्वंसिना युगनिधनसदृश –**

१ ए. इं., व्हॉ. ८ मधील छापावरून.

२ 'तळाकं' (ब्यू.).

३ '–वृत्तिकं'– वाचावे.

४ 'राज्ञः क्षत्रपस्य सुगृहीतनाम्वः स्वामिजयदाम्न:' वाचावे.

७ परमघोरवेगेन वायुना प्रमथितसलिलविक्षिप्तजर्ज्जरीकृताव[दी][र्ण]– . . . . . . . . . . . क्षिप्ताश्मवृक्षगुल्मलताप्रतानं आ नदीतलादित्युद्घाटितमासीत् [।*] चत्वारि हस्तशतानि वीशदुत्तराण्यायतेन[1] एतावंत्येव विस्तीर्णेन

८ पंचसप्ततिहस्तानवगाढेन भेदेन निस्सृतसर्वतोयं मरुधन्वकल्पमतिभृशं दुर्द[2] . . . . . . . . . . . . स्यार्थे मौर्यस्य राज्ञः चंद्रगु[प्तस्य*] राष्ट्रियेण वैश्येन पुष्यगुप्तेन कारितं अशोकस्य मौर्यस्य [कृ*]ते यवनराजेन तुषास्फेनाधिष्ठाय

९ प्रणालीभिरलंकृतं तत्कारितया राजानुरूपकृतविधानया तस्मि(स्मिन्) भेदे दृष्टया प्रनाड्या वि[स्तृ]तसेतु . . . . . . . . . . . णा आ गर्भात्प्रभृत्यविहतसमुदितराजलक्ष्मीधारणागुणतस्सर्व्ववर्णैरभिगंम्य[3] रक्षणार्थं पतित्वे वृतेन आ प्राणोच्छ्वासात्पुरुषवधनिवृत्तिकृत–

१० सत्यप्रतिज्ञेन अन्यत्र संग्रामेष्वभिमुखागतसदृशशत्रुप्रहरणवितरणाविगुणरिपु . . . . . . . . . . . तकारुण्येन स्वयमभिगतजनपदप्रणिपतितशरणदेन दस्युव्यालमृगरोगादिभिरनुपसृष्टपूर्व्वनगरनिगम–

११ जनपदानां स्ववीर्य्यार्जितानामनुरक्तसर्व्वप्रकृतीनां पूर्व्वापराकरावन्त्यनूपनीवृदानर्त्तसुराष्ट्रश्व [भ्र]मरुकच्छसिन्धुसौवीरकुकुरापरान्तनिषादादीनां समग्राणां तत्प्रभावा . . . . . . . .[4]र्थकामविषयाणां विषयाणां पतिना[5] सर्व्वक्षत्राविष्कृत–

१२ वीरशब्दजातोत्सेकाविधेयानां यौधेयानां प्रसह्योत्सादकेन दक्षिणापथपतेः सातकर्णेर्द्विरपि निर्व्याजमवजित्यावजित्य संबंधाविदूरतया अनुत्सादनात्प्राप्तयशसा मा . . . . . . . प्तविजयेन भ्रष्टराजप्रतिष्ठापकेन यथार्त्थहस्तो–

१३ च्छ्रयार्जितोर्जितधर्मानुरागेन(ण) शब्दार्त्थगान्धर्व्वन्यायाद्यानां विद्यानां महतीनां पारणधारणविज्ञानप्रयोगावाप्तविपुलकीर्त्तिना तुरगगजरथचर्य्यासिचर्म्मनियुद्धाद्या . . . . . . . . . . . तिपरबललाघवसौष्ठवक्रियेण अहरहर्द्दानमानान–

१४ वमानशीलेन स्थूललक्षेण यथावत्प्राप्तैर्बलिशुल्कभागैः कनकरजतवज्रवैडूर्यरत्नोपचयविष्यन्दमानकोशेन स्फुटलघुमधुरचित्रकान्तशब्दसमयोदारा–

---

१ 'विंशत्युत्तरा –' वाचावे.

२ 'दुर्दर्शनमासीत्।' वाचावे.

३ '–रभिगम्य' वाचावे.

४ 'यथावत्प्राप्तधर्मा –' वाचावे.

५ 'पत्या' वाचावे.

लंकृतगद्यपद्य . . . . . . . . . . . . . . प्रमाणमानोन्मानस्वर-
गतिवर्णसारसत्वा (त्त्वा) दिभिः

१५ परमलक्षणव्यञ्जनोपेतकान्तमूर्त्तिना स्वयमधिगतमहाक्षत्रपनाम्ना नरेन्द्रकन्यास्वयंवरानेकमाल्यप्राप्तदाम्ना महाक्षत्रपेण रुद्रदाम्ना वर्ष-सहस्राय गोब्राह्मण . . . . . . . . . . . . र्त्थं धर्म्मकीर्ति-वृद्धयर्थं च अपीडयित्वा करविष्टि–

१६ प्रणयक्रियाभिः पौरजानपदं जनं स्वस्मात्कोषा[त् *] महता धनौघेन अनतिमहता च कालेन त्रिगुणदृढतरविस्तारायामं सेतुं विधाय सर्व्वत[:] . . . . . . . . . . . . . . . सुदर्शनतरं कारितमिति [।*] अस्मिन्नर्थे

१७ महाक्षत्रपस्य मतिसचिवकर्मसचिवैरमात्यगुणसमुद्युक्तैरप्यतिमहत्वा (त्त्वा)-द्भेदस्यानुत्साहविमुखमतिभिः प्रत्याख्यातारम्भं पुनः सेतुबन्धनैराश्या-द्धाहाभूतासु प्रजासु इहाधिष्ठाने पौरजानपदजनानुग्रहार्थं पार्त्थिवेन कृत्स्नानामानर्त्तसुराष्ट्रानां (णां) पालनार्त्थं नियुक्तेन

१८ पह्लवेन कुलैपपुत्रेणामात्येन सुविशाखेन यथावदर्थधर्म्मव्यवहारदर्शनैर-नुरागमभिवर्द्धयता शक्तेन दान्तेनाचपलेनाविस्मितेनार्य्येणाहार्य्येण

१९ स्वधिष्ठिता धर्मकीर्त्तियशांसि भर्तुरभिवर्द्धयतानुष्ठितमिति।

## अनुवाद

सिद्धि असो! हा **सुदर्शन** [नामक] तलाव **गिरिनगराहून** दूरवरही . . . माती व दगड यांनी रुंदी, लांबी व उंची यांमध्ये (कोठेही) जोड राहू न देता मजबूत रीतीने सर्व थर जोडल्यामुळे पर्वताच्या पायथ्या-प्रमाणे दिसणारा, उत्कृष्ट बांधकाम केलेला . . . . नैसर्गिक बांधांनी युक्त, उत्कृष्ट अशा नाल्यांनी, कालव्यांनी आणि घाणीपासून रक्षण करणाऱ्या उपायांनी युक्त अशा तीन थरांमध्ये बांधलेल्या बांधाच्या योगाने [आता] उत्कृष्ट स्थितीत आहे.

(ओ. ३) **राजा महाक्षत्रप सुगृहीतनामा**[1] **स्वामी चष्टन** याचा नातू, [राजा क्षत्रप सुगृहीतनामा स्वामी जयदामन् याचा पुत्र] [आणि] **राजा, महाक्षत्रप** [आणि] माननीयांनी [सदैव] उल्लेखिलेला **रुद्रदामन्** याच्या [कारकीर्दीच्या] **बहात्तराव्या –७२– वर्षी मार्गशीर्ष कृष्ण प्रतिपदेच्या दिवशी** सतत वर्षाव करणाऱ्या पर्जन्याने पृथ्वीला जणू काय

---

१ स सुगृहीतनामा स्यात् प्रातर्यः स्मर्यते बुधैः। ज्याचे स्मरण सज्जन प्रातःकाळी करतात त्याला 'सुगृहीतनामा' म्हणावे.

एक विशाल समुद्र केला असता, **ऊर्जयत्** पर्वतातून निघणाऱ्या **सुवर्णसिकता, पलाशिनी** आदि नद्यांच्या भयंकर वेगाच्या लोंढ्यामुळे, या तलावाच्या रक्षणार्थ योग्य ते उपाय पूर्वी केले होते तरी, पर्वताची शिखरे, वृक्ष, तट, गोपुरे, द्वारे, गृहे यांच्या वरील भागांचा विध्वंस करणाऱ्या, प्रलय-काळातल्या सारख्या, अत्यंत भयंकर वेगाच्या झंझावाताने ढवळले गेलेल्या, [नद्यांच्या प्रवाहांत] फेकले गेलेल्या दगड, वृक्ष, झुडुपे, लतादिकांनी हा तलाव नद्यांच्या तळापर्यंत उघडा पाडला होता.

(ओ. ७) चारशेवीस हात लांब आणि तितकाच रुंद आणि पंचाहत्तर हात खोल अशा खिंडारातून [या तलावाचे] सर्व पाणी वाहून गेल्यामुळे तो ओसाड वाळवंटासारखा दुर्दर्शनीय झाला होता.

(ओ. ८) हा तलाव [येथील लोकांकरिता] **मौर्य** राजा **चंद्रगुप्त** याचा प्रांताधिकारी वैश्य **पुष्यगुप्त** याने बांधविला होता. **मौर्य** [राजा] **अशोक** याच्याकरिता **यवनराज तुषास्फ** याने त्या तलावाला आपल्या देखरेखीखाली मोठमोठ्या कालव्यांनी आणि राजाच्या पदवीला साजेश्या, त्या खिंडारात दृष्टीस पडलेल्या, मोठ्या नालींनी, तसेच विशाल अशा बांधाने युक्त केले होते.

(ओ. ९) जन्मापासून सतत समग्र राजलक्ष्मी धारण केल्यामुळे सर्व वर्णांनी (स्वतः होऊन) ज्याच्याकडे येऊन आपल्या रक्षणार्थ आपला स्वामी म्हणून पसंत केले होते ; ज्याने युद्धाखेरीज अन्यत्र यावज्जीव मनुष्यवध न करण्याची सत्य प्रतिज्ञा केली आहे ; जो समोर आलेल्या आपल्या तोडीच्या, आपणासारखे शस्त्रप्रहार करण्यास समर्थ असलेल्या [शत्रूशीच युद्ध करतो]; [ज्याला असहाय शत्रु पाहून] अनुकंपा उत्पन्न होते ; जो स्वतः येऊन प्रणिपात करणाऱ्या लोकांना जीवदान व रक्षण देतो ; चोर, सर्प, हिंस्र प्राणी, रोग इत्यादिकांपासून मुक्त असलेली नगरे, व्यापारी शहरे व ग्राम ज्या देशांत आहेत, जे देश त्याने स्वतःच्या पराक्रमाने जिंकले आहेत, तसेच ज्या देशांतील लोक त्याच्याशी राजनिष्ठ आहेत, असे पूर्व आणि पश्चिम **आकरावन्ती, अनूप** देश, **आनर्त, सुराष्ट्र, श्वभ्र, मरु, कच्छ, सिन्धु-सौवीर, कुकुर, अपरान्त, निषाद** इत्यादि सर्व देश ज्याच्या प्रभावामुळे . . . . . [धर्म], अर्थ व काम हे पुरुषार्थ प्राप्त करून घेतात, त्या देशांचा स्वामी – सर्व योद्धयांशी लढून आपली वीरकीर्ति प्रस्थापित केल्यामुळे जे गर्विष्ठ व मग्रूर झाले होते त्या **यौधेयांचा** ज्याने आपल्या बळाने उच्छेद केला ; **दक्षिणापथाचा स्वामी सातकर्णि** याचा निष्कपटपणे दोनदा पराजय केल्यावरही, स्वतःशी जवळचे नाते असल्यामुळे, त्याचा नाश केला नाही म्हणून ज्याला कीर्ति प्राप्त

झाली आहे ; ज्याने राज्यभ्रष्ट नृपतींना पुनः गादीवर बसविले आहे ; जो [न्यायदानात] हात उचलून यथार्थपणे उच्च न्यायाविषयी आपला अनुराग व्यक्त करतो ; ज्याने शब्दविद्या, अर्थविद्या, संगीत, न्याय इत्यादि थोर विद्यांचे संपूर्ण ज्ञान, संस्मरण, विज्ञान व प्रयोग यांच्या योगे विपुल कीर्ति मिळविली आहे ; अश्व, हत्ती व रथ यांचे प्रचलन, तरवार व ढाल यांनी द्वंद्व युद्ध . . . वगैरेंमध्ये उत्कृष्ट सामर्थ्य, चपलता व सौष्ठव ही ज्याने प्राप्त करून घेतली आहेत ; सदैव दान देणे, मान करणे, अपमान न करणे हाच ज्याचा स्वभाव बनून गेला आहे ; जो उदार आहे ; न्याय्य मार्गाने मिळालेले कर, शुल्क, भाग यांच्या योगे ज्याचा खजीना सोने, रुपे, हिरे, वैडूर्य व रत्ने यांनी तुडूंब भरून वाहतो आहे ; ज्याने प्रसाद, लाघव, माधुर्य, वैचित्र्य आणि कान्ति या शब्दगुणांनी अलंकृत अशी गद्य व पद्य [काव्ये] रचली आहेत ; ज्याचे शरीर योग्य प्रमाण, रुंदी व उंची, स्वर, चालण्याची ढब, वर्ण, धैर्य, बळ आदि उत्कृष्ट लक्षणांनी युक्त आणि सुन्दर आहे ; ज्याने स्वतःच्या पराक्रमाने 'महाक्षत्रप' पदवी मिळविली आहे ; ज्याने राजकन्यांच्या स्वयंवरांत अनेक पुष्पहारांचे ढीग मिळविले आहेत – त्या **महाक्षत्रप रुद्रदामन्ने** हजार वर्षांच्या जीवनार्थ, गोब्राह्मणांच्या [पालनार्थ] आणि स्वतःचे पुण्य व कीर्ति यांच्या वृद्धयर्थ, नगरांतील व खेडेगावांतील जनतेला कर, वेठ, नजराणा इत्यादिकांनी त्रास न देता, आपल्या स्वतःच्या खजीन्यातून मोठा धनराशि खर्च करून अल्पावधीत [पहिल्याच्या] तिप्पट बळकटपणा असलेला हा बांध घालून हा तलाव सर्व बाजूंनी सुन्दर दिसणारा असा करविला आहे.

(ओ. १६) या प्रकरणी महाक्षत्रपाच्या अमात्यगुणांनी युक्त असलेल्याही मंत्र्यांनी व कार्यकारी अमात्यांनी, बांधाला पडलेले खिंडार फार मोठे असल्यामुळे, अनुत्साही होऊन या बांधाचा आरंभ करू नये असा निर्णय केला होता ; पण हा बांध होणार नसल्यामुळे निराश झालेल्या प्रजाजनांनी जेव्हा हाय ! हाय ! असे उद्गार काढले, तेव्हा या ठिकाणी नगरांतील व खेडेगावांतील जनतेच्या कल्याणाकरिता [त्या] राजाने संपूर्ण **आनर्त** आणि **सुराष्ट्र** देशांच्या रक्षणाकरिता नेमलेल्या, **कुलैपाचा** पुत्र, **सुविशाख** नामक **पह्लव** अमात्याने – जो न्याय्य अर्थ, धर्म व व्यवहार यांच्या योगाने प्रजेचे राजाविषयी प्रेम वाढवीत आहे ; जो स्वतः सामर्थ्यवान्, संयमी, धीरप्रकृति, गर्वरहित, सच्छील आणि प्रामाणिक आहे ; जो आपल्या कारभाराने आपल्या स्वामीचे पुण्य, कीर्ति आणि यश वृद्धिंगत करीत आहे त्याने – हे बांधकाम पूर्ण केले.

## क्रमांक ५२

# गुंदा येथील प्रथम रुद्रसिंहाच्या काळचा शिलालेख : वर्ष १०३

हा शिलालेख मेजर वॉटसनला उत्तर काठेवाडाच्या हालार जिल्ह्यातील **गुंदा** या गावी सन १८८० मध्ये विहीरीत सापडला होता. नंतर तो जामनगरला हलविण्यात आला. पुढे वॉटसन म्यूझियम स्थापन झाल्यावर तो तेथे ठेवण्यात आला. त्याचे वाचन व भाषांतर ब्यूह्लरने सन १८८१ मध्ये इंडियन अँटिक्वरी, व्हॉ. १०, पृ. १७० इ. मध्ये केले. नंतर भगवानलाल इंद्रजी, रॅप्सन आणि देवदत्तपंत भांडारकर यांनी त्यात काही दुरुस्त्या सुचविल्या.[1] शेवटी राखालदास बॅनर्जी आणि वि. स. सुखटणकर यांनी तो छापासह एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १६, पृ. २३३ इ. वर प्रसिद्ध केला. त्याच छापावरून तो येथे संपादिला आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा प्राकृत-मिश्रित अशुद्ध संस्कृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाच्या आरंभी तत्कालीन राज्यकर्ता **राजा क्षत्रप स्वामी रुद्रसिंह** यांची वंशावळ पुढीलप्रमाणे दिली आहे—तो **राजा महाक्षत्रप स्वामी चाष्टनाचा** प्रपौत्र (पणतू), **राजा क्षत्रप स्वामी जयदामन्‌चा** पौत्र (नातू) आणि **राजा महाक्षत्रप स्वामी** (प्रथम) **रुद्रदामन्** याचा पुत्र होता. नंतर लेखाचा काळ **वर्ष १०३, वैशाख शुद्ध पंचमी, रोहिणी** नक्षत्राचा मुहूर्त असा दिला आहे. त्या मुहूर्तावर **आभीर** सेनापति **बापक** याचा पुत्र, सेनापति **रुद्रभूति** याने **रसोपद्रिय** गावात एक वापी (पायऱ्यांची विहीर) खणविली आणि बांधून काढविली असे म्हटले आहे.

या रुद्रसिंहाच्या नाण्यांवरून तो शक वर्ष १०३ पर्यंत क्षत्रप, पुढे १०३ ते ११० पर्यंत महाक्षत्रप, ११० ते ११२ पर्यंत पुनः क्षत्रप, आणि ११३ ते ११८ पर्यंत पुनः महाक्षत्रप म्हणून राज्य करीत होता.

**स्थलनिश्चय** — **रसोपद्रिय** गाव सध्या अस्तित्वात नाही. पण प्रस्तुत लेखाची शिला **गुंदा** येथे विहीरीत सापडली होती. असे शिलालेख सामान्यतः मूळ ठिकाणापासून हलविले जात नसत. म्हणून प्राचीन रसोपद्रियाचे आता गुंदा गावात रूपान्तर झाले असावे असे दिसते.

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९६३ मधील संदर्भ पाहा.

ओळ वाचन

१ सि[द्धं][।*] राज्ञो महक्षत्रपस्य स्वामिचाष्टनप्रपौत्रस्य राज्ञो क्षत्रपस्य स्वामिजयदामपौत्रस्य.

२ राज्ञो महक्षत्रपस्य स्वामिरुद्रदामपुत्रस्य राज्ञो क्षत्रपस्य स्वामिरुद्र –

३ सीहस्य [व]र्षे [त्रि]युत्तरशते १००[+*]३ वैशाख शुद्धे पंचमिध[स्य] तिथौ रोहिणीनक्ष[त्र] –

४ मुहूर्त्ते आभीरेण सेनापतिबापकस्य पुत्रेण सेनापतिरु[द्र]भूतिना रसो –

५ [प]द्रिये वा[पी][खा]नि[तो] [बं]धापितश्च सर्व्वसत्वानां हित-सुखार्थमिति [।* ]

अनुवाद

सिद्धि असो! **राजा महाक्षत्रप स्वामी चाष्टन** याचा प्रपौत्र, **राजा क्षत्रप स्वामी जयदामन्**चा पौत्र [आणि] **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रदामन्** याचा पुत्र **राजा क्षत्रप स्वामी रुद्रसिंह** याच्या [कारकीर्दीच्या] **एकशे तीन – १०३ –** या **वर्षी वैशाख शुद्ध पंचमीस रोहिणी** नक्षत्राच्या मुहूर्तावर **आभीर** सेनापति **बापक** याचा पुत्र सेनापति **रुद्रभूति** याने सर्व प्राण्यांच्या हितसुखाकरिता [ही] विहीर खणविली आणि बांधविली

क्रमांक ५३

## वांढ येथील प्रथम रुद्रसिंहाच्या काळचा यष्टिलेख : वर्ष [११०]

हा लेख कच्छ जिल्ह्याच्या मांडवी तालुक्यातील **वांढ** गाव सापडला होता. नंतर तो भूज येथील संग्रहालयात नेण्यात आला. ड जमीनदार यांनी त्याचे वाचन संबोधि, व्हॉ. ३, पृ. ७४ मध्ये फोटोस प्रसिद्ध केले, तेच किंचित् वदल करून येथे दिले आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी आणि भा प्राकृत आहे.

**विवेचन** — हा स्तम्भ भग्न स्थितीत आहे. त्याचा उजवीकड काही भाग फुटून नष्ट झाला आहे. त्यामुळे त्याचा अर्थ लावणे कठी जाते. त्याच्या आरंभी **राजा महाक्षत्रप रुद्रदामन्** याचा पुत्र **रा** [महाक्षत्रप] **स्वामी रुद्रसिंह** याच्या कारकीर्दीतील एका वर्षाचा उल्ले

होता. त्यांतील पहिल्या दोन संख्यावाचक चिन्हांनी ११० ही संख्या दर्शविली आहे. त्यापुढे एखादे चिन्ह असावे काय हे सांगता येत नाही. बहुधा नसावे.

प्रथम रुद्रसिंह हा महाक्षत्रप प्रथम रुद्रदामन् याचा पुत्र होता. तो गादीवर येण्यापूर्वी त्याचा वडील भाऊ दामजदश्री याचा पुत्र जीवदामन् हा राज्य करीत होता. त्याच्या एका नाण्यावर शक संवत् १०० ही संख्या भगवानलालनी वाचली होती.[१] त्या नाण्यावरील त्याची आकृतीही त्याच्या नंतरच्या नाण्यांवरील त्याच्या आकृतीपेक्षा किंचित् निराळी आहे.[२] या दोन प्रमाणांवरून दामजदश्रीनंतर त्याचा पुत्र जीवदामन् किंचित् काळ महाक्षत्रप म्हणून राज्य करीत होता ; त्यानंतर त्याचा चुलता रुद्रसिंह याने त्याला पदच्युत करून गादी बळकाविली असे मानण्यात येते. या महाक्षत्रप रुद्रसिंहाची नाणी शक संवत् १०३ ते ११० या वर्षांची सापडली आहेत. पुढे त्याला ११० ते ११२ मध्ये आपल्या पुतण्याच्या हाताखाली क्षत्रप व्हावे लागले असे दिसते. प्रस्तुत लेखातील अक्षरांच्या ठेवणीवरून त्यात त्याची 'महाक्षत्रप' पदवी उल्लेखिली असावी. तेव्हा त्यातील वर्ष ११० च असण्याचा संभव आहे. शक वर्ष ११० नंतर तो पुन: क्षत्रप झाला असे त्याच्या नाण्यांवरून दिसते.

प्रस्तुत लेखाचा खालचा भाग बराचसा नष्ट झाल्यामुळे तीत उल्लेखिलेली यष्टि कोणाकरिता कोणी उभारली हे सांगता येत नाही.

**ओळ** **वाचन**

१ **राज्ञो महा[क्षत्रपस] स्वामिरुद्रदामपुत्र –**
२ **स [रा*][ज्ञो महा][क्षत्रप*]स्य स्वामिरुद्रसिंह –**
३ **स वरिशे १००[+*]१० . . . नितशेतह**
४ **अर्यति स्वामित्र . . . रुद्रमा . . मु**
५ **[व]कसगोत्र थ . . विज रत्न थापित**
६ **केशदेसिकए[।*].**

## अनुवाद

[ही यष्टि फार भग्न झाल्यामुळे त्याचा सुसंगत अर्थ लावणे अशक्य आहे. त्यात आरंभी **राजा महाक्षत्रप रुद्रदामन्चा** पुत्र **महाक्षत्रप स्वामी रुद्रसिंहाच्या** कारकीर्दीतील ११० वर्षाचा उल्लेख दिसतो.]

---

१ *B. M. C.* (*Andhras*), p. cxxiv. २ *Ibid.* p. cxxv.

## क्रमांक ५४

# अन्धौ येथील प्रथम रुद्रसिंहाच्या काळचा यष्टिलेख : वर्ष ११४

हा लेख कच्छ जिल्ह्याच्या खावडा तालुक्यातील **अन्धौ** येथे सापडला होता. तो आता भूज येथील संग्रहालयात ठेवला आहे.

ह्या लेखाची शिला डाव्या-उजव्या बाजूस थोडी थोडी फुटली असल्यामुळे काही अक्षरे नष्ट झाली आहेत. तथापि एकंदरीत ऐतिहासिक मजकूर सुरक्षित आहे. या लेखाचे वाचन डॉ. जमीनदार यांनी प्रथम केले.[१] तेच येथे दिले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी ब्राह्मी आणि भाषा प्राकृत-मिश्रित संस्कृत आहे.

**विवेचन**—हा लेख **राजा महाक्षत्रप स्वामी चष्टनाचा** प्रपौत्र, **राजा क्षत्रप जयदामन्चा**[२] पौत्र आणि **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रदामन्चा** पुत्र **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रसिह** याच्या काळचा आहे. त्याच्या कारकीर्दीतील ११४ हे वर्ष संख्याद्योतक चिन्हांनी दर्शविले आहे.

रॅप्सनने रुद्रसिंहाच्या कारकीर्दीचे दोन खंड मानले आहेत. ते स्वीकारल्यास पूर्वोक्त क्र. ५२ चा यष्टिलेख पहिल्या खंडात, तर प्रस्तुत लेख दुसऱ्या खंडात पडतो. या लेखाचा उद्देश [शक] **वर्ष ११४ मध्ये ज्येष्ठ शुक्ल द्वादशीस** कोणा **आभीराने** (त्याचे नाव स्पष्ट नाही) **नंदक** नावाच्या गृहस्थाच्या हस्ते ही यष्टि उभारली हे नमूद करण्याचा दिसतो.

**ओळ** **वाचन**

**१ [सिद्धम् ।* राज्ञो महाक्षत्रपस्वामिचष्टन*–]**
**२ [प्र*]पौत्रस्य राज्ञो क्षत्रपस्य [जय]–**
**३ दामपौत्रस्य राज्ञो महाक्षत्रप –**
**४ स्य स्वामिरुद्रदामपुत्रस्य**
**५ [रा]ज्ञो महाक्षत्रपस्य स्वामिरुद्रसि –**

---

१ संबोधि, व्हॉ. ३, पृ. ४६.

२ जयदामन् हा आपला पिता चष्टन याच्या काळी क्षत्रप पदावर होता. तो त्याच्या हयातीत निधन पावल्यामुळे त्याला 'महाक्षत्रप' आणि 'स्वामी' ही उपपदे या लेखात लावली नाहीत असे दिसते.

६ **हस्य वर्षे १००[+*]१०[+*]४ ज्येष्ठमू[लीय]**
७ **[शु]द्ध द्वादशियमिति[१] प्रतिष्ठापे . .**
८ **आभीरपुत्र कु . . . .**
९ **. . . . . .[पु]त्र[स]. . .**
१० **दूषेनिकसगोत्रस**
११ **नंदकहस्ते उथापित [।*]**

### अनुवाद

सिद्धि असो ! **राजा महाक्षत्रप स्वामी चष्टनाचा** प्रपौत्र, **राजा क्षत्रप जयदामन्चा** पौत्र, **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रदामन्चा** पुत्र, **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रसिंह** याच्या [कारकीर्दीतील] **वर्ष ११४, ज्येष्ठामूलीय** मासाच्या शुद्ध **द्वादशीस**[२] प्रतिष्ठापिलेली **आभीरपुत्र** . . [याची यष्टि] . . . पुत्र दूषेनिकगोत्री **नंदक** याच्या हस्ते उभारली.

### क्रमांक ५५

## जुनागड येथील जयदामन्च्या नातवाच्या काळचा शिलालेख

हा लेख काठेवाडातील **जुनागड** शहराच्या पूर्वेस असलेल्या आणि सध्या 'बावा प्याराचा मठ' या नावाने ज्ञात असलेल्या लेण्यांजवळ खणताना सापडला होता. तो बाहेर काढताना थोडा फुटला. नंतर तो तेथील राजवाडयात नेला जात असताना त्याचा आणखी एक तुकडा पडला. पुढे तो वॉटसन म्यूझियम मध्ये ठेवण्यात आला. त्यावेळी त्याच्या मध्य भागातील चीरेमुळे दोन तुकडे झाले. त्याचे पहिले वाचन ब्यूह्लरने आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया, व्हॉ. २, पृ. १४० इ. वर छापासह प्रसिद्ध केले. नंतर रॅप्सन व ल्यूडर्स यांनी त्याचा उल्लेख केला.[३] शेवटी राखालदास बॅनर्जी आणि वि. स. सुखटणकर यांनी तो एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १६, पृ. २३९ इ. वर छापासह संपादिला. त्याच छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

---

१ 'द्वादश्याम्' वाचावे.

२ एकादशीस उपोषण करून द्वादशीच्या पुण्य तिथिस ही यष्टि उभारणारा नंदक हिंदुधर्मी दिसतो.

३ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९६६ मधील संदर्भ पाहा.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी रुद्रसिंहाच्या गुंदा येथील लेखातल्यासारखी ब्राह्मी असून भाषा शुद्ध संस्कृत दिसते. त्या काळच्या शुद्ध संस्कृतमध्ये लिहिल्या गेलेल्या अत्यल्प लेखांमध्ये याची गणना केली पाहिजे.

**विवेचन**—प्रस्तुत लेख अतिशय भग्न झाल्यामुळे त्याचा उद्देश सांगणे कठीण आहे. तथापि अवशिष्ट अक्षरांवरून तो **चाष्टनाचा** प्रपौत्र आणि राजा क्षत्रप स्वामी **जयदामन्**चा पौत्र अशा कोणा महाक्षत्रपाच्या काळचा दिसतो. हा महाक्षत्रप प्रथम रुद्रदामन्च्या पुत्रांपैकी असावा. या रुद्रदामन्ला दामजद आणि रुद्रसिंह असे दोन पुत्र होते. त्यातील कोणता येथे विवक्षित आहे हे प्रस्तुत लेख अत्यंत भग्न झाल्यामुळे सांगता येत नाही. शेवटच्या ओळीत केवलिज्ञान प्राप्त झालेल्याचा उल्लेख दिसतो. त्यावरून जैन धर्मासंबंधी काही धर्मदाय नमूद करणे हा या लेखाचा उद्देश असावा. तसे असल्यास ज्या लेण्याजवळ ही शिला आढळली ते जैन धर्माचे असावे. प्रस्तुत लेखात चैत्र शुक्ल पंचमी व गिरिनगर (सध्याचे जुनागड) यांचा उल्लेख आला आहे.

**ओळ** **वाचन**[१]

१ . . . . . . . . . . **स्तथा सुरग[ण]** . . . . . . . **क्षत्राणां प्रथम** . .

२ . . . . . . . . . **चाष्टनस्य प्र[पौ]त्रस्य राज्ञः क्ष[त्र]पस्य स्वामिजयदामपौत्रस्य राज्ञो म[हा]**–

३ . . . . . . . . . **[चै]त्रशुक्लस्य दिवसे पंचमे ५ इ[ह] गिरिनगरे देवासुरनागय[क्ष]रा[क्ष]स** . . . . . . . . .

४ . . . . . . . . . **थ[पु]रमिव** . . . . **केवलिज्ञानसं** . . . **नां** . . . . **जरामरण** . . . . .

**अनुवाद**

. . . . देवगण . . . क्षत्रियांमध्ये श्रेष्ठ . . . . **चाष्टनाचा** प्रपौत्र, **राजा क्षत्रप** स्वामी **जयदामन्**चा पौत्र, **राजा महा-[क्षत्रप]** . . . . . . . . याच्या कारकीर्दीत . . . . . **चैत्र शुक्ल पंचमीस–५–**येथे **गिरिनगरात** देव, असुर, नाग, यक्ष, राक्षस . . . केवलींच्या ज्ञानाप्रत प्राप्त झालेल्या . . . . जरामरण . . . .

१ ए. इं., व्हॉ. १६ मधील छापावरून.

## क्रमांक ५६

# मूलवासर येथील प्रथम रुद्रसेनाच्या काळचा यष्टिलेख : वर्ष १२२

हा लेख काठेवाडातील द्वारकेच्या ईशान्येस सुमारे १० मैलांवर असलेल्या **मूलवासर** येथे अरुंद लांबट शिलाखंडावर कोरलेला सापडला होता. तो नंतर द्वारकेतील सार्वजनिक वाचनालयात नेण्यात आला. त्याचा पहिला उल्लेख भगवानलाल इंद्रजी व रॅप्सन यांनी सन १८९० मध्ये केला. नंतर त्याचे पहिले वाचन 'भावनगर कलेक्शन ऑफ संस्कृत अँड प्राकृत इन्स्क्रिप्शन्स्', पृ. २३ वर छापासह प्रसिद्ध झाले. पुढे भगवानलाल इंद्रजी व रॅप्सन यांनी त्याची चर्चा केली.[१] नंतर हीरानंद शास्त्रींनी 'देवदत्त रामकृष्ण भांडारकर व्हॉल्यूम', पृ. १७३ वर छापासह त्याचे वाचन प्रसिद्ध करून त्याची चर्चा केली. त्यांचेच वाचन येथे दिले आहे.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी ब्राह्मी आणि भाषा मागील लेखातल्याप्रमाणे संस्कृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेख **महाक्षत्रप स्वामी रुद्रसेनाच्या** कारकीर्दीतील [शक संवत्] **१२२** चा आहे. यात त्याची वंशावळ दिली नाही. पण इतर लेखांवरून व नाण्यांवरून तो महाक्षत्रप प्रथम रुद्रदामन्चा नातू आणि महाक्षत्रप रुद्रसिंहाचा पुत्र प्रथम रुद्रसेन होता असे समजते. त्याच्या चांदीच्या नाण्यांवरून रॅप्सनने त्याचा काळ शकसंवत् १२१ ते १४४ (सन १९९–२२२) असा ठरविला आहे.[२] प्रस्तुत लेखातील वर्ष या कालखंडात पडते.

प्रस्तुत लेखाचा उद्देश **वाणिजक** नामक एका पुरुषाच्या मुलाने आपल्या मित्राकरिता आपला प्राण अर्पण केला होता. त्याच्या स्मरणार्थ ही शिलायष्टि उभारली हे नमूद करण्याचा होता. आश्चर्याची गोष्ट ही की त्या मुलाचे नाव या लेखात दिले नाही. त्याच्या पित्याचे—वाणिजकाचे—नाव मात्र या शिलेवर इतरत्रही कोरले आहे असे हीरानंद शास्त्रींनी म्हटले आहे.

स्मारक यष्टि उभारण्याची पद्धत भारतीयांनी परकी लोकांकडून घेतली[३] हे हीरानंद शास्त्रींचे मत बरोबर नाही. कारण मागे दाखविल्याप्रमाणे

---

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९६२ मधील संदर्भ पाहा.

२ *B. M. C.* (*Andhras*), p. 96.

३ *D. R. Bhandarkar Volume*, p. 175.

'मनुस्मृतीं'त (९, २८५) यष्टीचा उल्लेख आहे. अशा स्मारकयष्टींना जो इजा करील त्याला तेथे दंडाची शिक्षा सांगितली आहे.

**ओळ** **वाचन**[१]

**१ राज्ञो महाक्षत्रप[स्य] [स्वा]मिरुद्रसेनस्य**
**२ वर्षे १००[+*]२०[+*]२ वैशाख – बहुल – पञ्चम्यां**
**३ इमं(यं) शिलालष्टि [उत्थापिता*] वाणिजकस्य पुत्रेण**
**४ प्रतिजीवितं दत्तं [स्व]मित्रे हि जि(नि)जस्य [।*]**

**अनुवाद**

**राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रसेन** याच्या कारकीर्दीतील १२२ [या] वर्षी **वैशाख कृष्ण पंचमीस** ही शिलायष्टि उभारली. **वाणिजका**च्या पुत्राने आपल्या मित्राकरिता आपले जीवित अर्पण केले.

## क्रमांक ५७

# गढा येथील प्रथम रुद्रसेनाच्या काळचा शिलालेख : वर्ष १२७

हा लेख काठेवाडातील जसदनजवळच्या **गढा** या गावी एका तळ्याच्या काठावरील शिळेवर कोरलेला सापडला होता. तो सध्या राजकोट येथील वॉटसन संग्रहालयात ठेवला आहे. त्याचे पहिले वाचन भाऊ दाजींनी सन १८६८ मध्ये जर्नल ऑफ दि बाँबे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, व्हॉ. ८, पृ. २३४ इ. वर प्रथम केले. नंतर होर्नल, भगवानलाल इंद्रजी, रॅप्सन व दे. रा. भांडारकर यांनी त्याची चर्चा केली.[१] राखालदास बॅनर्जी व वि. स. सुखटणकर यांनी तो एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १६, पृ. २३६ इ. वर छापासह संपादिला. त्याच छापावरून त्याचे संपादन येथे केले आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी व भाषा संस्कृत-प्राकृत मिश्रित आहे.

**विवेचन** — या लेखाच्या आरंभी तत्कालीन राज्यकर्ता **रुद्रसेन** याच्या कारकीर्दीचे [शक] **वर्ष १२७,**[२] **भाद्रपद कृष्ण पंचमी** असा

१ ल्यूडर्सची यादी, क्रमांक ९६७ मधील संदर्भ पाहा.

२ या वर्ष-संख्येतील शेवटचे चिन्ह अनिश्चित आहे. ते कदाचित '६' चे द्योतक असेल. ल्यूडर्सची पूर्वोक्त यादी, क्रमांक ९६७ पाहा.

काळाचा उल्लेख आला आहे. तो रुद्रसेन राजा **महाक्षत्रप भद्रमुख स्वामी चष्टनाच्या पुत्राचा** प्रपौत्र, **राजा महाक्षत्रप भद्रमुख स्वामी रुद्रदामन्** याचा पौत्र आणि **राजा महाक्षत्रप स्वामी रुद्रसिंहाचा** पुत्र होता. यात दिवंगत महाक्षत्रपांना 'भद्रमुख' (मंगलवदन) असे विशेषण लावले आहे. कालिदासाच्या 'शाकुन्तल' नाटकात मारीचाश्रमातील तापसीने अज्ञात राजा दुष्यन्त याला उद्देशून बोलताना या विशेषणाचा उल्लेख केला आहे. इतरत्र मात्र हे विशेषण फारसे आढळत नाही.

प्रस्तुत लेखाचा उद्देश मानगोत्री **प्रताशकाचा** पुत्र **खरर्पत्थ** याचे हे 'शत्र'[१] (स्मारक) त्याच्या भावांनी उभारले असे नमूद करण्याचा दिसतो. शेवटी 'तो स्वर्गास जावो' अशी भावना व्यक्त केली असावी, पण 'स्वर्ग' शब्दाशिवाय ती व्यक्त करणारे शेवटल्या ओळीतील शब्द आता नष्ट झाले आहेत.

**ओळ** **वाचन**

**१ [व]र्षे १००[+*]२०[+*] ७ [भा]द्रपदबहुलस ५ [रा]ज्ञो महक्षत्रपस**

**२ भद्रमुखस स्वमचष्टनपुत्रप्रपौत्रस्य राज्ञो क्ष[त्र]पस**

**३ स्वामिजयदमपुत्रपौत्रस्य राज्ञो महक्षत्रपस्य भद्रमुखस्य**

**४ [स्व]मरुद्रदामपौत्रस्य राज्ञो महक्ष[त्र*]पस्य भद्रमुखस्य स्वम–**

**५ रुद्रसीह[पुत्र*]स्य राज्ञो महक्षत्रपस्य स्वामिरुद्रसेनस्य [।*] इदं शत्रं**

**६ मानसगोत्रस्य प्र[ता]शकपुत्रस्य खरर्पत्थस्य भ्रात्रभिः उत्थवि[तं] स्व[र्ग–]**

७ . . . . . . .

**अनुवाद**

**वर्ष १२७, भाद्रपद कृष्ण** ५ [या तिथीस] **राजा महाक्षत्रप भद्रमुख स्वामी चष्टनाच्या** पुत्राचा प्रपौत्र, **राजा क्षत्रप स्वामी जयदामन्** याच्या पुत्राचा पौत्र, **राजा महाक्षत्रप भद्रमुख स्वामी रुद्र-दामन्** याचा पौत्र, **भद्रमुख महाक्षत्रप स्वामी रुद्रसिंह** याचा पुत्र **राजा**

---

१ 'शत्र' शब्द कोशात सापडत नाही. भाऊ दाजींनी त्याचा अर्थ 'तळे', होर्नलने 'सोमयाग' किंवा 'दातृत्व', ल्यूडर्सने 'आसन' आणि राखालदास बॅनर्जींनी 'अन्नसत्र' असा केला आहे. पण हे अर्थ 'उत्थापित' या विशेषणाला जुळत नाहीत. येथे 'स्मारक-शिला' असा अर्थ विवक्षित दिसतो. तिला आता छत्री म्हणतात. यासारख्या इतर अनेक लेखांत स्मारकशिला (यष्टि) उभारल्याचे उल्लेख आढळले आहेत.

**महाक्षत्रप स्वामी रुद्रसेन** [याच्या कारकीर्दीत] हे शत्र (शिलास्मारक) मानगोत्री **प्रताशकाचा** पुत्र **खरपंथ** याच्या भावांनी उभारले आहे. [तो] स्वर्गास [जावो !]

## क्रमांक ५८

## ईंटवा येथील महाराज रुद्रसेनाची मृण्मय मुद्रा

जुनागड पासून तीन मैलांवरील जंगलात **ईंटवा** नामक टेकाड आहे तेथे पुष्कळ प्राचीन विटा सापडतात. म्हणून त्याला हे नाव मिळाले असावे. तेथे श्री. जी. व्ही. आचार्य यांनी केलेल्या उत्खननात ही मृण्मय मुद्रा सापडली होती. ती डॉ. बहादूरचंद छाबडा यांनी फोटोसह एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. २८, पृ. १७४-७५ वर प्रसिद्ध केली आहे. त्या फोटोवरून तिचे वाचन व विवेचन येथे केले आहे.

ही मुद्रा वाटोळी असून एक इंच व्यासाची आहे तिच्या मध्यभागी पर्वताची आकृति असून सभोवार लेख कोरला आहे. त्याचा आरंभ घडयाळाच्या तबकडीवरील तीन या आकडयाजवळ होतो.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा शुद्ध संस्कृत आहे. मुद्रेवरील लेख 'महाराज - रुद्रसेन – विहारे भिक्षुसंघस्य' (ही मुद्रा **महाराज – रुद्रसेन – विहारातील** भिक्षुसंघाची) असा आहे.

प्राचीन काळी कपडा, ताडपत्र वगैरेंवर ओल्या मातीचा गोळा ठेवून त्यावर अशा मुद्रा उमटवीत असत. बाणाच्या 'हर्षचरिता'त हर्षाने दिग्विजयाच्या आरंभी ग्रामदान करण्याच्या हेतूने हाती घेतलेली मुद्रा मातीच्या गोळयावरून निसटून ओल्या जागेवर खाली पडली आणि तिच्या योगे हर्षाच्या मुद्रेने पृथ्वी अंकित झाली असा प्रसंग वर्णिला आहे. अशा अनेक मृण्मय मुद्रा वैशाली, राजघाट वगैरे ठिकाणीं उत्खननात सापडल्या आहेत. तशी ही मुद्रा आहे. आतापर्यंत सापडलेल्या मुद्रांत ही सर्वांत प्राचीन असावी.

क्षत्रपांच्या वंशावळीत 'रुद्रसेन' नावाचे चार क्षत्रप होऊन गेले. प्रस्तुत मुद्रेची लिपी बरीच प्राचीन असल्याने तीत उल्लेखिलेला रुद्रसेन तन्नामक पहिला क्षत्रप असावा. तो रुद्रदामन्‌चा नातू होता. त्याच्या नाण्यांवरून तो सन १९९ ते २२२ या काळात राज्य करीत होता असे दिसते.

क्षत्रपांनी सामान्यतः 'राजन्', 'स्वामी' आणि 'क्षत्रप' किंवा 'महाक्षत्रप' अशा पदव्या घेतल्या होत्या. तेव्हा प्रस्तुत मुद्रेच्या रुद्रसेनाने

'महाराज' पदवी धारण केली होती हे उल्लेखनीय आहे. त्याने बहुधा स्वत:च्या नावे ईंटवा येथे विहार बांधवून तो बौद्ध भिक्षुसंघाला दिला असावा. प्रस्तुत मुद्रेतील शुद्ध संस्कृत भाषेवरून त्या विहारात महायान पंथाचे भिक्षु राहत होते असे दिसते.

## क्रमांक ५९

# लाठी येथील क्षत्रपांचा लेख

हा लेख सौराष्ट्रातील **लाठी** या गावी सापडला होता. तो आता मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियम मध्ये ठेवला आहे. त्याचा छाप *Chronology of Gujarat*, Plate XVII, B मध्ये दिला आहे.

हा लेख अत्यंत भग्न स्थितीत आहे. त्याची फक्त पहिली ओळ आणि दुसऱ्या ओळीतील एकच अक्षर आता वाचता येते. पहिल्या ओळीत महाक्षत्रपस [स्वामि]रुद्र – आणि दुसऱ्या ओळीत [स] एवढीच अक्षरे आता अवशिष्ट आहेत.

**लिपी व भाषा**——या लेखाची लिपी प्राचीन ब्राह्मी व भाषा प्राकृत आहे.

**विवेचन**——या लेखात ज्या **महाक्षत्रप स्वामी रुद्रसेनाचा** उल्लेख आहे तो महाक्षत्रप रुद्रदामन्चा नातू प्रथम रुद्रसेन असावा.

क्षत्रपांचे बहुतेक लेख कच्छ जिल्ह्यात – विशेषत: अन्धौ येथे – सापडले आहेत. प्रस्तुत लेख सौराष्ट्राच्या इतर भागात सापडला आहे म्हणून त्याला महत्त्व आहे. लेखाचा उद्देश सांगता येत नाही.

## क्रमांक ६०

# राजकोट येथील विजयसेनाच्या काळचा लेख : वर्ष १६२

हा लेख **राजकोट** येथे गुजराथचे पुरातत्त्वज्ञ जे. एम. नानावटी यांच्या ऑफीसात होता. त्याचा फोटो *Chronology of Gujarat*, Plate XVII, C मध्ये प्रथम छापला होता. नंतर डॉ. जमीनदार यांनी त्याचा फोटो छापून आपले वाचन प्रसिद्ध केले आहे.[१]

---

१ संबोधि, व्हॉ. ३, पृ. ७५.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ब्राह्मी आणि भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेख फक्त तीन ओळींचा आहे. त्यात आरंभी एका **महाक्षत्रपाचे** नाव आले होते, पण ते आता नष्ट झाले आहे. तथापि त्याच्या कारकीर्दीचे **१६२** हे वर्ष चिन्हांनी व शब्दांनी व्यक्त केले असल्याने[1] तो महाक्षत्रप विजयसेन असावा असे अनुमान करता येते. त्या वर्षी सिंहसेनाच्या पुत्राने[2] एक वापी (पायऱ्यांची विहीर) सर्व प्राण्यांच्या हिताकरिता प्रतिष्ठापित केली (खोदविली) असे म्हटले आहे.

**ओळ** **वाचन**[3]

**१ सिद्धम्[।*] राज्ञो महाक्षत्रपस्य [विजयसेन*]स्य वस्ये दसठत[रे]**
**२ शतमे**[4] **१००[+*]६०[+*]२ . . . . . . सिहसेनपुत्रस्य**
**३ सवसत्वहितसुखात्थं खेते वावी [प्रति]ष्ठापित [।*] फ[ल]मभिवर्द्ध-**
**[ताम्*] [।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! **राजा महाक्षत्रप** [विजयसेन] याचा एकशे **बासष्टाव्या – १६२ – वर्षी** . . . .[5] [याने] सिंहसेनपुत्राची ही शेतातील वापी सर्व प्राण्यांच्या हितसुखाकरिता खोदून पूर्ण केली. हिचे फल वृद्धिगत होवो!

## क्रमांक ६१

# मेवासा येथील भर्तृदामनच्या काळचा यष्टिलेख : वर्ष २०३

**[पट्टिका ३०]**

हा लेख कच्छ जिल्ह्यातील **मेवासा** गावी सन १८९८ मध्ये मुंबईच्या दिवाण बहादूर रणछोडभाई यांना आढळला. व्ही. जी. त्रिवेदी

---

१ डॉ. जमीनदार यांनी ही चिन्हे १०० [+*] ५ अशी वाचली आहेत. पण त्यांचे हे वाचन मागील 'दसठतरे शतमे' (द्विषष्टयुत्तर-शततमे) या प्राकृतातील शब्द-योजनेशी जुळत नाही.

२ हा सिंहसेन क्षत्रप कुळातील दिसत नाही. डॉ. जमीनदारांनी तसे मानले आहे, पण या क्षत्रप कुळात एकच सिंहसेन झाला. नाण्यांवरून तो शक संवत ३०४ मध्ये गादीवर होता. त्याच्या काळाशी प्रस्तुत लेखातील १६२ हे वर्ष जुळत नाही तेव्हा हा सिंहसेन कोणी सामान्य व्यक्ति असावा.

३ *Chronology of Gujarat*, Plate XVII, C वरून.

४ 'द्विषष्टयुत्तर-शततमे वर्षे' असे याचे संस्कृत रूपान्तर होईल.

५ या व्यक्तीचे नाव आता वाचता येत नाही.

आणि डी. बी. डिसकळकर यांनी वॉट्सन म्युझियमच्या सन १९२३-२४ च्या वार्षिक अहवालात तो प्रथम प्रसिद्ध केला. नंतर डिसकळकरांनी ऑल इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्सच्या पाचव्या अधिवेशनाच्या अहवालात (पृ. ५६५ इ.) तो पुनः प्रसिद्ध केला. अलीकडे सन १९६१ मध्ये ब्रतींद्रनाथ मुखर्जींनी इंग्लंडच्या जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी (१९६१), पृ. १०६ वर त्याची विस्तृत चर्चा केली आहे. तथापि त्यातील अनेक समस्यांचे निराकरण झाले नाही.

हा लेख २ फू. १ इं. उंच आणि वरील भागी १ फू. २ इं. आणि खालील भागी १ फू. ५ इं. अशा शिलाखंडावर कोरला आहे.

**लिपी व भाषा** — प्रस्तुत लेखाची लिपी ब्राह्मी आणि भाषा किंचित् अशुद्ध संस्कृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचे वाचन पुढे दिले आहे. त्याचा सरळ अर्थ लावल्यास अनेक समस्या उत्पन्न होतात. सकृद्दर्शनी त्यात असे म्हटलेले दिसते की **राजा महाक्षत्रप स्वामी चष्टन** याचा खापरपणतू (पुत्रप्रपौत्र) **राजा महाक्षत्रप भदिदम** (भर्तृदामन्) याचा खापरपणतू **राजा महाक्षत्रप** याच्या **१०३** या वर्षी (वर्षशत त्रिउत्रके) **श्वगनाचा** प्रपौत्र (पणतू) आणि **वपाचा** पुत्र आभीर हरिहोवकगोत्री **वसुराक** – जो **गुगनाचा** दौहित्र (मुलीचा मुलगा) आहे – त्याने पूर्वोक्त वर्षाच्या **कार्त्तिक शुक्ल सप्तमीस** आपला धनी **राज्येश्वर** (राज्याचा मालक) याची यष्टि (स्मारक-शिला) बसविली आणि एक भवनही बांधले.

वर प्रस्तुत लेखाचे शब्दशः भाषांतर दिले आहे. पण त्यामुळे अनेक समस्या उत्पन्न होतात. भर्तृदामन् हा चष्टनाचा खापरपणतू — म्हणजे त्याच्या नंतरच्या चौथ्या पिढीतील नसून सातव्या पिढीतील होता. त्याच्याही खापरपणतूच्या काळी ही यष्टि उभारली असे म्हटले आहे आणि त्या घटनेचे वर्ष १०३ हे दिले आहे. पण आश्चर्य असे की तत्कालीन क्षत्रपाचे नाव दिले नाही. आतापर्यंत कच्छमध्ये व इतरत्र अनेक यष्टिलेख सापडले आहेत. त्यांतील प्रत्येकात तत्कालीन क्षत्रपाचे नाव आले आहे. येथे मात्र त्याचे नाव आढळत नाही हे विलक्षण वाटते. येथे त्याच्या चष्टन व भर्तृदामन् या पूर्वजांची नावे आली आहेत, पण ज्या काळी ही यष्टि उभारली त्या काळच्या क्षत्रपाचे नाव दिले नाही, ही गोष्ट प्रथमच खटकते. दुसरे असे की यष्टि उभारली त्यावेळचे वर्ष १०३ दिले आहे ते इतर निर्देशांशी जुळत नाही. पश्चिमेच्या क्षत्रपांच्या लेखांतील व नाण्यांवरील वर्षे शक संवताची असतात या विषयी आता मुळीच संशय नाही. शक संवत् १०३ म्हणजे **ख्रिस्तोत्तर**

१८१–८२ होय. या वर्षी भर्तृदामन्‌चा खापरपणतू तर राहोच, पण स्वत: भर्तृदामन्‌ही झाला नव्हता. त्याच्या नाण्यांवरून त्याची कारकीर्द शक संवत्‌ २०१ ते २१७ (इ. स. २७९ ते २९५) अशी होती. तेव्हा पूर्वोक्त वर्षनिर्देश प्रस्तुत लेखातील इतर निर्देशांशी जुळत नाही. तिसरे असे की वसुराकाने आपला धनी राज्येश्वर (म्हणजे तत्कालीन राजा) याच्या नावे यष्टि उभारली असेल हे संभवनीय वाटत नाही. इतर यष्टिलेखांत आपल्या नातेवाइकाच्या नावे यष्टि उभारल्याचा उल्लेख आढळतो. अशा अनंत समस्या या लेखाचा सरळ अर्थ केला तर उत्पन्न होतात.

मुखर्जींनी आपल्या परीने या समस्या सोडविण्याचा प्रयत्न केला आहे. बहुतेक सर्व यष्टिलेखांत तत्कालीन क्षत्रपाची वंशावळ थेट चष्टनाशी भिडविलेली दिसते. तत्कालीन राजाचा चष्टनाशी संबंध जोडताना पुत्र, पौत्र, प्रपौत्र आणि पुत्र-प्रपौत्र असे नातेवाचक शब्द योजलेले आढळतात. पण भर्तृदामन्‌ हा चष्टनानंतरचा सातव्या पिढीतील क्षत्रप. त्याचा चष्टनाशी संबंध जोडण्यास पुत्र, पौत्र, प्रपौत्रांची दीर्घ लांबण लावावी लागणार; म्हणून या लेखाच्या लेखकाने 'पुत्रप्रपौत्र' एवढाच शब्द योजून तो संबंध दर्शविला आहे. तेव्हा त्या शब्दाचा अर्थ 'वंशज' असा घ्यावा असे डिसकळकर आणि मुखर्जी या दोघांनीही म्हटले आहे आणि ते मान्य होण्यासारखे आहे.

पण 'प्रस्तुत लेखात निर्देशिलेले १०३ हे वर्ष भर्तृदामन्‌च्या कारकीर्दीशी कसे जमवावयाचे?' यावर मुखर्जींचा तोडगा हा की ते वर्ष आभीर (पुढे कलचुरि–चेदि या नावाने प्रसिद्ध झालेल्या) संवताचे घ्यावे. म्हणजे ते इ. स. ३५२ चे द्योतक होईल. त्या काळी भर्तृदामन्‌चा वंशज तृतीय रुद्रसेन हा राज्य करीत होता. तेव्हा त्याच्या काळी ही यष्टि उभारली असे मानता येईल. पण 'क्षत्रपांच्या इतर सर्व लेखांत शक संवताचा उपयोग केला आहे. त्यात न आढळणाऱ्या आभीर संवताचा उपयोग प्रस्तुत लेखातच कसा केला?' असे विचारल्यास मुखर्जींचे उत्तर हे की ही यष्टि उभारणारा आभीर होता. म्हणून त्याने आपल्या लेखात आभीर संवताचे वर्ष उल्लेखिले असावे. हे सर्व वादाकरिता मान्य केले तरी प्रस्तुत लेखात तत्कालीन क्षत्रपाचे नाव कसे येत नाही हा प्रश्न राहतोच.

या लेखात चष्टन व भर्तृदामन्‌ या दोन क्षत्रपांचीच नावे आली आहेत. इतर कोणत्याही क्षत्रपाचे नाव आढळत नाही याचे कारण मुखर्जी असे सांगतात की चष्टन हा वंशकर्ता होता म्हणून त्याचे नाव

आणि भर्तृदामन्च्या कारकीर्दीत क्रांति होऊन रुद्रसिंह हा दुसऱ्या वंशातला राजा गादीवर आला म्हणून भर्तृदामन्चे नाव, अशी दोन क्षत्रपांचीच नावे प्रस्तुत लेखात दिली आहेत. नंतर पुनः क्रांति होऊन द्वितीय रुद्रदामन् याने गादी बळकावली. तो चष्टनवंशी होता हे दाखविण्याकरिता प्रस्तुत लेखातील वंशावळ चष्टनाशी भिडवली आहे.

मुखर्जींनी मोठ्या कुशलतेने आपले मत मांडले आहे खरे, पण ते पटत नाही. प्रस्तुत लेखाचा उद्देश तत्कालीन क्षत्रप चष्टनवंशी होता हे प्रतिपादण्याचा असणे शक्य नाही; कारण हा लेख एका खासगी व्यक्तीचा आहे. त्या व्यक्तीला हा राजकीय हेतु चिकटविणे योग्य होणार नाही. दुसरे असे की जो क्षत्रप चष्टनवंशी होता हे जाहीर करण्याकरिता हा लेख कोरविला असे मुखर्जी म्हणतात त्याचे नावच मुळी या लेखात येत नाही! इतर तत्कालीन कोरीव लेखांवरून असे दिसते की आभीरवंशी लोकांनीही कच्छ-सौराष्ट्रामध्ये शक संवताचाच उपयोग केला आहे, आभीर संवताचा नाही.[१] या सर्व कारणांमुळे मुखर्जींची उपपत्ति स्वीकारता येत नाही.

डिसकळकरांचाही अर्थ असाच आक्षेपार्ह आहे. ते ओळ ३–४ मध्ये 'वर्षशते व्युत्तरके' असे वाचून त्याचा अर्थ 'वर्ष ३००' असा करतात, ते असंभवनीय आहे. त्याचा अर्थ 'वर्ष १०३' असा होईल. शिवाय 'हा लेख शक वर्ष ३०० (सन ३७८) मध्ये राज्य करणाऱ्या तृतीय रुद्रसिंहाच्या काळचा आहे' असे ते मानतात. तसे असल्यास त्याचे नाव या लेखात का येत नाही हा प्रश्न उरतोच. तेव्हा त्यांचेही मत स्वीकरणीय नाही.

मग या लेखाचा अर्थ कसा लावावयाचा? त्याचे वाचन पुढे दिले आहे. त्याचे काळजीपूर्वक निरीक्षण केल्यास दुसऱ्या ओळीतील बहुतेक शब्द तिसऱ्या ओळीत त्याच क्रमाने आलेले दिसतील. लेखकाच्या अनवधानाने हे झाले असावे. एखाद्या मजकुराची नक्कल करताना कित्येकदा असे होते हे सर्वांस माहीत आहे. लेखकाच्या निष्काळजीपणामुळे कोरीव लेखांत चुका उत्पन्न होऊन अर्थाचा घोटाळा झाल्याची उदाहरणे आम्ही इतरत्र दाखविली आहेत[२] तसाच हा प्रकार आहे.

---

१ उदाहरणार्थ, गुंदा येथील प्रथम रुद्रसिंह याच्या काळचा शकवर्ष १०३ चा, आणि अन्धौ येथील त्याचाच लेख शकवर्ष ११४ चा, या आभीरांच्याच लेखांतील कालोल्लेख पाहा.

२ उदाहरणार्थ, क्रमांक ३७ मधील 'सिवखदनागसिरिय' आणि क्रमांक ३८ मधील 'कुशणमूल' पाहा.

तेव्हा प्रस्तुत लेखाचा आरंभीचा भाग पुढीलप्रमाणे असावा —

**राज्ञो महाक्षत्रपस्य स्वामिचष्टनपुत्रप्रपुत्रस्य राज्ञो महाक्षत्रपस्य भदिदमस्य वर्षशत[द्वये] त्र्युत्तरके —.**

'पुत्रप्रपुत्र' (संस्कृत, पुत्रप्रपौत्र) याचा अर्थ 'खापरपणतु' घ्यावयाचा नसून 'वंशज' असा घेतला पाहिजे हे सर्वांस मान्य आहे. प्रस्तुत लेखाच्या तिसऱ्या ओळीच्या शेवटी 'वर्षशत' असा शब्द स्पष्ट आहे. 'वर्षशते' असा नाही, त्याचा संबंध चौथ्या ओळीच्या आरंभी आलेल्या 'त्र्युत्तरके' या शब्दाशी लागू शकत नाही. या शिलेचा उजवीकडचा काही भाग फुटून गेलेला दिसतो. ती शिला खाली १ फूट ५ इंच रुंद आणि शीर्षभागी १ फूट २ इंच रुंद अशी आहे आणि 'वर्षशत' हा शब्द तिसऱ्या ओळीच्या शेवटी आला आहे, यावरून हे अनुमान समर्थित होते.[१] उजवीकडचा भाग फुटून नष्ट झाल्यामुळे 'वर्षशत'— नंतरची 'द्वये' अशी दोन अक्षरे आता वाचता येत नाहीत.[२] ती जोडल्यास 'वर्षशतद्वये त्र्युत्तरके' (वर्ष २०३) (सन २८१) असा या लेखातील कालोल्लेख होईल. त्या वर्षी प्रस्तुत लेखात उल्लेखिल्या-प्रमाणे भर्तृदामन् गादीवर होता; कारण त्याच्या नाण्यांवरून तो शक संवत् २०१ ते २१७ या कालखंडात राज्य करीत होता हे माहीत झाले आहे.

ही यष्टि आभीर वसुराकाने आपला धनी राज्येश्वर याच्या नावे उभारली होती. 'राज्येश्वर' पदाने 'भर्तृदामन्' विवक्षित नसून वसुराक ज्याच्या नोकरीत होता तो त्याचा मालक (भर्ता) घेतला पाहिजे.

प्रस्तुत लेखाचा अर्थ अश्या रीतीने लावल्यास कोणतीही समस्या उत्पन्न होत नाही.

---

१ ही यष्टि आता भूज येथील संग्रहालयात ठेवली आहे. त्या संग्रहालयाचे क्यूरेटर श्री. वैद्य यांनी त्या यष्टीचे फोटो मला पाठवले. त्यावरून ही गोष्ट माझ्या लक्षात आली. पहिल्या व दुसऱ्या ओळीच्या अखेरचे एक एक अक्षर कडा फुटल्यामुळे नष्ट झाले असावे. पुढील वाचन पाहा.

२ त्यातील पहिल्या अक्षरातील द् त्या ओळीच्या शेवटी दिसतो तो पाहा. या लेखाचे छाप माझ्या विनंतीवरून आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंटचे ॲडिशनल डायरेक्टर जनरल श्री. बी. के. थापर यांनी बडोदा येथील पुरातत्त्व खात्याच्या पश्चिमी मंडलाच्या अधीक्ष-कांना सांगितले व त्या मंडलाचे डॉ. मार्गबंधू यांनी भूज संग्रहालयातील या लेखाचे छाप मला पाठविले याबद्दल मी या सर्वांचा आभारी आहे.

प्रस्तुत कोरीव लेखावरील माझा सविस्तर लेख जर्नल ऑफ दि ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या व्हॉ. २८ मध्ये पृ. ५६–६२ वर प्रसिद्ध झाला आहे तो पाहा.

ओळ वाचन[1]

द्रि ! ष्टं

१ सिद्धम्[।*]राज्ञो महाक्षत्र(त्र)पस्य स्वामिचष्टन[स्य*][2]
२ पुत्रप्रपुत्रस्य राज्ञो महाक्षत्रपस्य भदिदम[स्य*][3]
३ पुत्रप्रपुत्रस्य राज्ञो महाक्षत्रपस्य वर्षशत[द्वये*][4]
४ त्रि-उत्रके (त्र्युत्तरे) वपपुत्रस्य श्वगनप्रपुत्रस्य आभिरस्य
५ हरिहोवकसगोत्रस्य वसुराकस्य गुगनदौहित्रस्य[5]
६ कार्तिं(र्त्ति)कस(स्य) सु दि ७ राज्येश्वरस्य [इ][यं*] भर्तु यट्टि प्रष्टापि-
७ ता[6] . . . . . . . . . . एकं भवनं च[।*]

अनुवाद

सिद्धि असो! **राजा महाक्षत्रप स्वामी चष्टन** याचा खापरपणतू **राजा महाक्षत्रप**[7] **भदिदम** (भर्तृदामन्) याच्या २०३ **या वर्षी कार्त्तिक शुक्ल ७** [या तिथीस] हरिहोवक–गोत्री आभीर **श्वगनाचा** नातू, **वपाचा** पुत्र आणि **गुगन** याच्या मुलीचा मुलगा **वसुराक** याने **राज्येश्वर** या आपल्या धन्याची ही यष्टि उभारली [आणि] एक भवन [बांधले].

---

१ छापावरून लेखाच्या आरंभी 'द्रि' आणि 'ष्टं' यांच्या मध्ये दीपाकृति हे मंगल चिन्ह आहे. 'दृष्टं' हा येथे मंगलवाचक शब्द दिसतो.

२ 'महाक्षत्रपस्य' या विशेषणावरून '–चष्टनस्य' असा मूळचा पाठ असून शेवटचे अक्षर शिलेची कडा फुटल्यामुळे नष्ट झाले असावे हे लक्षात येते. यासारखाच 'चाष्टनस्य प्र[पौ]त्रस्य' हा क्रमांक ५५, ओ. २ मधील पाठ पाहा.

३ येथे या बाजूची कडा फुटल्यामुळे हे अक्षर नष्ट झाले आहे.

४ येथे 'शत' याचा संबंध ओ. ४ मधील 'त्रि-उत्रके' याच्याशी लावता येत नाही. येथे 'द्वये' अशी दोन अक्षरे 'शत' नंतर नष्ट झालेली दिसतात. 'द्वये' मधील पहिल्या संयुक्त अक्षरातील द् त्या ओळीच्या शेवटी दिसतो तो पाहा.

५ डिसकळकरांनी 'गुत्थजधितुस्य' वाचले होते.

६ संस्कृत, 'भर्तुर्यष्टिः प्रतिष्ठापिता।'

७ येथे मुळातील द्विरुक्त शब्द गाळले आहेत.

# खंड तिसरा — विदर्भातील क्षत्रप-लेख

## क्रमांक ६२

## पौनी येथील रुपिअम्माचा छायास्तम्भ – लेख

[ पट्टिका ३, आकृति ३ ]

ज्यावर हा लेख कोरला आहे तो शिलाखंड भंडारा जिल्ह्यातील **पौनी** येथे सन १९५७ मध्ये मणिराम लांजेवार यांच्या शेतात खणताना सापडला होता. तो आम्ही एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. ३७, पृ. २०१ इ. वर संपादिला आहे. हा लेख आता नागपूरच्या मध्यवर्ति संग्रहालयात ठेवला आहे.

हा लेख ३० सें. मी. रुंद आणि ३० ते ५७ सें. मी. उंच अशा स्तंभाच्या तुकड्यावर कोरला आहे. यावर वरील भागी एक अर्ध-वर्तुळाकार अर्ध कमळ असून त्याच्या खाली दोन आडव्या रेषा आणि तीन ओळीतील प्रस्तुत लेख प्राचीन ब्राह्मी लिपीत कोरला आहे. पहिल्या दोन ओळी २९ सें. मी. लांब असून तिसरी फक्त ९ सें. मी. आहे.

**लिपी व भाषा** — या लेखाची लिपी ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाची ब्राह्मी असून भाषा प्राकृत आहे.

**विवेचन** — प्रस्तुत लेखाचा उद्देश तो ज्या शिलाखंडावर कोरल आहे तो **छायास्तम्भ** (प्रतिमायुक्त स्तंभ) **महाक्षत्रप कुमार रुपिअम्म** याचा आहे हे जाहीर करण्याचा होता. हा पश्चिम महाराष्ट्रातील चष्टन व नहपान यांसारखा तत्कालीन कुषाण सम्राटाने विदर्भ प्रांताव नेमलेला प्रांताधिपति असावा. महाक्षत्रप असताही त्याची 'कुमार' ह पदवी नागार्जुनकोंड येथील महासेनापति एली एहवलदास याला जश लावली आहे तशी दिसते. हा महाक्षत्रप चष्टन-नहपानासारखा शकवंश असावा; कारण रुपिअम्म हे नाम शक नावाला भारतीय रूप देऊ बनविलेले दिसते.

प्रस्तुत लेखावरून कुषाणांचे साम्राज्य दक्षिणेत पुणे व नाशि या जिल्ह्यांपुरते मर्यादित नसून ते विदर्भावरही पसरले होते असे स्प दिसते. किंबहुना, त्याने त्याच्याही पुढे दक्षिण कोसल (छत्तीसगड) व्याप होते असे कुषाणांच्या नाण्यांचे काही संचय त्या प्रदेशात सापड आहेत,[१] त्यावरून स्पष्ट दिसते.

---

१ *J. N. S. I.*, Volume XXXIII, pp. 1 f.

प्रस्तुत लेखातील छायास्तंभाचा उल्लेख सर्वांत प्राचीन आहे. यानंतर नागार्जुनकोंड येथील दोन लेखांत एली एहवलदास आणि राणी वम्मभटा यांच्या स्मरणार्थ छायास्तम्भ उभारल्याचा उल्लेख आहे.[१] छायास्तम्भावर संस्मरणीय व्यक्तीची आकृति असे हे वम्मभटेच्या स्तंभावर ती व तिच्या दोन दासी कोरल्या आहेत त्यांवरून स्पष्ट आहे. प्रस्तुत लेखाच्या शिलाखण्डावर मात्र तशी आकृति नाही. कदाचित् ती फुटून नष्ट झालेल्या भागावर होती असे असेल.

रुपिअम्म हा महाक्षत्रप असताही त्याला कुमार हे उपपद लावले आहे हे लक्षणीय आहे. अशा उल्लेखात कुमार याचा राजपुत्र असा अर्थ विवक्षित दिसत नाही. पूर्वी दाखविल्याप्रमाणे नागार्जुनकोंड येथील एका लेखात एका महासेनापतीलाही हे उपपद लावले आहे. 'कुमार' याने एखादे विशिष्ट राजकीय पद दाखविले जात असेल. या संबंधात 'कुमारामात्य' या संज्ञेचेही स्मरण होते.

**ओळ** **वाचन**

**१ सिधम्[।*]महखत्तव–कुमारस**
**२ रुपिअंमस छाया–**
**३ खम्भो[।*]**

**अनुवाद**

सिद्धि असो! [हा] **महाक्षत्रप कुमार रुपिअम्माचा छायास्तम्भ** [आहे.]

१ *Ep. Ind.* Vol. XXXIV, pp. 20 f.

परिशिष्ट पाचवे

# आणखी काही कोरीव लेख

## क्रमांक ६३

## दौलतपूर येथील चष्टनाच्या काळचा यष्टिलेख : वर्ष ६

[पट्टिका २८]

७५ सें. मी. उंच आणि २० सें. मी. रुंद अश्या एका शिला-यष्टीवर कोरलेला हा लेख कच्छ जिल्ह्यातील भूजच्या वायव्येस १०४ किलोमीटरवर असलेल्या **दौलतपूर** गावात तेथील सरपंच श्री. मुखीधनजी करसन पाटील यांच्या शेतात अलीकडे सापडला होता. तो डॉ. सौ. शोभना गोखले यांनी जर्नल ऑफ दि ओरिएंटल इन्स्टिटयूट; व्हॉ. १८ पृ. २३७ इ. वर दोन छापांसह प्रसिद्ध केला होता. त्या छापांपैकी पृ. २४४ समोरील छाप जास्त चांगला आहे.[1] पश्चिमी क्षत्रपांच्या कोरीव लेखांचा अभ्यास करताना या लेखाकडे माझे लक्ष गेले. त्याच्या वाचनाकरिता मला त्याच्या एका नव्या छापाची जरूरी भासली. तेव्हा माझ्या विनंतीवरून पुरावस्तु विभागाचे अतिरिक्त संचालक श्री. बी. के. थापर यांनी त्या विभागाच्या पश्चिमी शाखेचे अधीक्षक डॉ. मार्गबंधु यांना प्रस्तुत लेखाचे छाप पुरविण्याबद्दल सांगितले. डॉ. मार्गबंधूंनी आपले सहाय्यक डॉ. बी. एल. नागर्च यांना भूजला पाठवून या लेखाचे चांगले छाप काढविले आणि ते मला पाठविले. या सर्व अधिकाऱ्यांचा मी ऋणी आहे. ओरिएंटल इन्स्टिटयूटच्या पूर्वोक्त जर्नलमध्ये प्रसिद्ध झालेल्या व आता मिळालेल्या छापांवरून प्रस्तुत लेखाचे संपादन येथे केले आहे.

हा लेख सध्या तेरा ओळींचा आहे. तो ज्या यष्टीवर कोरला आहे तिचा काही शीर्ष भाग फुटून गेल्यामुळे आरंभीच्या दोन तीन ओळी आता नष्ट झाल्या आहेत.[2] डावी-उजवीकडचा भाग फुटलेला दिसत नाही. शेवटच्या दोन ओळी मात्र आता अस्पष्ट झाल्या आहेत. हा लेख घसीटच्या पद्धतीने लिहिल्यामुळे आणि आता तो खराब स्थितीत असल्यामुळे त्याचे वाचन व विवेचन कठीण झाले आहे.

---

१ पट्टिका २८ मध्ये दिलेला छाप त्या जर्नलमधील (पृ. २४४ समोरचा) आहे.

२ त्यातील अनुमानाने जुळविलेली अक्षरे पुढे दिली आहेत.

**लिपी व भाषा**—या लेखाची लिपी कुषाणकालीन ब्राह्मी आहे. पण त्याची अक्षरे घसीटचा पद्धतीने लिहिली असल्यामुळे ती कुषाण कालीन चष्टनाच्याच अन्धौ येथील लेखातल्याप्रमाणे चपटी व रुंद नाहीत. ती उभट दिसतात. या लेखातील 'त'ला गाठ नाही, पण 'न'ला आहे. 'प्रितिस्वामिने', ओ. ६, पाहा. 'य' हा त्रिभागात्मक आहे. '–गोत्राय', ओ. ५ पाहा. 'व' हे अक्षर उभट असून त्याचा खालचा भाग वाटोळा आहे. 'वराहदेव–', ओ. ९-१०, पाहा. ६ या संख्येचे चिन्ह ओ. २ मध्ये आले आहे.[१] या लेखाची भाषा क्षत्रपांच्या इतर अनेक लेखांतल्याप्रमाणे प्राकृतमिश्रित संस्कृत आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेख खराब स्थितीत असल्यामुळे त्याचे वाचन व विवेचन कठीण झाले आहे. श्रीमती गोखले यांच्या मते आर्यगोत्री द्युतिस्वामी याला दान देणाऱ्या सुदौसक्रस गोत्री जैत्राचा नातू आणि वराहदेवाचा पुत्र ईश्वरदेव[२] नामक आभीराने एक गोत्रयष्टि (आपल्या कुटुंबाच्या नावे स्मारकशिला) उभारल्याचा त्यात उल्लेख आहे. त्यांनी त्याचा चौथ्या ओळीतील कालनिर्देश [शक] संवत्सर २५४ (सन ३३२-३३३) असा वाचला आहे. सन ३३२ पूर्वी शक क्षत्रप यशोदामन् गादीवर होता, पण त्याचा प्रस्तुत लेखात निर्देश न येण्याचे कारण त्या काळी क्षत्रपांच्या राज्यात गृहकलह उफाळला होता. त्या काळी आभीर ईश्वरदेवाने क्षत्रपांच्या राज्याचा एखादा लचका तोडून तेथे आपला अंमल बसविला असावा, पण त्याची सत्ता स्थिर नसल्याने त्याला प्रस्तुत लेखात कोणतीही पदवी लावली नाही. ही यष्टि उभारताना त्याने साहजीकच त्या प्रदेशात चालू असलेल्या शक संवताचा उपयोग कालनिर्देशार्थ केला आहे, असे त्यांनी प्रतिपादिले आहे.

श्रीमती गोखले यांनी प्रस्तुत लेखाचे जे वाचन प्रसिद्ध केले आहे त्यावरून त्यांना त्याच्या पहिल्या तीन ओळी मुळीच लागल्या नव्हत्या असे दिसते; कारण, त्यांच्या त्या ओळींच्या वाचनाचा काहीच अर्थ होत नाही. त्यांनी चौथ्या ओळीत 'संवत्सर त्रि २५४' असा कालनिर्देश वाचला आहे. हे वाचनही बरोबर दिसत नाही. त्या ओळीत त्या काळाची द्योतक संख्याचिन्हे दिसत नाहीत. शिवाय त्या काळी शक संवताचा उल्लेख करताना 'वर्ष' शब्दाचा उपयोग केला जात असे. एकाही

---

१ ब्यूह्लरच्या भारतीय लिपिशास्त्रावरील जर्मन पुस्तकातील प्लेट ९ मधील ६ या संख्येची चिन्हे पाहा.

२ श्रीमती गोखले यांचे 'ईश्वरदेव' हे वाचन बरोबर दिसत नाही. त्यांनी वाचलेले 'ई' हे अक्षर 'ग' दिसते. आमचे येथील 'रेगरेश्वरदेव' हे वाचनही संशयातीत नाही.

लेखात त्याकरिता 'संवत्सर' शब्द योजिलेला आढळत नाही. श्रीमती गोखले यांनी या लेखाच्या पहिल्या चार ओळींतील महत्त्वाची माहिती —ओ. २ मध्ये आलेल्या सहा या वर्ष संख्येचा उल्लेख वगैरे— लक्षात घेतली नाही. म्हणून त्यांचे वाचन व विवेचन स्वीकारता येत नाही.

प्रस्तुत लेखाच्या पहिल्या अवशिष्ट ओळीत सुदैवाने अद्यापि शाबूत असलेली '—नस्य' ही दोन अक्षरे अत्यंत महत्त्वाची आहेत. ती 'चष्ट-नस्य' या राजनामाची अवशिष्ट अक्षरे आहेत. **चष्टन** हा माळवा व काठेवाड प्रदेशांवर दीर्घ काळ राज्य करणाऱ्या पश्चिमी क्षत्रपवंशाचा मूळ पुरुष होता, म्हणून त्या वंशातील क्षत्रपांच्या सर्व कोरीव लेखांतील वंशावळ त्याच्यापासून सुरू होत असलेली दिसते. यानंतरच्या २ ते ४ या ओळीतील शुद्ध वाचन 'राज्ये **वसे ६ गि[म्ह] दितिय मास दस वासरेत्रि(त्र) राज्ये**' असे आहे. त्याचा अर्थ '(चष्टनाच्या) राज्यकाळी वर्ष ६, ग्रीष्माच्या दुसऱ्या महिन्यातील दहाव्या दिवशी येथे या राज्यात' असा आहे. दुसऱ्या ओळीच्या शेवटी ६ या संख्येचे द्योतक चिन्ह सुस्पष्ट आहे. कुषाण काळच्या लेखांत सहा या संख्येचे द्योतक म्हणून ते अनेक ठिकाणी आढळते. शिवाय प्रस्तुत लेखातील कालनिर्देशाची पद्धत —वर्ष ऋतु, महिना व दिवस यांचा उल्लेख असलेली— तत्कालीन उत्तर भारतातील पद्धतीसारखी आहे.[१]

नंतर प्रस्तुत लेखात म्हटले आहे की 'ही यष्टि **सुदोतकाचा** पुत्र वसुगोत्री **प्रोतिस्वामी** याच्या स्मरणार्थ **जैत्रकाचा** नातू आणि **वराहदेवाचा** पुत्र **आभीर** [रेगरेश्वर]देव[२] याने सर्व कुटुंबाच्या कल्याणार्थ उभारली आहे.'

चष्टनाचा अलीकडे सापडलेला हा दुसरा कोरीव लेख आहे यापूर्वी त्याच्या कारकीर्दीतील अकराव्या (शक) वर्षाचा लेख अन्धौ येथे सापडला होता.[३] तोपर्यंत असे मानले जात होते की **गौतमीपुत्र** सातकर्णीने नहपान क्षत्रपाचा समूळ उच्छेद केल्यावर तत्कालीन कुषाण सम्राटाने माळवा—काठेवाडातील आपल्या राज्याच्या रक्षणार्थ चष्टनाला क्षत्रप म्हणून नियुक्त केले होते. अन्धौ लेखाच्या उपलब्धीमुळे ते मत आता अग्राह्य ठरले आहे. त्या लेखावरून असे स्पष्ट झाले आहे की (शक) वर्ष ११ मध्येच चष्टनाची क्षत्रप म्हणून नियुक्ति झाली होती

---

१ दक्षिण भारतीय कालनिर्देश पद्धतीत ऋतूतील माससंख्येच्या ऐवजी पक्षसंख्येचा उल्लेख असतो. माळवा–काठेवाडांत क्षत्रपांची सत्ता स्थिर झाल्यावर वर्ष, चैत्रादि चांद्रमास पक्ष व तिथि यांचा निर्देश कालोल्लेखांत होऊ लागला.

२ या व्यक्तिनामाचे वाचन संशयातीत नाही.

३ मागे क्र. ४५ पाहा.

प्रस्तुत लेखाने त्याचा राज्यारंभकाळ पाच वर्षांनी (शक संवत ६ मध्ये) मागे नेला जात आहे यात त्याचे महत्त्व आहे. त्या वेळी तो अगदी तरुण (विशीच्या आतील) असावा. कारण टॉलेमीने केलेल्या त्याच्या उल्लेखावरून तो सन १४० मध्ये उज्जैनीस राज्य करीत होता, हे माहीत झाले आहे.[१] त्या वेळी त्याचे वय पाउणशे वर्षांहून अधिक असावे. त्याने ५६ वर्षांहून अधिक काळ राज्य केलेले दिसते. शक संवत् ५२ च्या-पूर्वी वार्धक्यामुळे त्याने आपला नातू प्रथम रुद्रदामन् यास राज्यकार-भारात साहाय्य करण्याकरिता क्षत्रप नेमले होते. त्या दोघांच्या नावे शक वर्ष ५२ मध्ये कोरलेले अनेक लेख अन्धौ येथे सापडले आहेत.[२]

चष्टन हा कुषाण सम्राट् कनिष्क याचा जवळचा नातलग होता असे दिसते. म्हणून मथुरेजवळच्या माट या गावी उभारलेल्या देवकुलात कनिष्क, हुविष्क वगैरे कुषाण सम्राटांच्याप्रमाणे त्याचीही प्रतिमा स्थापन केली होती.[३] कनिष्काने कच्छ व काठेवाड हा प्रदेश जिंकल्यावर चष्टनाची त्या प्रदेशाचा क्षत्रप म्हणून नियुक्ति केली असावी. आरंभी त्याच्या अमलाखाली संपूर्ण काठेवाड नसावा. कारण त्यातील प्रभास तीर्थ नहपानाच्या अमलाखाली होते असे क्र. ४३ च्या लेखावरून दिसते. त्या लेखात नहपानाचा जामात ऋषभदत्त याने प्रभास येथे आठ ब्राह्मणांची लग्ने धर्मदाय रूपाने लावून दिल्याचा उल्लेख आहे.

**ओळ** **वाचन**

**१ . . नस्य[४] . .**
**२ राज्ये वसे ६ [गि] –**
**३ म्ह दितिय मास [द] –**
**४ स वासरेत्रि(त्र) राज्ये व –**
**५ सुसगोत्राय**
**६ प्रितिस्वामिने . व –**
**७ सुदोतकसुताय**
**८ . अभिरस्य[५] [जै] –**

---

१ Rapson, *B. M. C.* (*Andhras*), p. xxxix.

२ क्र. ४६–५९ पाहा.

३ *An. Rep. A. S. I.* 1911–12, p. 125.

४ 'चष्टनस्य' वाचावे. या पूर्वीच्या दोन तीन ओळीत 'सिधं [।*] य्सामोतिकपुत्रस्य क्षत्रपस्य' असे शब्द असावे.

५ 'आभीरस्य' वाचावे.

**९ त्रकपौत्रस्य व –**
**१० राहदेवपुत्रस्य**
**११ [रेगरेश्वर][1]देवस्य**
**१२ . . गोत्रहिताय**
**१३ [लठि] उथापित[।*]**

## अनुवाद

. . . **चष्टनाच्या**[2] राज्यकाळी **वर्ष** ६,[3] **ग्रीष्म** [ॠतु] **दुसरा महिना, दहावा दिवस** [या दिवशी] येथे [या] राज्यात ही यष्टि (स्मारक शिला) **जैत्रकाचा** नातू **वराहदेवाचा** पुत्र **आभीर [रेगरेश्वर]देव** याने वसुगोत्री **वसुदोतकाचा** पुत्र **प्रीतिस्वामी** याच्या स्मृत्यर्थ ही यष्टि [सर्व] कुटुंबाच्या कल्याणाकरिता उभारली.

## क्रमांक ६४

# मल्हारा येथील आदित्यराजाचा ताम्रपट

**[पट्टिका ४ – ७]**

हा ताम्रपट अमरावती जिल्ह्याच्या अचलपूर तालुक्यातील **मल्हारा** गावी श्री. महादेवराव बोरेकार यांच्या संग्रही होता. त्याचा एक पत्रा सन १९७४ मध्ये अचलपूरला विकण्यात आला होता. तो श्री. वि. प्र. रोडे यांनी विदर्भ संशोधन मंडळाच्या वार्षिक १९७४ मध्ये प्रसिद्ध केला. नंतर इतर पत्रे हळू हळू प्रकाशात आले. तेव्हा संपूर्ण ताम्रपट आम्ही विदर्भ संशोधन मंडळाच्या वार्षिक १९७६ मध्ये छापांसह संपादिला. सातवाहनांच्या इतिहासात त्याचे महत्त्व लक्षात घेऊन तो येथे दिला आहे.

या ताम्रपटाचे पाच पत्रे आहेत. त्यांना जोडणारी ९ सें. मी. व्यासाची तुटलेली कडी मिळाली आहे, पण तिला जोडलेली मुद्रा मात्र सापडली नाही. पहिल्या व शेवटल्या पत्र्यावर एका बाजूवर आणि इतर पत्र्यांच्या दोन्ही बाजूंवर लेख कोरला आहे. सर्व पत्रे वाकाटकांच्या

---

१ या नावाचे वाचन संशयातीत नाही.

२ नष्ट झालेल्या ओळीत चष्टनाची क्षत्रप पदवी आणि त्याचा पिता य्सामोतिक यांचा निर्देश आला असावा.

३ हे वर्ष शक संवताचे असून त्याचे समांतर ख्रिस्ती संवताचे वर्ष ८४-८५ हे येते.

ताम्रपटांच्या पत्र्यांपेक्षा पातळ व किंचित् लहान आकाराचे आहेत.[१] या पत्र्यांची लांबी १७·६ सें. मी. व रुंदी ९·७ सें. मी. आहे. सर्व पत्र्यांचे वजन ९०० ग्रॅम आहे.

**लिपी व भाषा** — प्रस्तुत लेखाची लिपी पेटिकाशीर्षक (box-headed characters) प्रकाराची असून अक्षरांचे वळण वाकाटकांच्या ताम्रपटांतल्याप्रमाणे आहे. १०, ५ व २ या संख्यांची चिन्हे शेवटच्या ओळीत आली आहेत. त्यांपैकी ५ या संख्येचे चिन्ह लक्षणीय आहे. भाषा संस्कृत आहे. फक्त शेवटल्या ओळीतील मिति प्राकृतात आहे. लेख गद्यपद्यमिश्रित आहे. शेवटी दोन शापाशीर्वादात्मक श्लोक आहेत. सर्व लेख सुंदर व शुद्ध संस्कृतात लिहिला आहे.

**विवेचन** — प्रस्तुत ताम्रपटाचा उद्देश **'मुण्ड'** वंशातील **आदित्यराज** नामक राजाने **वानखेट** येथे **'आंकिष्ठा'** नामक **'भोगा'तील** (तालुक्यातील) खालील गाव काही ब्राह्मणांना दान दिले हे नमूद करण्याचा होता. **महाग्राम,** दोन गावे मिळून झालेली **चिक्खलिका, आम्रकर्गातिका, लौहशलका, चिंचपल्लिका, निग्गोण्डिज्झार दहरकपटत्ता, आम्रकवाटक, शिंशपादिका,** आणि **बुज्जाटक** हे ते गाव होत. हे दान खालील अधिकाऱ्यांना कळविण्यांत आले होते :– **उपरिक**[२] **कुमारामात्य, दण्डपाशिक, चाट, भट, काष्ठिक, दूतप्रेषणिक** आणि **विनियुक्तक**. दान दिलेले ब्राह्मण येणेप्रमाणे – भारद्वाजगोत्री मातुलस्वामी, भट्टस्वामी, अग्निस्वामी, दित्यस्वामी, द्रोणस्वामी, नन्नस्वामी, सूर्यस्वामी, कालिशर्मा इत्यादि. हे दान देण्याचा उद्देश दात्याला व त्याच्या मातापित्यांना पुण्याची व कीर्तीची प्राप्ति व्हावी हा होता. शेवटच्या ओळीत ताम्रपटाची **मिति सव्व २,**

---

१ हा ताम्रपट वाकाटकपूर्वकालीन आहे याचे हे एक गमक आहे. प्राचीन ताम्रपटांचे पत्रे कालानुसार उत्तरोत्तर जाड व जास्त जास्त लांब रुंद होत गेले. सं. मु. सर ७, पृ. ५२ वरील तळटीपेत दिलेली प्राचीन ताम्रपटांच्या पत्र्यांची लांबी रुंदी पाहा.

२ अधिकाऱ्यांच्या या संज्ञा अनेक प्राचीन लेखांत आढळतात. पण त्यांच्या अर्थाबद्दल ऐकमत्य नाही. बंगाल प्रदेशातील दामोदरपुर येथे सापडलेल्या कुमारगुप्तकालीन ताम्रपटांवरून असे दिसते की उपरिक हा कुमारामात्यांची नियुक्ति करीत असे. तेव्हा तो त्यांच्यापेक्षा वरिष्ठ अधिकारी (प्रांताधिपतीच्या दर्जाचा) असावा. बृहस्पतिस्मृतीत त्याचा उल्लेख आला आहे. याज्ञवल्क्य स्मृतीवरील (१.३०७) बालक्रीडा टीकेत त्याच्या अपेक्षित गुणांचे वर्णन करताना 'दाक्षिण्यचारित्ररक्षणार्थमधिकरणसन्दिग्धविवेककृदुपरिक:' असे त्याचे लक्षण आले आहे. त्यावरून न्यायदानाचे कामही त्याच्याकडे असावे. (*E.I.*, XXIV, p. 134). चाट आणि भट हे सध्याचे पोलिस शिपाई व सैनिक यांसारखे दिसतात. फोगेलने 'चंबा संस्थानात या नावाचे अधिकारी अजूनही आढळतात ; चाट म्हणजे 'परगण्याचा मुख्य अधिकारी' आणि भट म्हणजे 'त्याच्या हाताखालचा अधिकारी' अश्या त्या संज्ञा आहेत' असे म्हटले आहे. (*Antiquities of Chambā*, part i, pp. 130 f.)

**गिम्ह प २, दिव १०[+*] ५** (संवत्सर २, ग्रीष्म पक्ष २, दिवस १५) अशी दिली आहे. ती प्राकृत भाषेत आहे.

प्रस्तुत ताम्रपटावरील लेखाचा आरंभ मंगलचिन्ह ('सिद्धम्'चे वाचक) आणि 'नमः पुरुषोत्तमाय' (पुरुषोत्तमाला नमस्कार असो!) यांनी झाला आहे. त्यानंतर दात्याची वंशावळ पुढीलप्रमाणे दिली आहे– परमभागवत (भगवान् विष्णूचा निष्ठावंत उपासक) असलेल्या आणि अश्वमेध यज्ञ करणाऱ्या **मुण्ड**वंशामध्ये जन्मलेला भारद्वाजगोत्री, चारी वेदांच्या अध्ययनात आनंद मानणारा **सोम** नामक ब्राह्मण होऊन गेला. त्याच्या विषयी म्हटले आहे की, ब्रह्मदेवाने आपल्या चार मुखांनी ज्या चार वेदांचे पठन केले त्या वेदांचे अध्ययन आपल्या एकाच मुखाने केल्यावरही त्याला गर्व[1] झाला नव्हता. त्यानंतर त्याच्या पायांचे चिंतन करणारा त्याचा पुत्र, आपल्या वंशाचे वर्धन करणारा, **वर्धन** नामक होऊन गेला. त्याच्या विषयी म्हटले आहे की, यमनियमांच्या अनुष्ठानात सदैव व्यापृत असणे, सच्छीलत्त्व, विद्वत्त्व, अतिथींविषयी प्रेम आणि तपश्चर्या हे त्या उदात्त मनोवृत्तीच्या वर्धनाचे अत्यंत खडतर व श्रेष्ठ असे सदैव पालन केले जाणारे व्रत होते. त्यानंतर त्याच्या पायांचे चिंतन करणारा आणि कोणतेही दान कधीही न स्वीकारणारा (अप्रतिग्राहक) असा त्याचा पुत्र **मुण्ड** होऊन गेला. त्याचा हात दानस्वीकाराने कधीही विटाळला नव्हता. तो सदैव व्रतस्थ आणि यज्ञानुष्ठानार्थ दीक्षित असे. म्हणून त्याच्या यज्ञांमध्ये संतुष्ट झालेला इंद्र स्वर्गातून धनाची मोठी धारा ओतत असे.

पुढे म्हटले आहे की, या मुण्ड ब्राह्मणाचे नाव त्याच्या सत्कर्मांमुळे लोकांमध्ये अत्यंत आदरणीय आणि वंशाला प्रतिष्ठा मिळवून देणारे असे असल्यामुळे त्याचे वंशज अद्यापि ते मोठ्या अभिमानाने धारण करतात. या वर्णनावरून मुण्ड हा या वंशातला आरंभीचा ज्ञात पूर्वज नसताही त्याचे नाव या वंशाला कसे प्राप्त झाले याचा उलगडा होतो.

आतापर्यंत निर्दिष्ट केलेल्या या वंशातील तीन्ही ब्राह्मणांनी कधी राजपदाचा उपभोग घेतल्याचा उल्लेख नाही. ते सर्व धार्मिक, व्रतनिष्ठ, यज्ञानुष्ठानात सदैव व्यापृत असणारे, निःस्पृह, वेदवेत्ते ब्राह्मण होते. यानंतरच्या मुण्डपुत्र **राष्ट्रमहाराजाने** आपल्या गुणांनी राजपद मिळविले असे म्हटले आहे ; पण ते कोणत्या परिस्थितीत, हे सांगितले नाही.

---

१ 'विस्मय' याचा येथे 'गर्व' असा अर्थ आहे. भासाच्या 'दूतवाक्या'तील (अंक १) 'आनीयतां स विहगवाहनमात्रविस्मितो देवः।' हे कृष्णासंबंधी दुर्योधनाचे शब्द पाहा.

त्यानंतर त्याचा पुत्र **राजकुलमहाराज** याने युद्धरूपी अग्नीमध्ये आपल्या शत्रूंच्या जीवितांची आहुति दिली असे वर्णन आले आहे त्यावरून त्याने समरांगणावर मोठे विजय मिळविले होते असे दिसते. त्याचा पुत्र **आदित्यराज** याचे वर्णन तो सुवर्णकमलाप्रमाणे गौरवर्ण, चंद्राप्रमाणे सर्वजनांच्या नयनांना आनंद देणारा, पराक्रमात राम, अंवरीष व सगर यांसारखा होता, असे ठरीव ठशाचे आहे. त्याने प्रस्तुत ताम्रपट आपल्या कारकीर्दीच्या दुसऱ्याच वर्षी दिला होता हे पूर्वी सांगितले आहे.

हा मुण्डवंश केव्हा राज्य करीत होता याचा आता विचार करू. त्याच्या प्राचीनत्वाची प्रमाणे ही —– (१) त्याचे वर्णन 'अश्वमेध-याजी' असे प्रस्तुत ताम्रपटात केले आहे. तेव्हा यातील राजांनी निदान एक तरी अश्वमेध यज्ञ केला असावा. पण वाकाटककालानंतर लौकरच अश्वमेध यज्ञ प्रचारातून गेले. वाकाटक कालात हे घराणे विदर्भात राज्य करीत असणे शक्य नाही. वाकाटकांनंतर अनुक्रमे विष्णुकुंडी, कलचुरि आणि बादामीचे चालुक्य यांची सत्ता विदर्भावर होती. त्या काळात हा वंश विदर्भात सत्तेवर असणे असंभवनीय आहे.[१] त्याचा उदय वाकाटकांच्या पूर्वीच झाला असला पाहिजे.

(२) प्रस्तुत ताम्रपटाची मिति **'ऋतुमिति'** (Season-date) स्वरूपाची आहे. ऋतुमिति सामान्यत: वाकाटकपूर्वकाळात प्रचलित होत्या. वाकाटकांच्या फक्त तीन[२] ताम्रपटांत ऋतुमितींचा उपयोग केला आहे. तेव्हा हा ताम्रपट वाकाटकोत्तरकालीन असणे संभवनीय नाही.

---

१ अलीकडे एका विद्वानाने हा मुंडवंश वाकाटकोत्तर काळात बादामीच्या चालुक्यांच्या काळापूर्वी राज्य करीत असावा असे सुचविले आहे. पण ते असंभवनीय आहे. वाकाटक हरिषेणानंतर विष्णुकुंडी प्रथम माधववर्म्याचे राज्य विदर्भावर पसरले. त्याचे निधन सन ५२८ मध्ये झाले. नंतर कलचुरि कृष्णराजाने पश्चिम महाराष्ट्र सन ५३३ मध्ये जिंकला. त्याने विदर्भ सन ५४० मध्ये जिंकला असावा. त्याचा मांडलिक स्वामिराज आभीर वर्ष ३२२ (सन ५७३) मध्ये विदर्भात राज्य करीत होता. सन ५२८ ते ५४० या १२ वर्षांच्या कालावधीत हे मुंड राजघराणे राज्य करीत असणे शक्य नाही. स्वामिराजानंतर बादामीच्या चालुक्यांच्या विदर्भावर आक्रमणाच्या पूर्वीही (सन ६३४ च्या पूर्वी) ते झाले असणे शक्य नाही. कारण तसे असते तर त्याच्या ताम्रपटाची मिति राज्यकालाच्या वर्षांत न देता विदर्भात तत्पूर्वी चालू असलेल्या आभीर संवतात दिली असती. त्या काळात महाराष्ट्र-विदर्भातील एकाही लेखात राज्यकालाच्या वर्षाचा (regnal date चा) उल्लेख नाही. तेव्हा हे घराणे वाकाटकपूर्वकालीन होते यात संशय नाही. याविषयी सविस्तर विवेचन विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७८ मध्ये पाहा.

२ ते ताम्रपट असे: (१) द्वितीय विन्ध्यशक्तीचा वाशीम ताम्रपट ; (२) द्वितीय प्रवरसेनाचा दुदिया ताम्रपट ; (३) हरिषेणाचा थाळनेर ताम्रपट (अप्रकाशित). द्वितीय प्रवरसेनाच्या पांढुरणा ताम्रपटातही तिचा उपयोग केला आहे पण तो ताम्रपट बनावट आहे.

(३) प्रस्तुत ताम्रपटातील कालनिर्देश प्राकृतात आहे. हा ताम्रपट कोणा विद्वान् ब्राह्मणाकडून लिहवून घेऊन कालनिर्देश घालण्याकरिता सचिवालयाकडे पाठविण्यात आला असावा. तेथे त्याची प्राकृत मिति घालण्यात आली असे दिसते. वाकाटक कालापासून प्राकृतचा उपयोग राजशासनातून नाहीसा झाला. तेव्हा हे दानपत्र वाकाटकपूर्वकालीन असावे.

पण यावर एक आक्षेप संभवतो. हा ताम्रपट वाकाटकपूर्वकालीन असल्यास यात उपरिक, कुमारामात्य, दण्डपाशिक, दूतप्रेषणिक अशा गुप्तकाळात प्रचलित झालेल्या संज्ञा कशा आढळतात? या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण नाही. प्रस्तुत ताम्रपट एका विद्वान् ब्राह्मण राजवंशाचा आहे हे आपण ध्यानात घेतले पाहिजे. त्यावरील लेख एखाद्या विद्वान् ब्राह्मणाकडूनच तयार करवून घेतला असला पाहिजे. म्हणून या संज्ञा संस्कृतात आहेत. अशा संज्ञा इतर वाकाटकपूर्वकालीन ताम्रपटांत आढळत नाहीत याचे कारण इतक्या प्राचीन काळचे इतके विस्तृत ताम्रपट अद्यापि आपणांस सापडले नाहीत. या संज्ञा गुप्त सम्राटांनी प्रथम प्रचारात आणल्या असे मानण्यास आधार नाही. संस्कृत भाषेचा उपयोग गुप्तपूर्वकालीन खानदेशातील महाराज स्वामिदासाच्या आभीर संवत् ६७ (सन ३१७) या इंदूर ताम्रपटातही आढळतो. तेव्हा हा ताम्रपट वाकाटकपूर्वकालीन होय याविषयी संशय राहत नाही.

सातवाहनांचा अस्त ख्रिस्तोत्तर २३० च्या सुमारास झाला. त्यानंतर देशात सर्वत्र अंदाधुंदी माजून दक्षिण भारतात आभीरादि राजवंश उदयास आले. विदर्भातील बेबंदशाहीस आळा घालण्याकरिता हा मुण्डवंश पुढे सरसावला असावा. या वंशाचे प्रारंभीचे पुरुष धार्मिक, सच्छील, विद्वान्, व्रतस्थ व यज्ञानुष्ठानी होते. पण देशात बंडाळी माजून धार्मिक जीवन अशक्य झालेले पाहून मुण्डपुत्राने स्रुवा (यज्ञातील पळी) टाकून देऊन तरवार घेतली असे दिसते. त्याने विदर्भात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित केली आणि राष्ट्रमहाराज हे सार्थ नाव धारण केले. प्रस्तुत ताम्रपटात 'त्याने स्वगुणाने राजपदवी प्राप्त करून घेतली' असे म्हटले आहे. त्याचा हाच अर्थ दिसतो. त्याचा पुत्र राजकुलमहाराज याने युद्ध–यज्ञात शत्रूंच्या आहुति दिल्याचे वर्णन आहे. त्यानेच बहुधा अश्वमेध यज्ञ करून विदर्भात सर्वत्र आपला दरारा वसविला असावा. आदित्यराज हा त्याचा पुत्र. तो सन २७० च्या सुमारास गादीवर आला असावा. त्यानंतर लौकरच वाकाटकवंशोत्पादक प्रथम विंध्यशक्ति

याचा पुत्र प्रथम प्रवरसेन याने दक्षिणेतून येऊन त्याचा उच्छेद केला आणि वाकाटक वंशाचे राज्य विदर्भात स्थापले असे दिसते.[१]

**स्थलनिश्चय** — आदित्यराजाने हा ताम्रपट **वानखेटा**तून दिला होता. ती त्याची राजधानी असावी. हे वानखेट जवळच्या अकोला जिल्ह्यातील वानखेडपुर असावे. **महाग्राम** हे अकोला तालुक्यातील महागाव दिसते. **चिक्खलिका** हे अमरावती तालुक्यातील चिखली असावे. **आम्रगर्तिका** अमरावती जिल्ह्याच्या मेळघाट तालुक्यातील आमझिरी असेल. **लौह-शलका** हे अमरावती तालुक्यातील लोहगाव दिसते. **चिञ्चपल्लिका** गावाचे सध्याचे नाव चिंचोली झाले असावे. त्या नावाची दोन गावे – चिंचोली खुर्द आणि चिंचोली ब्रुद्रुक अशी – अचलपुर तालुक्यात आहेत. **निग्गोण्डिज्झार, दहरकपटत्ता, आम्रकवाटक, शिंशपादिका** आणि **बुज्जाटक** यांना जुळणारी नावे विदर्भाच्या ग्रामनामावलीत आढळत नाहीत. दान दिलेली गावे ज्यात होती तो **आंकिष्ठा** भोग अकोला जिल्ह्याचा आकोट तालुका असावा.[२]

**ओळ** **वाचन**[३]

पहिला पत्रा

१ **सिद्धम्[४] ।। नमःपुरुषोत्तमाय ।। स्वस्ति वानखेटात् [।*]**
२ **परमभागवतोश्वमेधयाजिनां मुण्डपु –**
३ **त्राणाम् भारद्वाजसगोत्रः चतुर्व्वेदा –**
४ **नन्दिसोमः ।। चतुर्भिश्चतुरो**
५ **वेदान्वक्त्रै[:*] ब्रह्मा जगाद यान्[।*]तानधीत्यै –**
६ **कवक्त्रेण यो न विस्मयमागतः[५] [।। १ ।।*]**

दुसरा पत्रा : पहिली बाजू

७ **तस्य पुत्रस्तत्पादानुद्ध्यातः स्ववङश(वंश) –**
८ **वर्द्धनो वर्द्धणो(नो) नाम ।। यमनियम –**
९ **रतत्वमार्य्यवृत्तिः श्रुतम –**
१० **तिथिप्रियता तपस्विता च[।*]**
११ **अभवदतिसुदुष्करं हि तस्य**

---

१ सर्व वाकाटक ताम्रपटांत तसेच पुराणांतही प्रवरसेनालाच विदर्भातील वाकाटक राज्याचा संस्थापक मानले आहे.

२ या ताम्रपटाचे सविस्तर विवेचन आमच्या 'संशोधन मुक्तावलि' सर ७, पृ. ५०–६६ वर पाहावे.

३ मूळ ताम्रपटावरून. ४ चिन्हाने प्रदर्शित. ५ वृत्त-अनुष्टुभ्.

### दुसरा पत्रा : दुसरी बाजू

१२ व्रतमिदमार्य्यमतेऽपरं सदैव[1] ।।[२ ।।*]
१३ तस्य पुत्रस्तत्पादानुद्ध्यातः अप्रति –
१४ ग्राहको मुण्डः ।। प्रतिग्रहादिग्ध –
१५ करस्य यस्य । नित्यव्रतस्यापि हि
१६ दीक्षितस्य । यज्ञे वसोर्व्वासवतुष्ट (ष्टि) मुक्ता
१७ पपात धारा त्रिदिवादनल्पा[2] ।।[३ ।।*].

### तिसरा पत्रा : पहिली बाजू

१८ चिह्नं लोकविशेषशंसि सुमहत्सक (त्क) र्म्मलब्धास्प –
१९ दम् । श्लाघ्यं रत्नमिव प्रजाबहुमतं वङश (वंश) प्रति –
२० ष्ठाकरम् [।*] यस्याद्यापि वहन्ति नाम कुलजा दिक्षु
२१ प्रकाशं गुणैः श्रीवत्सं भुजगा इवोन्नत –
२२ फणाः प्रोन्नामितैर्मूर्द्धभिः[3] ।। [४ ।।*] तस्य पुत्रः (त्र) –
२३ स्तत्पादानुद्ध्यातः स्वगुणोपार्ज्जितराज –
२४ शब्दः श्रीराष्ट्रमहाराजः [।*] तस्य पुत्रः.

### तिसरा पत्रा : दुसरी बाजू

२५ तत्पादानुद्ध्यातः श्रीराजकुलमहाराजः
२६ येन कुन्तानलज्वाले । वैरारणिसमुद्भवे ।
२७ यशोमलान्यमित्राणां हुतान्यायूंषि
२८ संयुगे[4] ।। [५ ।।*] तस्यात्मज_ कनकपङकज –
२९ राशिगौरः कान्त्या शशीव जगतो नयनाभि –
३० रामः [।*] रामाम्बरीषसगरप्रतिमप्रभावः ।
३१ आदित्यराज इति विश्रुतनामधेय[5] [ः ।।६ ।।*] यज्ञ [रा] जानुज्ञा [तः*].

### चौथा पत्रा : पहिली बाजू

३२ स आदित्यराज_×कुशली ।। आङकिष्ठाभोगवासिनः
३३ समुपागतानुपरिककुमारामात्यदण्डपाशिक –
३४ चाटभटकाष्ठी (ष्ठि) कदूतप्रेषणिकविनियुक्तका –

---

१ वृत्त-पुष्पिताग्रा.
२ वृत्त-उपजाति.
३ वृत्त-शार्दूलविक्रीडित.
४ वृत्त-अनुष्टुभ्.
५ वृत्त-वसन्ततिलका.

३५ दीन् सम्बोधयत्यस्तु व[ः*] संविदितम्[।*]
३६ भारद्वाजसगोत्राय मातुलस्वामिने
३७ भट्टस्वाम्यग्निस्वामिदित्यस्वामिद्रोणस्वामि –

चौथा पत्रा : दुसरी बाजू

३८ नन्नस्वामिशू(सू)र्य्यस्वामिकालिशर्म्मप्रभृ –
३९ तिभ्यश्च ब्राह्मणेभ्यः महाग्रामः चिक्खल्लि –
४० काद्वयम्।। आम्रकर्गत्तिका लौहश –
४१ लका। चिञ्चपल्लिका। निग्गोण्डिज्झारम्।
४२ दहरपटत्ता।। अ(आ)म्रवाटक।। शिङश(शिंश) –
४३ पादिका। बुज्जाटकञ्चेति।। मातापित्रो[ः]

पाचवा पत्रा

४४ आत्मनश्च पुण्ययशोभिवृद्धये। उदकपूर्व्वे–
४५ ण ग्रामा दत्ताः।। बहुभिर्व्वसुधा भुक्ता।
४६ राजभिस्सगरादिभिः[।*]यस्य यस्य यदा
४७ भूमिस्तस्य तस्य तदा फलम्[१]।।[७।।*]षष्टि –
४८ वर्षसहस्राणि। स्वर्ग्गे मोदति भूमिदः[।*]
४९ आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसे[त्*]।। [८।।*]
५० सव्व २ गिम्ह प २ दिव १०[+*]५।।

**अनुवाद**

(ओ. १–४) सिद्धि असो! पुरुषोत्तमाला नमस्कार.

स्वस्ति. **वानखेटाहून** [हा ताम्रपट दिला आहे.]

[पूर्वी] अश्वमेध यज्ञ करणाऱ्या **मुण्ड**वंशीयांमध्ये भगवंताचा (विष्णूचा) अत्यंत निष्ठावान् उपासक, भारद्वाजगोत्री, चारी वेदांच्या पठनात आनंद मानणारा **सोम** [नामक ब्राह्मण] होऊन गेला.

[श्लोक १] ब्रह्मदेव आपल्या चार मुखांनी जे चार वेद म्हणता झाला त्यांचे पठन आपल्या एकाच मुखाने करूनही तो [सोम] गर्विष्ठ झाला नाही.

(ओ. ७–८) त्याच्या पायांचे चिंतन करणारा त्याचा पुत्र स्ववंशाचे वर्धन करणारा **वर्धन** नामक [होता.]

---

१ या व पुढील श्लोकाचे वृत्त-अनुष्टुभ्.

(श्लोक २) यमनियमांत [सदैव] व्यापृत असणे, सदाचार विद्वत्त्व, अतिथींविषयी प्रेम आणि तपश्चर्या – हे त्या सद्बुद्धिमान [वर्धनाचे] अत्यंत दुष्कर असे सदैव चालणारे व्रत होते.

(ओ. १३–१४) त्याच्या पायांचे चिंतन करणारा [आणि] [कधीही] दान न स्वीकारणारा त्याचा पुत्र **मुण्ड** [नामक] [होऊन गेला.]

(श्लोक ३) दानस्वीकाराने ज्याचा हात कधीही विटाळला नव्हता, जो नेहमी व्रतनिष्ठ आणि यज्ञानुष्ठानार्थ दीक्षित असे त्या [मुण्ड ब्राह्मणाच्या] यज्ञांमध्ये संतुष्ट झालेल्या इंद्राने ओतलेली धनाची मोठी वृष्टि स्वर्गातून पडत असे.

(श्लोक ४) ज्याप्रमाणे नाग आपल्या फणा उंच करून भगवान् विष्णूला [आपल्या देहावर] धारण करतात त्याप्रमाणे [त्या मुण्डाचे] वंशज त्याचे नाव – जे या जगात विशेष गुणांचे द्योतक आहे, जे थोर अशा सत्कर्मांच्यामुळे प्रसिद्ध झाले आहे, जे प्रजाजनांनी प्रशंसिले आहे, जे त्या वंशाला प्रतिष्ठा मिळवून देणारे आहे, जे गुणांमुळे सर्व दिशांत प्रसिद्धि पावले आहे ते नाव – आपली मान उंच करून अद्यापि रत्नाप्रमाणे धारण करतात.

(ओ. २२–२५) त्याच्या पायांचे चितंन करणारा – ज्याने आपल्या गुणांनी राजपदवी मिळविली होती असा – त्याचा पुत्र श्री**राष्ट्रमहाराज** [होऊन गेला.]

त्याच्या पायांचे चिन्तन करणारा त्याचा पुत्र **राजकुलमहाराज** [नामक] [होता]–

(श्लोक ५) ज्याने [योद्धयांचे] भाले हेच ज्याच्या ज्वाळा आहेत [आणि] वैररूपी अरणींतून ज्याची उत्पत्ति होते त्या युद्धरूपी अग्नीत शत्रूंच्या कीर्तिधवल जीवितांचा होम केला.

(श्लोक ६) त्याचा पुत्र **आदित्यराज** या नावाने विख्यात आहे. तो सुवर्णकमलांच्या गुच्छांप्रमाणे गौरवर्ण आहे; तो आपल्या कान्तीने चंद्राप्रमाणे सर्व जगाच्या नेत्रांना आनंद देतो आणि ज्याचा प्रताप राम, अम्वरीष आणि सगर यांच्या सारखा आहे —

(ओ. ३२–४५) तो **आदित्यराज** कुशल असून यज्ञराजाच्या अनुज्ञेने [येथे] जमलेल्या **आंकिष्ठा** – भोग (विभाग) वासी **उपरिक, कुमारामात्य, दण्डपाशिक, चाट, भट, काष्ठिक, दूतप्रेषणिक, विनियुक्तक** आदि [सेवकांना] कळवितो – "तुम्हांला हे माहीत असावे की – भारद्वाज गोत्री **मातुलस्वामी, भट्टस्वामी, दित्यस्वामी, द्रोणस्वामी, नन्नस्वामी,**

**सूर्यस्वामी, कालिशर्मा** प्रभृति ब्राह्मणांना **महाग्राम,** दोन **चिक्खलिका** गाव, **आम्रकर्यातिका, लौहशलका, चिंचपल्लिका, निग्गोण्डिज्झार, दहरकपटत्ता, आम्रवाटक, शिंशपादिका** आणि **बुज्जाटक** [हे] गाव आम्ही आपल्या मातापित्यांच्या आणि स्वतःच्या पुण्य आणि कीर्ति यांच्या वृद्धीकरिता उदक सोडून [दान] दिले.

(श्लोक ७) सगर आदिकरून अनेक राजांनी पृथ्वीचा उपभोग घेतला. ज्याची ज्या काळी पृथ्वी असेल त्याला त्या काळी भूमिदानाचे फळ मिळते.

(श्लोक ८) भूमिदान करणारा स्वर्गात साठ हजार वर्षे आनंदाचा उपभोग घेतो. जो [दान दिलेली] भूमि काढून घेतो आणि जो त्या कृत्याला अनुमति देतो, तो तितकीच वर्षे नरकात राहतो.

(ओ. ५०) **संवत्सर** २, **ग्रीष्म पक्ष** २, **दिवस** १५.

### क्रमांक ६५

## देवनी मोरी येथील रुद्रसेनाच्या काळचा करंडक – लेख : [आभीर] संवत् १२७

गुजराथेतील साबरकांठा जिल्ह्यातील शामलाजी गावाजवळ **देवनी मोरी** येथे महाराज सयाजीराव विश्वविद्यालयाच्या पुरातत्त्व विभागाने सन १९६२ मध्ये केलेल्या उत्खननात एका मोठ्या स्तूपात ७ इंच व्यासाचा आणि ५ इंच उंचीचा दगडी करंडक सापडला होता. त्यात रेशमी वस्त्राच्या लहान पिशव्यांत काही अवशेष, एका लहान सोन्याची उंच डबी आणि थोडी राख आढळली. या करंडकावर दोन कोरीव लेख आहेत. त्याच्या झाकणावर भगवान् बुद्धाचे 'प्रतीत्यसमुत्पादा'-संबंधी वचन कोरले आहे. दुसरा लेख ऐतिहासिक महत्त्वाचा आहे. तो करंडकाच्या बाजूवर सभोवार तीन ओळींत आणि त्याच्या तळाच्या बाहेरील बाजूवर दोन ओळींत कोरला आहे. या लेखात उल्लेखिलेले **वर्ष** १२७ हे शक संवत्सराचे मानून त्यात निर्दिष्ट केलेला राजा रुद्रसेन हा चष्टनाचा वंशज होय असे मत या लेखाचे संपादक आर्. एन्. मेहता आणि एस्. एन्. चौधरी यांनी प्रतिपादिले होते.[१] ते चूक असून ते वर्ष आभीर संवताचे आहे हे पुढे दाखविले आहे. म्हणून या लेखाचा

---

१ *J. O. I.*, XII, p. 174.

अन्तर्भाव क्षत्रपांच्या लेखांत न करता त्याची चर्चा परिशिष्टात केली आहे.

**लिपी आणि भाषा**—या लेखाची लिपी ब्राह्मी आणि भाषा संस्कृत आहे. तो बहुतांशी शुद्ध रीतीने लिहिला व कोरला आहे.

**विवेचन**—प्रस्तुत लेखाचा उद्देश **कथिक**–वंशी **रुद्रसेन** राजाच्या कारकीर्दीत **[संवत्सर] १२७, भाद्रपद पंचमीस** अग्निवर्मन् आणि सुदर्शन नामक भिक्षूंनी महाविहाराजवळ हा महास्तूप उभारला, हे नमूद करण्याचा होता. या कामावर **पाशान्तिक** आणि **पड्ड** या शाक्य भिक्षूंची देखरेख होती. भगवान् बुद्धाचे शरीरावयव ज्यात आहेत असा हा दगडी करंडक **सेनपुत्र वराहाने** येथील फरसबंदी जमिनीत स्थापन केला. भगवान् बुद्धाच्या कृपेची आकांक्षा करणारा विख्यात **महासेन** भिक्षु ह्याने धर्म आणि संघ यांच्या वृद्धीकरिता हा [करंडक] करविला.

पूर्वोक्त संपादकांनी प्रस्तुत लेखांतील १२७ हे वर्ष शक संवताचे मानून त्यात उल्लेखिलेला राजा रुद्रसेन हा पश्चिमी क्षत्रप चष्टनाचा वंशज प्रथम रुद्रसेन असावा असे प्रतिपादिले. त्याने सन २०० ते २२० या काळात राज्य केले असल्यामुळे या लेखातील वर्ष शक १२७ (सन २०५) हे त्याच्या कारकीर्दीत पडते असे त्यांनी म्हटले आहे.

पण हे प्रतिपादन बरोबर नाही. या लेखाची अक्षरवटिका ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या आरंभाइतकी प्राचीन दिसत नाही ती त्रैकूटक राजा दह्लसेन याच्या आभीर संवत् २०७ (सन ४५७)च्या पार्डी ताम्रपटाच्या अक्षरवटिकेशी जुळते.[1] शिवाय ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या आरंभीचे बहुतेक सर्व लेख संस्कृतात नसून प्राकृतात आहेत. तसेच प्रस्तुत लेखातील रुद्रसेन चष्टनवंशी असता तर त्याची क्षत्रप किंवा महाक्षत्रप पदवी त्यात उल्लेखिली असती. आणखी एक प्रबळ प्रमाण हे की चष्टन वंशाचे 'कार्दमक' हे नाव कान्हेरी येथील क्रमांक २५ च्या लेखावरून ज्ञात झाले आहे. प्रस्तुत लेखातील रुद्रसेन हा त्या वंशातील नसून 'कथिक' वंशातील होता. तेव्हा तो चष्टनाचा असणे शक्य नाही.[2]

पुराणांतील वंशावळीवरून असे समजते की अंध्रांच्या (सातवाहनांच्या) अस्तानंतर आभीर राजे उदयास आले. दहा आभीर

---

१ C. *I. I.*, IV, pp. 22 f.

२ देवनी मोरी येथील उत्खननात गौतम बुद्धाच्या प्रतिमा सापडल्या आहेत. ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या आरंभी कोरलेल्या नाशिक, कार्ले, कान्हेरी वगैरेतील लेण्यांत बुद्धाच्या प्रतिमा आढळत नाहीत.

राजांनी १६० वर्षे[१] राज्य केले असे पुराणे सांगतात, पण त्यांची नावे देत नाहीत. प्रस्तुत लेखातील रुद्रसेन हा आभीरवंशी असावा. आभीर राजा शिवदत्तपुत्र ईश्वरसेन याने स्थापिलेला आभीर संवत् उत्तर कोकण, पश्चिम महाराष्ट्र, दक्षिण गुजराथ आणि मध्य भारताचा नेमाड जिल्हा यांत काही शतके प्रचलित होता.[२] रुद्रसेनाचा प्रस्तुत लेख आभीर संवत् १२७ (सन ३७६–७७) चा दिसतो. त्याची मिति आवश्यक त्या वारनक्षत्रादिकांच्या अभावी पडताळून पाहता येत नाही. याच्या कालाविषयी विस्तृत विवेचन आमच्या 'संशोधन मुक्तावली': सर ९, पृ. २२–३४ वर पाहा.

प्रस्तुत लेखात कार्माजवळच्या पाशान्तिक नामक पल्लीचा उल्लेख आहे असे मेहता - चौधरींनी म्हटले होते आणि पाशान्तिक हे शामलाजीचे प्राचीन नाव आहे असे प्रतिपादिले होते. पण त्यांचे वाचन व अर्थ दोन्ही चूक आहेत. या लेखात कोणत्याही स्थलाचा उल्लेख नाही.

**ओळ** **वाचन**[३]

**[करंडकाच्या बाजूवर सभोवार]**

१ **नमस्सर्व्वज्ञाय ।। ज्ञानानुकम्पाकारुण्यप्रभावविषये नमः [।*] सम्यक्-संबुद्धसूर्य्याय परवादितमोनुदे**[४] **।।[१ ।।*] सप्तांविशत्यधिके**[५] **कथिक-नृपाणां समागतेब्दशते [।*].**

२ **भ(भा)द्रपदपंचमदिने नृपतौ श्रीरुद्रसेने च**[६] **[।। २ ।। *] कृत**[७]**मवनिकेतु-भूतं महाविहाराश्रये महास्तूपं(पम्) [।*]सत्वा[त्वा]नेकानुग्रहनिरताभ्यां शाक्यभिक्षुभ्यां(भ्याम्) [।। ३ ।। *]**

---

१ पुराणातील पाठ 'सप्तषष्टिस्तु वर्षाणि (किंवा सप्तषष्टिं च वर्षाणि) दशाभीरास्तथैव च (किंवा दशाभीरास्ततो नृपाः)' बरोबर दिसत नाहीत. कारण दहा आभीरांचा काळ ६७ वर्षे मानल्यास एका राजवटीचा सरासरीचा राज्यकाळ ६·७ वर्षे येतो, तो असंभवनीय वाटतो. वायुपुराणाच्या एका प्रतीत 'सप्तषष्टिशतानीह' असा पाठ आहे. त्यात उल्लेखिलेली १६७ ही वर्षसंख्या जास्त संभवनीय आहे. *C. I. I.*, IV, p. xxvi पाहा.

२ यानंतरच्या त्रैकूटक व गुर्जर राजवंशांच्या कोरीव लेखांत आभीर संवताचाच उपयोग केला आहे.

३ जर्नल ऑफ दि ओरिएंटल इन्स्टिटयूट, व्हॉ. १२, पृ. १७६ व १७७ मधील प्लेटीवरून.

४ वृत्त-अनुष्टुभ्. ५ 'सप्तविंशत्यधिके' असे पाहिजे. वृत्ताकरिता बदल केला आहे.

६ श्लोक २ ते ६ चे वृत्त—आर्या.

७ 'कृतः' व 'स्तूपः' अशी शुद्ध रूपे वृत्ताकरिता बदलली आहेत.

३ साध्वग्निवर्म्मनाम्ना सुदर्शनेन च विमुक्तरंध्रेण[।*]कार्म्मान्तिकौ च पाशान्तिक[पड्डौ] शाक्यभिक्षुकावत्र ।।[४ ।।*] दशबलशरीरनिलय-श्शुभशैलमयस्स्वयं वराहेण [।*]

[करंडकाच्या तळाच्या बाहेरच्या बाजूवर]

४ कुट्टिम[गतः] क्रि(कृ)तोयं समुद्गकस्सेनपुत्रेण ।।[५*]महसेन[१] भिक्षु-रस्य च कारयिता विश्रुतः समुद्गस्य[।*]
५ सुगतप्रसादकामो वृद्ध्यर्थंन्धर्म्मसङघाभ्यां(भ्याम्) ।।[६ ।। *].

## अनुवाद

[ओ. १] सर्वज्ञाला (बुद्धाला) नमस्कार असो!

(श्लो. १) ज्ञान, अनुकम्पा, कारुण्य आणि प्रभाव यांनी युक्त अशा [आणि] विरोधी वादिरूपी अंधकार नष्ट करणाऱ्या, सम्यग्ज्ञानयुक्त सूर्याला नमस्कार असो!

(श्लो. २) **एकशे – सत्तावीसाव्या वर्षी भाद्रपद पंचमीस कथिक** राजवंशातील **श्रीरुद्रसेन** राज्य करीत असता –

(श्लो. ३–४) अनेक प्राण्यांवर अनुग्रह करण्यात तत्पर असा सच्चरित **अग्निवर्मा** आणि दोषरहित **सुदर्शन** या [दोन] बौद्ध भिक्षूंनी महाविहाराजवळ [सर्व] पृथ्वीला ललामभूत असा [एक] महास्तूप निर्माण केला. **पाशान्तिक** आणि **पड्ड** हे बौद्ध भिक्षु या कामावर देखरेख करीत होते.

(श्लो. ५) **सेनाचा** पुत्र **वराह** याने स्वतः मंगल प्रस्तराचा बनविलेला, बुद्धाच्या शरीराचे अवशेष धारण करणारा हा करंडक स्तूपाच्या फरसबंदी जमिनीत ठेवला.

(श्लो. ६) बुद्धाच्या प्रसादाची कामना करणारा विख्यात **महासेन-**भिक्षु याने धर्म आणि संघ यांच्या वृद्धीकरिता हा करंडक करविला.

---

१ खरे नाव 'महासेन' असावे.

परिशिष्ट सहावे

# ‘कुशणमूल’वर टिप्पण

प्राचीन कोरीव लेखांत काही अश्या संज्ञा आहेत की त्यांचा निश्चित अर्थ आतापर्यंत ध्यानात आला नाही. ‘कुशणमूल’ ही अशा प्रकारची एक संज्ञा आहे. तिच्या अर्थाचे विवरण प्रस्तुत परिशिष्टात करावयाचे आहे.

‘कुशणमूल’ ही संज्ञा नाशिक येथील क्र. १० च्या लेण्यातील शक उषवदाताच्या (ऋषभदत्ताच्या) वर्ष ४१, ४२ आणि ४५ च्या एकाच लेखात फक्त दोनदा आलेली माहीत आहे. ते उतारे असे[१] —

**ओळ १ व २** — दत चानेन अक्षयनिवि काहापण – सहस्रानि त्रिनि ३००० संघस चातुदिसस ये इमस्मि लेणे वसंतानं भविसति चिवरिक – कुशणमूले च।

**ओळ ३** — ‘एतो चिवरिक-सहस्रानि बे २००० ये पडिके सते [।*] एतो मम लेणे वसवुथान भिखुनं वीसाय एकीकस चिवरिक बारसक [।*] य सहस्रप्रयुतं पायून – पडिकशते अतो कुशणमूल[२] [।*]

या लेखातील पहिल्या उताऱ्यात उषवदात सांगतो की (नाशिक येथील) माझ्या लेण्यात पावसाळ्यात राहणाऱ्या भिक्षूंच्या चीवरिक आणि कुशणमूल यांकरिता मी (गोवर्धन) येथील व्यापाऱ्यांच्या श्रेणीत (मंडळात) तीन हजार कार्षापण (व्याजाने) ठेव म्हणून ठेवले आहेत. दुसऱ्या उताऱ्यात तो सांगतो की या तीन हजार कार्षापणांच्या ठेवींपैकी दोन हजार कार्षापण (दर माहा)[३] दर शेकडा एक पडिक व्याजाच्या दराने भिक्षूंच्या चीवरांकरिता (वस्त्रांकरिता) ठेव म्हणून ठेवले आहेत. या ठेवीवरील व्याज (२४० पडिक किंवा कार्षापण) येईल. त्यातून वीस भिक्षूंना प्रत्येकी १२ कार्षापण चीवरांकरिता द्यावे. राहिलेल्या १००० कार्षापणांची ठेव (दर माहा) दर शेकडा पाऊण पडिक या व्याजाच्या दराने ठेवली आहे. तिचे व्याज (९० पडिक[४] किंवा कार्षापण) येईल. त्याचा उपयोग (भिक्षूंच्या) कुशणमूलाकरिता करावा.

---

१ क्र. ३८ पाहा.

२ सेनार्टच्या वाचनात तिसऱ्या ओळीच्या शेवटी ‘कुशन’ असा पाठ आहे. तेथीलही शुद्ध वाचन ‘कुशण’ असेच आहे.

३ सेनार्टने दाखविल्याप्रमाणे हा व्याजाचा दर मासिक आहे.

४ ब्यूह्लर व सेनार्ट यांना दुसऱ्या ठेवीवरील व्याज ७५ पडिक किंवा कार्षापण वाटले, पण ते चूक आहे. त्या मासिक व्याजाच्या दराने १०० कार्षापणांचे वार्षिक व्याज ९ कार्षापण होईल. अर्थातच १००० कार्षापणांवर ते ९० होईल, ७५ नव्हे. दे. रा. भांडारकरांनी ते व्याज बरोबर दिले आहे.

यातील पहिल्या, २००० कार्षापणांच्या, ठेवीवरील व्याजाच्या विनियोगाबद्दलचा आदेश सहज समजतो. ते व्याज २४० पडिक किंवा कार्षापण येईल. ते २० भिक्षूंना प्रत्येकी बारा कार्षापण, असे चीवरांकरिता द्यावयाचे असे. पण दुसऱ्या १००० कार्षापणांच्या ठेवीवर दर माहा दर शेकडा पाऊण पडिक किंवा कार्षापण या दराने जे ९० कार्षापणांचे व्याज येईल त्यांचा उपयोग कुशणमूलाकरिता करावयाचा होता. पण त्या 'कुशणमूला'च्या अर्थाविषयी विद्वानांनी विविध मते व्यक्त केली आहेत. भगवानलाल इंद्रजींनी त्याचे तीन अर्थ सुचविले – (१) कु + अशन=भिक्षूंना दिले जाणारे जाडे भरडे अन्न ; (२) कु + असन=भिक्षूंचे आसन; किंवा (३) कुसण=भिक्षूंचे पानपात्र. पण यांतील एकही अर्थ समाधानकारक नाही. सामान्यतः भिक्षूंनी आपले अन्न भिक्षा मागून मिळवावयाचे असे. त्यांच्या आसनाकरिता किंवा पानपात्राकरिता दरवर्षी इतकी रक्कम लागली नसती. ब्यूह्लरने या शब्दाचा कोणताच अर्थ सुचविला नाही. सेनार्टने या संदर्भात कान्हेरी येथील चार लेखांकडे लक्ष वेधले आहे.[1] त्यांमध्ये भिक्षूंना चीवरांकरिता १२ कार्षापण आणि ऋतुकालात (किरकोळ खर्चाकरिता) एक कार्षापण देण्याची योजना केली आहे. एका लेखात ह्या ऋतुकालाला गिम्हकाल (उन्हाळा) म्हटले आहे. पण स्वतः सेनार्टला हा एक कार्षपणाचा विनियोग समाधानकारक वाटेना. कारण भिक्षूंना आपले अन्न भिक्षा मागून मिळवावयाचे असे, आणि त्यांनी पैशाला स्पर्श करावयाचा नसे.[2] शिवाय, यात आणखी एक अडचण सेनार्टपुढे उभी राहिली. १००० कार्षापणांवरील व्याज ७५ कार्षापण येईल असे त्याला ब्यूह्लरप्रमाणे वाटले. ते ७५ कार्षापण २० भिक्षूंमध्ये दर माहा एक कार्षापण याप्रमाणे ४ महिने कसे वाटावयाचे ? यावर त्याने अशी तोड सुचविली की नाशिक येथे भिक्षूंचा वस्सो (लेण्यात पावसाळच्यातील अवस्थान) चार महिन्यांचा नसून कमी काळाचा असावा. पण हे स्पष्टीकरणही समाधानकारक वाटत नाही. डॉ. देवदत्तपंत भांडारकरांनी या उताऱ्याचा निराळाच अर्थ सुचविला. त्यांनी म्हटले आहे की, "ह्या ९० कार्षापणांना कुशणमूल (कुशणांचे मूल्य) म्हटले आहे. इतर लेण्यांतील लेखांमध्ये या सारख्याच संज्ञांचा विचार करता मला असे निश्चितपणे वाटते की या उताऱ्यात कुशण हे लेण्यांतील इतर उताऱ्यांत उल्लेखिलेल्या पडिका(प्रतिका)प्रमाणे एक नाणे असावे. यापुढे जाऊन मला असेही

---

१ त्याचे क्र. १५, १८, २१ आणि २८ हे लेख (आ. स. ऑ. वे. इं., व्हॉ. ५) पाहा.
२ ए. इं., व्हॉ. ८, पृ. ८३.

वाटते की, हे कुशण नहपान क्षत्रपाचे चांदीचे नाणे या अर्थी योजिले असावे. ते नाणे त्याने प्रथम कडफीसस या कुषाण स्वामीकरिता पाडले असल्याने त्याला हे नाव पडले असावे. उषवदाताने १००० कार्षापणांची ठेव एका श्रेणीमध्ये ठेवली होती. तिचे व्याज ९० कार्षापण येत असे. त्याचा विनियोग त्या लेण्यातील २० भिक्षूंना पावसाळ्यातील चार महिन्यांत प्रत्येकी एक कुशण देऊन करावयाचा असे. त्याकरिता ८० कुशण लागत. ते ९० कार्षापणांच्या बदली घेता येत. तेव्हा या दोन नाण्यांचे विनिमय प्रमाण ८ : ९ असे असे." हे स्पष्टीकरणही समाधानकारक नाही. पूर्वोक्त उताऱ्यात 'प्रत्येक भिक्षूला एक कुशण द्यावयाचा' असा उल्लेख नाही. शिवाय नहपानाच्या काळच्या लेखात 'कार्षापण'[१] आणि 'सुवर्ण'[२] अशा दोनच नाण्यांचे उल्लेख आहेत. त्यांपैकी पहिल्याने त्याचे स्वत:चे चांदीचे नाणे आणि दुसऱ्याने त्याच्या राज्यात प्रचलित असलेले त्याच्या कुषाणवंशी स्वामीचे सोन्याचे नाणे विवक्षित असावे. 'कुशणा'चा नाणे म्हणून कोठेच उल्लेख आढळत नाही.

दिनेशचंद्र सरकारनी 'कुशण' याचा अर्थ 'कृशान्न' (किरकोळ अन्न) असा केला आहे.[३] उषवदाताने आपल्या लेण्यात राहणाऱ्या भिक्षूंच्या भोजनाची निराळी व्यवस्था केली होती. खालील उतारा पाहा —

एतो मम लेणे वसतानं चातुदीसस भिखुसघस मुखाहारो भविसति। (क्र. ४३, ओ. ४–५). तेव्हा त्यानंतर त्यांच्याकरिता कृशान्नाची निराळी व्यवस्था करण्याची जरूरी नव्हती.

आतापर्यंत दिलेले कोणतेही स्पष्टीकरण समाधानकारक नसल्यामुळे आम्ही एक नवीन सुचवितो. 'कुशणमूल' हे बहुतकरून 'कुशलमूल' याबद्दल चुकीने कोरले असावे. लेख कोरणारे पाथरवट व तांबट पुष्कळदा विलक्षण चुका करीत असत.[४] आम्ही पुढे दाखविणार आहों की,

१ क्र. ३८, ओ. १–३.

२ क्र. ४३, ओ. १.

३ *Select Inscriptions* (First Ed.), p. 159.

४ उदाहरणार्थ, पुळुमावीच्या नाशिकच्या लेण्यातील लेखामधील 'नवनरस्वामि' पाहा. (क्र. १९, ओ. १) तेथील शुद्ध पाठ 'नवनगरस्वामि' असाच असला पाहिजे. 'नवनरस्वामि' याचा 'नुकताच गादीवर आलेला राजा' असा अर्थ तेथे असणे शक्य नाही. कारण तो लेख पुळुमावीच्या राजवटीच्या २२ व्या वर्षी कोरला होता. ही चूक 'कुशणमूल' सारखी अद्यापि सुधारली नाही. दुसरे उदाहरण ऋद्धपूर येथील नलवंशी भवदत्तवर्म्याच्या नावाचे. ए. इं., व्हॉ. १९, पृ. १०० इ. वर ते भवत्तवर्मा असे आले आहे. तेच त्याचे खरे नाव समजले जात होते. पण एडेंगा येथील नलांच्या नाणकसंचयावरून त्या राजाचे शुद्ध नाव 'भवदत्तवर्मन्' होते असे आम्ही दाखविल्यावर ती चूक सुधारण्यात आली. ज. न्यू. सो. इं., व्हॉ. १, पृ. २९ इ. पाहा.

त्यासारखा 'कुशलमूल' हा शब्द या काळच्या आणि नंतरच्याही कोरीव लेखांत किंचित् निराळ्या अर्थाने आढळतो. 'कुशलमूल' म्हणजे 'आरोग्याचे मूळ' किंवा 'औषध' होय. बौद्ध भिक्षूंना तीन वस्तूंची गरज असे -- (१) वर्षाऋतूत निवाऱ्याची सोय, (२) वस्त्रे, आणि (३) आजारी पडल्यास औषध. त्यांच्या वर्षाऋतूतील निवासाकरिता लेणी खोदविली असत. कान्हेरी, नाशिक वगैरे ठिकाणच्या लेखांवरून त्यांच्या चीवरांकरिता कार्षापणांच्या मोठमोठ्या रकमा व्याजाने लावल्या असत. आता राहिले त्यांचे औषधपाणी. त्याकरिताही तजवीज केलेली काही लेखांत आढळते. उदाहरणार्थ, आभीर नृपति ईश्वरसेन याच्या नाशिकच्या लेण्यातील एका लेखात विष्णुदत्ता नामक उपासिकेने भिक्षूंच्या 'गिलान-भेषजार्थ' (आजाऱ्यांच्या औषधाकरिता) काही ठेव ठेवल्याचा उल्लेख आहे.[१] त्याच हेतूने उषवदातानेही प्रस्तुत लेखातली दुसरी १००० कार्षापणांची ठेव (दर माहा) दर शेकडा पाऊण या व्याजाच्या दराने ठेवली होती. त्याने वरील व्याजाचे कार्षापण भिक्षूंमध्ये वाटण्याची योजना ठरविली नव्हती; कारण, कोणा भिक्षूला त्याची जरूर लागणार नाही तर कोणाला जास्त कार्षापण लागतील.

तेव्हा 'कुशलमूल' हा शुद्ध शब्द असून त्याऐवजी कोरक्याच्या चुकी-मुळे 'कुशणमूल' असे कोरले गेले असावे. 'कुशणमूल' हा शब्द इतर कोठेही आढळत नाही, पण 'कुशलमूल' मात्र अनेक लेखांत येतो हे आता दाखवितो.

स्टेन कोनो याने संपादिलेल्या 'खरोष्ठी कोरीव लेखां'त 'कुशलमूल' तीन ठिकाणी आढळते.[२] ते उतारे आणि त्यांचे मराठी भाषांतर खाली दिले आहे :--

(१) माणिकिआला येथील शिलालेख (कॉ. इ. इं., व्हॉ. २, १, पृ. १४९-५०; ओळी ८-११)

**ओळ**

८-एतेण कु-

९-शलमुलेन बुधेहि च षवएहि च

१०-समं सद भवतु

११-भ्रतर स्वरबुधिस [।*]

[या आनंदाच्या मुळाच्या (पुण्याईच्या) योगे बुद्ध व श्रावक यांच्यासह माझा भाऊ स्वरबुद्धि याकरिता हे असो !

---

१ *C.I.I.*, Vol. IV, p. 3.

२ *Ibid*, Vol. II, part i, pp. 149 f.

(२) संवत् २८ चा हिड्डा येथील कोरीव लेख (कॉ. इ. इं., व्हॉ. २, १, पृ. १५८)

**ओळ** २ – एतेन कुशलमुलेन तेष धर्मन अभिबुति येष धर्मखए बोधिसत्वशरिर सर्वसत्वन निर्वनसंभरए भवतु रजस अग्रप्रचंशए।

[ या आनंदाच्या मुळाच्या (पुण्याईच्या) योगे हे बोधिसत्त्वाच्या शरीराचे अवशेष, जेथे धर्मक्षय आहे त्या ठिकाणी त्या अधर्माचा पाडाव करून, सर्व प्राण्यांच्या निर्वाण-साधनाकरिता आणि त्यातही राजाच्या मुख्य वाटयाकरिता, प्रवृत्त होवो ! ]

(३) वर्दक येथील भाजनलेख कॉ. इ. इं., व्हॉ. २, १, पृ. १७०.

**ओळ** २ – इमेण कुशलमुलेण महरज – रजतिरज – हुवेष्कस अग्रभग्रए भवतु [।*]

[ या आनंदाच्या मुळाने (पुण्याईने) हे महाराज, राजातिराज हुवेष्क याच्या मुख्य भागाकरिता प्रवृत्त होवो ! ]

या तीन्ही उताऱ्यांत स्टेन कोनोने 'कुशलमूल' याचा अर्थ root of bliss 'आनंदाचे साधन' अर्थात् 'पुण्य' असा केला आहे. कारण पुण्यामुळेच परलोकी प्राण्यास आनंद प्राप्त होतो. हा शब्द केवळ खरोष्टी लेखांतच येतो असे नाही. अलीकडे तो आम्हांला एका संस्कृत लेखात– तुम्मलगुडेम येथील विष्णुकुंडी नृपति द्वितीय गोविंदवर्मा याच्या लेखात[१]– आढळला आहे. खालील उतारा पाहा —

**ओळ**

२१ – स्वस्या अग्र –

२२ – महिष्याः परममहादेव्या विहारस्य दीपधूपगन्धपुष्पध्वजपान-
भोजनशयनासनग्लान –

२३ – भैषज्यखण्डस्फुटितशीर्णसंस्कारादिकुशलमूलानुपच्छेदार्थम् . . . ।

यातील 'पानभोजनशयनासनग्लानभैषज्य' हे शब्द मागील विहा-रस्य याशी जोडावयाचे नसून त्यांचा संबंध तेथील भिक्षूंशी आहे. त्या लेखात उल्लेखिलेले दोन गावांचे दान त्या राजाने विहारातील बुद्ध-मूर्तीच्या पूजेकरिता पुष्पादि सामग्री, विहाराची डागडुजी आणि त्यातील भिक्षूंचे अन्नपान इत्यादिकांमुळे उत्पन्न होणारे समग्र पुण्य (स्वस्या अग्रम-हिष्याः कुशलमूलानुपच्छेदार्थं) आपल्या पट्टराणीला मिळावे म्हणून दिले होते. येथेही 'कुशलमूल' हाच शब्द योजिला आहे आणि त्याचा अर्थ 'परलोकीच्या कुशलत्वाचे कारण अर्थात् पुण्य' असाच आहे.

---

१ या ताम्रपटाच्या कालाविषयी इतरत्र (सं. मु., सर ८, पृ. १६२ इ.) केलेले विवेचन पाहा.

वरील विवेचनावरून उषवदाताच्या नाशिक येथील लेखात 'कुशलमूल' हाच शब्द कोरावयाचा होता हे दिसून येईल. तेथे त्याचा अर्थ 'आरोग्याचे साधन' अर्थात् 'औषध' असा होता. पण कालान्तराने त्याचा अर्थ 'परलोकीच्या आनंदाचे साधन' अर्थात् 'पुण्य' असा झाला असे दिसते.

परिशिष्ट सातवे

# कोरीव लेखांवर आणि इतिहासावर आणखी काही टिप्पणे

हा ग्रंथ छापला जात असता त्यातील काही कोरीव लेख व नाणी यांवरील लेख अवलोकनात आले. त्यांविषयी संक्षिप्त विवेचन पुढे केले आहे.

**क्र. ५० — खावडा येथील प्रथम रुद्रदामन्च्या काळचा लेख —** हा लेख पी. आर. श्रीनिवासन यांनी ए. इं., व्हॉ. ३७, पृ. १३९–४२ वर छापासह संपादिला आहे. त्यावरून असे दिसते की तो देवदत्तपंत भांडारकरांनी क्र. ४६–४९ च्या लेखांबरोबर अन्धौ येथेच पाहिला होता. अन्धौ ही खावडा गावाची वाडी आहे.

श्रीनिवासनांनी या लेखातील कालोल्लेख 'वर्ष [५]३, श्रावणस ब. ५' असा वाचला आहे. पण ५३ ही संख्या अस्पष्ट आहे. 'ब'(बहुल)चे हे रूप इतरत्र कोठेही आढळत नाही. आम्ही ते १० या संख्येचे द्योतक मानले आहे तेही संशयास्पद आहे. काही अंशी यासारखे चिन्ह १०० या संख्येचे दर्शक म्हणून द्वितीय भीमसेनाच्या आरंग ताम्रपटाच्या शेवटच्या ओळीत आले आहे. (ए. इं., व्हॉ. ९, पृ. ३४४ च्या समोरील पट्टिका पाहा.) पण ती संख्या येथे विवक्षित असणे शक्य नाही. या तऱ्हेचे चिन्ह १० या संख्येचे द्योतक म्हणूनही कोठे आढळत नाही. पुढील चिन्ह ५ या संख्येचे द्योतक म्हणून घेतले जाते तेही निश्चित नाही. त्यासारखे चिन्ह दशांश पद्धतीतील ९ या अंकाचे द्योतक म्हणून आढळते. [ब्यूह्लरची पट्टिका ९ (ब) यातील ९ या अंकाची रूपे पाहा.] एकंदरीत या लेखातील काळाचे वाचन निश्चित नाही.

पण प्रस्तुत लेखावरून एवढे मात्र दिसते की त्या काळी चष्टन व रुद्रदामन् यांचा संयुक्त कारभार नव्हता. रुद्रदामन् हाच क्षत्रप होता. टॉलेमी (सन १४०, शक वर्ष ६२) सांगतो की त्या काळी चष्टन उज्जयिनीस राज्य करीत होता. म्हणून प्रस्तुत लेखातील वर्ष शक संवत् ६२ नंतरचे असले पाहिजे. ते शक वर्ष ५३ असणे शक्य नाही. ते शक संवत् ६३ असणेच संभवनीय आहे.

**क्र. ५३ — वांढ येथील प्रथम रुद्रसिंहाच्या काळचा लेख —** हाही लेख पी. आर. श्रीनिवासनांनी ए. इं., व्हॉ. ३७, पृ. १४२ इ. वर छापासह संपादिला आहे. त्यांनी यातील वर्ष १०५ असे वाचले आहे. या लेखाची पट्टिका अस्पष्ट असल्याने त्याचे वाचन बहुतांशी संदिग्ध आहे. श्रीनिवासनांचे वाचन खाली दिले आहे.

**वाचन**

**ओळ**

**१ राज्ञो महाक्ष[त्र]पस स्वामि[रुद्र]दामपुत्र –**
**२ स [रा]ज्ञो म[हाक्षत्र]पस स्वामिरुद्रसिंह –**
**३ स वरिशे १०० [५] [कार्त्ति]क ब[हुल] दिवसे बितिपा ––**
**४ अयां तिथौ मात्रिसेविकए गों . न्द्रकं[ठित] अतिमु ––**
**५ तकसगोत्राए [जश्टि] अजमित्रेण उथपित**
**६ कशदेशिकए [।*]**

**क्र. ६१ –– मेवासा येथील भर्तृदामनच्या काळचा लेख ––** हाही लेख पी. आर. श्रीनिवासनांनी ए. इं., व्हॉ. ३७, पृ. १४४ इ. वर छापासह संपादिला आहे.

या लेखाच्या शीर्षभागी असलेल्या आकृतीचे वर्णन श्रीनिवासनांनी निराळ्या प्रकाराने केले आहे. त्यांच्या मते मधल्या दिव्याच्या डाव्या बाजूस डमरू आणि उजव्या बाजूस दुसरा एक लहान दिवा आहे. या सर्व आकृत्या मंगलवाचक आहेत असे त्यांना वाटते.

प्रस्तुत लेखाच्या उजवीकडची लहानशी पट्टी फुटून नष्ट झाली आहे हे त्यांच्या लक्षात आले नाही. त्यांनी तिसऱ्या ओळीच्या शेवटी 'वर्षशत' आणि चौथ्या ओळीच्या आरंभी '२ ५ उत्रे कदंबपुत्रस्य · · ·' इत्यादि, आणि सहाव्या ओळीच्या आरंभी 'कार्तिकस शुक्ल ५' असे वाचले आहे. हे वाचन छापाला धरून नाही. श्रीनिवासनांच्या मते या लेखाची मिति [शक] वर्ष २०५ कार्त्तिक शुक्ल ५ आहे. या लेखातील काही व्यक्तिनामांचे त्यांचे वाचन निराळे आहे, पण त्याला महत्त्व नाही.

आमच्या प्रमाणे श्रीनिवासनांनीही या लेखाच्या दुसऱ्या-तिसऱ्या ओळीत लेखकाच्या चुकीमुळे काही शब्दांची द्विरुक्ति झाली आहे, असे म्हटले आहे.

## सातवाहनांचा इतिहास

सातवाहन राजवंशाचा मूळ पुरुष सातवाहन याची नाणी अंध्र प्रदेशातील हैदराबाद, मेदक जिल्ह्यातील कोंडापूर, पश्चिम महाराष्ट्रातील नेवासे आणि विदर्भातील अकोला येथे सापडली आहेत. तो ख्रिस्तपूर्व २३६ मधील अशोकाच्या निधनानंतर लौकरच उदयास आला असावा. नंतर त्याने दक्षिणेत आपली सत्ता पसरविली असे दिसते. त्याच्या नंतरच्या त्याच्या वंशातील सिमुक सातवाहनाची नाणी आतापर्यंत सापडली नव्हती. ती

अलीकडे अंध्र प्रदेशाच्या करीमनगर जिल्ह्यातील गोदावरी नदीच्या काठच्या कप्परावपेट गावात मिळाली आहेत.[१] त्यांपैकी एक पोटिनचे आणि बाकीची पाच तांब्याची आहेत. त्यांच्या पुढील बाजूवर हत्तीच्या पाठीवर 'रञो सिरि छिमुक सातवाहनस' या पूर्ण लेखापैकी काही अक्षरे आणि मागील बाजूवर उज्जैनी चिन्ह आणि स्वस्तिकाची आकृति आढळते.

ही नाणी सिमुक सातवाहनाची होत यात संशय नाही. पण त्यांच्या त्या प्रदेशातील प्राप्तीवरून सातवाहन राजे मूळचे अंध्रातील होत असा जो निष्कर्ष काही विद्वान् काढतात तो चुकीचा आहे. मागे सांगितल्याप्रमाणे सिमुकापूर्वीच्याही वंशकर्त्या सातवाहन राजाची नाणी करीमनगर जिल्ह्याच्याही दक्षिणेस मेदक जिल्ह्यातील कोंडापूर येथील उत्खननात सापडली आहेत. तेव्हा त्यात नवीन असे काही नाही. नाणेघाटातील नागनिकेच्या लेखात आलेल्या वर्णनावरून सिमुक याने सबंध दक्षिणापथावर आपला अंमल बसवून 'दक्षिणापथपति' ही पदवी धारण केली होती असे आम्ही मागे (पृ. [८] वर) दाखविले आहे. तेव्हा त्याची नाणी पश्चिम महाराष्ट्रातील त्यांच्या मूळस्थानाहून दूरवर अंध्र प्रदेशात सापडली तर त्यात नवल नाही. सातवाहनांचे आरंभीचे कोरीव लेख पश्चिम महाराष्ट्रातच सापडले आहेत. त्यांच्या राज्यकालाच्या अखेरीस झालेल्या विजय सातकर्णीने अंध्रात आपल्या नावे विजयपुरी (सध्याचे नागार्जुनकोंड) नामक नगरी स्थापून तेथे आपली राजधानी केल्यामुळे पुराणांत या वंशाला चुकीने अंध्र म्हटले आहे, हे आम्ही मागे सविस्तरपणे दाखविले आहे.[२]

## विजय सातकर्णीचे प्रतिमायुक्त नाणे

मुम्बईतील प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियमचे सन्मान्य नाणक सल्लागार श्री. एस्. एम्. शुक्ल यांना गुजराथेत मिळालेले विजय सातकर्णीचे प्रतिमायुक्त नाणे डॉ. शोभना गोखले यांनी प्रसिद्ध केले आहे. त्याच्या पुढील बाजूवर उजवीकडे वळलेला राजाचा चेहरा आणि सभोवार 'रञो वासिठिपुतस. . . . सातकणिस' असा लेख आणि मागील बाजूवर उज्जैन चिन्ह, जवळ सहा टेकड्यांचा पर्वत, खाली नदी व वर चंद्र-सूर्यांची चिन्हे असून सभोवार [अरहणष] वाहिठिपुतस हिरुविजय [हातकणिष] असा लेख आहे.

यापूर्वी विजय सातकर्णीची प्रतिमारहित नाणी विदर्भात चंद्रपूर (चांदा) येथे व तऱ्हाळ्याच्या नाणकसंचयात सापडली होती, पण त्यांवर त्याच्या

---

१ *J. E. S. I.*, V, pp. 136 f.

२ मागे, पृ. [८] ते [१५] पाहा.

मातृनामाचा निर्देश नव्हता. या नाण्यावर तो 'वासिष्ठीपुत्र' या शब्दाने दाखविला आहे. तेव्हा गौतमीपुत्र सातकर्णीला वसिष्ठगोत्री राणीपासून पुळुमावि, स्कन्द सातकर्णि आणि विजय सातकर्णि असे तीन पुत्र झाले असे दिसते. याच विजय सातकर्णीचा उल्लेख क्र. ३१ च्या लेखात वासिष्ठीपुत्र सातकर्णि असा आला आहे. त्यात त्याचे वैयक्तिक नाव विजय हे आले नव्हते. ते या नाण्यावरून आता माहीत होत आहे. त्याच्या या नाण्यावर तेलुगु शब्द असल्यामुळे त्याचे राज्य (विदर्भाप्रमाणे) अंध्र देशावर होते हे स्पष्ट दिसते.

हा वासिष्टीपुत्र विजय सातकर्णि क्र. ३२ च्या नागार्जुनकोंड स्तंभलेखात उल्लेखिलेल्या गौतमीपुत्र विजय सातकर्णीहून भिन्न होता. तो दुसरा विजय सातकर्णि सातवाहनकालाअखेर अंध्रात राज्य करीत होता हे पृ. [३६] वर दाखविले आहे.

* * *

**राज्यशासन, पृष्ठ [ १०३ ] व [ १०७ ]**—मल्हारा ताम्रपटाच्या (क्र. ६४) ओळ ३४ मधील 'काष्ठिक' याचा अर्थ 'कचेरीतील दंडधारी सेवक' असा आहे. त्या शब्दाचा त्या अर्थी उपयोग 'पादताडितक' नामक भाणात आला आहे. 'चतुर्भाणी' (सं. मोतीचंद्र, १९५९), पृ. २१० वर या सेवकांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचा उल्लेख 'काष्ठकमहत्तर' असा आला आहे. तेव्हा मल्हारा ताम्रपटातील 'काष्ठिक' हा निर्देश चुकीचा नाही.

# सूची

[खालील सूचीतील शब्दांपुढील आरंभीचे कंसविरहित अंक भाग २ मधील पृष्ठांचे, आणि नंतरचे काटकोनाकृति कंसातील अंक भाग १ मधील पृष्ठांचे समजावे. नृ. = नृपति आणि क्ष. = क्षत्रप.]

## अ

### आ—चालू



### इ



### उ



### ऊ



### ऋ

ऋ--चालू



ए



ओ



क

**च**—चालू

द—चालू



ध

## न

**प**—चालू

**प—चालू**



**फ**

फ—चालू



ब

ब—चालू



भ

**भ—चालू**



**म**

**म—चालू**



**य**



**र**

र—चालू

व—चालू

व—चालू

श—चालू



ष



स

स—चालू

स--चालू

स—चालू



ह



क्ष

शासकीय मुद्रणालय, नागपूर.

## पट्टिका ४

# आदित्यराजाचा मल्हारा ताम्रपट



आकृति ४—पहिला पत्रा



आकृति ५—दुसरा पत्रा : पहिली बाजू

## पट्टिका ७

# आदित्यराजाचा मल्हारा ताम्रपट

आकृति १०—चौथा पत्रा : दुसरी बाजू

आकृति ११—पाचवा पत्रा

पट्टिका ८



आकृति १२—नाशिक येथील भटपालिकेचे चैत्य लेणे



आकृति १३—नाशिक येथील ऋषभदत्ताचे विहार लेणे



आकृति १४—नाशिक येथील गौतमीपुत्र सातकर्णीचे देवी-लेणे

## पट्टिका १०



आकृति १५—नाशिक येथील देवी-लेण्याचा दरवाजा



आकृति १६—कार्ले येथील चैत्य लेण्याच्या दात्यांच्या प्रतिमा



आकृति १७—कार्ले येथील चैत्य लेण्याचा दर्शनी भाग



आकृति १८—कार्ले येथील चैत्य लेण्याचा आतील भाग



आकृति १९——अमरावती येथील स्तूपाला लावलेला शिल्पपट्ट



आकृति २०——अमरावती येथील स्तूपाच्या कठड्याच्या सूचीवरील नलगिरि-हस्तिदमनाचा शिल्पपट्ट



आकृति २१—राजा मांधाता (भाजे येथील लेणे)



आकृति २२—उत्तर कुरूवरील स्वारीत राजा मांधाता (भाजे येथील लेणें)

पट्टिका १६



आकृति २४—माट येथील महाक्षत्रप चष्टनाचा पुतळा (मथुरा संग्रहालय)

पट्टिका १७







आकृति २५—अजंठा क्र. १० च्या लेण्यातील षड्दन्तजातक कथेतील दृश्य

पट्टिका १८



आकृति २६—मातृदेवता (ब्रम्हपुरी उत्खनन)



आकृति २७—ग्रीक देव पोसीडन (ब्रम्हपुरी उत्खनन)




२८




२९

आकृति २८ व २९––सातवाहन




३०



३१

आकृति ३१––सातवाहन




३२

आकृति ३० व ३२––सातकर्णि



आकृति ३३—सातकर्णि व नागनिका (प्लॅस्टर कास्ट वाढीव आकार)





आकृति ३४—शक्ति



आकृति ३५—आपीलक (वाढीव आकार)




तऱ्हाळे येथील संचयातील पोटीनची नाणी—क्र. १–७ आणि ११–१२ : गौतमीपुत्र सातकर्णि; क्र. ८–१४ : पुळुमावि; क्र. १५–१६ : स्कन्द सातकर्णि; क्र. १७–२१ : यज्ञ सातकर्णि ; क्र. २२–२३ : विजय सातकर्णि; क्र. २४–२५ : कुंभ सातकर्णि; क्र. २६–२८ : कर्ण सातकर्णि; क्र. २९–३० : शक सातकर्णि ; क्र. ३१–३२ : पुळुमावि.

## पट्टिका २२ (नाणी)



आकृति ३६—गौतमीपुत्र सातकर्णि (प्रतिमायुक्त)



आकृति ३७—वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावि



आकृति ३८—वासिष्ठीपुत्र पुळुमावि (प्रतिमायुक्त)

## पट्टिका २३ (नाणी)





३९ ४०

आकृति ३९——वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णि
आकृति ४०——वासिष्ठीपुत्र स्कन्द सातकर्णि (प्रतिमायुक्त)





४१ ४२

आकृति ४१——वासिष्ठीपुत्र सातकर्णि (प्रतिमायुक्त)
आकृति ४२——गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि

## पट्टिका २४ (नाणी)







४३ ४४

आकृति ४३—यज्ञ सातकर्णि (दोन शिडांचे जहाज)

आकृति ४४—गौतमीपुत्र विळिवायकुर




आकृति ४५—महारठि माढरीपुत्र शिवलकुर

## पट्टिका २५ (नाणी)






आकृति ४६—**महासेनापति भरद्वाजपुत्र शक मान महिष**



आकृति ४७—**राजा शक मान महिष**



आकृति ४८—**राजा शक मान महिष**

## पट्टिका २६ (नाणी)



आकृति ४९—नहपान



आकृति ५०—चष्टन



आकृति ५१—ईश्वरदत्त (वर्ष १५४)



ओळ १—डावा अर्ध भाग



ओळ १—उजवा अर्ध भाग

आकृति ५२ (अ)—वनवासी येथील चुटुकुलानन्द सातकर्णीचा शिलालेख : संवत्सर १२

पट्टिका २८



आकृति ५३—दौलतपूर येथील चष्टनाच्या काळचा लेख : वर्ष ६

पट्टिका २९



आकृति ५४—अन्धौ येथील चष्टनाच्या काळचा लेख : वर्ष ११

पट्टिका ३०



आकृति ५५——मेवासा येथील भर्तृदामन्च्या काळचा लेख : वर्ष २०३

# सातवाहनांच्या आणि प
# क्षत्रपांच्या कोरीव लेख
# व नाण्यांची प्राप्तिस्थ

- ▷ राजधानी
- □ शिलालेखांचे प्राप्तिस्थ
- △ ताम्रपटांचे प्राप्तिस्थ
- ◎ नाण्यांचे प्राप्तिस्थान

पंजाब

किस्तान

राजस्थान

पुष्कर

मध्य प्रदेश

सर्वाणिया
उज्जैन
इंदूर
विदिशा
सांची
त्रिपुरी
महेश्वर
नर्मदा
वाळपूर

गुजरात

मेवासा
अन्धौ
वांढ
प्रभास
गुंदा
मूलवासर
राजकोट
गढा
इटावा
लाठी
जुनागड

विदर्भ

अचलपूर
मल्हारा
पौनी
तऱ्हाळा
वाशीम

महाराष्ट्र

नाशिक
जोगळटेंभी
पैठण
जुन्नर
नेवासे
नाणेघाट
कार्ले
रांजणगाव
वाटेगाव
कोल्हापूर
गोदावरी
भीमा
कृष्णा

आंध्र

कोंडापूर
हैद्राबाद
कोंडवली
वेंगी
अमरावती
नागार्जुनकोंड (विजयपुरी)
चिन
अडोणी
म्याकडोनी
तुंगभद्रा

म्हैसूर

गोवे
वनवासी
मळवल्ली

अरबी समुद्र

ओ




प्रमाण